


घनघोर युद्ध सुरू झालें, दुर्योधनानें आपल्या भावांच्या विचारानें पांडव सेनेचा पूर्ण पाडाव करण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें त्यानें भीष्माच्या बाजूस जाऊन पांडव सेनेवर निकराचा हल्ला केला. तें पाहून विराटाचा मुलगा श्वेत यानें भीष्माला सोडून दिलें व त्यांच्यावर जोराचा हल्ला केला. त्याच्या हल्ल्यानें कौरव सैन्य सैरावैरा पळूं लागलें. पुन्हां श्वेतानें भीष्माशीं द्वंद्व आरंभिलें. त्यानें भीष्माच्या रथावरील झेंडा उडवून दिला आणि त्यांच्या हातांतील धनुष्य तोडून त्याला पुरेसें करून सोडलें. सर्वांना वाटलें कीं भीष्म धारातीर्थी पडला. म्हणून पांडवांनीं आनंदानें शंखनाद केला.

दुर्योधन घाईनें भीष्माचार्यांच्या मदतीस गेला व त्यांना धीर देत म्हणाला—"हा पहा श्वेत आतां मारला जातोय." एवढ्यांत बाह्लिक, कृतवर्मा, कृप, शल्य, विकर्ण वगैरे वीर एकट्या श्वेतावर तुटून पडले. जणूंकांहीं भीष्माचार्यांहून मोठा योद्धा तोच आहे.

श्वेत कचा योद्धा नव्हता. त्या सर्वांस पुरून उरणारा होता. त्या सर्वांना तोंड देत असतां सुद्धां त्यानें भीष्माच्या हातांतील धनुष्यबाण तोडलें. एवढा मोठा वीर भीष्म पण तो सुद्धां श्वेताचे बाणअडवूं शकला नाहीं. श्वेताचा हा पराक्रम पाहून कौरवांच्या तोंडाचें पाणी पळालें.

भीष्महि कांहीं कच्चा दिलाचा नव्हता. त्यानें आपल्या बाणांनीं श्वेताचा रथ, घोडे व सारथी सर्वांचाचा नाश केला. त्याबरोबर श्वेत रथावरून खालीं उतरला व एक प्रलयंकारी शक्ति भीष्मावर सोडली. परंतु भीष्मानें वाटेंतच तिला नष्ट केलें. श्वेत चेवला. त्यानें रागारागानें आपली मोठी गदा उचलली व भीष्माच्या रथावर फेंकली. भीष्माला त्याची कल्पना असल्यामुळें तो अगोदरच रथाखालीं उतरून गेला होता.

दुसऱ्या रथांत बसून भीष्मानें श्वेतावर हल्ला केला. तोंपर्यंत पांडव सैन्य श्वेताच्या मदतीस आलें. परंतु भीष्मानें आपल्या बाणांनीं त्यांना दूर थोपवून धरलें व श्वेतावर ब्रह्मास्त्रासारखाच एक भयंकर शक्तिबाण सोडला. तो त्याच्या शरिरांतून आरपार निघून गेला.

श्वेताला पडलेला पाहून विराटाचा दुसरा पुत्र शंख ह्याला फार राग आला. तो शल्यावर सूड उगवण्यासाठीं धावून गेला. पण कौरव सैन्यानें त्याला पाठीशीं घेतलें व भीष्म पुढें आला. इकडे शंखाच्या मदतीला म्हणून अर्जुन धांवून आला.

ह्या पहिल्या दिवसाच्या युद्धांत पांडव सैन्यावर भीष्म तुटून पडला होता. कीड मुंग्यांप्रमाणें पांडव दल मरून पडत होतें. संध्याकाळीं सूर्यास्त होतांच युद्ध संपलें.

ह्या पहिल्या दिवसाच्या युद्धांतच युधिष्ठिर निराश झाला. तो आपल्या भावांना बोलावून घेऊन श्रीकृष्णाकडे गेला. म्हणाला—"आपल्या सर्व सैन्याचा बळी घेऊनच भीष्म



शस्त्र खालीं ठेवणार असें दिसतें आहे. केवळ राज्यलोभानें मी ह्या युद्धाला तयार झालों होतों. पण मला वाटतें, भीष्माच्या हातून ह्या सर्वांचा बळी पडण्यापेक्षां आपणच जंगलांत कुठेंतरी जाऊन तप करीत बसावें. आमच्या मध्यें अर्जुन धीराचा योद्धा. पण त्याचाहि मागचा पायच दिसला. भीम मात्र धीरानें लढला. भीष्माची ती भीषण चर्या पाहून भय वाटलें आम्हांला. ह्या युद्धांत आपल्या बाजूचें युद्ध संचालन उत्तम व्हावें असें जर वाटत असेल तर तूंच भीष्माच्या तोडीच्या वीरांना निवडून काढ. हें सर्व

मुख-पृष्ठावरील गोष्ट



तुझ्यावर अवलंबून आहे. नाहीं तर आम्हांला ह्या युद्धांत जयाची आशा नाहीं."

कृष्ण म्हणाला—"तूं कशाला एवढें मनाला लावून घेतोस? तुमचा सेनापति एवढा मोठा धृष्टद्युम्न असल्यावर तुझे भाऊ एकेक महारथी असल्यावर मग कसली शंका? कोणास ठाऊक एखादवेळीं शिखंडीच्या हातून सुद्धां भीष्म मारला जाईल. असे हातपाय गाळून काय उपयोग."

हें ऐकून युधिष्ठिर धृष्टद्युम्नाकडे वळून म्हणाला—"सेनापति! देवांचा जसा कार्तिकेय तसा तूं आम्हांला आहेस. ह्या युद्धांत यश अपयश सर्व तुझ्या हातीं आहे. म्हणून तूं सैन्याच्या अग्रभागीं राहून सैन्याचें संचालन कर. आम्हांला मार्ग दाखव. आपल्याला विजय मिळाला पाहिजे."

"महाराज! आपण काळजी करूं नका. या युद्धांत आपणांस यश मिळणार आहे. आणि द्रोण तर माझ्या हातूनच मारला जाणार आहे. हें युद्ध फार रंगणार आहे. आपण नुसतें पाहात राहा." धृष्टद्युम्न म्हणाला.

त्याचें बोलणें ऐकून सर्वांना चेव चढला.

"मला वाटतें उद्यांच्या युद्धांसाठीं आपण वारुण व्यूह रचूं व आपली सेना त्यांत सज्ज करून ठेवूं. हा व्यूह शत्रूला अजेय आहे. यामुळें आपल्या सर्व सैन्याचें रक्षण होईल." युधिष्ठिर म्हणाला.

दुसरे दिवशीं सूर्योदयापूर्वीच पांडव सेना युद्धास तयार झाली. ह्या दिवशीं सेनेच्या आघाडीवर अर्जुन होता. सेना एकाचा क्रौंच पक्षाच्या आकृती प्रमाणें उभी करण्यांत आली होती. मुख्य मुख्य ठिकाणीं मोठेमोठे वीर उभे होते. दोन्ही बाजूस भीम व धृष्टद्युम्न उभे होते. डोक्याच्या ठिकाणीं अर्जुन मेरू पर्वताप्रमाणें तळपत होता. दुर्योधनानेंहि आपली सेना एका व्यूहा-



प्रमाणें उभी केली होती. प्रत्येक नाक्याच्या जागांवर महारथ्यांना त्यानें उभें केलें होतें. अग्रभागीं भीष्मपितामह स्वतः असून त्यांच्या मदतीला शूरवीर नेमले होते. सूर्योदयाबरोबर कौरव सेना युद्धभूमीकडे निघाली. दोन्हीं सैन्यांतील योध्यांनीं शंखनाद केला आणि युद्धास आरंभ झाला.

दोन्हीं बाजूंनीं बाणांचा वर्षाव होऊं लागला. भीष्मानें आपल्या बाणांनीं भीम, अर्जुन, अभिमन्यु, कैकेय, विराट वगैरेंना हैराण करून सोडलें. त्यांनीं भीष्माला थोपवून धरण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु भीष्मानें शेवटीं त्यांनीं रचलेला व्यूह मोडून टाकला.

अर्जुनाला राग आला. त्याला वाटलें अशा तऱ्हेनें आपले सर्व वीर भीष्माच्या तलवारीला बळी पडतील. म्हणून प्रथम त्यांचा समाचार घेतला पाहिजे. त्यानें कृष्णाला सांगून आपला रथ भीष्माकडे वळविला. वाटेंत आलेली कौरव सेना उध्वस्थ करीत तो पुढें निघाला.

भीष्माच्या रोखानें अर्जुन येत असलेला पाहून द्रोण, कृप, शल्य, दुर्योधन अश्वत्थामा विकर्ण वगैरेंनीं त्याच्यावर बाण वृष्टि करण्यास



आरंभ केला. अर्जुनानें त्या सर्व बाणांना आपल्या बाणांनीं मध्येंच अडविलें. अर्जुनासमोर ते किती वेळ टिकाव धरणार. त्यांत सात्यकी, विराट, धृष्टद्युम्न, उपपांडव, अभिमन्यु वगैरे त्याच्या मदतीला धावून आले.

दोन्ही पक्षांत घनघोर युद्ध सुरू झालें. अर्जुन त्वेशानें बाणावर बाण सोडून कौरव सेनेचा संहार करीत होता. तेव्हां दुर्योधन भीष्माला म्हणाला—"आजोबा! आज मध्यम पांडव अर्जुनाला त्वेश चढलेला दिसतो आहे. तो आपली सारी सेना कापीत सुटला आहे. तुमच्या मुळेंच कर्ण युद्धाला आला



नाहीं. एकटा कर्णच त्याला थोपवूं शकेल. परंतु आतां तुम्हीच अर्जुनाला मारण्याचा कांहीं तरी उपाय करा. आज तो मारला गेला नाहीं तर उद्यां कांहीं आपलें सैन्य शिलक राहात नाहीं."

भीष्माचें क्षात्रतेज स्फुरण पावलें. तो आवेशानें अर्जुनावर तुटून पडला. दोघांचें निकराचें युद्ध सुरू झालें. दोघांच्या रथांचे झेंडे तुटून खालीं पडले. दोघांनीं एकमेकांच्या घोड्यांना बाण मारले. भीष्मानें शेवटीं अर्जुनाचा सारथी कृष्ण ह्याच्यावर तीन बाण सोडून त्याला घायाळ केलें. अर्जुनानें प्रत्युत्तर म्हणून भीष्माच्या सारथ्यावर तीन बाण सोडले. पुढें ते दोघे परस्परांला हारवण्यासाठीं जिवापाड प्रयत्न करूं लागले. पण कांहींच निष्पन्न होईना. दोघेहि एकाहून एक वीर शिरोमणि होते. सर्व वीर भीष्मार्जुनांचें युद्ध पहात कौतुक करीत उभे राहालें.

तेथें जवळच त्या दोघांच्या मदतीला आलेल्या द्रोण धृष्टद्युम्न ह्यांचें युद्ध सुरू झालें. दोघे एकमेकांवर जोरजोरानें बाण सोडूं लागले. लढतां लढतां द्रोणानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य तोडून टाकलें व घोड्यांना मारलें. रथ मोडला. सारथ्याला ठार केलें. त्याचें हें काम पाहून असें वाटूं लागलें कीं द्रोण धृष्टद्युम्नाला मारणार. परंतु धृष्टद्युम्नानेंहि द्रोणाची शक्ति व गदा नष्ट करून टाकली होती. रथ मोडल्यामुळें धृष्टद्युम्न ढाल तलवार घेऊन द्रोणावर धावला. परंतु त्यानें आपल्या बाणांनीं त्याला पुढें येऊं दिलें नाहीं.

धृष्टद्युम्नाला निःसहाय पाहून भीम त्याच्या मदतीला गेला. त्यानें त्याला एका रथांत बसविलें. तिकडून दुर्योधनानें द्रोणाच्या मदतीसाठीं कलिंग राजाला सेनेसह पाठवून दिलें. त्यांनीं भीमाला घेरून टाकलें व बाण वृष्टि करूं लागले. कलिंगाचा राजकुमार





शुकदेव यानें भीमाच्या रथाच्या घोड्यांना मारलें. त्या रागांत भीमानें आपल्या रथांतूनच लोखंडाची गदा फेंकून शुकदेवाला मारली. तेथल्या तेथेंच तो गार झाला. त्याच गदेच्या धक्क्यानें त्याच्या रथाचा झेंडाहि खालीं पडला.

कलिंगाच्या सैन्यानें भीमावर चारी बाजूंनीं एकदम आक्रमण केलें. पण भीमानें ढाल तलवारीनें त्यांची बाणवृष्टि अडवली. कलिंगाचा दुसरा राजपुत्र भानुमंत त्यांत होता. तो हत्तीवर बसून युद्ध करीत होता. भीमाला पाहिल्या बरोबर त्यानें जोरानें गर्जना करून भीमाला आव्हान केलें. त्याची गर्जना ऐकून भीमासहि चेव आला. तो त्याहून मोठ्यानें गर्जना करीत त्याच्यावर धावून गेला. त्यानें जोरानें त्याच्या हत्तीचा दांत धरून ओढला. त्यावर पाय देऊन तो वर चढला व आपल्या तलवारीच्या एका वारानें भानुमंताचें मुंडके खालीं पाडलें. त्याच झपाट्यांत त्यानें त्याच्या साथीदारांना सुद्धां जमिनीवर लोळवून हत्तीला सुद्धां मोक्षमार्ग दाखविला. नंतर तो कलिंगाच्या सेनेचा संहार करूं लागला. त्याच्या जवळ तलवारी शिवाय कोणतेंहि शस्त्र नव्हतें. त्यानें आपल्या तलवारीनेंच कौरवांच्या गजबलाचा नाश केला. रथदलानें जवळ येण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु कोणीहि त्याच्या जवळ येऊं शकलें नाहीं. शेवटीं त्यांनीं दुरून बाण मारावयास सुरवात केली. परंतु भीम आपली तलवार सारखी फिरवीत होता. त्यानें बाणवृष्टि अडविली. ह्या झटापटींत कलिंगाची बरीच सेना मारली गेली.

आपल्या सेनेचा संहार झालेला पाहून कलिंग राजा श्रुतायुष पुढें आला व भीमाशीं युद्ध करूं लागला. त्यानें आपल्या बाणांनीं भीमाला चारी बाजूंनीं घेरलें. तितक्यांत भीमाचा सारथी अशोक रथ घेऊन तेथें आला. भीम रथावर चढला व श्रुतायुष

बरोबर युद्ध करूं लागला. पण भीमापुढें त्याचा पाडाव लागला नाहीं. थोड्याच वेळांत तो मारला गेला.

भीमाला एकट्यालाच युद्ध करतांना पाहून धृष्टद्युम्नाला कौतुक वाटलें. तो आपल्या कडील बाकीच्या वीरांना प्रोत्साहन देण्यासाठीं म्हणाला—"अरे शिखंडी पाहातोस काय! भीमाप्रमाणें युद्ध कर. चला सर्व वीर. व्हा पुढें युद्धाला." आणि तो सात्यकीला घेऊन भीमाच्या मदतीला धावला.

इकडे कौरव सेनेंत ओरडा झाला कीं भीम सर्व कौरव सेना कापून काढीत आहे. त्यावरोबर भीष्म भीमाशीं युद्ध करावयास आला. भीमाबरोबर सात्यकी, धृष्टद्युम्न वगैरे होते त्या सर्वांशीं भीष्माचें युद्ध सुरूं झालें. भीष्मानें प्रथम भीमाच्या घोड्यांना मारलें. त्याबरोबर भीमानें एक शक्तिबाण सोडला. परंतु तो भीष्मानें मध्येंच अडविला. भीष्माचार्यांच्या तावडींतून भीमाला सोडविण्यासाठीं धृष्टद्युम्नानें भीमाला आपल्या रथावर बसविलें आणि दूर कुठें तरी नेलें. या अवधींत सात्यकीनें भीष्माच्या सारथ्यावर हल्ला करून त्याला मारलें. त्यामुळें भीष्माच्या रथाचे घोडे बिचकले व सैरावैरां पळूं लागले. हें पाहून भीमाला फार आनंद झाला. त्या आनंदाच्या भरांत त्यानें धृष्टद्युम्नाला आलिंगन दिलें. नंतर ते दोघे सात्यकीच्या जवळ आले. त्यांना पाहतांच सात्यकी रथाखालीं उतरला व भीमाला कडकडून भेटला. तो म्हणाला—"धन्य आहे भीमा तुझी. तूं एकट्यानें कलिंगाच्या राजाला व दोन्ही राजकुमारांना मारलेंस आणि कलिंगाच्या सर्व सैन्याची धुळधाण उडविलीस.

ह्या वेळेपर्यंत दुपार झाली होती.






[ ९ ]

[चंद्रवर्मा कपालिनीचा निरोप घेऊन उत्तर दिशेच्या अनुरोधानें निघाला. कृष्णसर्पानें एका विचित्र वृक्षापर्यंत नेऊन त्याला सोडलें. त्या वृक्षावरील एक फळ तोडून खाण्याबरोबर त्याला पशुपक्ष्यांची भाषा कळूं लागली. कांहीं अंतर चालून गेल्यावर त्याला अग्निप्रवाहाची नदी लागली. ती नदी पार करून जाणारा एक महासर्प पाहून व त्याच्या पाठीवरून कांहीं माकडें जात असलेलीं पाहून चंद्रवर्मा सुद्धां त्यांच्या पाठोपाठ निघाला व नदीपार जाऊन पोंचला—पुढें वाचा.]

चंद्रवर्मा सांपाच्या पाठीच्या पुलावरून तो अग्निप्रवाह पार करूं लागला. थोड्या वेळानें त्याला किनारा दिसल्याबरोबर त्यानें उडी मारली व किनारा गाठला आणि कोणत्यातरी झाडावर चढून लपून बसण्याचें त्यानें ठरविलें. त्याच्या सर्व अंगाला घाम सुटला. धापा टाकीत तो कसा बसा एका झाडाच्या बुंधाजवळ येऊन पोंचला. या वेळीं त्याची नजर त्या महाभयंकर सांपावर गडलेली होती. त्याचा तो दहा बारा फूट रुंदीचा जबडा झाडींतून पुढें सरकत येत असलेला त्यानें पाहिला. निखाऱ्यासारखे त्याचे भयंकर डोळे पाहून चंद्रवर्माच्या अंगाचा थरकाप उडाला. पण सुदैवानें सांपानें दुसऱ्याच बाजूला तोंड फिरविलें. बहुतेक चंद्रवर्मा त्याला दिसला नसावा.



थोड्या वेळानें त्याच्या शरिराचा बराचसा भाग पुढें सरकत झाडींत निघून गेला. सांपाची नजर आतां आपणावर पडणें शक्य नाहीं या गोष्टीची खात्री झाल्यावर चंद्रवर्मानें त्याचें शरीर न्याहाळून पाहिलें. त्याचें सर्व शरीर तेल लावल्यासारखें चमकत होतें. कातडें पोलादी कवचासारखें टणक होतें. एकदा तलवार खुपसून पहावी असा विचार करून त्यानें तलवारीचा एक वार केला. पण तो त्या सांपाच्या शरिरांत घुसण्य ऐवजीं खण असा आवाज मात्र झाला. सांपानें शेपटी देखील हलविली नाहीं. तो आपला पुढें जात होता.



चंद्रवर्मानें आश्चर्यानें एकदां आपल्या चारी बाजूला पाहिलें. फळांच्या भारानें वांकलेल्या झाडाच्या फांद्या पाहून तो जवळच्या झाडाकडे वळला. एक आंबा तोडून तो खाणार, एवढ्यांत त्याला दुरून हत्तीचें ओरडणें ऐकूं आलें. हत्तीचें तें ओरडणें केविलवाणें होतें. ज्या बाजूनें आवाज येत होता त्या बाजूला त्यानें वळून पाहिलें. त्याला हत्ती तर दिसला नाहीं. परंतु सोंसाट्याच्या वाऱ्यानें झाडें हलतांना मात्र दिसलीं. वारा नाहीं, मग हीं झाडें कां बरें हलत असावीं, हें त्याला कांहीं समजेना. त्याला कांहीं वेळानें हत्तीचें ओरडणें पुन्हां ऐकूं आलें. या खेपेस एकाच हत्तीचें तें ओरडणें नव्हतें. सबंध कळपच्या कळप ओरडत होता. सारें रान त्या आवाजानें दुमदुमलें.

चंद्रवर्मा ज्या झाडाच्या फांदीवर बसला होता त्या फांदीवरून उठून तो झाडाच्या अगदीं टोकाच्या फांदीवर जाऊन बसला. त्यानें तेथून जें दृश्य पाहिलें तें पाहून त्याचाच काय त्याच्याहून मोठमोठ्या बहाद्दरांचा थरकांप उडाला असता.

जो सांप तो अग्निप्रवाह पार करून आला होता त्यानें हत्तीला विळखा घातला











होता आणि त्याला सारखा आवळीत चालला होता आणि आपला भयंकर जबडा पसरून त्याला गिळण्याच्या प्रयत्नांत होता. आपला जीव वांचविण्यासाठीं हत्ती तडफडत होता. त्या हत्तीच्या चारी बाजूला कळपाचे हत्ती जमा झाले होते आणि केविलवाण्या आवाजांत ओरडत होते. आपल्या पुढाऱ्याची ती दुर्गत पाहून व स्वतः त्याचें सहाय्य करण्याची इच्छा असूनहि स्वतःस निरुपाय समजून सर्व जणुं कांहीं विह्वळत होते.

हत्ती व सांपाच्या त्या युद्धांत किती झाडें झुडपें दबलीं व चुरगळलीं गेलीं हें सांगणें कठीण होतें. परंतु त्या सांपाला त्याची वानवाच नव्हती. आपला विळखा जास्त जास्त आवळत त्यानें हत्तीला अगदीं असहाय करून टाकलें होतें. आपल्या त्या भयंकर जबड्यांत त्यानें हत्तीला ओढायला जसजशी सुरवात केली तसतसें हत्तीचें ओरडणें जास्तच केविलवाणें होत गेलें.

तें दृश्य पाहून चंद्रवर्मानें एकदां आकाशाकडे पाहिलें आणि देवाचा धांवा केला—"देवा, मी एकाहून एक भयंकर असे प्रदेश पाहिले आहेत. परंतु ह्याच्या इतका भयंकर देश मी कधीं पाहिला नाहीं. तुझी कृपा असेल तरच मी वांचेन. नाहींतर तुझ्या चरणीं माझा हा शेवटचा नमस्कार."

त्या अग्नि प्रवाहाच्या प्रदेशासमोर कपालिनीचें जंगल त्याला एखाद्या उद्यानासारखें भासलें. या प्रदेशांतून कित्येक योजन चालत जावयाचें होतें. तो आतां पर्यंत जें थोडें अंतर चालत आला होता तेवढ्यांत त्याला जे अनुभव आले त्यावरून पुढल्या मार्गाची त्याला पुरेपूर कल्पना आली. परंतु तो कच्चा दिलाचा नव्हता.







“देव तारी त्याला कोण मारी” ही एक खूणगाठ त्यानें हृदयांत घट्ट आवळून धरली आणि येईल त्या संकटाला धैर्यानें तोंड देण्याचें ठरविलें.

त्याची भूक तहान पार पळाली. त्यानें ज्या कामाची जबाबदारी स्वतः वर घेतली होती तें किती कठीण व किती भयंकर आहे याची त्याला पुरी कल्पना आली. डोळे मिटून झाडाच्या फांदीला घट्ट धरून तो बसून राहिला. ही कपालिनी आणि शंख यांच्या कारस्थानांतून आपल्याला सुटका मिळेल तर किती बरें होईल? परंतु सुटका कशी मिळणार व कोण देणार? सुटका नाहीं. पुढें मागें आजू बाजूला संकटें आहेत. महासागरांत एकाएकीं येऊन पडलेल्याला किनारा कोठून मिळणार? वहात वहात लागेल तोच किनारा.

चंद्रवर्मा याच विचारांत झाडावर बसल्या-बसल्याच झोंपीं गेला. त्याला सूर्यास्त झालेला कळला नाहीं कीं पशुपक्षी आपा-पल्या घरट्यांत परत येत असलेले कळलें नाहीं. घनदाट अंधकार पडला. आकाशांत तारे चमकूं लागले होते. परंतु चंद्राचें दर्शन मात्र कोठें होत नव्हतें.





अशा शांत वेळीं एकाएकीं सोसाट्याचा वारा आल्यानें त्याची झोंप मोडली. त्याला वाटलें कीं तो फांदीवरून वर कोठींतरी जाऊं लागला आहे. आपण कोठें जात आहों? कशांत सांपडलों आहों या विचारांत असतांनाच तो एका जागीं आदळला. एकाद्या कांबळ्यावर आदळलों कीं काय असें त्याला वाटलें. दगडावर नाहीं आदळलों नाहींतर या जिवाचा सोक्षमोक्षच होऊन गेला असता. असा विचार करीत चंद्रवर्मा उठूं लागला. परंतु तो ज्या जागेवर पडला होता. तीजागा हलूं लागल्या सारखें त्याला वाटलें. त्यानें चकित होऊन जरा वळून पाहिलें. परंतु समोर बोरूसारखें कांहीं तरी त्याला दिसलें. ते बाजूला सारून त्यानें काय आहे हें पाहिलें तेव्हां त्याला एक पक्षी दिसला. तो पक्षी दुसऱ्या एका पक्ष्याला म्हणत होता–

“आपण ही रात्र येथेंच काढावी. या थंडींत त्या ज्वाला प्रवाहावरून येणारी ऊन ऊन हवा किती बरी वाटते. अंग दुखणें थोडें कमी झालें आहे.”

तें ऐकून होकार देणारा दुसरा पक्षी चंद्रवर्माला दिसला.





आतां आपण कोठें आहों हें कळायला चंद्रवर्माला फारसा वेळ लागला नाहीं. तो झोंपला असतांना भयंकर मोठे गरुडपक्षी त्या झाडावर आले. त्यांच्या पंखांच्या वाऱ्यानें सोसाट्याचा वारा सुटल्यासारखें आपणांस वाटलें. आपण आदळलों ते एका दुसऱ्या पक्ष्याच्या पंखावरच आदळलों म्हणून वांचलों. त्या हत्तीसारख्या राक्षसी पक्ष्याच्या पंखावर त्याचें वजन एखाद्या मुंगीसारखेंच होतें. त्या पक्ष्याला कोणी आपल्या पंखावर बसलें असेल असें वाटण्यासहि कारण नव्हतें. परंतु त्यांना कळण्यापूर्वीं कीं कोणी पंखावर



बसलें आहे, आपण स्वतःचा बचाव करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. नकळत पंखावरून पाय काढला पाहिजे.

चंद्रवर्मा असा विचार करून हळूहळू पंखावरून खालीं उतरूं लागला. परंतु तेवढ्यांत त्याला आकाशांत उजेड दिसूं लागला. त्यानें डोकें वर करून पाहिलें तेव्हां त्याला अग्निपक्षी उडत येत असलेला दिसला. त्याच्या सर्व अंगांतून ज्वाळा येत होत्या. तो पक्षी चंद्रवर्मा ज्या पक्ष्यांच्या पंखावर पडला होता त्या पक्ष्यांजवळच सरळ उडत उडत आला. चंद्रवर्मानें त्या पक्ष्याला ओळखलें. हाच तो कृष्णसर्पानें सांगितलेला अग्निपक्षी. त्या शंख मांत्रिकाच दूत आहे.

अग्निपक्षी उतरूं लागतांच गरुड पक्ष्यांनीं एक विशेष प्रकारचा आवाज काढून त्याचें स्वागत केलें. अग्निपक्ष्यानें सरळ खालीं उतरून पक्ष्यांच्या भाषेंत म्हटलें—"मी तुमच्या शोधार्थच निघालों होतों. बरें झालें तुमची गाठ पडली."

"काय काम आहे!" गरुड एका पक्ष्यानें विचारलें.

अग्निपक्ष्यानें नीट बसून व आपले पंख नीट सावरून म्हटलें—"माझ्या मालकानें







एका जबाबदारीच्या कामावर माझी नेमणूक केली आहे. तसें तें कठीण काम नाहीं. म्हाणारपणानें कंबरडें बांकडें झालें असून आमच्या मालकाची बरोबरी करूं इच्छिणाऱ्या एका म्हाणाऱ्या कपालिनीला धरून आणण्याचें तें काम आहे. परंतु हें काम मला करतां येणें शक्य नाहीं. कारण रात्रीच्या वेळीं मला येतांना पाहून ती कपालिनी सावध होते. म्हणून तुम्ही दोघे जा आणि तिला उचलून घेऊन या. मी तुमचे हे उपकार जन्मोजन्मीं विसरणार नाहीं."

तें ऐकून गरुड पक्षी मागें पुढें करूं लागले. एक जण म्हणाला—"हें पहा, मी फार दमलों आहें. सूर्यास्त झाल्यापासून समुद्रांत खूप आंत उडत जाऊन व पोटभर खाऊन आम्ही दमून भागून परत आलों आहों. आमचे पंख दुखूं लागले आहेत. या अग्निप्रवाहाच्या वाफेनें थोडासा शेक मिळावा म्हणून आम्ही येथें येऊन बसलों होतों. उद्यां संध्याकाळीं मी येईन तूं मागशील ती मदत करायला. आतां तूं आम्हांला सोड!"

अग्निपक्ष्यानें आनंदानें आपले पंख एकदां फडफड केले. तेवढ्यानें सारें रान



हललें. तो म्हणाला—"दिवसां त्या कपालिनीला पकडणें अशक्य. ती मोठी हुशार बाई आहे. तिच्या जवळ पुष्कळ हुशार सेवक देखील आहेत. कित्येक वर्षें झालीं, ती बया रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून बसत आली आहे. पण कांहीं दिवसांपासून तिची तब्येत बिघडली असल्यानें ती इतकी सावधगिरी बाळगूं शकत नाहीं. तुम्ही कोठें तरी लपून बसा व एकाएकीं तिला चोंचींत धरून घेऊन या झालें. तिला मंत्र म्हणायला देखील वेळ मिळतां कामा नये. म्हणजे तुमच्या केसालाहि धक्का लागणार







नाहीं. त्या नंतर तुम्ही तिला उचलून नेऊन शंखासमोर टाका. तो तिला खावयाची ती शिक्षा देईल व तुम्हांला बक्षीस देईल. तुम्हांला त्याच्या विरुद्ध तक्रार करण्याचें कारणच उरणार नाहीं."

तुझ्या मालकानें बक्षिस वगैरे देण्याची काय गरज आहे? आम्हांला सात समुद्रा पलीकडे जाऊन येण्याची शक्ति त्यानें दिली म्हणजे झालें. आम्हांला याहून जास्त कांहीं नको." एक गरुड पक्षी म्हणाला.

"मला तें सर्व कांहीं नको, मला कधीं मरण येऊं नये असा एकादा मंत्र त्यानें मला शिकवला तर मला पुरें, मला आणखी कांहीं नको." दुसरा गरूड पक्षी म्हणाला.

चंद्रवर्मा मनांतल्या मनांत विचार करूं लागला—"या मूर्ख पक्ष्यांना तो शंख म्हणजे काय देव वाटला कीं हे सर्व मागूं लागले आहेत?"

गरुड पक्ष्यांनीं जें कांहीं मागितलें तें ऐकून अग्निपक्षी म्हणाला—"तें मी आपल्या मालकाला सांगतों. बरें तर उद्यां सकाळीं जरा माझ्या घरीं तुम्ही दांवे या. तसें तुम्हांला दूर नाहीं. वेळ पाहून मी तुमची मालकाशीं ओळख करून देईन." अग्नि पक्षी म्हणाला.

गरुड पक्ष्यांनीं होकारार्थी मान हलविली. अग्निपक्षी आनंदानें, आला होता त्या वाटेनें परतला. उत्तर दिशेकडे तो जोरानें जात होता. गरुडपक्षी थोडा वेळ गप्प मारीत तेथेंच बसून राहिले. नंतर आपली चोंच जमिनीवर ठेवून व जमिनीला आपलें अंग चिकटवून ते बसले आणि झोंपी गेले.

[पुढें चालू]



# * शंका *

विक्रमार्क वडाच्या झाडाजवळ गेला. झाडावरून तें लटकणारें प्रेत काढून खांद्यावर टाकलें आणि नंतर पुन्हां स्मशानाची वाट धरली. नियमाप्रमाणें शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा! इतक्या दिवसांच्या परिचयामुळें आपण मित्र बनलों आहोंत. आतां सांग बरें, तुला तो स्मशानांतील भिकारी मोठा वाटतो कीं मी मोठा वाटतो? अशा प्रकारच्या शंका कुशंका मनुष्याच्या मनांत उठतात. अशाच प्रकारची शंका विंध्यदेशाच्या सेनापतींची मुलगी रत्नावली हिच्या मनांत थैमान घालीत होती. ती गोष्ट तुला सांगतों." असें सांगून वेताळानें गोष्ट सांगण्यास प्रारंभ केला.

विंध्यदेशाच्या राजाच्या दरबारी श्रीमंत नांवाचा एक सेनापति होता. विंध्यदेशाच्या

## वेताळाच्या गोष्टी



एका भागांत चोरी लूटमार फार होत असे. सेनापति श्रीमंतानें आपल्या सैन्यानिशीं कित्येक वेळां त्या प्रदेशाची पाहाणी केली.

रात्रंदिवस चोरांचा सुगावा लावण्यासाठीं झटत राहिला. पण कशाचाच कोठें पत्ता लागला नाहीं.

ही काळजी त्याच्या मागें होतीच आणि आतां दुसरी काळजी म्हणजे त्याच्या मुलीच्या लग्नाची काळजी त्याला वाटूं लागली. रत्नावली फार सुंदर व बुद्धिमान होती. म्हणून तिच्याशीं लग्न करण्याच्या इच्छेनें कित्येक युवक येत असत. त्यांत राजसिंह नांवाचा एक तरूणहि होता. परंतु तो रत्नावलीशीं लग्न करण्याच्या हेतूनें श्रीमंताकडे आला नव्हता. तो आला होता श्रीमंताच्या कडून कांहीं मदत मागण्यासाठीं. कारण त्याचा किल्ला होता चोरांच्या भागांत. चोरांनीं अद्याप त्याच्या किल्ल्यावर हल्ला केला नव्हता. तरी वेळीं सावध झालेलें बरें आणि जमल्यास चोरांना पकडून राजाच्या स्वाधीन करावें असा विचार करून तो श्रीमंताकडे आला होता.

राजसिंह सेनापतीला म्हणाला—"महाराज, आपण आपली सेना माझ्या मदतीला दिलीत तर मी तिचा सर्व खर्च देईन. चोरांना पकडण्याच्या कामी तिचा उपयोग होईल."

सेनापतीनें अद्याप काय करावें ह्याचा विचार केला नव्हता. ह्या अवधींतच रत्नावली राजसिंहाच्या नजरेस पडली. तिला पाहतांच तिच्याशीं लग्न करावेंसें त्याला वाटलें. त्यानें सेनापतीला तसें स्पष्ट विचारलेंहि.

सेनापतीला तो तरुण पसंत पडला. तो चांगल्या कुळांतला होता. तसेंच शूर, सुंदर व साहसी होता. शिवाय सेनापतीला वाटलें कीं ह्या चोरलुटेऱ्यांच्या प्रदेशांत आपला कोणी संबंधी असेल तर वचक



राहील लोकांवर. परंतु आपल्या मुलीला त्या लुटेऱ्यांच्या प्रदेशांत पाठवतांना त्याचें मन कच खाऊं लागलें.

थोडा विचार केल्यावर त्यानें आपली मुलगी राजसिंहाला द्यावयाचें ठरविलें आणि लग्नानंतरहि कांहीं दिवस तिला घरींच ठेवून घेण्याचा निश्चय केला. चोरांचा त्रास कमी झाल्यावर तिला सासरी पाठविण्याचा त्यानें बेत केला.

झालें. रत्नावलीचें लग्न ठरलें. मोठ्या थाटामाटानें लग्न सोहळा पार पडला. लग्नानंतर थोडें सैन्य घेऊन जेव्हां राजसिंह घरीं जाण्यास निघाला तेव्हां रत्नावलीहि निघण्यास तयार झाली. तें पाहून सेनापति म्हणाला—

"बाळे, तूं आत्तांच कशाला जातेस? जेव्हां तुला नवऱ्याकडे जावेंसें वाटेल तेव्हां तुझा पति येऊन घेऊन जाईल तुला. सध्यां त्या भागांत अराजकता माजली आहे. थोड्यांच दिवसांत तेथील वातावरण शांत होईल मग पाठवीन तुला."

"बाबा! एकदां लग्नाच्या अक्षता डोक्यावर पडल्या म्हणजे मुलीनें आपल्या पतीबरोबर जाणें तिचा धर्म नाहीं का? मला जेव्हां आपणास भेटावेंसें वाटेल तेव्हां



मी येऊन भेटून जाईन आणि पतीबरोबर असल्यावर भीति कसली?" असें सांगून ती पतीबरोबर निघून गेली.

रत्नावली सासरीं आल्यापासून तिला एक दिवस सुद्धां शान्तपणानें झोंप लागली नाहीं. दररोज तिच्या कानावर चोऱ्या दरोड्याच्या गोष्टी येत असत. खून, मारामारीच्या बातम्या येत असत. त्यामुळें ती अगदीं घाबरून जात असे. ती राहात असलेला किल्ला खूप मोठा होता. पण दिवसा तेथें पुष्कळ नोकरचाकर वावरत असल्यामुळें भीती वाटत नसे. पण रात्रीं तेथें चिट-

पांखरूंहि नसे. त्यांतून राजसिंहसुद्धां चोरांना पकडण्यासाठीं म्हणून रात्रींच बाहेर पडत असे. बिचारी रत्नावली जीव मुठींत धरून रात्र घालवीत असे. जरा कुठें खुट्ट वाजलें कीं ती कावरी बावरी होई. तिच्या सोबतीला तिच्या मोहरची एक जुनी दासी मात्र होती.

चोरांच्या टोळीचा एक नायक होता. त्याच्या विषयीं अशा कांहीं आश्चर्यकारक घटना ऐकूं येत असत कीं त्यावर विश्वासच होत नसे आणि अशा त्या नायकाला पकडून आणण्याच्या कामासाठींच राजसिंह रोज रात्रीं बाहेर पडत असे. तो जायला निघाला कीं रत्नावली त्याच्या रक्षणासाठीं देवाची प्रार्थना करीत बसत असे.

राजसिंह जी सेना आपल्या सासऱ्या-कडून घेऊन आला होता ती किल्ल्यांतच पाहारा देत असे. परंतु त्यामुळें गांवांतील लोकांचा त्रास मात्र कमी झाला नव्हता आणि गंमत अशीं कीं एवढा मोठा किल्ला, पण त्याच्याकडे कोणाची ही नजर वळली नव्हती.

दिवसामागून दिवस जात होते. एक वर्ष लोटलें. रत्नावलीला मुलगा झाला. त्यामुळें सर्व आनंदांत होते.



एक दिवस दाई घाबऱ्या घाबऱ्या रत्नावली-कडे आली व म्हणाली–" अहो ! चोर चोर म्हणून इतक्या दिवसापासून आपण जें ऐकत होतों त्यांना मी आज प्रत्यक्ष पाहिलें. ते दुसरे तिसरे कोणी नसून आपल्या किल्ल्या-तीलच नोकर माणसें आहेत आणि त्यांचा नायकहि किल्ल्याचा मालकच आहे. मी स्वत: माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे. आतां आपल्याला थोडा वेळ सुद्धां येथें राहाणें सुखाचें होणार नाहीं."

दाईचें बोलणें ऐकून ती थोडी घाबरली. पण थोडा विचार केल्यावर तिला वाटलें 'असेल दाईचें म्हणणें खरें' आणि म्हणूनच बाहेर एवढ्या चोऱ्या झाल्या तरी किल्ल्यांत कांहींहि झालें नाहीं. म्हणूनच चोरांना पकडण्यासाठीं गेले असतां राजसिंह सुखरूप परत येत असे आणि म्हणूनच त्याला कधीं चोरांचा नायक मिळाला नाहीं आणि म्हणूनच राजसिंहानें बाहेरून आण-लेल्या सेनेला किल्ल्यांतच डांबून ठेवलें आहे. म्हणजे राजसिंह आपल्या वडिलांशीं कपटी नाटक खेळत आहे. त्यासाठींच तो आपल्याला येथें घेऊन आला आहे. ठीक आहे. पण प्रत्यक्ष आपण पाहिल्या-






शिवाय कांहीं करावयाचें नाहीं, असे तिनें ठरविलें.

राजसिंहाचें तिच्यावर अतिशय प्रेम होतें. मुलगा तर त्याला जीव कीं प्राण होता आणि असा राजसिंह चोर, हत्यारा, ठक असेल ही कल्पनाच तिला करवेना. पण खरी गोष्ट कळावी म्हणून ती राजसिंहाच्या प्रत्येक हालचालीवर फार लक्ष ठेवूं लागली.

एक दिवस राजसिंह नित्याप्रमाणें रात्रीं बाहेर निघाला असतां रत्नावलीनें त्याला अडविलें. तो तेव्हां थांबला. परंतु मध्यरात्रीं ती हळूच उठला व चोर पावलांनीं बाहेर निघून गेला. रत्नावलीनें नुसते डोळे मिटून घेतले होते. तो बाहेर पडतांच ही सुद्धां एक काळी ओढणी घेऊन त्याच्या मागोमाग निघाली. तो किल्ल्याच्या बाहेर पडतांच ही पण किल्ल्याबाहेर गेली. नंतर तिनें दुरून पाहिलें. तिचा पति एका चिंचेच्या झाडापर्यंत गेला व तेथून एकदम दिसेनासा झाला.

ती त्या झाडापर्यंत गेली. तेथें तिला एक मोठी विहीर दिसली. त्यांत अंधार होता. तरी तिचा पति तेथेंच गेला होता. म्हणून रत्नावली सुद्धां आंत उतरली. तेथें विहिरीच्या भिंतीजवळ कांहीं झाडें वाढलेलीं होतीं. त्यांच्या पाठीमागून कोणी बोलल्यासारखा आवाज येत होता. ती हळूं हळूं त्या झाडांच्या जवळ गेली. तेथें तिला एक लहान दार दिसलें. त्याच्या पलीकडे एक दुमजली इमारत होती. तेथें राजसिंह होता आणि त्याच्या आसपास किल्ल्यांतील सर्व नोकर होते. राजसिंह त्यांना कांहीं तरी सांगत होता आणि ते नोकर त्याच्या अंगावर ओरडत होते.

रत्नावली थोडी पुढें सरकली व त्यांचें संभाषण ऐकूं लागली. तिच्या कानावर शब्द पडत होते—"मी तुमचा सरदार आहें, माहीत आहेना? जर कोणी माझा हुकूम मानला नाहीं तर हें पहा माझ्या हातांत काय आहे तें." असें म्हणून राजसिंहानें आपल्या नोकरांना तलवार दाखविली.

"आपण सैन्य आणल्यापासून आमचा आपल्यावरचा विश्वास पार उडाला आहे. आम्हांला असें वाटूं लागलें आहें कीं आपण त्या सैन्याच्या हातींच आम्हांला देणार आहांत. म्हणून आम्ही आतां दुसरा सरदार निवडणार आहोत." हें सांगणारा किल्ल्याचा धोबी होता.

राजसिंहानें आपली तलवार उपसली आणि धोब्याच्या अंगावर धांवून गेला. त्या बरोबर चार पांच भाल्यांचीं टोकें त्याच्या छातीवर रोखलीं गेलीं. हें पाहातांच रत्नावलीनें एक किंकाळी फोडली व ती बेशुद्ध होऊन खालीं पडली.

रत्नावलीनें जेव्हां डोळे उघडले तेव्हां ती आपल्या घरीं पलंगावर निजलेली होती. राजसिंह तिच्या जवळच बसला होता. आपला पति सुखरूप असल्याचें पाहून तिला आनंद झाला.

रत्नावली सावध झाल्यावर राजसिंह तिला म्हणाला—"तुझी प्रकृति फार बिघड-



लेली आहे. म्हणून तूं कांहीं दिवस आपल्या माहेरीं जा. तुम्हां दोघांना मी उद्यांच पाठवून देतों.

दुसऱ्या दिवशीं रत्नावली आपल्या माहेरच्या सर्व लव्याजम्यानिशीं माहेरीं गेली. वाटेंत तिला प्रश्न पडला कीं आपल्या वडिलांना काय सांगावें? आपल्या पती विषयीं सर्व सांगून टाकावें कीं नाहीं?

एवढी गोष्ट सांगून वेताळानें राजास विचारलें—"राजा जो विचार रत्नावलीच्या मनांत आला, ती शंका मलाहि वाटते. ती वडिलांची आज्ञाधारी मुलगी आहे. तेव्हां प्रजेचा शत्रु असलेल्या आपल्या पतीविषयीं खरीखुरी माहिती पित्याला देईल कीं पतिव्रता म्हणून त्याच्या विषयीं आपल्या वडिलांना कांहीं कळूं देणार नाहीं? का ज्या उद्देशानें तिच्या वडिलांनीं तिचें लग्न राजसिंहाबरोबर लावलें होतें तो उद्देशच उडवून लावील? जर तूं माहीत असून ठीक उत्तर दिले नाहींस तर तुझें डोकें फुटेल. तुला माहीत आहे ना?"

"असें म्हणतात कीं लग्नाच्या मुलींना पितृआज्ञाच शिरसावंद्य असते. परंतु विवाहा-नंतर पति देवतातुल्य असतो आणि चोरांना पकडण्याचें काम सेनापतीचें आहे. तिचें नव्हें, म्हणून ती जबाबदारी तिची नाहीं. ही गोष्ट राजसिंहाला पक्की माहीत होती. म्हणूनच आपला भेद बायकोला समजला असतां सुद्धां तिला त्यानें माहेरीं पाठवून दिलें. त्याचा तिच्यावर पूर्ण विश्वास होता. म्हणून रत्नावलीला आपल्या पतीचा भेद पित्याला कळविण्याची जरूरी नाहीं." राजानें आपलें मत सांगितलें.

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह अदृश्य झाला व पूर्ववत् वडाच्या झाडावर लटकूं लागला. (कल्पित)




# वनराज सिंह

एकदां सिंह आराम करीत असतां त्याच्या मनांत आपल्या राजेपणाचा विचार आला. तो जंगलांत हिंडायला निघाला. वाटेंत त्याला एक वाघ दिसला. तो त्याला म्हणाला—"आजकाल तूं फारच शेफारलेला दिसतो आहेस. जंगलाचा राजा कोण आहे तें, माहीत आहेना तुला?"

"जी हुजूर, आपणच महाराज!" वाघ हात जोडून म्हणाला.

सिंह पुढें निघाला. त्याला एक वनमाणूस दिसला. सिंह त्याला म्हणाला—"माहीत आहे का ह्या जंगलाचा राजा कोण आहे तें?"

"आपणच सरकार!" वनमाणुस म्हणाला.

सिंह पुढें निघाला. त्याला एक हत्ती दिसला. त्याला तो म्हणाला—"अरे ए काळ्या, ह्या जंगलाचा राजा कोण आहे तें माहीत आहे का तुला?"

हत्तीनें सिंहाजवळ जाऊन आपल्या सोंडेंत त्याला घट्ट पकडून दूर झाडांत फेंकून दिलें. पण सिंह अंग झाडत बाहेर आला व त्याला म्हणाला—"इतकें रागा-वण्याचें काय कारण. माहीत नव्हतें तर सांगूं नाहीं कां? 'माहीत नाहीं' म्हणून?"





# ठकास महाठक

एका गांवांत एक शेतकरी राहात असे. त्याचा मुलगा थोडा मंदबुद्धीचा होता. परंतु त्याची सून मात्र फार हुशार व शहाणी होती.

एक दिवस मुलगा आपल्या घराबाहेर झाडाखालीं बसून कुऱ्हाडीचा दांडा करीत होता. तितक्यांत कोणी तिघे जण तेथें आले व म्हणाले—"तुला आमच्या राजानें बोलाविलें आहे. आमचा राजा म्हणजे समुद्राचा राजा."

समुद्राचा राजा म्हणजे देव. पण ह्याला बोलाविण्यास जीं माणसें आलीं होतीं तीं काळीं कभिन्न होतीं. ते बहुतेक राक्षसांचे दूत होते. पण ही गोष्ट त्या अर्धवटाच्या लक्षांत आली नाहीं. त्यानें विचारलें—"तुमच्या राजाचें माझ्याशीं काय काम आहे?"

"आमच्या राजाला एक फार महत्वाचें काम करवून घ्यावयाचें आहे. तें तुमच्याकडूनच होणार असल्यामुळें त्यांनीं तुम्हांला बोलावून आणण्यासाठीं आम्हांला पाठविलें आहे." ते म्हणाले.

"माझे वडील शेतांवर गेले आहेत आणि अंधार होण्याच्या सुमारास परत येतील. त्यांना घेऊन जा." मुलगा म्हणाला.

"असें होय! मग तुम्हीं दोघेहि चला. उद्यां पर्यंत तुम्हीं बंदरांत आलांत तर ठीक आमची नाव तेथें असेल." असें सांगून ते निघून गेले.

वडील घरीं आल्याबरोबर मुलानें राजाचा निरोप त्यांना कळविला. म्हणाला—"बाबा, आज समुद्री राजाकडून दोघे तिघे जण आले होते. त्या राजाला आमच्याकडून कांहीं काम करवून घ्यावयाचें आहे. जर आपण तें काम केलें तर आपल्याला पुष्कळ मोठें बक्षीस मिळणार आहे."

श्री रा. गो. देसाई

"राजाचें चिन्ह वगैरे कांहीं होतें का त्यांच्या जवळ?" शेतकऱ्यानें विचारलें.

"तसें कांहीं त्यांनीं आणलें नाहीं. ते म्हणाले, आमची नांव बंदरांत आहे. उद्यां सकाळपर्यंत आलांत तर आम्हीं घेऊन जाऊं." मुलगा म्हणाला.

"बंदरापर्यंत मी पायीं जाऊं? शक्य नाहीं. जर तें अंतर कमी झालें तरच मी येऊं शकेन." असें म्हणून म्हातारा झोंपला.

मुलानें ही गोष्ट आपल्या बायकोला सांगितली. म्हणाला—"समुद्राच्या राजानें आम्हांला बोलविलें आहे. परंतु जों पर्यंत बंदरापर्यंतचें अंतर कमी होणार नाहीं तों पर्यंत बाबा येणार नाहींत."

"एवढेंच ना? मग त्यांत काय एवढें मोठें. सारी वाट सरेपर्यंत गोष्ट सांगत राहा आपल्या वडिलांना." बायकोनें सांगितलें.

बायकोचें म्हणणें त्याला पटलें. दुसऱ्या दिवशीं तो पाहाटे उठला. वडिलांना उठविलें. म्हणाला—"बाबा उठा लवकर. तुम्हीं म्हणाला होतात ना? रस्ता कमी केला तर येईन म्हणून? चला मी कमी करतों वाट."



दोघे बापलेक निघाले बंदराकडे. वाटेंत मुलगा बापाला सारखा गोष्टी सांगत चालला होता. शेवटीं सूर्योदयाच्या सुमारास पोहोंचले ते दोघे बंदरावर. तेथें ते तिघे राक्षस दूत आणि एक मोडकी नाव त्यांच्या दृष्टीस पडली. ती पाहून शेतकरी म्हणाला—"ही कसली होडी, राक्षसी होडी दिसते आहे ही."

"आमच्या राजाजवळ जितक्या नावा आहेत त्यांत हीच जलद चालणारी आहे. म्हणून आम्ही ही होडी आणली आहे." ती काळीं माणसें म्हणालीं.

ते दोघे बापलेक त्या नावेंत जाऊन बसले आणि होडकें चालू झालें. थोड्याच



वेळांत ती होडी एका बेटाला लागली. त्या बेटावर कोठें कांहीं झाडपाला हष्टीस पडत नव्हता. सर्व प्रदेश अगदीं रूक्ष होता. तेथें उतरल्यावर त्या बापलेकांना कळलें कीं तें बेट राक्षसांचें आहे. करतात काय ?

त्या राक्षस दूतांनीं दोघांना आपल्या राजासमोर आणून उभें केलें. त्याला पाहतांच दोघांची बोबडी वळल्यासारखीच झाली. कारण तो राजा आपल्या दूतांपेक्षां जास्त काळा आणि कुरूपहि होता.

"तुम्हीं आम्हांला इतक्या दूर कशासाठीं बोलाविलें." शेतकऱ्यानें विचारलें.

"कांहीं विशेष नाहीं. आमच्याकडे एक फार मोठें भांडें आहे. त्याच्या बुडापाशीं विस्तव घालण्यासाठीं तुम्हांला बोलावून आणलें आहे. आमच्या लोकांना कांहीं तें जमत नाहीं. जर का तुम्हांकडूनहि हें काम झालें नाहीं तर जिवंतपणें तुम्हीं परत जाऊं शकणार नाहीं." राजानें सांगितलें.

"अगोदर तें भांडें तरी पाहूं द्या. मग पाहूं काय करावयाचें तें." शेतकरी म्हणाला.

राक्षस त्यांना एका खोलींत घेऊन गेला. तेथें मध्यभागीं एक मोठें तांब्याचें भांडें ठेवलेलें होतें. शेतकऱ्यानें तें दुरून पाहिलें. नंतर राक्षसांना बाहेर पाठवून देऊन खोलीला आंतून कडी लावून घेतली. मग सावकाश त्या दोघांनीं चारी बाजूस हिंडून फिरून तें भांडें पाहिलें. तें त्या शेतकऱ्याला ओळखीचें वाटलें. तो मुलाला म्हणाला—"तुला ह्या हंड्याविषयीं कांहीं माहीत आहे का ? हें अक्षय पात्र आहे. हें पूर्वी आपल्या राजाकडे होतें. सध्याचा जो राजा आहे ना ! त्याचे पंजोबा ह्यांत भात शिजवून जे कोणी येतील त्यांना जेवण देत असत. तोच हा हंडा, ह्या राक्षसांनीं चोरून आणला आहे इथें."



"पण बाबा, आपण येथून सुटणार कसे ?" मुलानें विचारलें.

"तें सर्व मी पाहातों. काढतों कांहीं तरी मार्ग शोधून.

शेतकऱ्यानें दार उघडलें. राक्षसांना बोलाविलें. ते मोठ्या घाईनें आले. त्यांनीं विचारलें—"विस्तव घातला का ?"

"विस्तव घालायला कांहीं लाकडें सरपण पाहिजे कीं नाहीं. आला आंब्याचीं, जांभळाचीं, चिंचेचीं, वडाचीं, पिंपळाचीं, लिंबाचीं आणि बाभळीचीं लाकडें अशीं नऊ तऱ्हेचीं लाकडें पाहिजेत. त्याशिवाय गारगोट्या, कापूस, वाळलेल्या काटक्या. हें सर्व सामान आणून द्या म्हणजे पेटवितों चूल."

राक्षस दूत शेतकऱ्याचा निरोप घेऊन राजाकडे गेले व त्याला तो निरोप सांगितला. राजा एकदम मोठ्यानें ओरडून म्हणाला— "तुम्हांला माहीत नाहीं काय ? आमच्या बेटावर साधें गवत सुद्धां उगवत नाहीं. मग कोठून असणार एवढीं लाकडें."

"तरी पण आमच्या देशांत आहेत ना. आपल्या दोन दूतांना पाठवा आणि मागवा आमच्या सुनेकडून. बरोबर आपल्या दोन मुलांना पाठवून द्या. नाहींतर तिचा विश्वास बसणार नाहीं." शेतकरी म्हणाला.



"जोंपर्यंत लाकडें येणार नाहींत तोंपर्यंत तुम्हीं दोघे ह्याच खोलींत बसून राहा." असें सांगून राक्षसांच्या राजानें त्या दोघांना हंड्याच्या खोलींत बसवून ठेवून खोली बंद करून घेतली. शेतकऱ्यानें सांगितल्याप्रमाणें त्यानें आपल्या दोन मुलांना नावाड्यांबरोबर शेतकऱ्याच्या गांवीं पाठवून दिलें.

तेथें पोहोंचल्यावर राक्षसाचे मुलगे शेतकऱ्याच्या सुनेला म्हणाले—"आम्हीं राक्षस राजाचे मुलगे आहोंत. तुझा सासरा व

नवरा आमच्या देशांत आहेत. त्यांनीं जांभळाचीं, आंब्याचीं, चिंचेचीं वडाचीं, पिंपळाचीं, बेलाचीं वगैरे लाकडें तुझ्याकडून मागून आणावयास सांगितलीं आहेत.

राक्षसाचें म्हणणें ऐकल्या बरोबर सुनेला कळलें, ह्यांत कांहीं तरी घोटाळा आहे. ती राक्षस पुत्रांना म्हणाली—"तुम्हांला पाहिजे असलेल्या सर्व वस्तू त्या खोलींत आहेत. तेथून काय काय तें घेऊन जा." असें सांगून तिनें एका अंधार कोठडीकडे बोट दाखविलें. दोघे राक्षस पुत्र आंत शिरतांच तिनें बाहेरून दार बंद करून घेऊन कुलूप लावून घेतलें. बाहेर उभे असलेल्या राक्षसांना ती म्हणाली—"तुमचे राजकुमार त्या खोलींत आहेत. परंतु त्या खोलीची किल्ली कांहीं केल्या सांपडत नाहीं. आमच्या घरवाल्यांनीं किल्ली दिली म्हणजेच तें दार उघडेल. तों पर्यंत कांहीं करणें शक्य नाहीं. जा आपल्या राजाला जाऊन सांगा."

राक्षस होडी घेऊन आपल्या राजाकडे गेले व सूनबाईंनीं सांगितल्याप्रमाणें सांगितलें.

राक्षस राजा कावरा बावरा झाला. त्याचें आपल्या मुलांवर अतिशय प्रेम होतें. त्यानें शेतकऱ्याला आणि त्याच्या मुलाला सोडून दिलें व घरीं जाण्यास सांगितलें.

"असें कसें ? आम्ही काम करून बक्षीस घेऊनच जाणार. आम्हांला घरीं जायची कांहीं घाई नाहीं." शेतकरी म्हणाला.

राक्षस राजानें त्यांना बक्षीस म्हणून दोन सोन्याच्या विटा दिल्या आणि एका नावेंत बसवून घरीं पाठवून दिलें व त्याच नावेंतून आपल्या मुलांना परत घेण्यास सांगितलें. घरीं आल्यावर त्यांनीं राक्षस पुत्रांना त्यांच्या घरीं पाठवून दिलें.



# विलियम शेक्सपीयर

इंग्लंड मधील स्ट्राटफर्ड अन् एवान् नांवाच्या गांवीं इ.स. १५६८ मध्यें विलियम शेक्सपीयर याचा जन्म झाला. ह्याच्या वडिलांचें नांव जोन व आईचें नांव मेरी होतें. हा आपल्या आई वडिलांचा तिसरा मुलगा. हें मध्यम वर्गीय कुटुंब होतें.



वयाच्या अठराव्या वर्षी त्यानें आपल्याहून आठ वर्षांनीं मोठी असलेल्या एका स्त्रीशीं विवाह केला. तिचें नांव ॲन् हतवे असें होतें. तीन मुलें झाल्यानंतर इ. स. १५८७ मध्यें तो आपल्या उपजीविकेसाठीं लंडनला आला. थोड्याच दिवसांत त्याचा तेथें चांगला जम बसला. नाटक लिहिणें व अभिनय करणें हा त्याचा व्यवसाय होता.

त्याचें सर्वांत पहिलें नाटक 'लव्स लेबर लॉस्ट' हें होय. तें त्यानें इ.स. १५७० मध्यें लिहिलें. तेव्हां पासून त्यानें नाटकें लिहिण्याचा सपाटा चालविला. वर्षांतून दोन ह्या हिशेबानें तो नाटकें लिहित असे.

तो आपल्या स्वतःच्या नाटकांत व त्याच प्रमाणें दुसऱ्या नाटकांतूनहि अभिनय करीत असे. थोड्याच दिवसांत चांगला अभिनेता म्हणून त्याची ख्याती झाली.

शेक्सपीयरला ह्यांत पुष्कळ पैसे मिळाले. त्यानें ग्लोब थियेटरचा एक भाग विकत घेतला. आपल्या गांवांत शंभर एकर सुपीक शेत जमीन विकत घेतली. त्याच प्रमाणें तेथें एक छानदार घर विकत घेतलें. शेक्सपीयरचीं नाटकें फार लोकप्रिय झालीं. त्यानें ह्या नाटकांचे कित्येक प्रयोग त्यावेळच्या ब्रिटनच्या राणीसमोर खेळूनहि दाखविले.

विलियम शेक्सपीयर २३ एप्रिल १६१६ मध्यें निधन पावला. त्याच्या कृतींना इंग्रजी साहित्यांत फार मोठें स्थान आहे.








# चंद्राचा उपग्रह

सोवियेट रशियाच्या वैज्ञानिकांनीं १२ सप्टेंबरला एक रॉकेट सोडलें. ४ ऑक्टोबरला पुन्हां एक उपग्रह सोडला. त्यावरून असें सिद्ध होतें कीं असे उपग्रह बनविणें मनुष्याच्या शक्ति बाहेर नाहीं. हे उपग्रह चंद्राला प्रदक्षिणा घालूं शकतात. एवढेंच नव्हें तर ते चंद्राच्या अगदीं जवळून फिरतात. चंद्रावर हवा नसल्यानें तो चंद्रावर पडण्याची मुळींच भीती नाहीं.

परंतु चंद्रावर उंच उंच शिखरें आहेत. त्यांच्याशीं टक्कर होऊं नये म्हणून ह्या उपग्रहांना थोड्या अंतरावरूत प्रदक्षिणा करावी लागते. अशा तऱ्हेचे उपग्रह कशा साठीं सोडतात, ह्या उपग्रहांत टेलिस्कोप ठेवून चंद्राच्या पृष्ठभागाचें अध्ययन करता येण्यासारखें आहे.

चंद्रावर कोठें कोठें कशा तऱ्हेचें हवा मान आहे ही माहिती या उपग्रहांच्या सहाय्यानें मिळूं शकेल. कारण चंद्रावर जर हलकीशी देखील हवा वगैरे असेल तर ह्या उपग्रहाची गति लगेच मंद होईल. उपग्रहाच्या गतींत थोडा देखील बदल झाला तर त्यावरून तेथील वातावरणाचा अंदाज मिळेल आणि तेथें जर हवा मुळींच नसेल तर हे उपग्रह इतक्या नियमीतपणें चंद्रा भोंवती फिरतील कीं आपल्याला त्यावरून घड्याळ सुद्धां लावतां येईल.





# ज्यूलियस सीझर

[ इ. सनापूर्वी सुमारें १०० वर्षे जूलियस सीझर नांवाचा एक प्रतापी राजा होऊन गेला. तो आपल्या वयाच्या २६ व्या वर्षापासूनच राजकारणांत शिरला होता. रोम मधील त्या वेळच्या तीन शासकांपैकीं हा एक होता. सीझर हा रोमच्या पश्चिमेकडील भागाचा अधिकारी होता. पोम्पे मध्य तथा दक्षिण भागाचा अधिकारी होता. क्रासन पूर्व व इराण प्रदेशाचा शासक होता. सीझरनें आपल्या पराक्रमानें आपलें राज्य दुपटीनें वाढविलें. त्यामुळें पॉम्पेला ईर्षा वाटूं लागली. त्यानें, सीझरनें आपलें सैन्य मागें बोलवावें म्हणून मागणी केली. परंतु सीझरचा दरारा दिवसेंदिवस वाढत होता. त्यानें त्या मागणीकडे लक्ष दिलें नाहीं, एवढेंच नव्हें तर त्यानें सैन्यानिशीं रोम शहरांत प्रवेश केला. पॉम्पे भिऊन पळून गेला. अनायास सीझरला त्या प्रदेशाचा अधिकार मिळाला. पुढें त्यानें आफ्रिका व आशीया मायनर कडील शत्रूंचा पराभव करून सर्वत्र विजय मिळविला. ]

विजयी सीझर रोम नगरांत प्रवेश करणार होता म्हणून चहूंकडे आनंदोत्सव सुरू होता. लोक सीझरचा जयजयकार करण्यासाठीं जमले होते.

सीझरचें येणें कांहीं लोकांना पसंत नव्हतें. रोममध्यें त्या वेळीं लोकशाही असल्यामुळें त्यांना वाटत होतें कीं सीझर रोममध्यें आला कीं तो सर्व सूत्रें आपल्या हातीं घेऊन राजतंत्र सुरू करील.

त्यांत कांहीं लोक असे होते ज्यांचे सीझरशीं पटत नव्हतें. अशा लोकांत कॅसियस नांवाचा एक माणूस होता. तो ब्रूटसला म्हणाला—"मला वाटतें सीझरच्या येण्यानें रोमवर संकट ओढवणार आहे."

ब्रूटसलाहि तसाच भास होत होता. तो सीझरच्या जवळच्या मित्रांपैकीं एक होता. तो त्याला मान देत असे पण त्याची देशभक्ति त्याहून जास्त होती. तो प्रथम देशाला व मग व्यक्तीला मान देत असे. ब्रूटस मोठ्या मनाचा, उदार व निस्वार्थी होता. स्वभावानें तो सरळ व चांगला होता आणि म्हणूनच कॅसियसनें त्याला आपल्या बाजूला वळविण्याचा प्रयत्न केला व त्याला यशहि आलें.

देशहितासाठीं म्हणून सीझरचा खून करण्याचें ठरलें आणि हें देशकार्य आहे असें समजून ब्रूटसनें त्याचें नेतृत्व करण्याचें काम स्वीकारलें.

इकडे कारस्थान जोरांत सुरू होतें आणि तिकडे मोठ्या वैभवानें सीझर नगरांत प्रवेश करीत होता. त्याच्या स्वागतासाठीं जिकडे तिकडे आनंदोत्सव सुरू होते. सीझरच्या चारीबाजूला लोकांची एकच गर्दी होती. अशा वेळीं जमावांतून एक आवाज ऐकूं आला. 'सीझर सावध रहा. १५ मार्च येत आहे.' सीझरनें त्याकडे दुर्लक्ष केलें. म्हणाला—"येऊं दे. कांहीं हरकत नाहीं."



जेथें कसरतीचे खेळ चालले होते तेथें मार्कस अँटोनिअस नांवाचा एक अभिमानी व्यक्ति होता. त्यानें सीझरला राज चिन्हा-प्रमाणें असलेला एक मुकुट भेट म्हणून दिला. अँटोनिअसनें तीन वेळां तो मुकुट पुढें केला. पण सीझरनें तीनहि वेळां तो नाकारला. हें पाहून लोकांना आनंद झाला. त्यांनीं त्याचा जयजयकार केला.

कांहीं दिवसांनीं एका अंधाऱ्या रात्रीं सर्व कारस्थानी लोक ब्रूटसच्या घरीं जमले. सर्वांनीं आणा शपथा घेतल्या. पण ब्रूटस ह्या गोष्टीस तयार झाला नाहीं. तो म्हणाला—"आपण ज करीत आहोंत तें देश हिताचें कार्य म्हणून करीत आहोंत. लोकशाही राजवटीवर असणारा आपला अभिमान पुरेसा नाहीं का? आणि जर शपथेशिवाय हें कार्य होणार नसेल तर न करणेंच बरें."

"मार्क अँटनीयसचा सीझरवर पूर्ण विश्वास आहे. सीझरच्या मागें तो राहिला तर तो अस्तनींतील सापासारखा होईल. म्हणून त्यालाहि मारून टाकलें पाहिजे. असा सला कॅसियनें दिला. परंतु ब्रूटसला तें पटलें नाहीं.

तो म्हणाला—"आपल्याला हत्याकांड सुरू करावयाचें नाहीं. मार्कस अँटोनी






सीझरचा उजवा हात असला तरी त्यापासून लोकशाही राजवटीला मुळींच धक्का पोंचत नाहीं, आणि त्यांतून सीझर मेल्यावर तर तो अगदीं निरुत्साही होईल. मला वाटतें त्याची भीती बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं.

सीझरला ज्या दिवशीं मारण्याचें ठरलें होतें त्याच्या अदल्या दिवशीं रात्रीं सीझरची बायको झोपली असतां तिला फार वाईट अपशकुनी स्वप्नें पडलीं. ती माउली त्या रात्रीं तीन वेळां झोपेंत ओरडली—"वांचवा! वांचवा!! सीझरला लोक मारीत आहेत." सकाळीं उठल्यावर ती आपल्या नवऱ्याला म्हणाली—"आज तुम्हीं घराबाहेर पडूं नका. मला कालच्या स्वप्नांनीं भय वाटत आहे." सीझरनें तिच्याकडे प्रथम लक्ष दिलें नाहीं. पण तिनें फारच हेका धरल्यामुळें तो कबूल झाला.

थोड्या वेळानें कॅसियसच्या कारस्थानी लोकांपैकीं एक जण सीझरला बोलाविण्यास आला. परंतु सीझरनें त्याला नकार दिला.

"तें कां? आज प्रजेच्या प्रतिनिधींनीं आपल्याला मुकुट अर्पण करण्याचें ठरविलें आहे, आणि आपण येत नाहीं म्हणजे काय? आजची सभा एकदां स्थगित झाली कीं पुढें काय होईल कोणास ठाऊक आणि जर लोकांना समजलें कीं आपण आलां नाहींत तर लोक आपल्याला भित्रे म्हणायला कमी करणार नाहींत." तो म्हणाला.

एवढ्यांत त्याच पक्षांतील आणखी कांहीं लोक सीझरला बोलवावयास आले. आतां सीझरला नाहीं म्हणणें शक्य नव्हतें. तो आपल्या बायकोला म्हणाला—"तूं अगदीं भिऊं नकोस" आणि तो त्यांच्याबरोबर निघून गेला.

त्या भयंकर कारस्थानाचा एका साधारण व्यक्तीस सुगावा लागला. त्यानें सीझरला एक चिठ्ठी लिहिली. त्यांत त्यानें स्पष्ट लिहिलें कीं ब्रूटस व कॅसियस वगैरे लोकांनीं तुला मारून टाकण्याचा बेत केला आहे. म्हणून सावध रहा. ही चिठ्ठी त्याला देण्यासाठीं तो सीझरच्या रस्त्यांत उभा राहिला, आणि सीझर येत असतां त्यानें ती चिठ्ठी कशी तरी धडपड करून त्याला दिली. पण दुर्दैव ती चिठ्ठी सीझरनें वाचूनहि पाहिली नाहीं.

सीझरनें सभामंचकावर पाऊल ठेवल्या बरोबर सर्व लोक आदरानें उभे राहिले. कारस्थानी लोक त्याच्या चारी बाजूला उभे होते, जणुं कांहीं ते त्याचा गौरवच करीत आहेत. त्यांपैकीं प्रत्येकानें पुढें येऊन पूर्वीं ठरल्याप्रमाणें सीझरला आपल्या तलवारीच्या टोकानें भोसकलें. प्रेक्षकांना त्याची कल्पना नव्हती. शेवटीं ब्रूटस आला व त्यानें शेवटचा वार केला. त्याला पाहून सीझरला आश्चर्य वाटलें. "अरे! ब्रूटस!! तूंहि कां." असें म्हणत त्यानें प्राण सोडला.

ही घटना होण्यास फार वेळ लागला नाहीं. त्यामुळें सर्वलोक आणि प्रजेचे प्रतिनिधि अवाक थक्क होऊन जागच्याजागीं उभे राहिले. मार्क ॲंटोनीनें हा सर्व प्रकार पाहिला आणि तेथून सरळ घरीं निघून गेला. त्याला फार दुःख वाटलें. त्यानें



आपल्या एका विश्वासू व्यक्ती करवी ब्रूटसला कळविलें—"ब्रूटस बद्दल माझ्या मनांत आदर आहे. सीझरवर माझें प्रेम होतें. म्हणून मला सीझरच्या खुनाचें कारण समजलें तर मी तुझा अनुचर होईन आणि जर ब्रूटसनें मला अभयवचन दिलें तर मी तेथें येऊन समक्ष बोलण्यास तयार होईन."

"माझ्या मनांतहि तुझ्या मालकाविषयीं आदर आहे. त्यानें येथें येऊन निश्चिंतपणें आपल्या शंका दूर करून घ्याव्या. मी त्याला अभयवचन देतों." ब्रूटसनें नोकरां करवीं उलट उत्तर पाठविलें.

अंटोनी सभागृहांत आला. सीझरचा मृत देह पाहून त्याला आपले अश्रू आवरेनासें झाले. मारेकऱ्यांना तो कांहींहि म्हणाला नाहीं. परंतु ज्या तलवारींनीं सीझरला मारलें त्या तलवारींनीं आपलाहि अंत करण्याची त्यानें इच्छा प्रगट केली.

"आमच्या हाताकडे व तलवारीकडेच पाहून आम्हांला हत्यारे ठरवूं नकोस. आमच्या हृदयांत डोकावून पहा म्हणजे रोम विषयीं आमची तळमळ तुला दिसेल. थांब, सीझरच्या मृत्युमुळें जनता फार गोंधळली आहे. प्रथम तिला शांत करूं दे. मग मी तुला सविस्तर सांगतों कीं मी त्याला कां मारलें तें." ब्रूटस म्हणाला.

अंटोनीनें सीझरच्या यथोचित संस्काराची विनंती केली. त्यावर ब्रूटस म्हणाला—"तुला सीझर विषयीं चार शब्द बोलण्यास व सन्मानपूर्वक त्याचा अंत्यविधि करण्यास माझी परवानगी आहे. पण तें सर्व माझें बोलणें झाल्या नंतर." अंटोनीनें तें कबूल केलें.

ब्रूटस लोकांच्या समोर येतांच चारी बाजूंनीं लोक ओरडून विचारूं लागले, सीझरला कां मारलें? स्पष्ट करा."



"सीझर आपल्याला जितका प्रिय होता तितकाच, किंबहुना थोडा जास्तच मलाहि प्रिय होता. परंतु फार खेदानें सांगावें लागत आहे कीं जर तो जिवंत राहिला असता तर आपल्या सर्वांना गुलामाप्रमाणें मरावें लागलें असतें. मी जर सीझर असतों तर तुम्हीं सर्वांनीं मिळून माझ्याशीं ज्या तऱ्हेचें वर्तन केलें असतें तेंच मी सीझरच्या बाबतींत केलें. सीझर सद्गुणी होता. परंतु त्याची महत्त्वाकांक्षाच त्याच्या मृत्यूला कारण झाली. जर आपल्याला असें वाटत असेल कीं माझ्या मृत्यूनें रोमचे हित होणार असेल तर मी ज्या तलवारीनें सीझरला मारलें त्याच तलवारीनें आत्महत्या करण्यास तयार आहें." इतकें बोलून ब्रूटस मंचकावरून उतरला. ब्रूटसनें सर्वांना शांत होऊन मार्क ॲंटनीचें म्हणणें ऐकून घ्यावयास सांगितलें.

ॲंटनी उत्तम वक्ता होता. ॲंटनी बोलूं लागला. तो पुन्हां पुन्हां सांगत होता कीं मी सीझरची मुळीच प्रशंसा करीत नाहीं. परंतु त्याच्या वाक्यांत त्याच्या विषयीं तो सद्भाव मात्र उत्पन्न करीत होता. कारस्थानी लोकांचीं कारस्थानें सांगून तो











औपरोधिकपणें त्यांना चांगले म्हणत होता. त्यानें त्यांना 'सज्जन' म्हटलें कीं सर्वांना त्यांच्या बद्दल आदर वाटण्या ऐवजीं निरादर वाटूं लागला. तो पुढें म्हणाला— "ब्रूटस म्हणतो आहे कीं सीझर महत्वाकांक्षी होता. खरें असेल तें. कारण ब्रूटस 'सज्जन' आहे व तो कधीं खोटें बोलत नाहीं. पण मी सीझरला तीन वेळां मुकुट दिला तरी त्यानें एक दोनदां नाहीं, तिन्हीं वेळां नाकारला. इतका महापुरुष पण क्षणांत कसा नाहींसा झाला पाहा! हे जिवंत असलेले ब्रूटस, कॅसियस वगैरे थोर व्यक्ति! त्यांच्यावर कशासाठीं अन्याय करावा! अन्याय व्हावा ह्या मरण पावलेल्या सीझरवर." नंतर ॲंटोनीनें सीझरच्या शरीरावरील तलवारीचे घाव सर्वांना दाखवून कोणी कोणी कोणता वार मारला त्याचें विस्तृत वर्णन केलें. शेवटीं तो म्हणाला— "ही पहा सीझरनें केलेली शेवटची घोषणा. ती ऐकून खरोखर आपल्या डोळ्यांतून टिपें गळतील. तरी पण ब्रूटस वर रागावण्याचें कारण नाहीं. तो थोर पुरुष आहे. सीझरनें लिहिलें आहे कीं माझ्या मृत्यू नंतर प्रत्येक नागरिकाला ७५ रुपये मिळावेत."

ॲंटनीचें भाषण ऐकून लोकांना आवेश चढला. ते सीझरला मारणाऱ्या कपटी लोकांच्या शोधार्थ धांवले. त्यांची घरें जाळून टाकली. ब्रूटस वगैरे सर्वजण पळून गेले.

कांहीं दिवसांनीं ह्या दोन्हीं पक्षांत युद्ध झालें. सीझरच्या पक्षाचा नेता ॲंटनी होता. दुसऱ्या बाजूस ब्रूटस, कॅसियस वगैरे लोक होते. ब्रूटसला कळून आलें कीं कॅसियस पक्का स्वार्थी आहे. पुढें फिलिपर्क नांवाच्या गांवीं दोन्हीं पक्षांची लढाई झाली त्यांत कपटी लोक हारले. ब्रूटस व कॅसियसनें आत्महत्या करून घेतली.





# ७. सेंट्रल लेदर रिसर्च इंस्टिट्यूट - मद्रास

आपल्या देशांत जितकें चामडें मिळूं शकतें तितकें आणखी दुसऱ्या कोणत्याहि देशांत मिळत नाहीं. ह्या देशांत दरवर्षी १४२ लाख गाईंची कातडी, ३० लाख म्हशींचीं कातडीं, २१३ लाख बकरींचीं कातडीं मिळतात. ह्या सर्वांची एकंदर किंमत चाळीस कोटीच्या जवळ जवळ आहे. जर ही सर्व कातडीं आपल्या देशांतच कमावली तर त्याची जवळ जवळ दुप्पट किंमत येईल.

सध्यां ह्या देशांतून ३०-३४ कोटी रुपयांची कातडी निर्यात होत आहेत. हा धंदा आपल्या देशांत फार मागासलेला आहे. म्हणून आपल्याकडून चामड्यांचा पुरा उपयोग होऊं शकत नाहीं. खास्तव सध्यां चामड्याच्या वस्तू, चामड्याला लागणारे रासायनिक सामान वगैरे पदार्थ आपणांस बाहेरून मागवावे लागत आहेत.

आपल्या देशांत चामड्याच्या उद्योगधंद्याचा अभ्यास करण्यासाठीं व ह्या देशांत मिळणारी रासायनिक द्रव्यें त्या करितां किती उपयुक्त आहेत हें जाणण्यासाठीं ही सेंट्रल लेदर इंस्टिट्यूट १५ जानेवारी १९५३ मध्यें स्थापण्यांत आली. तेव्हां पासून हें काम चालू आहे.













# ❋ उपकारी कोल्हा ❋

चीन देशांत एके ठिकाणीं अन्टाक नांवाचा एक फार गरीब माणूस राहात असे. त्याच्या जवळ फक्त एक डाळिंबाचें झाड होतें. त्याच्या जोपासनेंत त्याचा सारा वेळ जात असे. रात्रं दिवस तो झाडाखालीं बसून राही.

त्याच्या घराच्या भिंतीजवळ जरी कोणी मुलें त्याला दिसलीं तरी त्याला राग येई. तो त्यांना दरडावीत असे. कधीं कधीं पकडून चांगलें पिटत पण असे. डाळिंबाच्या झाडा-वर असलेलें प्रेम पाहून लोकांनीं त्याचें नांवच 'डाळिंबाचा राजा' असें ठेविलें होतें.

एका वर्षीं त्या झाडाला पुष्कळ डाळिंबें लागलीं. तेव्हां तर तो चोवीस तास त्या झाडाच्या खालींच बसलेला असे.

एक दिवस रात्रीं पाहारा देत असतां डुलकी आली. ती घालविण्यासाठीं त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. पण तो आपली झोंप आवरूं शकला नाहीं. तो जागा झाला तेव्हां त्याला कांहीं डाळिंबें कमी झालेलीं दिसलीं. अशींच आणखी एक दिवशीं कांहीं डाळिंबें कमी झालेलीं दिसलीं.

चोराला पकडण्यासाठीं म्हणून एक दिवस अन्टाक झोंपेचें सोंग घेऊन झाडाखालीं बसला. थोड्या वेळांत एक कोल्हा भिंतीवर उडी मारून आला. त्यानें डाळिंबावर झडप घालतांच अन्टाकनें त्याला पकडण्यासाठीं त्याची शेपटी धरली. परंतु लटपट धडपड करून कोल्हा सुटून पळून गेला.

दुसऱ्या दिवशीं त्याला पकडण्यासाठीं अन्टाकनें जेथून कोल्हा येत असे त्या जागीं भिंतीला खूप डिंक लावून ठेवला. नित्या-प्रमाणें कोल्हा आला. पण डिंक लावला असल्यामुळें भिंतीला चिकटून बसला. आतां अन्टाकनें त्याला पकडलें आणि मारण्यास सुरवात केली. कोल्हा बोलूं लागला. म्हणाला—"जर तूं मला सोडून दिलेंस तर मी तुझ्या उपयोगी पडेन. इतकेंच नव्हे तर राजाच्या मुलीशीं तुझें लग्न लावून देईन."

"माझी थट्टा करतोस होय. अरे मी इतका गरीब आहे कीं साधारण मनुष्य सुद्धां आपली मुलगी मला देणार नाहीं. तेथें राजाच्या मुलीची काय गोष्ट!" अन्टाक म्हणाला. पण जेव्हां कोल्हा पुन्हां पुन्हां सांगूं लागला कीं राजाच्या मुलीशीं तुझें लग्न लावून देतों तेव्हां त्यानें कोल्ह्याला सोडून दिलें.

कोल्हा नदीपार करून सरळ राजाकडे गेला. "महाराज, आपल्याकडे रत्न चाळ-ण्याच्या चाळण्या आहेत त्या आमच्या राजानें मागितल्या आहेत. टोपलीभर रत्नें आलीं आहेत. त्यांतील उत्तम ठेवून घेऊन बाकी फेकून देणार आहे." कोल्ह्यानें सांगितलें.

कोल्हा राजाकडून चाळण्या घेऊन गेला. त्यांत एका चाळणीच्या भोकांत कोठें कोठें ल्हान ल्हान माणिक, मोत्यें, हिरे, पाचू, नीलमणि बसविले आणि चाळणी परत केली. देतांना कोल्ह्यानें ती चाळणी जोरानें जमिनीवर आपटली. त्याबरोबर सर्व रत्न



चारी बाजूस विखुरलीं. राजकन्या तीं गोळा करण्यासाठीं पुढें सरसावल्या. तें पाहून कोल्हा म्हणाला—"तुम्हांला रत्नें पाहिजे होतीं तर मग मला कां सांगितलें नाहीं? मी अन्टाक राजाकडून चार उंटांच्या पाठीवर लादून आणून दिलीं असतीं."

चीन देशाच्या राजाला वाटलें इतका धनवान राजा असेल तर त्याला आपला जांवई कां करून घेऊं नये? तो कोल्ह्यास म्हणाला—"रत्नाची गोष्ट सोड. तूं आपल्या राजाला सांग, आमच्या तीन मुली आहेत. त्यांपैकीं वाटेल तिच्याशीं त्यानें लग्न करावें."










"तो लग्न करणार आहे कीं नाहीं मला माहीत नाहीं. मी त्याला विचारून येऊन सांगेन" कोल्हा म्हणाला.

कोल्हा अन्टाककडे आला. म्हणाला—"राजा, आपली मुलगी तुला देण्यास तयार आहे. चल लवकर लग्नास."

"अरे! लग्नास जायचें म्हणजे कांहीं तयारी नको का? जवळपास कांहीं पैसे नकोत का? किती पैसे द्यावे लागतील? माझ्याजवळ तर फुटकी कवडी सुद्धां नाहीं. मग कसें!" अन्टाकनें विचारलें. तो फार खिन्न झाला.

"थोड्या शहाणपणानें काम घेतलेंस तर सर्व कांहीं ठीक होईल. तूं नुसता माझ्या-बरोबर ये. बाकीची सर्व व्यवस्था मी बघतों." कोल्हा म्हणाला.

दोघे निघाले. नदीजवळ आल्यावर कोल्ह्यानें अन्टाकला गळ्यापर्यंतच्या पाण्यांत उभें केलें व तो धांवत धांवत राजाकडे गेला. म्हणाला—"आमचे महाराज चाळीस उंटांवर रत्नांचीं पोतीं लादून येत होते. पण नदी पार करीत असतां एकाएकीं नदीला पूर आला आणि सर्व वाहून गेलें. उंट, त्यावरील गोणी, नोकर चाकर, सामान सर्व वाहून गेलें. राजे साहेबांचे कपडेहि त्यांत गेले. कसेबसे राजेसाहेब जीव धरून बसले आहेत. काय करावें कांहीं सुचत नाहीं."

"जें गेलें तें गेलें. आतां त्याच्याबद्दल दुःख करून काय उपयोग!" असें म्हणून राजा राजपुरुषाला उचित असा पोषाख घेऊन कांहीं नोकरांसह नदी कांठीं गेला. अन्टाकला पाण्याबाहेर काढून चांगले कपडे देऊन आपल्याबरोबर घेऊन आला.

राजाच्या सर्वांत धाकट्या मुलीशीं अन्टाकचें मोठ्या थाटानें लग्न झालें. कांहीं दिवस जेवणावळींची झोड चालली होती. ती ओसरल्यावर अंटाकला काळजी वाटूं लागली. तो कोल्ह्याला म्हणाला—"आतां-पर्यंत सर्व ठीक झालें. पण पुढें कसें करा-वयाचें? मी घरीं जाईन तेव्हां सारें बिंग फुटणार त्याला कांहीं उपाय सांग."

"तेव्हांचें तेव्हां पाहूं, आतां काय त्याचें?" कोल्हा म्हणाला.

राजानें एक मुहूर्त पाहून जांवई व मुलीला पाठवून दिलें. कोल्हा थोडा पुढें गेला. त्याला एक उंटांचा काफला दिसला. तो त्यांना म्हणाला—"तुम्हीं चांगला दिवस पाहून निघालेले दिसत नाहीं. मागून डाकू येत आहेत. ते तुमचा सर्व माल लुटून नेतील."

काफिलेवाल्यानें त्या दिशेनें पाहिलें तर खरोखरच त्या बाजूला धूळ उडलेली दिसत होती. तो म्हणाला—"कोल्होबा, आतां काय करणार? कसे तरी वांचवा."

"ते लूटमार करूं लागले म्हणजे त्यांना सांगा हा माल अन्टाक राजाचा आहे. म्हणजे ते तुम्हांला कांहीं करणार नाहींत." कोल्ह्यानें सांगितलें व तो निघून गेला.

थोड्या वेळानें राजाचें सैन्य आलें. सैनिकांनीं काफल्याच्या मालकाला विचारलें—"कोणाचा आहे हा काफला?"



"अन्टाक महाराजांचा आहे सरकार." काफलेवाला म्हणाला. तें सर्वांनीं ऐकलें. कोल्ह्यानें ह्या प्रमाणें कांहीं घोडेस्वारांना सांगितलें. कांहीं धनगरांनाहिपण सांगितलें. सैनिकांनीं त्यांना विचारलें तेव्हां ते सुद्धां म्हणाले—"अन्टाक महाराजांचें सरकार."

कोल्हा जातां जातां एका राक्षसाच्या किल्ल्यांत गेला. राक्षस राजानें त्याला विचारलें—"आज इकडे कोठें सवारी?"

"कोठें काय विचारतोस? डाकू येत आहेत." कोल्हा म्हणाला. "प्राण वाचले म्हणजे पुरे. ते लाखो लोक आहेत. तूं एकटा









त्यांना काय तोंड देणार? आपले प्राण वांचव म्हणजे जास्त."

"कोठें जाऊं? काय करूं? कसें वांचवूं आपल्याला?" राक्षसांच्या राजानें घाबरून विचारलें.

"तूं भट्टी मध्यें लपून बस मी तुझ्यावर लाकडें रचतों. म्हणजे कोणाला कांहीं कळणार नाहीं. आणि ते निघून गेले म्हणजे ये बाहेर." कोल्ह्यानें सुचविलें.

राक्षस भट्टींत निजला कोल्ह्यानें त्याच्यावर लाकडें रचून त्याला आग लावली. राक्षस त्या अग्नींत जळून मरून गेला.

कोल्हा धांवत धांवत अन्टाक राजकुमारीचें स्वागत करण्यासाठीं त्यांना सामोरा गेला व त्यांना राक्षसाच्या किल्ल्यांत घेऊन आला.

तो किल्ला पाहून राजकुमारीला व तिच्याबरोबर आलेल्या लोकांना वाटलें, हाच अन्टाक राजाचा किल्ला आहे. त्यांना बरें वाटलें.

पुढें अन्टाक आपल्या बायकोसह तेथेंच राहूं लागला. तिच्याबरोबर आलेलें सैन्यहि तेथेंच राहिलें. कोल्हा सुद्धां तेथेंच राहूं लागला.

एकदां कोल्हा अन्टाककडे आला. तो अन्टाकला म्हणाला—"मी तुझ्यावर एवढें उपकार केले आहेत. आणि आतां मी जर मेलों तर तूं माझें काय करशील?"

"मी तुला डोक्यावर घेईन." अन्टाक म्हणाला.

कांहीं दिवसांनीं कोल्हा मेला. अन्टाकनें आपल्या वचनाप्रमाणें खरोखरच त्याच्या कातड्याची टोपी केली आणि आपल्या डोक्यावर घातली. हा रिवाज त्या देशांत अजून सुद्धां चालू आहे, म्हणे. तेथील लोक कोल्ह्याच्या कातड्याची टोपी वापरतात.





# अहिंसा मूर्ति

[ ११ ]

एक आठवडा संपला. अनिरुद्धनें भद्रीला आठवण केली. भद्री संन्यास घेण्यास तयार झाला. दोघांबरोबर शुद्धोदनच्या आणखी एका भावाचा मुलगा आनंद, किंबिल सुप्रबद्ध याचा मुलगा, म्हणजे यशोधराचा भाऊ देवदत्त आणि भगशाक्य राजकुमार, सर्व संन्यास दीक्षा घेण्यास तयार झाले. करमणुकीखातर बाहेर जात आहों असें सांगून सर्व घराबाहेर निघाले आणि गांवापासून सोळा मैल अंतरावर एकत्र जमले. तेथें त्यांनीं आपापल्या नोकरा-चाकरांना निरोप दिला. फक्त उपाली नामक एका न्हाव्याला बरोबर घेतलें आणि एका निवांत जागीं गेले. तेथें त्यांनीं आपले सुंदर वस्त्रालंकार काढून उपालीला दिले आणि म्हणाले—"आम्ही संन्यास घेण्याचें ठरविलें आहे."

उपालीनें विचार केला, मी हे वस्त्रालंकार घेऊन जर कपिलवस्तूला परत गेलों तर शाक्य लोक मला जिवंत सोडणार नाहींत. हे राजकुमार सर्वसंगपरित्याग करून संन्यास घेत आहेत तर आपण देखील संन्यास कां घेऊं नये? असा विचार करून त्यानें तीं सर्व वस्त्राभूषणें एका झाडावर ठेवलीं आणि राजकुमारांच्या पाठोपाठ चालूं लागला. राज-

घटना झालेल्या स्थळीं तेथें बदल होण्या-पूर्वी जर कुत्र्यांना ती जागा दाखविली तर आपल्या कामांत त्यांना खात्रीनें यश येतें. अधिक बदल झाली नसेल तर दोषी माणसाचा वास जवळ जवळ सहा तें आठ तास राहातो. आणि जर त्या व्यक्तीची एकादी वस्तू तेथें सांपडली तर पुष्कळ दिवसांनंतर सुद्धां दोषी व्यक्तीचा तपास लगूं शकतो.

घटनेनंतर पुष्कळ दिवसांनीं अपराध्याचा पत्ता लागल्याची उदाहरणें सुद्धां मिळालेली आहेत. १७-१०-५८ ला रामनाथपुरम जिल्ह्यांत चोक्कलिंगम पुदूर नांवाच्या गांवीं रात्रीं चोरी झाली. त्यांत पंधरा हजार रुपयांचा माल चोरीस गेला. तेथील पोलीस कुत्र्यांसाठीं मद्रासला कळविलें आणि चोरी झालेल्या घराला कुलूप लावलें. २० तारखेला 'चीफ' ला ती जागा दाखविण्यांत आली. त्या जागेचा त्यानें वास घेतला व त्याच्या अनुरोधानें तो १७ मैल अंतर धांवत जाऊन एका गांवांत त्यानें चोराला पकडलें. त्याचें नांव अळगप्पन. तो जुना कैदी होता. म्हणजे कसलेला चोर असला पाहिजे. त्याच्या जवळ चोरीचा बराच माल सांपडला.

असेंच 'युवराजानें' सुद्धां मोठ्या गमतीदार रितीनें एका खुन्याला पकडलें. १७-२-५८ रोजीं मदुरा जिल्ह्यांतील थिरुमले स्टेशनाजवळ एका झोंपडींत रात्रीं एक चौकीदार त्याची बायको व मुलें मारल्याचें दिसून आलें. त्या ठिकाणी पोहोंचण्यास युवराजाला एक आठवडा लागला. तरी सुद्धां त्यानें रक्ताच्या वासानें सहा मैलाच्या अंतरावर एक पोतें शोधून काढलें. त्यांत रक्तानें भरलेलीं हत्यारें होतीं. खून करणारानें तें पाहिलें म्हणून त्यानें बाकी साथीदारांची नांवें एका कागदावर लिहून ठेवून आत्महत्या करून घेतली.

अशाच रीतीनें 'चीफ'नें, एकदां गस्त घालीत असतां अवघ्या दोन तासांत अपराध्याचा शोध लाविला.

एका खुनाच्या बाबतींत 'युवराज'नें खऱ्या गुन्याला पकडून देऊन निरपराध्याला सोड-विलें. खऱ्या गुन्हेगारानें आपला अपराध कबूल केला.

साधारणपणें पोलीसांकडून पकडला गेलेला अपराधी अपराध कधीं कबूल करीत नाहीं. परंतु पोलीस कुत्र्यानें धरून दिलेला अपराधी कधीं नाकबूल झाला नाहीं.








# मुंग्या

मुंग्या न पाहिलेला व्यक्ति जगांत कोठें मिळणार नाहीं. आपल्या नजरे समोर येणाऱ्या मुंग्यांत सर्व साधारणपणें तांबड्या, काळ्या, पंखांच्या, मुंगळे वगैरे असतात. त्यांत लहान मोठ्या मुंग्याहि असतात. काळ्या मुंग्या चावत नाहींत. पण लहान तांबड्या मुंग्या फार जोरानें चावतात आणि त्या चावल्यावर ती जागा सुजतेहि व दुखते सुद्धां. मुंगळे चावत नाहींत. पण रक्त काढतात अंगातून.

सर्व ठिकाणीं अंगणांत जमिनींत मुंग्यांचीं वारूळें असतात आणि चुकून जरी त्यावर आपला पाय पडला तरी त्या चावण्यास चुकत नाहींत. घरांत सुद्धां सर्व ठिकाणीं वावरतांना त्या दिसतात. जमीनीच्या फटींतून भिंतीच्या भोकांतून ये जा करीत असलेल्या आपल्याला त्या नेहमीं दिसतात. त्यांची रांग कोठून तरी कोठें तरी जात असते. त्या नेहमीं धुंद करून असतात.

खरोखर ह्याहून अधिक माहिती आप-ल्याला नसते. पण त्यांच्याविषयीं समजून घेण्यालायक किती तरी गोष्टी आहेत. अनेक शास्त्रज्ञांनीं ह्याचा सखोल अभ्यास केला आहे.

निरनिराळ्या देशांत व प्रांतांत तऱ्हे-तऱ्हेच्या मुंग्या आढळतात. परंतु सर्व जगांत आठ हजार जातीच्या मुंग्या आहेत. एका शास्त्रज्ञानें बेल्जियम कांगो मधील मुंग्यांवर ११३७ पानांचें पुस्तक लिहिलें आहे.

वाळवीला कांहीं देशांत 'पांढऱ्या मुंग्या' म्हणतात. परंतु त्या मुंग्यांच्या जातींत मोडत नाहींत. वैज्ञानिकांच्या मतें मुंग्या गांधीलमाशा व मधमाशांच्या जातीच्या आहेत आणि वाळवी वागुरड्याच्या जातींत



मोडते. असें असलें तरी वाळवीचें जीवन मुंगी प्रमाणेंच जास्त करून असतें.

जगांत मुंग्या किती असतील हें सांगणें फार कठीण आहे. तरी पण एवढें निश्चित कीं दुसऱ्या कोणत्याहि प्राण्यापेक्षां मुंग्यांची संख्या जास्त आहे.

मुंग्यांची जीवन घालविण्याची आपली एक स्वतंत्र रीत व सभ्यता आहे. त्यांत त्यांचे जे नियम आहेत त्याला अनुसरूनच त्या आपलें आयुष्य घालवितात. त्या प्रजोत्पत्ति करतात व युद्धहि करतात. प्रत्येक जातीच्या मुंग्यांना एक एक तऱ्हेचा वास येतो. भिन्न भिन्न वासवाल्या मुंग्यांत भयंकर युद्ध होतें. त्या एक दुसऱ्याच्या वारुळावर हल्ले पण करतात. ह्यांच्या कांहीं गोष्टी मनुष्य स्वभावाप्रमाणें दिसून येतात.

जसा मनुष्य कांहीं सामाजिक नियम मानतो तसा मुंग्याहि कांहीं सामाजिक नियम मानतात. अन्न संचय, रचना वगैरे प्रण्यांच्या सहज प्रवृत्ती त्यांच्यांत विकासास पावलेल्या आढळतात.

कांहीं मुंग्या नावेंत बसून देशांतरालाहि जात असतात.

सुमारें ३० हजार वर्षांपूर्वीच्या मुंग्या आपणास आजहि पहावयास मिळतात. त्यावेळीं कांहीं मुंग्या देवदारू झाडाच्या डिंकाला चिकटल्या गेल्या आणि तो डिंक आज आपल्याला मिळत आहे. त्याला आपण हल्लीं तृणमणि म्हणून ओळखतों. हा डिंक कांचेप्रमाणें फार दर्शक असल्यानें त्यांत असलेली मुंगी आपल्याला आज सुद्धां पाहावयास मिळते.

पावसानंतर जर आपण अंगणांतील एखादा दगड उचलला तर त्याखालीं आपल्याला बऱ्याच मुंग्या आढळून येतील. दगड उचलतांच त्या चहूं कडे सैरावैरा पळूं लागतील. ह्या साऱ्या मजूर मुंग्या आणि त्यांत जी मोठी मुंगी असेल ती राणी मुंगी. राणी मुंगी, मादी मुंगी असते. बाकी मुंग्या तिचीं पिलें असतात. नर मुंग्या फार लहान असतात. मादी मुंगी फक्त प्रसूतीच्या वेळींच आपल्या वारुळांत बसलेली दिसते. इतर वेळीं ती बाहेरच असते.

जी मुंगी राणी होणारी असते तिला आपल्या घरीं बरीच मोकळीक असते. दुसऱ्या मुंग्या तिला जास्त खायला घालून मोठ्या लाडानें प्रेमानें वाढवितात, आणि ती पण पौष्टिक अन्न खाऊन चांगली हृष्टपुष्ट होते. तिचें मांसपिंड फार मजबूत असतात. कांहीं दिवसांनीं तिला पंख फुटतात. नंतर गर्भधारण झालें म्हणजे ती आपलें माहेरघर सोडून उडून जाते आणि दुसऱ्या जागीं जाऊन बसते. तेथें झाडाच्या सालीखालीं, दगडाच्या खालीं किंवा कोठें तरी फटींत-बिटींत ती आपल्यासाठीं व आपल्या पिलांसाठीं जागा तयार करते. ह्यानंतर तिला पंखांची गरज नसते. म्हणून ती आपले पंख तोडून टाकते. ह्यांतील मांसपेशी त्यांच्याच खाद्यभांडारांतील एक वस्तू होत.



या नंतर राणी मुंगी अंडीं घालते आणि अंड्यांतून पिलें निघालीं म्हणजे आपल्या पोटांत जमविलेलें अन्न काढून पिलांना खाऊं घालते. मुंग्यांची मुलें प्रथम फार कमजोर असतात तरी ती खाणें शोधून आणून आपल्या आईला व भावंडांना देतात. राणी मुंगी एकेका वेळीं बरीच अंडी घालीत जाते. त्यांतून निघालेलीं पिलें आपल्यासाठीं व आपल्या आईसाठीं अन्न आणून जमवून ठेवतात. राणी मुंगी बसून बसून मुलांनीं आणलेलें अन्न खाऊन खूप माजते व अंडीं घालीत जाते. खाणें व अंडीं देणें हेंच तिचें काम.

          

सर्व राणी मुंग्या अशा तऱ्हेनेंच आपलें घर करीत नसून निरनिराळ्या तऱ्हेनें करतात. आशिया व उत्तर आफ्रिकेंत एका जातीच्या मुंग्या आहेत. त्यांतील राणी जेव्हां आपलें घर करण्यासाठीं उडून जाते, तेव्हां तिच्या पायाला पकडून कांहीं मजूर मुंग्या तिच्या बरोबर येतात. आपापल्या नव्या घराचें सर्व काम त्याच मुंग्या करतात.

कांहीं जातींतील राणी मुंग्या आपल्या बरोबर मजूर मुंग्यांना नेत नाहींत आणि आपल्या संततीचें रक्षण पण करीत नाहींत. म्हणून त्या दुसऱ्या जातीच्या मुंग्यांवर हला करतात. हे ह्यांचे हल्ले फार मजेदार असतात.

एक प्रकारची राणी मुंगी आपल्या जवळच्या जातीच्या मुंग्यांच्या वारुळांत शिरते. तेथील अंड्यांना एकत्र करून त्यांना आपल्या ताब्यांत घेते आणि त्याच मुंग्यांशीं लढाई करते, भांडते, नंतर त्या अंड्यांतून ज्या मुंग्या निघतील त्या ह्या चोर राणीच्या गुलाम म्हणून काम करतात. त्या ह्या राणीची व तिच्या संततीची सेवा करतात. अशातऱ्हेनें कांहीं वारुळांत दोन तऱ्हेच्या मुंग्या असलेल्या दिसतात.

'फार्मिका' नांवाच्या मुंग्यांच्या जातीची राणी फार ल्हान असते. हिच्या अंगावर ल्हान ल्हान कांटेरी केस असतात. जेव्हां ती आपलें घर करण्यासाठीं निघते तेव्हां ती जवळच्या दुसऱ्या प्रकारच्या मुंग्यांच्या वारुळांत घुसते. मग कसें तरी करून त्यांच्याच कामकरी मुंग्यांना आपल्या भोंवती जमा करते. ह्या कामकरी मुंग्या आपल्या आईला मारून टाकून ह्या नव्या राणीची व तिच्या संततीची सेवा चाकरी करूं लागतात. थोड्याच दिवसांत जुन्या मुंग्या मरून जातात. ते सर्व वारूळ ह्या नवीन मुंग्यांना आपोआपच मिळतें. (पुढें चालू)



## जोडनांवें चढाओढ

मार्च १९६० :: बक्षिस १० रुपये





**कृपा करून जोडनांव पोस्ट-कार्डावरच पाठवावीत.**

वरील फोटोंची ओळख करून देणारीं जोडनांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठीं, पण परस्परांशीं थोडेंफार साम्य दर्शविणारीं असावीत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ७ जानेवारी १९६० पूर्वी खालील पत्त्यावर पाठवावीत. पोस्ट-कार्डा शिवाय आलेलीं जोडनांवें स्वीकारण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ**
**चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६.**

## जानेवारी महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालील जोडनांवें सर्वोत्तम ठरली आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होतांच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषकाचें नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो : प्रयत्ना विना, पोट भरायाः जगीं समर्थ कुणी नसे !
दुसरा फोटो : धडपड जीवनीं, नित्य असावीः तूं आम्हाला शिकवितसें !!

प्रेषक : **श्री. विश्वास ग. सोनवणे**
" विद्या प्रसाद " स्टेशन रोड, धुळें ( पश्चिम खानदेश ) मुंबई राज्य.










# महाभारत

दुसऱ्या दिवशीच्या युद्धांत सुरुवातीस दुपारपर्यंत भीमानें आपला पराक्रम गाजविला. त्यानंतर दुपारपासून युद्ध संपेपर्यंत अर्जुनानें आपलें कौशल्य दाखविलें.

आपलें सैन्य मेंढरां बकऱ्यांप्रमाणें कापलें जात असल्याचें पाहून दुर्योधनाचें रक्त खवळलें. त्याच्या म्हणण्यावरून कृप, अश्वत्थामा, शल्य वगैरे मिळून धृष्टद्युम्नावर धांवून गेले. धृष्टद्युम्नानें अश्वत्थाम्याच्या रथाचे घोडे मारले. त्याबरोबर तो शल्याच्या रथावर चढला व युद्ध करूं लागला. अभिमन्यूनें हें पाहिलें. तो त्याच्याशीं युद्ध करूं लागला. अभिमन्यूला पाहतांच दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मण अभिमन्यूच्या समाचाराला धांवला.

ह्या संधीचा फायदा घेऊन कौरव वीरांनीं येऊन अभिमन्यूला चारी बाजूंनीं घेरलें. अभिमन्यु एकटा होता तरी डगमगला नाहीं. तो सर्वांना तोंड देत होता. आपल्या मुलाच्या मदतीला अर्जुन तेथें गेला व क्रोधानें भराभर बाणवृष्टि करूं लागला. दावाग्नि भडकून रान जसें बेचिराख होतें त्याप्रमाणें कौरव दलाचा संहार होऊं लागला.

अर्जुनाचें हें उग्र रूप पाहून कौरव सैन्यांतील सर्व वीरांचें धाबें दणाणलें. अर्जुनाच्या समोर येण्याचें साहस कोणांतच उरलें नाहीं. सर्व वीर सैरवैरां पळूं लागले.

भीष्म सुद्धां अर्जुनाचा पराक्रम पाहात उभा राहिला. तो द्रोणाचार्यांला म्हणाला—"आज अर्जुनासमोर जाण्याची कोणाची छाती होत नाहीं आणि आपल्या सैन्याला मागें बोलावणेंहि ठीक होणार नाहीं. म्हणून मला वाटतें, आतां युद्ध थांबविणेंच रास्त आहे. थोड्या वेळांत सूर्यास्तहि होणार आहे." त्यांची सूचना मान्य झाली.

दुसऱ्या दिवशीं पुन्हां युद्ध सुरू झालें. आज युद्धाचा तिसरा दिवस उजाडला होता. कौरवांनीं आपली सेना गरुडव्यूहांत उभी केली व पांडवांनीं अर्धचंद्र व्यूहांत.

आज संतप्त वातावरणांतच युद्धाला प्रारंभ झाला. कालचा चेव अद्यापिहि कायम होता. आज अर्जुन, भीम, घटोत्कच, सात्यकी, उपपाण्डव वगैरे मोठ्या शौर्यानें लढत होते. आजच्या युद्धांत घटोत्कचाचा पराक्रम भीमाहून सुद्धां जास्त वरचढ होता.

दुर्योधन सात हजार रथदल घेऊन घटोत्कचावर धांवला. परंतु भीमानें दुर्योधनावर असा एक बाण सोडला कीं तो मूर्छित झाला. अर्थातच त्याच्या सारथ्यानें रथ शिबिराच्या दिशेनें वळविला. त्यामुळें कौरव सेनेचा धीर सुटला. ती पळूं लागली. भीमाला तेवढेंच फावलें. तो बाण सोडीत शत्रूचा पाठलाग करूं लागला. ह्याच वेळीं अर्जुन व अभिमन्यु सात्यकीच्या सेनेचा संहार करण्यांत रंगून गेले होते. भीष्म व द्रोणांना त्या हल्ल्यामुळें आपलें सैन्य मागें घेणें सुद्धां शक्य होत नव्हतें.

दुर्योधनाला जेव्हां शुद्ध आली तेव्हां त्यानें आपल्या सैनिकांना माघार घेतांना



पाहिलें. त्यानें पुन्हां त्यांना रणांगणावर पाठविलें. नंतर तो भीष्माजवळ येऊन म्हणाला—“ आजोबा! तुम्हीं जिवंत असतांना कौरव सेना माघार घेत असलेली पाहून मला लाज वाटते. हा अपमानच नव्हे का आपला? मला तर असें वाटत होतें कीं पांडव सेनेंत तुमची, द्रोणाची व अश्वत्थाम्याची बरोबरी करणारा कोणी नाहीं. कां पांडवां-बद्दल वाटत असलेल्या प्रेमामुळें तुम्हीं आपल्या सैनिकांची माघार तटस्थपणें पाहात आहांत? मला असें मध्येंच सोडून देण्याचा तुमचा विचार आहे काय? मला वाटतें, ह्यावेळीं तरी तुम्हीं आपली सर्व शक्ति एकवटून युद्ध केलें पाहिजे.

दुर्योधनाच्या ह्या आरोपानें भीष्माला राग आला. ते म्हणाले—“ मी तुला पहिल्यानेंच सांगितलें होतें कीं पांडवांना जिंकणें सोपें नाहीं. आणि तें सत्य आहे. आणि मी तर म्हाताराच आहें. तरी पण मी आपली शिकस्त करण्याचा प्रयत्न करतों.” भीष्माच्या क्रोधोक्तीनें दुर्योधनाला बरें वाटलें. त्यानें शंख वाजवितांच त्याच्या सैन्यांतून रणभेरी वाजविल्या गेल्या. दुपारच्या युद्धांत भीष्मानें खरोखरच शत्रुसैन्यावर जणुं आग पाखडली होती. त्या आगींत पांडव सैन्य जळून भस्म होत होतें. दुर्योधनानें भीष्माच्या मदती-साठीं एक मोठी तुकडी पाठवून दिली. पांडवांचें सैन्य जिकडे वाट फुटेल तिकडे धावूं लागलें. भीष्माच्या ह्या क्रोधामुळें सर्व-कडे हाहाकार पसरला.

कृष्ण अर्जुनाचा सारथी होता. त्यानें अर्जुनाचा रथ एका बाजूस थांबवून त्याला म्हटलें—“ अर्जुना, तूं मागें म्हणाला होतास कीं भीष्म द्रोणासह सर्व कौरव सैन्याचा नाश करून टाकीन म्हणून. आतां आठव तें वचन. तें पूर्ण करण्याची वेळ आली आहे. तें बघ तिकडे, तुझ्या सेनेला भीष्माचार्य पाठीमागें रेटीत जात आहेत. भीष्माचें हें रुद्ररूप पहा आणि त्याला तोंड देऊन आपले शब्द पूर्ण करून दाखव.”

“चल मग तिकडे. फिरव आपला रथ त्या बाजूला.” अर्जुन म्हणाला. त्या नंतर थोड्याच वेळांत भीष्म व अर्जुन यांचें युद्ध सुरू झालें. अर्जुनाला पुढें सरसावलेला पाहून पांडव सेना पुन्हां नव्या दमानें युद्धास पुढें निघाली.

भीष्म निकरानें लढत होता. आपल्या बाणाच्या ओघानें त्यानें अर्जुनाला पुढें येऊं







दिलें नाहीं. परंतु अर्जुनानें आपल्या कौशल्यानें दोनदां भीष्माच्या हातांतील बाण तोडून टाकले. भीष्माला सुद्धां त्याचें कौतुक वाटलें. ते म्हणाले—“शाबास अर्जुना! तुझ्यासारखा धनुर्धर तूंच! चालूं दे. असेंच पाहिजे.” आणि त्यानें जास्त त्वरेनें बाण सोडण्यास आरंभ केला. इतकेंच नव्हे तर त्यानें कृष्ण सारथी असून सुद्धां त्याच्यावर बाण सोडण्यास सुरुवात केली.

भीष्माचा आवेश पाहून कृष्णाला वाटलें, आजोबांच्या पुढें म्हणून अर्जुन थोडें भीत भीत युद्ध करीत आहे आणि असेंच जर चालू राहील तर युधिष्ठिराचें सैन्य कीड मुंग्या-प्रमाणें नष्ट होईल. त्याला आठवण करून दिली पाहिजे कीं भीष्माला मारणें फार जरूरी आहे आणि तें काम अर्जुनालाच केलें पाहिजे. त्याला प्रत्यक्ष दिसत होतें कीं पांडव सेना हरणाच्या शिकारीप्रमाणें मारली जात आहे. सात्यकी त्यांना पळून न जाण्यासाठीं सांगत आहे आणि त्यांना धीर देऊन मागें फिरवीत आहे.

कृष्ण रागांत होताच. तो म्हणाला—“सात्यकी, जे भिऊन पळून जात आहेत त्यांना खुशाल जाऊं दे आणि ज्यांना पळून जाण्याची इच्छा आहे त्यांनाहि जाऊं दे. सर्वजण गेले तरी चालेल. मी एकटा भीष्म व द्रोण यांना मारून युधिष्ठिराला विजयश्री मिळवून देईन आणि त्याचा राज्याभिषेक करवून राजा, म्हणून घोषित करीन.” असें सांगून कृष्णानें तावातावानें हातांतील घोड्यांचा लगाम सोडून दिला. आपलें सुदर्शन चक्र हातांत घेऊन रथांतून उडी मारून भीष्माकडे जाऊं लागला.

“कृष्णा, मार. तुझ्या हातून जर मला मरण आलें तर माझें केवढें भाग्य असें मी समजेन. त्यामुळें माझा दुहेरी फायदा आहे. तो म्हणजे, मला इह लोक तर मिळेलच, परलोकाची प्राप्ति देखील होईल. मी धन्य होईन.” भीष्म न भितां शांतपणें कृष्णाला म्हणाला.

कृष्णाचा राग शांत झालेला नव्हता. तो रागांतच म्हणाला—“म्हाताऱ्या, तुझ्या-मुळेंच हें युद्ध होत आहे. आज दुर्योधनाचा तुला एवढा पुळका येत आहे, परंतु ज्या दिवशीं दुर्योधनानें कपटानें पांडवांना द्यूतांत हारविलें तेव्हां त्याचा मंत्री असून सुद्धां तूं त्याला शब्दानें तरी सांगितलेंस? त्याला समजावण्याचा प्रयत्न केलास? आणि





समज, त्यानें तुझें म्हणणें ऐकलें नसतें तर तेव्हांच कां नाहीं त्याला सोडून गेलास ?"

"आश्रितांचा तो परमादर करीत आला आहे." भीष्मानें उत्तर दिलें.

"यादवांचें म्हणणें न ऐकल्यानें कंसाची काय गत झाली होती आठवत असेलच. अरे, जो राजा मार्गच्युत होतो त्याला शिक्षा देणें प्रजेचें कर्तव्यच आहे." कृष्णानें भीष्माला उत्तर दिलें.

इतक्यांत अर्जुन रथावरून उतरून कृष्णा-जवळ आला आणि त्याला जोरानें आपल्या-कडे ओढून घेतलें. परंतु कृष्ण आवेशानें त्याला दहा पावलें ओढीत घेऊन गेला.

अर्जुनानें तसेंच त्याला अडविलें. म्हणाला—"शांत हो ! तुझ्याशिवाय आम्हां पांडवांना दुसरा कोणाचा आधार आहे ? मी आपल्याला माझ्या भावाची व मुलाची शपथ घेऊन सांगतों कीं मी माझें वचन पूर्ण करीन. कौरवांचा समूळ नाश करीन."

कृष्ण शांत झाला व आपल्या रथांत येऊन बसला. अर्जुनहि त्याच्या पाठोपाठ आला व रथांत चढून सर्व शक्ति एकवटून युद्ध करूं लागला. त्यानें ऐंद्रास्त्र सोडलें. त्या योगें सारी कौरव सेना ढेकणांप्रमाणें पटापट मरून पडूं लागली. भीष्मद्रोणादींना प्रलयकाळाची आठवण झाली. कौरव सैन्य हळूं हळूं रणांगणावरून पाय काढूं लागलें.

संध्याकाळीं युद्ध संपल्यावर सर्व आपा-पल्या शिबिराकडे वळले. परत जातांना सर्वजण आपापसांत अर्जुनाच्या शौर्याची स्तुति करीत चालले होते. त्या दिवशींच्या युद्धांत अर्जुनानें कौरवांचे दहा हजार रथ, सातशें हत्ती वगैरे नष्ट करून आपला पराक्रम दाखविला.






[ १० ]

[ अग्निप्रवाह पार करून चंद्रवर्मा एका फळांच्या बागेंत पोंचला. अंधार पडल्यानंतर तो एका झाडाच्या फांदीवर झोंपला असतां राक्षसी गरुड पक्ष्यांच्या पंखाच्या वाऱ्यानें तो खालीं पडला. पण सुदैवानें तो एका पक्ष्याच्या पंखावर पडला. तेथें शंख मांत्रिकाचा अग्निपक्षी आला व त्यानें त्या गरुड पक्ष्यांजवळ कमलिनीला उचलून आणण्यासाठीं मदत मागितली. त्यांनीं मदत देण्याचें कबूल केलें. पुढें वाचा. ]

अग्निपक्ष्याचें गरुड पक्ष्यांशीं जें बोलणें झालें तें सारें पक्ष्यांची भाषा कळत असल्यानें चंद्रवर्माला कळलें. तो जास्त उत्सुकतेनें त्यांचें बोलणें ऐकूं लागला. गरुड पक्षी शंख मांत्रिका-च्या डोंगरावर जाणार आहेत हें समजल्यावर त्यानें विचार केला कीं या पक्ष्यांच्या पंखाला जर मुंगीसारखा बिलगून राहालों तर मी सहजीं शंख मांत्रिकाच्या डोंगरावर जाऊन पोंचेन. शंभर योजन भयंकर जंगलांतून चालत जाण्याचे श्रम टळतील व जीव धोक्यांत पडण्याची भीति राहणार नाहीं. हा तरी एक गमतीदार अनुभव आपल्याला मिळेल.

त्याचा आनंद गगनांत मावेनासा झाला. केव्हां उजाडतें आहे आणि केव्हां हे पक्षी उड्डाण करत आहेत असें झालें त्याला. शंभर योजन कांहीं तासांत उडायला मिळणार !

त्याच्या मनांत कपालिनीचा विचार देखील आल्याशिवाय राहिला नाहीं. तिला उचलून आणण्याचा घाट घातला आहे का या शंखानें ? पण ती कांहीं इतकी मूर्ख नाहीं. या पक्ष्यांच्या पंज्यांत सांपडायला ? या पक्ष्यांना धरून ती कालसर्पाच्या स्वाधीन करील, झालें आणि त्याच्या तोंडांत सांपडल्यावर कोण सुटणार ?

चंद्रवर्माच्या डोक्यांत रात्रभर हेच विचार घोळत होते. त्याला झोंप आली नाहीं. पूर्व दिशा फांकल्या आणि गरुड पक्ष्यांनीं डोळे उघडले. एक विचित्र तऱ्हेचा आवाज काढून ते ओरडले आणि एकदांच आपलें पंख फडफडवून त्यांनीं अकाशांत उड्डाण केलें.

चंद्रवर्मा त्यांच्या पंखांत खोल शिरून बसला होता म्हणून त्याला थंडी वारा कांहीं लागत नव्हता. पक्षी उत्तर दिशेकडे उडत चालले आहेत हें पाहून त्याच्या मनाला समाधान वाटलें. पाहतां पाहतां ते कित्येक पर्वत, दरी-खोरीं, नद्या व जंगलें पार करून एका डोंगराजवळ पोंचले. त्यांच्या बोलण्यावरून त्याला कळलें कीं तोच डोंगर शंख मांत्रिकाचा डोंगर आहे, आणि त्याला तर तेथेंच जावयाचें होतें.



ज्या पक्ष्याच्या पंखांत चंद्रवर्मा बसला होता त्यानें दुसऱ्या पक्ष्याला असें म्हणत एकाएकीं सुरकांडी मारली—" मित्रा, पाहिलेंस का तें सरोवर ? पहा, त्यांत केवढी मोठी एक हत्ती सारखी मगर आहे. मगरीचें मांस खाऊन किती दिवस झाले." असें म्हणत बाणासारखा तो त्या तलावाकडे अधोमुख होऊन उडत होता.

पक्ष्यानें इकडे सुरकांडी मारली आणि हत्तीसारख्या त्या मगरीला दोन्ही पंज्यांनीं उचलून पुन्हां त्यानें आकाशांत उड्डाण केलें. हें किती एका क्षणार्धांतच घडलें असावें या गडबडींत चंद्रवर्माच्या हाताची पकड सैल झाली व तो तोल सांवरता न आल्यामुळें खालीं तलावांत जाऊन पडला.

गरुड पक्ष्याला हें कळलें देखील नाहीं कीं त्याच्या पंखांत कोणी बसलें होतें आणि तलावांत पडलें. त्याची नजर फक्त मगरीवर होती. भीतिमुळें अर्थातच चंद्रवर्माची नजर पण त्या मगरीवर होती. परंतु मगरीला गरुडानें उचलून नेलें आणि चंद्रवर्मा तलावांत पडला. तलावांत दुसरी मगर नसेल कशावरून ? ही धास्ती त्याच्या मनाला वाटत होती.












हें सर्व घडायला फार वेळ लागला नाहीं. क्षणार्धांत सर्व गोष्टी घडल्या म्हटलें तरी चालेल. ती ताडाएवढी मगर, पण ती सुद्धां त्या राक्षसी गरुड पक्ष्याच्या पंज्यांत असहाय होऊन तडफडत होती. चंद्रवर्मा तें दृश्य पाहूं शकला नाहीं. भयभीत होऊन त्यानें डोळे घट्ट मिटून ठेविले. डोळे उघडून पाहिलें तेव्हां त्याला तलावांतल्या मगरी घाबरून जाऊन आपापला जीव वांचविण्यासाठीं पळत असलेल्या दिसल्या. त्याच्याकडे पहावयास एकाहि मगरीला वेळ नव्हता.

चंद्रवर्मा तें दृश्य एक क्षणभरच पाहूं शकला असेल. नंतर तो पाण्यांत बुडी मारून थोडा वेळ शांत पडून राहिला. पण पाण्यांत बुडी मारून तो किती वेळ राहूं शकणार? वर यावेंच लागलें. वर येऊन पाहातो तों मगरी वाट फुटेल तिकडे पळत असलेल्या त्याला दिसल्या. पाण्यांत मोठमोठ्या लाटा येत होत्या.

त्यानें विचार केला, हें सर्व ईश्वर कृपेनेंच घडलें. मी पाण्यांत पडलों काय आणि या मगरी भिऊन पळत आहेत काय? नाहींतर ह्यांनीं माझ्या अंगाचे लचके तोडून खाल्ले असते. परंतु फार वेळ तलावांत पडून राहाण्यांतहि अर्थ नाहीं. मगरी आतां घाबरल्या असल्या तरी थोड्या वेळानें स्थिर स्थावर झाल्यावर त्या माझ्यावर चारी बाजूंनीं तुटून पडतील. म्हणून शक्य तितक्या लवकर किनारा गाठला पाहिजे. किनाऱ्यावर झाडी होती आणि त्यांत लपून छपून पुढला मार्ग काढतां येणें शक्य आहे.

किनारा सुमारें दहावीस फुटावर होता. त्याला वाटत होतें अगदीं तसेंच झालें. एकाएकीं पाणी हलूं लागलें व एक मोठी मगर तोंड वासून त्याच्याकडे पोहोत येत असलेली त्याला दिसली.






चंद्रवर्मा भ्याला. काय करावें त्याला सुचेना. तो जोरानें ओरडला. पण त्याचा बचाव करायला तेथें कोण येणार? नाहीं, मला मरावयाचें नाहीं. असा मनाचा निर्धार करून त्यानें सारी शक्ति एकवटून पोहण्यास सुरवात केली आणि एका मिनिटांत तो किनाऱ्यावर येऊन पोंचला.

मगरीनें त्याला धरण्याची शिकस्त केली. पण तिच्या हातची शिकार सुटली. तरी तिनें किनाऱ्यावर येऊन कांहीं अंतर चंद्रवर्माचा पाठलाग केला. पण चंद्रवर्मा इतक्या जोरानें पळाला कीं तिच्या हातांत सांपडला नाहीं. शेवटीं निराश होऊन ती परतली.

चंद्रवर्मा दमल्यामुळें धापा टाकीत होता. एका झाडाच्या खोडाला टेंकून त्यानें थोडा वेळ दम घेतला. त्याला त्याच्या तलवारीची आठवण झाली. गरुड पक्ष्याच्या पंखांतून खालीं पडत असतां नदींत तर नाहीं पडली? त्यानें आपल्या म्यानेला हात लावून पाहिला. तलवार थोडी बाहेर आली होती. पण म्यानेंतच होती. म्यानेंत पाणी भरलें होतें. तें त्यानें काढून टाकलें आणि तलवार बाहेर काढून पुन्हां आंत ठेवली.



आतांपर्यंत नशिबानें मला मदतच केली आहे. शंभर योजनांचें अंतर कष्टाशिवाय मी पार करून आलों. तलावांत पडलों पण मगरींचें भक्ष्य होण्यापासून मला नशिबानें वांचविलें. आत्मरक्षणासाठीं माझ्याजवळ ही जी एक तलवार आहे. ती सुद्धां तलावांत पडली नाहीं. बरें आतां पुढलें काम. तो उठून उभा राहिला. त्यानें समोरची झाडी बाजूला सारून एकदां तो प्रदेश पाहिला. समोर दूर त्याला एक डोंगर दिसला. त्याचें शिखर निमुळतें व उंच होतें, जणुंकांहीं एकादा भोंवराच कोणी उलटा














करून ठेवला आहे. हिरवळ व झाडें-झुडपें पाहून त्याच्या मनाला फार आनंद झाला. एकूण तो प्रदेश नैसर्गिक सौंदर्याच्या दृष्टीनें रमणीक होता.

याच पर्वतावर तो मांत्रिक राहातो म्हणावयाचा. मी किती जवळ पोंचलों आहें त्याच्या. तो शंख आणावयाचा आहे मला. तो त्याच्या घरच्या देव्हाऱ्यांत आहे, एका सांपाच्या गळ्यांत त्यानें घालून ठेवला आहे. तो चोरून आणावयाचा आहे आणि त्या कपालिनीला द्यावयाचा आहे. त्यानंतर तिच्या कृपेनें आपण सुटणार. आतांपर्यंत सर्व ठीक झालें. पण पुढें काय? तो शंख आणावयाचा कसा! आणि मिळाल्यावर कपालिनीला नेऊन द्यावयाचा कसा?

त्यानें एक सुस्कारा सोडला. कपालिनीचा निरोप घेऊन तो निघाला तेव्हां त्याच्या समोर तें शंभर मैलांचें अंतर कापून कसें जावयाचें हा प्रश्न होता. आतां तो अनायास तें अंतर कापून आला होता. परंतु दुसरा प्रश्न उभा होताच, शंख कसा मिळवावयाचा?

या प्रश्नावर तो मनांतल्या मनांत ऊहापोह करीत असतां एक भयंकर आवाज त्याला ऐकूं आला. चंद्रवर्मा दचकून ताठ उभा राहिला. पुन्हां तो आवाज ऐकूं आला. तो आवाज त्याच्या परिचयाचा होता. तो त्या अग्निपक्ष्याचा आवाज होता. गरुड पक्ष्याच्या पंखांत तो बसला असतांना अग्नि पक्षी तेथें आला होता व त्यानें येतांना व जातांना अशाच प्रकारचा विचित्र आवाज केला होता. त्यावरून तो पक्षी जवळपास कोठें तरी असला पाहिजे हें त्यानें ओळखलें. तो जास्त सतर्क होऊन ऐकूं लागला.

आतां आपण शंखाच्या पर्वताजवळ पोंचलों आहों या गोष्टीची त्याला शंका राहिली नाहीं. आजूबाजूला त्या शंखाचे हेर निरनिराळीं रूपें घेऊन हिंडत असणार. या अग्निपक्ष्याला दिवसां कांहीं दिसत नाहीं. म्हणून त्याच्या पासून आपल्याला दिवसां तरी कांहीं धोका नाहीं. पण त्या शंखाचें आणखी हेर कोण आहेत कोण जाणे?

चंद्रवर्मा कांहीं वेळ हाच विचार करीत कीं पुढें जावें कीं नाहीं, बसला होता. नंतर तो धीर करून उठला. येणाऱ्या कल्पित संकटाची भीति बाळगून स्वस्थ बसण्यांत शहाणपण नाहीं. संकट आलें कीं त्याला तोंड देण्याचा मार्गहि निघेल. असा विचार करून त्यानें एका ओढ्यावर जाऊन तोंड धुतलें. घोटभर पाणी प्याला व झाडावर चढून कांहीं आंबे तोडले आणि खाऊं लागला. एका झाडावर चढून त्यानें विश्रांति घेतली. रात्र होऊन काळोख पडल्यावर पुढें जावयाचें त्यानें मनाशीं ठरविलें. कारण काळोखांतच शंखाच्या पर्वतावर चढणें जास्त सोईचें व कमी धोक्याचें होईल असें त्याला वाटलें.

झाडावर पडल्या पडल्या त्याला छान झोंप लागली व त्याला स्वप्नें पण पडूं लागलीं. सूर्य ऐन डोक्यावर आला तेव्हां देखील त्या झाडींत त्याला ऊन लागलें नाहीं. म्हणून केव्हां सूर्यास्त झाला हें सुद्धां त्याला कळलें



नाहीं. चांगला काळोख पडल्यावर देखील तो झोंपूनच होता.

रात्रीं एकाएकीं त्याची झोंप मोडली त्या वेळीं दाट काळोख पडला होता. शेजारच्या तलावांतून लाटांचा मंजुळ आवाज येत होता. वाऱ्यामुळें पानांचा खुळखुळाट ऐकूं येत होता. तरी वातावरण शांतच होतें.

त्यानें विचार केला, फार रात्र झालेली दिसते आहे. पण आपण अंगिकारलेलें काम पार पाडण्यास हीच वेळ चांगली आहे. डोंगरावर चढून शंखाच्या पूजागृहांत एकदां डोकावून तर पाहूं या. असा विचार करून चंद्रवर्मा झाडावरून खालीं उतरला. एकदां आपली तलवार ठीक आहे कीं नाहीं पाहून घेतली आणि निघाला.

काळोखांत झाडा झुडपांतून लपत छपत तो डोंगराच्या दिशेनें कांहीं अंतर चालत गेला. कोठें तो अग्निपक्षी येतो का, हें पहात तो एकेक पाऊल पुढे टाकीत होता. त्याच्या मनानें कां कोणास ठाऊक त्या पक्ष्याची धास्ती घेतली होती. तोच आपल्या कामांत प्रथम विघ्न आणणार आहे, असें त्याला वाटलें. तो पक्षी येथें नसेल तर मी निर्विघ्न पणें शंखाच्या पूजागृहापर्यंत खास पोंचूं शकेन व काम उरकून परत येऊं शकेन.

चंद्रवर्मा डोंगराकडे जात असतां अकस्मात त्याला कोणाचें तरी कण्हणें ऐकूं आलें आणि त्याबरोबर त्याच्या कानावर "वर्मा" असे शब्द पडले. त्याचा विश्वास बसेना स्वतःच्या कानांवर. हा आवाज तर त्या कपालिनीचा आहे. ही इकडे कशी आली? रात्रीं गरुड पक्ष्यांना त्या अग्निपक्ष्यानें सांगितल्याप्रमाणें खरोखरच ते कपालिनीला उचलून घेऊन आले वाटतें. तो "कपालिनी!" असें म्हणत ज्या बाजूनें तो आवाज आला होता त्या दिशेनें चालूं लागला. [पुढें चालू]





# राजा लिअर

एकदां लिअर नांवाचा राजा ब्रिटनवर राज्य करीत असे. त्याला तीन मुली होत्या. मोठी मुलगी गानेरिल अल्बनीच्या संस्थानिकाला दिली होती. दुसरी रीगान कार्नवालच्या संस्थानिकाला दिली होती आणि सर्वांत धाकटी कार्डीलिया अजून कुमारिका होती. परंतु तिच्या वडिलांनीं तिच्यासाठीं दोन स्थळें योजून ठेविलीं होतीं. एक फ्रान्स देशाचा राजा व दुसरा बर्गन्डीचा संस्थानिक.

राजा ऐंशीं वर्षांचा झाला. त्याला समोर मृत्यू दिसूं लागला. आपला आतां भरंवसा नाहीं असें वाटून आपलें राज्य तिघी मुलींना वांटून देऊन आपण विश्रांति घ्यावी असें त्यानें ठरविलें. एके दिवशीं मुलींना बोलावून म्हणाला—"मुलींनो, मी आतां वृद्ध झालों आहें. तेव्हां या राज्याची वांटणी करून मी मोकळा होणार आहें. पण ज्या प्रमाणांत तुमचें माझ्यावर प्रेम आहे त्या प्रमाणांत मी त्याची वांटणी करणार आहें."

हें ऐकतांच मोठी बहीण पुढें झाली आणि म्हणाली—"बाबा! तुमच्यावर माझें किती प्रेम आहे ह्याचें वर्णन करावयास माझ्याजवळ शब्दच नाहींत. तुम्हीं मला प्राणाहूनहि जास्त प्रिय आहांत." आपल्या लाडक्या लेकीच्या तोंडून निघालेले शब्द ऐकून पिता आनंदला. त्यानें आपल्या राज्याचा तिसरा भाग देऊन टाकला.

त्या नंतर दुसरी मुलगी रीगान म्हणाली—"दुसऱ्या कोणापेक्षांहि माझें जास्त प्रेम आहे तुमच्यावर. तुमच्या सुखांतच मला आनंद आहे." तिच्या सांगण्यावर सुद्धां बाप खुश झाला आणि तिला त्यानें आपल्या राज्यांतील तिसरा भाग दिला.

विलियम शेक्सपियर













त्यानंतर आपली स्तुति ऐकण्यास उत्सुक झालेलें राजाचें मन आणखी स्तुति ऐक-ण्यासाठीं तिसऱ्या मुलीकडे वळलें. तो म्हणाला–“ आमच्या छोट्या पिल्लाचें काय म्हणणें आहे !”

कार्डीलिया म्हणाली–“ काय सांगूं ! मुलीचें पित्यावर जितकें प्रेम असावयास पाहिजे तितकें प्रेम आहे माझें आपल्यावर. ह्यापेक्षां जास्तहि नाहीं आणि कमीपण नाहीं.”

“ तुझा तसाच विचार असेल तर तुला खरोखरच कांहीं मिळणार नाहीं.” लिअर राजानें रागानें सांगितलें.

“ बाबा, उगाच कांहीं बढाया मारून मला आपली किंवा माझी स्वतःची फस-वणूक करून घ्यावयाची नाहीं. माझ्या प्रेमांत पतीचा वांटा येईल ना बरोबरीनें ? किंबहुना जास्तच ? काय, ताई आकांच्या प्रेमांत पतीचा वांटा नसेल ? खरोखरच त्यांचें तुम-च्यावरच असीम प्रेम असतें तर त्यांनीं लग्न करावयास नको होतें.” कार्डीलिया म्हणाली.

कार्डीलियाचें आपल्या पित्यावर खरोखरच दोघी बहिणींपेक्षां जास्त प्रेम होतें. पण तिला खोटी फुशारकी नको होती. राज्याच्या हिश्यासाठीं बापाला फंसवणें तिला योग्य वाटलें नाहीं. परंतु राजाला तिचा भाव समजला नाहीं. त्याला तिचा फार राग आला. त्या भरांत त्यानें आपलें राज्य दोघी मोठ्या मुलींना वांटून दिलें.

त्यानें भर दरबारांत राज्याची, अधिकारी वर्गाची, त्याच प्रमाणें नोकरांचाकरांची, आयादायांची वांटणी केली. म्हणाला– “आतां मी नांवापुरताच राजा. सर्व राज्य ह्या दोघींचें. मला फक्त शंभर नोकर पुरतील आणि मी पाळी पाळीनें मुलींकडे राहाणार. मी जिच्याकडे असेन तिनें माझा व माझ्या नोकरांचा खर्च भागवावा.” आणि असेंहि



म्हणाला–“ कार्डीलिया माझी मुलगी नाहीं व मी तिचा बाप नाहीं.”

राजाचें हें काम दरबारांत कोणालाच आवडलें नाहीं. परंतु राजासमोर बोलण्याची कोणाची छाती होईना. त्यांत केन्टचा राजा होता. तो उठला व राजाच्या धोरणाचा त्यानें विरोध केला. त्यावर राजा संतापून म्हणाला–“ मला विरोध करतोस ? माझ्या राज्यांतून चालता हो. पांच दिवसांच्या आंत येथून निघून जा आणि जर का कोठें कोणाच्या नजरेस पडलास तर डोकेंच उडवीन तुझें.” बिचारा केन्टचा राजा खालीं मान घालून निघून गेला.

त्यानंतर कार्डीलियासाठीं नियोजित वरांना बोलावून राजानें विचारलें कीं आतां कार्डीलियाशीं लग्न करण्यास कोण तयार आहे ? ह्यावर बर्गंडीचा संस्थानिक म्हणाला– “ मी तो विचार सोडला आहे.” फ्रान्सचा राजा मात्र खुशीनें तयार झाला. तो तिच्या स्पष्ट व सत्य वचनावर खुश झाला होता. पुढें फ्रान्सला जाते वेळीं ती आपल्या बहिणींना म्हणाली–“ आपल्या वडिलांवर दाखवलेलें प्रेम शेवटपर्यंत निभवा.” आणि ती आपल्या नवऱ्याबरोबर निघून गेली.



आपल्या राज्याची वांटणी केल्यावर राजा आपल्या नोकरांसह वडील मुलीकडे रहावयास गेला. पहिले कांहीं दिवस आनंदांत खुशींत गेले. परंतु महिना होतो न होतो तोंच गानेरिलचें खरें रूप दिसूं लागलें. ज्या वडिलांनीं तिला राज्य दिलें त्यांचें दर्शन देखील नकोसें वाटूं लागलें तिला. तो कांहीं तिच्याशीं बोलूं लागला तर ती तेथून उठून जात असे. तिच्या डोळ्यांत राजाचें शंभर नोकर सलूं लागले. आतां तें पाहून नोकर सुद्धां त्याप्रमाणें वागूं लागले. हें सर्व राजाला अगदीं असह्य झालें.

केन्ट राजाला राज्यांतून हाकलून दिलें होतें. तरी तो वेश पालटून राजाच्या जवळपासच रहात असे. त्याला राजाची फार कींव आली. त्यानें वेश पालटून नांव बदलून राजाची सेवा करण्याचा निश्चय केला आणि आपली कल्पना अमलांतहि आणली. तो नेहमीं राजाच्या भोंवती भोंवती असे. राजाशीं कोण कसा वागतो याकडे तो लक्ष ठेवी.

केन्ट राजाप्रमाणें राजाचा विदूषकपण राजाची सेवा चाकरी करी. हंसत हंसत राजाच्या विक्षिप्तपणाची तो थट्टा करी व त्याचें मनोरंजन करी.

गानेरीलला विदूषकाचें वागणें आवडत नसे. तिनें एक दिवस आपल्या वडिलांना विचारलें—"बाबा, तुम्हांला एवढी नोकर माणसें कशासाठीं पाहिजेत? ह्या सर्वांची मिजास राखणेंच कठीण झालें आहे."

आपल्या मुलीचें बोलणें ऐकून राजाला राग आला. आपण दिलेलें अर्धें राज्य घेऊन सुद्धां तिच्या मनांत असा विचार यावा! संतापाच्या भरांत तो आपल्या मुलीला वाटेल तसें बोलला आणि शेवटीं मी येथें क्षणभर सुद्धां राहात नाहीं म्हणून सांगुन तो तिच्या घरांतून बाहेर पडला.



राजाच्या नोकरांत केन्टचा मांडलीक होता. त्यानें पुढें जाऊन राजाची दुसरी मुलगी रीगान हिला राजा येत असल्याची सूचना दिली. तो तेथें पोहोंचला तेव्हां गानेरिलनें पाठविलेला माणूसहि तेथें आलेला होता. अर्थातच त्यानें मोठ्या बहिणीच्या घरून राजा धाकट्या बहिणीकडे कां येत आहे हा निरोप सांगितला होता.

केन्ट राजाला सगळ्या गोष्टींची कल्पना होती. त्या नोकराचें व त्याचें गानेरीलाच्या घरीं एकदां फार मोठें भांडण झालें होतें. त्यावेळीं त्या नोकराची एकदां हजेरी घेतली गेली होती. आतां सुद्धां त्याला पुढें आलेला पाहून त्याच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत पोहोंचली. म्हणून आतांहि त्यानें त्याचा खूप समाचार घेतला. त्यांची मारामारी चालली असतां रीगाननें त्यांना पाहिलें व केन्टच्या राजाला कैद करविलें.

राजा रीगानच्या घरीं आला. येतांच आपल्या नोकराला कैद केलेलें त्याला दिसलें. "माझे जांवई व मुलगी कोठें आहेत?" त्यानें विचारलें.





"रात्रभर त्यांनीं प्रवास केला असल्यानें झोंपले आहेत. फार दमले आहेत." नोकरांनीं सांगितलें.

"मला त्यांना भेंटावयाचें आहे!" बोलल्या त्यांना. राजाचें बोलणें ऐकून तीं दोघें बाहेर आलीं. त्यांच्याबरोबर गानेरील सुद्धां होती. राजाला आश्चर्य वाटलें. तो क्रुद्ध होऊन म्हणाला—"मला तोंड दाखवा-याला तुला लाज नाहीं वाटत?"

"तुम्हीं आपल्या अर्ध्या नोकरांना कमी करा आणि आलांत तसे पुन्हां गानेरीला-कडे परत जा." रीगान पुढें येऊन म्हणाली.

"मला वाटतें तूं गानेरीलाप्रमाणें दुष्ट नाहींस. मी आपल्या शंभर नोकरांच्या बरोबर येथेंच राहणार आहें." राजानें सांगितलें.

"बाबा, कशाला पाहिजेत तुम्हांला एवढे नोकर? पन्नास नोकर सुद्धां जास्तच आहेत. तुम्हीं पंचवीस नोकरांना ठेवा. बाकीच्यांना घा सुटी झालें." रीगाननें बापाला उपदेश केला.

"ओहो! असें होय!! म्हणजे गानेरीलाचें प्रेम एकंदरीत तुझ्या दुप्पट ठरलें." राजा कुत्सितपणें म्हणाला—"ती निदान पन्नास नोकरांना ठेवायला तरी तयार होती."

"खरें पाहिलें असतां तुम्हांला निराळ्या नोकरांची गरजच काय? एवढे नोकर आहेत ते नाहीं कां पुरत. पाहिजे आहेत कशाला ते पंचवीस, नाहीं पंधरा, नाहीं पांच. एकाची सुद्धां जरूर नाहीं." गानेरील तोऱ्यांत म्हणाली.

त्यानें फार कठोर शब्दांत दोघी बहिणींची निर्भत्सना केली. त्याला वाटलें येथें नोकरां-चाकरांशिवाय राहण्यापेक्षां कोठें तरी निघून गेलेलें बरें. ह्या विचारानें तो जवळ जवळ वेडापिसाच झाला.

त्या दोघींहि बाप आपल्या नोकरांना घेऊन अंधेरांत वादळांत निघून जात असलेला मुकाट्यानें पाहात उभ्या राहिल्या. एकीचेंहि मन द्रवलें नाहीं. एकीनेंहि त्याला 'जाऊं नका' म्हणून अडविलें नाहीं.

वादळ वाढत चाललें होतें राजाचे नोकर थारा मिळेल तेथें सैरावैरां पळून गेले. एकटा विदूषक मात्र त्याच्या पाठोपाठ गेला. राजाला पावसाची, वाऱ्याची, विजेची कशाचीच पर्वा नव्हती. निवाऱ्याला झाड झुडूप सुद्धां नव्हतें. जातां जातां तो वाऱ्याशीं बोलत होता. म्हणत होता—"वायु देवते! ह्या कृतघ्न मनुष्य जातीला नष्ट करून टाक."

राजा घरांतून निघून गेल्यावर केन्टच्या राजाला रीगाननें सोडून दिलें. तो त्याच्या मागोमाग आला व म्हणाला—"ह्या अशा भयंकर वादळांत आपण येथें कोठें?" बाहेरील वादळाहून राजाच्या मनांत जास्त भयंकर वादळ चालू होते. तो तसाच पुढें चालला होता. केन्ट राजा त्याला न कळत एका झोंपडींत घेऊन गेला. तेथें त्याच्या आगोदरच एक भिकारी येऊन विसावा घेत बसला होता. राजा त्याला पाहून म्हणाला—"कृतघ्न मुलींच्या दुर्व्यवहारानेंच ह्याच्यावर असा प्रसंग आला असला पाहिजे."










सकाळीं केन्ट राजानें त्याला डोव्हर बंदरांत नेलें. तेथें एका मित्राच्या घरीं त्याला ठेवून तो फ्रान्सला गेला व कार्डीलियाला सर्व समाचार सांगितला.

कार्डीलिया फार दुःखी झाली. दुःखावेग ओसरला व त्याची जागा संतापानें घेतली. नंतर तिनें आपल्या नवऱ्याला विचारून त्याच्या संमतीनें थोडी सेना घेतली व ब्रिटनला आली. पित्याचें राज्य पुन्हां त्याला मिळावें यासाठीं बहिणींशीं युद्ध करण्याची सुद्धां तिची तयारी होती.

कार्डीलिया डोवर पोहोंचेपर्यंत राजा लिअर कोठें तरी पळून गेला होता. पण डोवर बंदराच्या आसपासच तिच्या सैनिकांच्या तो नजरेस पडला. तो आपल्या डोक्यावर गवताचा मुकुट ठेवून आपल्याशींच कांहीं तरी बरळत होता. पुढें त्यानें आपल्या धाकट्या मुलीला ओळखलें आणि तिची माफी मागितली.

कार्डीलियाची सेना ब्रिटनला आल्याचें समजल्यावरून दोघी बहिणींनी आपापली सेना कार्डीलियाच्या सेनेशीं युद्ध करण्यास पाठविली. त्या दोन्हीं सैन्यांचा सेनापति ग्लस्टरचा राजा होता. त्याचें गानेरिल व रीगान दोघींवर प्रेम होतें. तोच आपल्यासाठीं फ्रान्स विरुद्ध लढत आहे ही बातमी गानेरिलला कळतांच तिनें रीगानला विष घालून मारलें आणि स्वतः विष खाऊन मरून गेली.

"फ्रांस व ब्रिटनच्या सैन्यामध्यें मोठें युद्ध झालें. त्यांत कार्डीलियाचा पराभव होऊन ती ग्लस्टरची कैदी झाली. जोंपर्यंत ती जिवंत आहे तोंपर्यंत आपल्याला गादी मिळणार नाहीं म्हणून ग्लस्टरनें तिला मारून टाकलें. तिच्या मृत्यूची वार्ता लिअर राजाला कळतांच त्याचा भ्रम पुन्हां वाढला. आणि त्या वेडांतच त्याचा अंत झाला. अशा तऱ्हेनें राजा लिअरचा दुःखद शेवट झाला.






एकेकाळीं रोम देशांत यूनान नांवाचा एक बलाढ्य राजा राज्य करीत असे. त्याच्या दरबारीं पुष्कळ मांडलीक राजे होते.

राजा म्हणजे त्याला कांहींतरी एक चिंता असलीच पाहिजे. हा राजा सुद्धां ह्याला अपवाद नव्हता. त्याला एक भयंकर असा त्वचा रोग झाला. मोठमोठ्या वैद्यांची औषधें झालीं. कोणीं गोळ्या दिल्या, कोणी काढे दिले. कोणी मलमें दिलीं, कोणी कांहीं. परंतु कोणाच्याहि औषधानें राजाला गुण आला नाहीं.

त्या देशांत रय्यान नांवाचा एक म्हातारा वैद्य आला. त्या गांवांत आल्यावर राजाच्या चर्मरोगासंबंधी बातमी त्याच्या कानावर गेली. ती ऐकतांच तो राजवाड्यांत गेला. राजाला म्हणाला—"महाराज, आपली परवानगी असल्यास मी आपल्या रोगावर इलाज करतों."

"खरोखरच जर तूं माझा हा आजार बरा केलास तर मी तुला अलोट पैसा देऊन श्रीमंत करून टाकीन व तुला आपला जवळचा मित्र समजेन." राजा म्हणाला.

राजाची परवानगी मिळतांच वैद्य औषधें तयार करूं लागला. औषध ठेवण्यासाठीं त्यानें एक बांबूचें लांब नरसाळें घेऊन त्यांत औषध घालून त्याला हातोडीप्रमाणें बूच बसविलें. एकदम पाहिलें म्हणजे तें हातोडी प्रमाणेंच दिसत असे आणि ही हातोडी घेऊन तो राजाकडे गेला.

"महाराज, ह्या काठीनें आज आपण 'पोलो' खेळा. आपण जर तळ हाताला घाम सुटेपर्यंत खेळत राहिलांत तर आपली व्यथा दूर होईल." वैद्यानें सांगितलें.

(पोलो म्हणजे घोड्यावर बसून लांब काठीनें चेंडू खेळण्याचा खेळ.)




त्या दिवशीं राजा आपल्या मित्रांच्या बरोबर तळहाताला घाम येईपर्यंत खेळला.

त्यानंतर वैद्यानें राजाला स्वच्छ चांगली आंघोळ घातली आणि त्याला झोंपवून तो निघून गेला.

थोड्या वेळानें राजाची झोंप मोडली. तो अंथरुणावर उठून बसला आणि आपल्या शरिराकडे पाहूं लागला. त्याला आश्चर्य वाटलें. त्याच्या शरिरावरील रोग संपूर्ण नाहींसा झाला होता.

दुसरें दिवशीं वैद्य समाचाराला आला. त्यावेळीं तो दरबारांत बसला होता. त्याला पाहतांच राजानें त्याला मिठी मारली व आपल्या शेजारींच बसवून घेतलें. त्यानंतर त्याला मोठमोठे नजराणे देऊन त्याचा सत्कार केला.

राजानें भर दरबारांत मन भरून त्याची स्तुति केली. तो म्हणाला—"ह्या वैद्यराजाप्रमाणें दुसरा कोणी वैद्य साऱ्या जगांत मिळणें कठीण. ह्यांनीं किती थोड्या वेळांत आणि तें सुद्धां शरिराला कांहींहि न करतां माझा आजार बरा केला. खरोखरच एक चमत्कार आहे." ह्या दिवसापासून राजा रोज दरबारांत त्याची स्तुति करीत असे व कांहीं तरी भेंट देत असे.

राजाचें हें वर्तन मंत्र्याला आवडलें नाहीं. म्हणून त्यानें वैद्याविषयीं राजाचें मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला. एके दिवशीं त्यानें राजाला एकांतांत गांठलें. म्हणाला—"महाराज, वैद्यराजानें आपल्याला चांगलें बरें केलें हें खरें आहे. आपण त्यांचा आदर केलांत हेंहि ठीकच आहे. त्याला एवढें डोक्यावर चढवणें बरें नाहीं."

"पोटांत दुखूं लागलें वाटतें? ज्यानें इतक्या थोड्या वेळांत मला बरें केलें त्याचें कौतुक नको करूं तर काय करूं?" राजा म्हणाला.



"महाराजांनीं दूर दृष्टीनें विचार करावा. कोणतेंहि काम मर्यादेबाहेर होतां कामा नये. जो इतका उत्तम वैद्य आहे, ज्याला निरनिराळीं औषधें माहीत आहेत, तो जसे रोग बरे करूं शकतो त्याप्रमाणें एका क्षणांत तो कोणताहि आजार उत्पन्न करूं शकतो. एवढेंच नव्हे तर मनुष्याला मारून टाकून नाहींसाहि करूं शकतो." मंत्री म्हणाला.

"हें सर्व झालें. मग तुझें म्हणणें तरी काय आहे? स्पष्टपणें सांग तरी." राजानें विचारलें.

"माझें मत जर विचाराल तर आतांच्या आतां ह्याचें डोकें उडवून टाका." मंत्र्यानें सांगितलें.

"ठीक आहे. तुझें म्हणणें पटतें मला." असें म्हणून राजानें वैद्याला बोलावणें पाठविलें.

"गरिबाची आठवण काढलीत? काय आज्ञा आहे?" वैद्यानें विचारलें.

"विशेष कांहीं नाहीं. तुझें डोकें उडवून टाकण्यासाठीं तुला बोलाविलें आहे." राजानें सांगितलें.

वैद्याला राजाचें म्हणणें ऐकून धक्काच बसला. "मी काय अपराध केला?" त्यानें विचारलें.




"मला गुप्त हेरांच्याकडून समजलें आहे कीं तूं मला मारून टाकण्यासाठीं आला आहेस. म्हणून मीच पहिला वार करतों. हं, हो तयार मरणाला." असें सांगून राजानें मारेकऱ्यांना बोलाविलें.

"मला वाटतें, कोणी तरी आपले कान भरले आहेत. ठीक आहे. कोणत्या ना कोणत्या क्षणाला मरण हें प्राप्तच आहे सर्वांना. मी तयार आहें. पण मला एकाच गोष्टीचें वाईट वाटतें आहे. माझ्या घरांत एक वैद्यकीचा ग्रंथ आहे. मी तो ग्रंथ माझी आठवण म्हणुन आपणास देऊं इच्छितों.







त्यांत पुष्कळच औषधींचें रहस्यपूर्ण वर्णन भरलेलें आहे. एवढेंच काय माझें डोकें उडवल्यानंतर सुद्धां आपण त्याच्या कडून कसें बोलवूं शकाल, याचें गूढ सुद्धां त्यांत सांगितलेलें आहे." वैद्य म्हणाला.

तो ग्रंथ पाहाण्याची राजाला फार इच्छा झाली. त्यानें तातडतोब आपल्या नोकरांना पाठवून वैद्याच्या घरांतील सर्व पुस्तकें आणविलीं. त्या पुस्तकांतील एका पुस्तकाकडे बोट दाखवून वैद्य म्हणाला—"हेंच तें पुस्तक, ह्यांत आपणांस बरीच माहिती मिळेल."

घाई घाईनें राजा पानें उलटण्याचा प्रयत्न करूं लागला. परंतु पानें एकमेकांना चिकटलेलीं असल्यामुळें राजा मधूनमधून जिभेवर बोट ठेवून त्या ओलसर बोटानें पानें उलटवीत होता. कांहीं पानें उलटल्या-वर राजा म्हणाला—"हें काय! हीं सर्व पानें तर अगदीं कोरीं आहेत!"

"आणखी उलटा. पहा, डाव्या बाजूस तीन ओळी लिहिलेल्या आढळतील." वैद्य म्हणाला.

तीन चार पानें आणखी उलटून होतात न होतात तो राजा एकदम खालीं पडला. काय झालें तें पाहाण्यासाठीं सर्व जण धावले. तोंपर्यंत राजाचा प्राण निघून गेला होता. राजाच्या मृत्यूचें कारण शोधतां शोधतां शेवटीं समजलें कीं चिकटलेल्या पानांना विष लावलें होतें. तीं चिकटलेलीं पानें उलटण्यासाठीं राजा तोंडांत बोट घालीत होता. त्यामुळें त्या कागदांना लावलेलें विष त्याच्या पोटांत गेलें व राजा मरण पावला.

राजा मंत्र्याच्या हुलकावण्यांना भुलून कृतघ्न बनला. त्याचा योग्य तोच मोबदला त्याला मिळाला. म्हणतात ना, "करावें तसें भरावें!"





# भुताटकी

पश्चिम घाटांत पुष्कळ लहान लहान टेंकड्या आहेत. त्यांतील एका टेंकडीचें नांव भुताची टेंकडी असें पडलें आहे. धनगर गुराखी आपलीं जनावरें आजूबाजूच्या टेकड्यांवर नेत असत. परंतु ह्या टेंकडीवर कोणासहि जाऊं देत नसत. कारण जो कोणी त्यावर जात असे तो कधीं परतून येत नसे.

त्या भुताटकीच्या टेंकडीवर एक मोठा गाईंचा कळप राहात असे. सकाळीं सूर्योदय होतांच त्या गाई गोठ्यांतून बाहेर येऊन चरत असत व संध्याकाळ होतांच गुराख्यानें वळवल्याप्रमाणें घराकडे परतत असत. त्यांच्या पाठीमागें कधीं कोणी गुराखी दिसत नसे.

त्या गाईंना चारा पाणी कोण देतो शेणगोठा कोण करतो, दूध कोण काढतो, ह्याचा कोणाला कांहींच पत्ता नव्हता. भुताटकीच्या टेकडीवर जेथें गोठा होता तेथें जवळच एक झोंपडी होती. रोज संध्याकाळीं त्या झोंपडींतून धूर निघत असे. तें पाहून तेथें कोणी तरी असलें पाहिजे, असा दाट संशय येई. परंतु त्या ठिकाणीं कधीं कोणाला मनुष्याचें दर्शन झालें नाहीं.

सत्यपाल गुराखी होता. नवीनच तो त्या गांवांत आला होता. लोकांच्या तोंडून त्यानें त्या टेकडीची कहाणी ऐकली आणि रोज ऐकत होता. त्यानें स्वतः त्या टेकडीचें वारंवार निरीक्षण केलें होतें. तेथें चरणाऱ्या गाईंनाहि तो न्याहाळून पाहात असे. त्या टेंकडीवर काय आहे हें स्वतः जाऊन पाहाण्याची त्याला फार उत्सुकता वाटूं लागली. तो मुलगा साहसी असल्यामुळें टेंकडीची पाहाणी करण्याचा त्याचा उत्साह रोजच्यारोज वाढत गेला. त्याच्या मित्रांनीं



त्याला पुष्कळ समजावून सांगितलें. म्हणाले— "अरे कशाला प्राण धोक्यांत घालतोस ? त्यांतून तुला जायचेंच असेल तर डोंगरावर जा. पण त्या गोठ्यांत किंवा त्या झोपडींत जाऊं नकोस. तेथपर्यंत पोहोंचलेल्यांची गति काय होते माहीत आहे ना ?"

सत्यपाल खंबीर मनाचा होता. त्यानें तेथें जाण्याचा निश्चय केला. आणि शेवटीं गेलाहि तो त्या डोंगरावर. त्याला तेथें विशेष असें कांहींच दिसलें नाहीं. कोठेंहि कसलेंहि भयंकर दृश्य दिसलें नाहीं कीं अकाळविकाळ आरोळ्या ऐकूं आल्या नाहींत.

तो सरळ झोपडीच्या रोखानें गेला. अगदीं झोपडीजवळ जाईपर्यंत त्याला कोणी अडविलें नाहीं. झोपडीच्या दाराजवळ जाऊन त्यानें आंत डोकावून पाहिलें. आंतील सामान पाहून तेथें कोणी तरी राहात असावेंसें त्याला वाटलें. त्यानें दार ठोठावलें. कोणी आलें नाहीं. म्हणून त्यानें हांका मारल्या— "आंत कोण आहे ?" त्यानें विचारलें. दोनदां तीनदां हांका मारून पाहिल्या. परंतु आंतून कोणी न आल्यानें तो आंत शिरला. तेथें एका बाजूला भांड्यांच्या उतरंडी होत्या. कांहीं भांडीं खालीं झांकून ठेविलेलीं होतीं. सत्यपालनें पाहिलें त्यांत अन्न झांकून ठेविलेलें होतें. दुसऱ्या बाजूस एक खाट होती. त्यावर अंथरूण घातलेलें होतें. हें पाहून त्याला विश्वास वाटला कीं येथें नक्की कोणी तरी राहात आहे. बाहेर गेला असेल. येईल थोड्या वेळानें म्हणून तो त्या खाटेवर आडवा झाला.

थोड्याच वेळांत सत्यपालला बाहेर कोणी आल्याची चाहूल लागली. तो उठून पाहाणार तितक्यांत एक मोठा राक्षसासारखा माणूस घाईघाईनें आंत शिरला व सरळ अन्नाच्या बाजूला गेला.



"खाटेवर निजलेल्याच्यासाठीं सुद्धां स्वयंपाक केलेला आहे का ?" सत्यपाल जोरानें ओरडला.

भूत सत्यपालाजवळ येऊन म्हणालें— "चल, जेवावयास ऊठ."

त्या भुताला पाहून दुसरा कोणी घाबरा-वयाचा. परंतु सत्यपाल धीराचा होता. म्हणाला—"मेहनत करणारानें खावें. मी कांहीं मेहनत केलेली नाहीं."

ह्यावर कांहींहि न बोलतां भुतानें अन्न वाढून घेतलें व क्षणार्धांत तें खाऊन चट्ट केलें.

नंतर भुतानें कुदळ फावडें सत्यपालच्या हातांत देऊन 'माझ्याबरोबर त्या दुमजली वाड्यांत चल' म्हणून सांगितलें.

"मी तेथून कांहींहि घेऊन आलेलों नाहीं तर मी कशाला कांहीं घेऊन चलूं ?" सत्यपाल म्हणाला.

स्वतःच कुदळ फावडें हातांत घेऊन भूत म्हणालें—"चल माझ्या बरोबर."

तूं पुढें हो. मी पाठोपाठ येतों." सत्यपाल म्हणाला.

ते दोघेहि वाड्याच्या पहिल्या मजल्यावर गेले. एके ठिकाणीं जागा दाखवून "येथें खण" म्हणून भुतानें सांगितलें.



"मी तेथें कांहीं सुद्धां पुरून ठेवलें नाहीं. मग मला खणण्याची तरी काय गरज ?" सत्यपाल म्हणाला.

भुतानें स्वतःच तेथें खणलें. तेव्हां त्यांना एक मोठा हंडा दिसला. "काढ वर हा हंडा." भुतानें आज्ञा दिली.

"मी जर हा हंडा खड्यांत पुरला असता तर उचलून बाहेर काढला असता. मी तो पुरला नाहीं. म्हणून मी बाहेरहि काढणार नाहीं." सत्यपाल धिटाईनें म्हणाला.

भुतानेंच तो उचलून वर काढून फर्शीवर आपटला. "हं, उघड झांकण." भूत म्हणालें.

"मी नाहीं लावलें तें झांकण. मग मी कां काढीन ?" सत्यपालनें विचारलें.

झांकणहि भुतानेंच काढलें. त्यांत सोन्याच्या मोहोरा भरलेल्या होत्या. भुतानें त्या सर्व जमिनीवर ओतून त्याचे तीन ढीग केले व सत्यपालाला म्हणाला–" सांग, ह्यांतला कोणता ढीग तुझा ? बरोबर सांगितलेंस तर तुझा फायदा होईल आणि मी पण शापमुक्त होईन. जर बरोबर सांगितलें नाहींस तर तुझें भस्म करून टाकीन आणि पुन्हां असाच कोणी येईपर्यंत तिष्ठत रखडत राहीन. जर मी शाप मुक्त झालों तर ह्यांतील एक हिस्सा तुझा. दुसरा गरीब लोकांचा. तिसरा मी मारलेल्या गुराख्यांच्या मुलाबाळांचा. असे हे तीन वांटे आहेत."

तिन्ही ढिगांच्या भोंवती हात पसरून सत्यपाल म्हणाला–" ह्यांतील एक वांटा माझा आहे."

सत्यपालाच्या तोंडून शब्द बाहेर पडतांच एकदम वीज चमकल्यासारखें झालें आणि समोरून भूत नाहींसें होऊन त्या जागीं एक सुंदर मनुष्य उभा असलेला दिसला.

तो पुरुष म्हणाला–" तुझ्यामुळें मी शापमुक्त झालों आहें. मी आतां जातों. हा डोंगर, ह्या गाई, हें धन, हें सर्व आतां तुझें आहे." असें म्हणत तो पुरुष निघून गेला.

सत्यपाल घरीं गेला. त्याला भुताच्या डोंगरावरून जिवंत घरीं परत आलेला पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. मग त्यानें डोंगरावर घडलेली सर्व हकीगत बाकीच्या गुराख्यांना वर्णन करून सांगितली.

त्या नंतर सत्यपालनें, भुतानें सांगितल्या प्रमाणें धनाची व्यवस्था केली व आपण सुखानें त्या डोंगरावर राहूं लागला. तेव्हांपासून त्या टेंकडीला लोक भुताची टेकडी न म्हणतां ' सत्याची टेकडी ' म्हणूं लागले.



# सावत्र आईचा आशीर्वाद

विक्रमार्क वडाच्या झाडाजवळ गेला. शव काढून खांद्यावर टाकलें व मुकाट्यानें स्मशानाची वाट धरली. चार पावलें गेल्यावर शवांतील वेताळ बोलूं लागला. " राजा, इतका त्रास होत असतांना सुद्धां तूं आपला प्रयत्न सोडीत नाहींस. खरोखर ही गोष्ट फार आश्चर्याची आहे. साधारण माणसाच्या हातून होणारी ही गोष्ट नव्हे. देवलची गोष्ट ऐकलीस कीं तुला हें पटेल." असें सांगून वेताळानें गोष्ट सांगण्यास प्रारंभ केला.

सिंधप्रांतांत सिंधु नदीच्या कांठीं एका गांवीं देवल नांवाचा माणूस राहात असे. त्याच्या जवळ थोडीफार जमीन होती. त्यांतून तो आपल्या कुटुंबापुरतें कांहीं तरी उत्पन्न काढीत असे. नवरा, बायको व मुलगा तिघांचें भागत असें त्यांत.

## वेताळाच्या गोष्टी



पुढें कांहीं दिवसांनीं त्याची बायको आजारी पडली. आपण आतां जगत नाहीं असें वाटल्यावरून बायकोनें आपल्या नवऱ्याला जवळ बोलावून म्हटलें—"मी आतां कांहीं जगत नाहीं. माझ्या लाडक्यासाठीं जीव अड-कून राहिला आहे. कोणत्याहि स्त्रीला आपल्या मुलाइतकें दुसऱ्याचें मूल आवडत नाहीं. बरें, त्यांतून दुसरें लग्न केलेंतच तर आपल्या ह्या मुलाकडे दुर्लक्ष करूं नका." इतकें सांगून तिनें डोळे मिटले ते पुन्हां उघडले नाहींत.

बायकोच्या मरणानें देवलला फार दुःख झालें. कांहीं दिवस तो अगदीं उदास होता. पुढें कालक्रमानें त्याचें दुःख ओसरून गेलें. कांहीं दिवसांनीं त्यानें रोहिणी नांवाच्या एका उपवर मुलीशीं लग्न केलें. पुन्हां त्याचा संसार सुरळीतपणें थाटला गेला. रोहिणी शाहणी व प्रेमळ होती. ती आपल्या सावत्र मुलाला प्रेमानें वागवीत असे. हें पाहून देवलला समाधान वाटलें. आनंदाचें अभ्यासाकडे फार लक्ष असे. व्यवस्थित चाल्लें होतें त्याचें शिक्षण.

त्याला काम यावें म्हणून वडील त्याच्या-कडून कामें करून घेऊं लागले. तरी आई त्याला करूं देत नसे. रोहिणीलाहि दोन मुलें झालीं, एक मुलगा व एक मुलगी. पण तिघे इतके मिळून राहात असत, जशीं सख्खी भावंडे आहेत.

त्यांच्याकडे एक गाय होती. अगदीं लहान वासरूं असल्यापासून देवलनें तिला पाळलें होतें. म्हणून तिच्यावर त्याचें फार प्रेम होतें. ती म्हातारी झाली होती. एकदां ती अचानक आजारी पडली. देवलनें एका अनुभवी वयस्कर माणसाला बोलावून आणलें. त्यानें आपल्या अनुभवानें आणि कल्पनेनें कांहीं उपचार सांगितले. परंतु कशानेंच गुण आला नाहीं. त्याला वाटलें कीं आपल्या



गाईवर कोणी तरी मंत्र घातला आहे. मांत्रिकाकडे गेल्यास तो गाईला ठीक करील.

त्याच्या ओळखीचा रुद्रदेव नांवाचा एक गवळी होता. त्याला मंत्रतंत्र माहीत होते. एक दिवस सकाळीं उठून देवल त्याच्या घरीं गेला. परंतु त्यावेळीं तो त्याच्या झोपडींत नव्हता. शेजारच्या जंगलांत कोठें तरी असेल असें वाटल्यावरून तो तेथेंहि गेला. देवल बराच वेळ इकडे तिकडे हिंडला, परंतु त्याला रुद्रदेव भेटला नाहीं. तो निराश होऊन येत असतां एकदम एका झाडाच्या मागून येऊन देवल समोर उभा राहिला आणि दरडावून म्हणाला—"कोण तूं? काय काम आहे तुझें येथें."

देवलनें भीत भीत आपल्या गाईच्या आजाराची गोष्ट त्याला सांगितली. तो म्हणाला—"तूं आपलें वचन पाळलें नाहींस ना? म्हणून तुला अद्दल घडण्यासाठीं त्याची बाधा गाईवर आली आहे."

"कसेंहि करून माझी गाय वांचवा हो." मी तुमच्या पायां पडतों.

"ह्याला एकच उपाय आहे आणि तो म्हणजे आपल्या मुलांपैकीं कोणा एकाचा बळी दे. म्हणजे तुझी गाय वांचेल." रुद्रदेवानें सांगितलें.



"मनुष्य बळी? आणि तो सुद्धां माझ्या मुलाचा? तें शक्य नाहीं. माझ्या हातून तें होणार नाहीं." देवल म्हणाला.

"अरे, त्यासाठीं तुला आपल्या मुलाला ठार करण्याची गरज नाहीं. फक्त तूं निश्चय कर कीं तूं कोणाला बळी देणार आणि त्याच्या डोळ्यांत पाहा. त्याला शिंक येईल. तेव्हां तूं त्याला "शतायुषी भव" असें म्हणूं नकोस. पुन्हां त्याच्या डोळ्यांत पहा. पुन्हां जेव्हां शिंकेल तेव्हां सुद्धां त्याला "शतायुषी भव" असा आशीर्वाद देऊं नकोस. अशा तऱ्हेनें तो तीन वेळां

शिंकेल व त्यानंतर तो तुझा मुलगा राहणार नाहीं. पण तुझी गाय मात्र वांचेल. हें तुला वाटलें तर कर."

देवल विचारांत पडला. काय करावें त्याला सुचेना. आपल्या गाईला पाहतांच त्याला वाटलें आपल्या पहिल्या बायकोनेंच तिला पछाडलें असावें. मग ह्यासाठीं पहिल्या बायकोच्या मुलाचा बळी देणेंच बरें. तिच्यासाठीं हिच्या मुलांना कां मारावें! हिला प्रायश्चित्त कशासाठीं!

देवलचें मन फारच अस्वस्थ झालें. हो, ना, करतां करतां त्यानें आनंदाचा बळी देण्याचें ठरविलें. ह्या गोष्टीला त्याचें मन तयार झालें, परंतु त्याचा अंतरात्मा तयार होईना. कारण आनंद त्याचा लाडका होता आणि त्याची आई वारल्या नंतर सुद्धां त्यानें त्याला लाडांत वाढविलें होतें. रोहिणीनें सुद्धां त्याच्या प्रेमांत भरच घातली.

त्याचें मन गाईंत व मुलांत घोटाळतां घोटाळतां एकदां स्थिर झालें. तो मनांत म्हणाला–'गाय मरते आहे ती मरूं दे. आपण त्याला काय करणार!'

घरांत शिरतांच आजारी असलेली गाय त्याच्याकडे केविलवाणी मुद्रा करून पाहात




असलेली दिसली. पुन्हां त्याचें मन डळमळलें. आपल्या मुलाचा बळी देऊन जर गाईचा प्राण वांचत असेल तर वांचविला पाहिजे.

थोड्या वेळांत तिन्हीं मुलें खेळून बागडून जेवणासाठीं घरांत आलीं. देवलनें आनंदला आपल्या जवळ बोलाविलें. त्यानें त्याच्या डोळ्यांत पाहिलें. आनंद शिंकला. पण देवलनें "शतायुषी भव" असें जिभेवर येऊन सुद्धां म्हटलें नाहीं. मग पुन्हां त्याच्या डोळ्यांत पाहिलें. पुन्हां आनंदला शिंक आली. ह्या वेळींहि तो कांहीं म्हणाला नाहीं.

देवलच्या मनांत भीति वाटूं लागली. त्याला वाटलें कीं आपण पुन्हां सुद्धां जर त्याला आशीर्वाद दिला नाहीं तर आपणच त्याला मारल्यासारखें होईल. तरी पण त्यानें आपलें मन घट्ट केलें आणि पुन्हां त्याच्या डोळ्यांत निरखून पाहिलें. आनंद त्याहि वेळीं शिंकला. बाप गप्पच होता.

त्याच वेळीं नेमकी रोहिणी तेथें आली आणि शिंकेचा आवाज ऐकून 'शतायुषी' म्हणाली. ती आपल्या नवऱ्याला म्हणाली– "हा तीन वेळां शिंकला पण एकदां सुद्धां त्याला 'शतायुषी भव' म्हणाला नाहींत?"



कांहींहि असो आईच्या आशीर्वादानें म्हणा किंवा योगायोगानें म्हणा आनंदला कांहीं झालें नाहीं. पण गाय मात्र त्याच दिवशीं मरून गेली.

एवढें सांगून वेताळ राजाला म्हणाला— "मला हें समजलें नाहीं कीं देवल गाईला वांचविण्यासाठीं आपल्या मुलाचा बळी देण्यास कां तयार झाला? त्याचें आपल्या मुलापेक्षां काय गाईवर जास्त प्रेम होतें? आणि देवल जर आपल्या मुलाला मारावयास तयार झाला होता तर रोहिणीनें आशीर्वाद देऊन त्याला कशासाठीं वांचविलें? माहीत असून तूं जर मुद्दाम उत्तर दिलें नाहींस तर तुझें डोकें गळून तुझ्या पायाशीं पडेल. माहीत आहे ना?"

"मुलावर कमी आणि गाईवर जास्त प्रेम होतें म्हणून देवलनें मुलाचा बळी देण्याचें ठरविलें नाहीं. आनंद त्याचा लाडकाच होता. परंतु त्याचें मन त्याला खात होतें. कारण मरतांना आनंदाच्या आईनें त्याच्याकडून वचन घेतलें होतें, तें त्यानें पाळलें नव्हतें. त्याच्या मतें ह्या पापाचें प्रायश्चित्त आनंदाचा बळी दिल्यानेंच होईल. म्हणून तो बळी देण्यास तयार झाला. पापाच्या भितीनें अज्ञानी जन अशींच पापें करतात. रोहिणीचें मन शुद्ध होतें. तिच्या मनांत पाप नव्हतें व सवतीमत्सर देखील नव्हता. म्हणून तिनें सहज निर्मळ मनानें आनंदला आशीर्वाद दिला."

"आपसांतील संबंध किंवा आनंदाशीं व्यवहार विपरीत असल्यामुळें ह्या दोघांचें व्यवहार भिन्न झाले असें नाहीं, तर विचारांत क्षणिक बदल झाल्यामुळें ते विरुद्ध झालेले दिसले." विक्रमार्क म्हणाला.

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह अदृश्य होऊन पुन्हां झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# सोन्याचा हंडा

धर्मलाल व दानवीर नांवाचे दोघे मित्र होते. ते दोघे एकाच गांवांत राहात नव्हते. धर्मलाल ज्या गांवांत राहात असे त्या गांवची जमीन फार सुपीक होती. म्हणून तो गांवच्या गांवच जणुं कांहीं एक मळा होता. परंतु दानवीराचा गांव खडकाळ व डोंगराळ असल्यानें रुक्ष होता.

एकदां धर्मलाल दानवीराकडे आला. तो गांव रुक्ष असल्यामुळें अन्न धान्याची फार वाण होती. धर्मलाल आल्यावर दानवीर त्याला घेऊन कंद-मुळें आणण्यासाठीं डोंगरावर गेला. तेथें खणतां खणतां त्यांना एक सोन्याचा हंडा सांपडला.

"आज दैव जोरांत दिसत आहे. हा हंडा विकून आपण ते पैसे अर्धे अर्धे वाटून घेतले तर आपलें दारिद्र्य कायमचें दूर होईल." धर्मलाल म्हणाला.

पण दानवीराला तें रुचलें नाहीं. त्याला वाटलें, आपण एकट्यानेंच सर्वच्या सर्व घ्यावें. म्हणून तो धर्मलालला म्हणाला—"हा हंडा काय सोन्याचा असेल? कांहींतरी दुसरा धातु मिसळलेला दिसतो आहे ह्याच्यांत."

"पारखून बघूं या तरी. आणि समजा, जरी हा सोन्याचा नसला तरी आपल्याला काय त्याचें? कारण आपल्याला हा फुकटांत मिळालेला आहे." धर्मलाल हंसून म्हणाला.

नंतर दानवीर हंडा घेऊन धर्मलालसह घरीं परतला. दुसरे दिवशीं आपल्या गांवीं जातांना धर्मलालनें विचारलें—"कीं केव्हां त्या हंड्याची पारख करणार?"

"सध्यां असाच राहूं दे तो माझ्याकडे. जेव्हां त्याची गरज भासेल तेव्हां पाहूं कसास लावून आणि जर तो खरोखरच सोन्याचा निघाला तर तो विकून तुझा वांटा तुझ्याकडे



पोहोंचता करीन. तूं कांहीं काळजी करूं नकोस." दानवीर म्हणाला.

मित्रावर विश्वास ठेवून धर्मलाल आपल्या गांवीं गेला. तो जातांच दानवीरानें हंड्याचें सोनें गाळून सर्व सोनें विकून टाकलें. आपल्या मित्राला त्या विषयीं कांहीं कळविलें सुद्धां नाहीं. धर्मलालनें बरेच दिवस वाट पाहिली. पण त्याचा पत्ता नाहीं. म्हणून तो स्वत: त्याला भेटून येण्यासाठीं निघाला.

धर्मलाल फार दिवसांनीं भेटल्यामुळें इक-डच्या तिकडच्या खूप गप्पा झाल्या. परंतु त्या हंड्याबिषयीं दानवीरानें एक शब्दहि काढला नाहीं. शेवटीं धर्मलालनेंच विषय काढला. म्हणाला—"हो, त्या हंड्याचें काय झालें? कोणच्या धातूचा निघाला तो शेवटीं?"

"हो! मी विसरलोंच ती गोष्ट. मी तेव्हांच सांगितलें नाहीं त्यांत सोनें नाहीं म्हणून! आगींत धातल्यावरोवर वितळून पाणी पाणी झालें." दानवीरानें सांगितलें.

धर्मलालनें सर्व ओळखलें. कारण जरी व सोनें ह्यांतील फरक धर्मलालला माहीत नव्हता असें मुळींच नाहीं. आणि खरोखरच जर ती जर असती तर निदान ती तरी दानवीरानें आणून दाखविली असती. पण त्यानें तसें कांहींच केलें नाहीं. पण आपल्याला सर्व कांहीं समजलें आहे असें त्यानें दानवीराला कळूं दिलें नाहीं. तो म्हणाला—"असें होय! जरच का निघाली ती सारी! मला वाटलें सोनें असेल म्हणून."

त्या दिवशीं दानवीराकडचा पाहुणचार घेऊन धर्मलाल आपल्या गांवीं जाण्यासाठीं निघाला. जातांना तो म्हणाला—"दानवीरा, आमच्या गांवांत सध्यां बागेंतील झाडें फळांनीं भरलेलीं आहेत आणि ह्या गांवांत तर सर्व शुष्क आहे. मग आपल्या मुलांना दे कीं माझ्या बरोबर पाठवून. दोन दिवसांनीं येतील परत. करतील दोन दिवस मजा."

"बरें आहे!" म्हणून दानवीरानें आपल्या मुलांना धर्मलाल बरोबर पाठवून दिलें.

जात असतां वाटेंत त्यांना माकडें दिसलीं. तीं पाहण्यासाठीं मुलें थांबलीं. मुलांना माकडें फार आवडतात म्हणून धर्मलाल माकडांचीं दोन पिलें घरीं घेऊन आला.

धर्मलालच्या घरीं दानवीराचीं मुलें अगदीं आनंदांत होतीं. तीं घरीं असलीं म्हणजे माकडांशीं खेळत असत. धर्मलालनें त्या मुलांना माकडांचीं नांवेंच ठेवलीं होतीं. त्यांच्या नांवानें हांक मारली म्हणजे तीं असतील तेथून धांवत येत असत. जेव्हां तीं मुलें बागेंत जात तेव्हां झाडावरचीं फळें खाण्यांत इतकीं गर्क होत असत कीं त्यांना कसलेंच भान राहात नसे. बागेंतून परत येतांना माकडांच्यासाठीं फळें आणायला मात्र तीं विसरत नसत.

कांहीं दिवस गेले. मुलांना आपल्या घरची मुळींच आठवण झाली नाहीं. पण दान-वीराला आपल्या मुलांना भेटण्याची इच्छा झाली. म्हणून त्यानें मी अमक्या दिवशीं येत आहें असें धर्मलालला कळविलें. ज्या दिवशीं दानवीर येणार होता त्या दिवशीं धर्मलालनें



दानवीराच्या मुलांना सांगितलें कीं तुम्ही बागेंत जाऊन खेळा. जेवायच्यास बोलवीपर्यंत तेथेंच खेळत राहा. मुलें बागेंत खेळण्यासाठीं निघून गेलीं. उन्हें थोडी चढल्यावर दानवीर आला. येतांच परस्परांना हालहवाली विचारून झाल्यावर दानवीर म्हणाला—"मुलें कोठें आहेत? दिसलीं नाहींत कोठें आल्यापासून?"

"खेळत असतील कुठें तरी." असें म्हणून धर्मलालनें त्यांना नांवांनीं हांका मारून बोलावलें. त्या नांवांनीं बोलाविल्यावर येण्याची सवय होती. म्हणून धर्मलालची हांका ऐकतांच दोन्ही माकडें धांवत आलीं आणि त्यांच्या खांद्यावर चढून बागडूं लागलीं. तीं चांगली माणसाळलेलीं असल्यानें दानवीराच्या अंगावर जाऊन सुद्धां तीं खेळूं लागलीं.

"हें रे काय?" दानवीरानें विचारलें.

"आपलीं मुलें ओळखलीं नाहींस वाटतें तूं?" धर्मलाल म्हणाला. "मी त्यांना येथें घेऊन आलों आणि तीं आपली बदलून अशी झालीं. मला सुद्धां त्यांच्या बदलण्याचें कारण समजलें नाहीं."

दानवीराचे डोळे उघडले. धर्मलालच्या अशा वागण्याचें कारण त्याला समजलें. त्यानें आपल्या मित्राचा हात धरला व म्हणाला—"होय गड्या! मी मोहानें खोटें बोललों. त्या सोन्याच्या हंड्याचे अर्धे पैसे मी तुला देतों. पण माझीं बाळें मला पाहूं देत. मी त्यांना घरीं घेऊन जाण्यासाठीं आलों आहें."

"घाबरूं नकोस मीहि मुलांचा बाप आहे. आहे मला मुलांच्या मायेची कल्पना. थांब बोलावून आणतों त्यांना." धर्मलालनें मुलांना बोलावून आणून बापाच्या स्वाधीन केलें.

दानवीर मुलांना घेऊन आपल्या गांवीं आला. त्यानें त्या सोन्याच्या हंड्याची अर्धी किंमत आपल्या मित्राला पाठवून दिली.






[ २ ]

उत्तर आफ्रिकेंत "डोकेकापू" नांवाच्या मुंग्याची एक विचित्र जात आहे. त्या जातीची राणी आपल्याला राहण्यासाठीं जागा शोधायला निघते. ती एका जातीच्या तिच्याहून मोठ्या मुंग्यांच्या वारुळाजवळ येते व दाराजवळ घुटमळत हिंडत राहाते.

वारुळांतल्या मजूर मुंग्या बाहेर तिला घुटमळतांना पाहून धरून आंत घेऊन जातात. पण त्या तिला ठार करीत नाहींत, कां कोणास ठाऊक. ही राणी मुंगी वारुळांतील राणी मुंगीच्या पाठीवर जाऊन बसते आणि तिच्या मानेला चावा घेऊन तिला मारून टाकते. वारुळांतल्या राणीचें डोकें गळून पडतें. म्हणूनच त्या जातीच्या मुंग्यांना डोकेकापू मुंग्या हें नांव पडलें. मजूर मुंग्या या नवीन राणीची व तिच्या संततीची चाकरी करूं लागतात. कालक्रमानें त्या वारुळांत डोके कापू मुंग्याच उरतात.

अशा या लुटेऱ्या मुंग्यांना स्वतःचें वारुळ बांधतां येत नाहीं. आयत्या वारुळावर चैन करणाऱ्या या मुंग्या आहेत. असेंच वर्षानुवर्षें शतकानुशतकें होत आलें आहे. परंतु एक वेळ खात्रीनें अशी येईल कीं वारुळ बांधणाऱ्या मुंग्यांची जातच नाहींशी होईल व वारुळें बांधतां येत नसल्यामुळें डोकेकापू मुंग्याची जात सुद्धां हळू हळू नवीन निवास स्थानांच्या अभावीं नाहींशी होईल.

'एमाजान' जातीच्या मुंग्यांचा धंदाच युद्ध आहे. यांना तीक्ष्ण नांगी असते. या 'फार्मिका' जातीच्या मुंग्यांच्या वारुळांत



शिरतात व तेथील राणीवर हल्ला करून तिला ठार करतात व मजूर मुंग्यांना गुलाम करून घेतात. या एमाजान मुंग्या फार्मिका मुंग्यावर हल्ला चढवून त्यांची अंडीं उचलून घेऊन जातात. फार्मिका मुंग्या स्वभावानें अहिंसक असल्यामुळें आयुष्यभर गुलामींत रखडत असतात. त्यांच्या वारुळांत ह्या एमाजान मुंग्याच काय, इतर किडे कोळी सुद्धां शिरतात व राहूं लागतात. त्यांच्या मेहनतीवर इतर मुंग्या व प्राणी चैन करतात.

मुंग्यांच्या जातींत ही सहिष्णुता आणखी एका स्वरूपांत आढळून येते. दोन जातीच्या मुंग्या एकाच वारुळांत निरनिराळ्या भागांत शांतपणें जीवनयापन करीत असलेल्या आढळतात.

मुंग्यांना दोन पोटें असतात. एका पोटांत खाल्लेलें अन्न पचतें. दुसरें, खरें पाहिलें तर पोटच नव्हे. त्यांतलें अन्न समाजाला पोंचतें. पाहुण्यांना अन्न देण्याची वेळ आली म्हणजे मुंग्या स्वतःच्या पिलांची सुद्धां पर्वा करीत नाहींत. पिलांना अन्न न देतां त्या पाहुण्यांना देतात.

आपण दुधासाठीं जशा गाई गुरें ठेवितों तशाच मुंग्या देखील "गाई" पाळतात. मुंग्यांच्या गाई म्हणजे झाडांच्या मुळांत राहणारे आणि त्यांच्याच रसावर जगणारे एक तऱ्हेचे किडे होत. मुंग्या या किड्यांना हळुवारपणें स्पर्श करतात त्या बरोबर त्या किड्यांच्या अंगांतून मधासारखा एक प्रकारचा गोड रस बाहेर येऊं लागतो. हा, मुंग्यांना आहार म्हणून उपयोगी पडतो. उन्हाळ्यांत वृक्षांचा रस कमी झाला म्हणजे मुंग्या आपल्या "गाईंना" आहार मिळेल अशा जागीं नेऊन ठेवतात.

"शिंपी" मुंग्या म्हणून देखील मुंग्यांची एक विचित्र जात आहे. या पानांत आपलें



घर करून राहतात. या मुंग्या इतर किड्यां-प्रमाणें प्रथम "लार्वा" म्हणजे अळी किंवा सुरवंटावस्थेंतून 'पूपा' म्हणजे कोष अवस्थेंत जाऊं लागल्या म्हणजे आपल्या चारीबाजूला एका तऱ्हेच्या चिकट धाग्याचें वेष्टन करून घेऊं लागतात. अशा तऱ्हेनें पानें चिकटून एक पानांचें पोकळ घरटें होतें. त्यांत या मुंग्या राहूं लागतात. या शिंपी मुंग्या रंगाच्या असतात व झाडांच्या पानांत हिरवट राहतात.

अंगाचा भडका उडविणाऱ्या काड मुंग्या सारख्या मुंग्यांची एक जात आहे. या नेहमीं एकत्र चिलगूनच चालतात फिरतात. यांना पाण्याची भीति नसते. पुराचें पाणी आलें कीं या आपल्या 'राणी'ला व पिलांना मधें करून चेंडवासारख्या चारी बाजूला वेढून बसतात व जमिनीकडे किंवा झाडांझुडपांकडे तरंगत जाण्याचा यत्न करतात.

### राक्षस मुंग्या

मुंग्यामध्यें कांहीं मुंग्या असभ्य समजल्या जातात. त्यांना 'राक्षस मुंग्या' म्हणतात. ह्या शिकार करून आपलें भक्ष मिळवितात. ह्या मुंग्यांना एका बाजूला तोंड असतें व दुसऱ्या बाजूला विषारी दांत किंवा नांगी



असते. ह्या मुंग्या जास्त करून उष्ण प्रदेशांत आढळतात. ह्यांत बऱ्याच जाती आहेत. कांहीं अगदीं ल्हान असतात तर कांहीं बऱ्याच मोठ्या म्हणजे एक इंच मोठ्या सुद्धां असतात.

बोलिवियामध्यें ह्या मुंग्यांना 'बुनी' म्हणतात. ह्या बुनी राक्षस मुंग्यांना तेथील लोक फार घाबरतात. ह्या जर का आल्या तर लोक शेतें सोडून निघून जातात. ह्या थोड्या ल्हान असतात. ह्याहून मोठ्या राक्षस मुंग्या दक्षिण अमेरिकेंत भूमध्य रेषेच्या आसपासच्या प्रदेशांत आढळतात. ऑस्ट्रे-




लियांत अशाच तन्हेच्या भयंकर मुंग्या आहेत. त्यांना "बुल डाग" म्हणतात.

ह्या शिकारी मुंग्यांचा मुख्य आहार म्हणजे वाळवी. म्हणून ह्या आपलीं वारुळें शेजारीं करतात. कांहीं जातीच्या मुंग्या एका मोठ्या फौजेप्रमाणें एके ठिकाणीं जमून बाहेर पडतात आणि मग त्यांना वाटेंत जो लहान मोठा प्राणी भेटेल त्यावर हल्ला चढवून आपली भूक भागवितात. ह्या मुंग्यांना डोळे नसतात. प्राण्याच्या आकाराचा त्यांना विचार नसतो. ह्यांच्या रस्त्यांत कोठें भोंक आले तर त्या, त्या भोकांत शिरतात. जर झाड मध्यें आलें तर त्या झाडावर जातात. त्यांना कशाचा अडथळा म्हणून होत नाहीं.

आफ्रिका, दक्षिण अमेरिका ह्या देशांत असंख्य 'शिपाई' मुंग्या टोळी करून इकडून तिकडे भटकत असतात. ह्यांना वाटेंत पाहिलें कीं हत्ती सुद्धां वाट सोडून बाजूला चालूं लागतो. ह्या टोळीच्या वाटेंत कोठें ओढा किंवा पाण्याचा प्रवाह आला तर ह्या एक दुसरीचे पाय धरून लांब दोरी प्रमाणें बनून पाण्याच्या दुसऱ्या कांठापर्यंत जातात आणि मग ह्या मुंग्यांच्या पुलावरून बाकी मुंग्या पैलतिराला जाऊन पोहोंचतात.

### दिनचर्या

राणी मुंगीला अंडीं घालण्याशिवाय दुसरें काम नसतें. ह्या राण्या फार दिवस जगतातहि. घरांतील कामकाज मजूर मुंग्या करतात. म्हणजे अंड्यांतून निघालेल्या पिल्लांचें पालनपोषण करणें खायला प्यायला घालणें, अन्न गोळा करणें, कळपाचें रक्षण करणें वगैरे.

मुंग्या जास्त करून द्रव पदार्थ खातात. जेव्हां त्या किड्यांच्या नाकाला चावा घेतात तेव्हां तेथील संपूर्ण द्रव पदार्थ शोषून घेऊन त्यांना टाकून देतात आणि हा उरलेला पदार्थ मुंग्यांच्या पाहुण्यांच्या उपयोगी पडतो.



एकेका वारुळांत हजारों मुंग्या असतात आणि त्या आपल्यासाठीं लाखों किड्यांना कोठारांत भरून ठेवतात.

वाळवंटांतील किंवा शुष्क प्रदेशांतील मुंग्या धान्याचे दाणे जमवितात. त्या धान्याचा चूर करण्यासाठीं दुसऱ्या मोठ्या डोक्याच्या मुंग्या असतात. ह्या मुंग्या आपल्या तोंडांत दाणा धरून त्याचा चूर करून ठेवतात. सगळ्या धान्याचा चूर करून झाल्यावर धान्य जमविण्याचे दिवस संपल्यावर मजूर मुंग्या ह्या मोठ्या डोक्यांच्या मुंग्यांना मारून टाकतात. हें काम त्यांना अन्यायाचें वाटत नाहीं. कारण धान्य नसेल तेव्हां ह्या मुंग्यांना कांहीं उपयोग नसतो आणि पुन्हां धान्य येईपर्यंत नवीन मुंग्या उत्पन्न होतातच.

मुंग्यांच्या वारुळाच्या तोंडाशीं किंवा जवळपास कसलीं झाडें वगैरे कांहीं नसतात. पण त्यांना उपयुक्त अशीं कांहीं झाडें झुडपें जवळपास दिसतात. कांहीं जणांचें असें म्हणणें आहे कीं मुंग्याच तीं झाडें लावतात. त्यांत असें असूं शकेल कीं धान्याचे दाणे नेत असतां किंवा नको असलेले फोल फेकींत असतां एकादा दाणा बाहेर इकडे तिकडे पडून उगवत असेल व त्याचें झाड होत असेल.



एवढें मात्र खरें कीं त्यांना पाहिजे असलेलीं झाडें त्यांच्या वारुळाच्या जवळपास दिसतात.

मुंग्या आपल्या आहाराची प्रथम पासूनच तरतूद करून ठेवतात. त्यांचें लक्ष भविष्य काळाकडे सुद्धां असतें. ह्याचें चांगलें उदाहरण म्हणजे मधमाशा.

एका विशेष प्रकारच्या मुंग्या आपल्यासाठीं एक ओलसर पदार्थाचा धागा तयार करतात. तोच खातात. रोज संध्याकाळीं ह्या मुंग्या बाहेर जाऊन गवत किंवा लहान लहान झाडें घेऊन येतात. त्यांच्या पानाचा चाऊन चाऊन ओलसर लेह तयार करतात

आणि त्याचाच त्या खाद्यासाठीं एक पदार्थ तयार करतात. म्हणजे हा कुत्र्यांच्या छत्र्या प्रमाणें असतो. मग ह्याला खत घालून मोठें करण्याचें काम ल्हान मुंग्याचें.

ह्या जातींतील राणी मुंगी जेव्हां घर सोडून जाते तेव्हां ती ह्या छत्र्यांतील छत्री आपल्या तोंडांत धरून घेऊन जाते. ती जी पहिली अंडीं घालते तीं फोडून त्यांच्यावर ही छत्री ठेवून येते. त्यामुळें पुन्हां अंडीं घालून त्यातून मुंग्या बाहेर पडेपर्यंत त्यांचें खाणें वाढून तयार होतें.

### वाळवी

वाळवी मुंग्याच्या जातींतील नाहीं, हें मागेंच सांगितलें आहे. पण मुंग्यांप्रमाणें वाळवींत सुद्धां नर मादी असतात, ह्यांच्या बारुळांतून 'राणी' वाळवी बरोबर 'राजा' ही असतो. ह्यांच्यांत कामकरी मुंग्या व शिपाई मुंग्या वेगळ्या वेगळ्या तऱ्हेच्या असतात.

मुंग्यांप्रमाणें वाळवी ठिकठिकाणीं आपलीं वारुळें करतात. ह्या लाकूड खाऊन राहातात. कांहीं जातीच्या वाळवी वर सांगितलेल्या मुंग्यांप्रमाणें कुत्र्याची छत्री करून खातात.

वाळवी अंधारांतच राहूं शकते. साध्या मुंग्यांपेक्षां वाळवी फार नुकसान करते. हें सर्वांस माहीतच आहे.

मुंग्यांच्यापासून आपल्याला शिकण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत. पहिली गोष्ट म्हणजे त्या आपसांत फार एकोप्यानें राहातात. आपलीं घरचीं कामें फार चतुराईनें व निरलसपणें करतात. मुंग्या आपल्या राणी मुंगीचा फार आदर करतात. पिलांचा सुद्धां प्रेमानें सांभाळ करतात. आपल्या घरच्या रक्षणासाठीं त्या प्राणपणानें लढतात. आपल्या समाजाच्या कल्याणासाठीं यथाशक्ति झटत असतात. अशा कित्येक गोष्टी माणसानें त्यांच्यापासून शिकण्यासारख्या आहेत.






[ १२ ]

घरीं परत येत असतां जीवक साकेत नगरीस गेला. त्या गांवच्या एका श्रीमंत गृहस्थाची बायको अर्धशिशीच्या आजारानें सात वर्षें अंथरुणावर पडून होती. कित्येक वैद्यांनीं चिकित्सा केली. पण गुण पडला नाहीं.

जीवकला ही गोष्ट कळली. तो त्या गृहस्थाच्या घरीं गेला आणि नोकरांकरवीं निरोप पाठविला कीं बाईसाहेबांची चिकित्सा करण्यासाठीं आलों आहें. त्या बाईनें आपल्या नोकरांना वैद्याचें वय विचारून घेतलें व म्हणाली—"मोठमोठ्या वैद्यांनीं जेथें हात टेंकले तेथें हा काय दिवे लावणार आहे!"

तें ऐकून जीवकनें विनम्रपणें परत निरोप पाठविला कीं वयामुळें ज्ञान येत नसतें. प्रत्येक म्हातारा मनुष्य ज्ञानी असतो असें थोडेंच आहे. माझें वय किती आहे, हें न पाहतां माझ्या ज्ञानाकडे पहावें. रोग बरा होईपर्यंत मी एक पै देखील घेणार नाहीं." तें ऐकून त्या श्रीमंताची बायको चिकित्सा करून घ्यायला कबूल झाली. जीवक आल्यावर ती त्याला म्हणाली—"हें पहा, गेलीं सात वर्षें मी या अर्धशिशीच्या आजारानें पडून आहें. निदान एक दिवस तरी ही अर्धशिशी थांबली तर मी जन्मभर तुमचे आभार मानीन."



# बायको असावी तर अशी

एका गांवांत एक शेतकरी रहात असे. त्याला मूलबाळ कांहीं नव्हतें. जमीन जुमला पण अगदीं बेताचा होता. परंतु दोघें नवरा बायको सुखासमाधानानें रहात. नवरा स्वभावानें फार भोळा होता. पण बायको त्याला संभाळून घेई. कोणी त्याला नांवें ठेवूं लागलें तर तें तिला आवडत नसे. त्यांच्याकडे एक बैलाची जोडी व दोन गाई होत्या. शेतकऱ्याची बायको दूध विकून थोडे पैसे मिळवी. तिनें शेंदोनशें रुपये आपल्या गरिबींतहि वांचविले होते. उतारवय होऊं लागलें तसें तिला सर्व कामाचा उरक होईना. म्हणून ती एक दिवस नवऱ्याला म्हणाली—"एक गाय विकून टाकूं या. एका गाईचें दुभतें आपल्याला पुरें होईल. येतील ते पैसे अडीअडचणीला उपयोगी पडतील." शेतकऱ्याला बायकोचा सल्ला पसंत पडला. तो एका गाईला घेऊन आठवड्याच्या बाजाराला गेला. त्यानें गाय विकण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु कोणी गाय विकत घ्यायला तयार झाला नाहीं. शेवटीं निराश होऊन तो घरीं परत निघाला. वाटेंत एका झाडाखालीं त्याला एक मनुष्य भेटला. त्याला आपला घोडा विकावयाचा होता. शेतकऱ्यानें आपली गाय देऊन तो घोडा घेतला.

घोड्याला घेऊन तो पुढें निघाला. वाटेंत त्याला एक धनगर भेटला. त्याच्या जवळ एक बकरी होती. शेतकऱ्यानें त्याला तो घोडा दिला आणि त्याची बकरी घेतली.

आणखी पुढें गेला, तेव्हां त्याला आणखी एक मनुष्य भेटला. त्याच्याजवळ एक बदक होतें. एक बदक पाळावें असें शेतकऱ्याच्या मनांत पुष्कळ दिवसांपासून होतें. त्यानें तें बदक घेऊन बकरी देऊन टाकली.

आणखी थोडें पुढें गेल्यावर त्याला एक मनुष्य कोंबडा घेऊन येत असलेला दिसला. शेतकऱ्यानें तें बदक दिलें आणि त्याबद्दल कोंबडा मागून घेतला.

शेतकरी कोंबडा घेऊन घरीं येत असतां त्याला गांवांतलाच एक ओळखीचा मनुष्य भेटला. त्यानें विचारलें—"कायरे लखू! गाय विकायला गेला होतास म्हणे? केवढ्याला गेली गाय? आणि हें कोंबडें केवढ्याचें?"

शेतकऱ्यानें घडलेली गोष्ट सांगितली आणि विचारलें—"काय बरोबर केलें कीं नाहीं?" तो शेतकरी म्हणाला—"तूं बरोबर केलेंस कीं चूक हें मी नाहीं सांगत. बायकोला जाऊन विचार, म्हणजे कळेल."

"माझी बायको माझ्या म्हणण्याबाहेर नाहीं. मी जें केलें तें अगदीं बरोबर केलें असेंच ती म्हणेल. पहा पाहिजे तर येऊन." शेतकरी म्हणाला.

त्याचा मित्र शेतकरी म्हणाला—"लाव तर पैज. तुझी बायको रागावली नाहीं तर शंभर मी द्यायचे. रागावली तर तूं द्यायचे. आहे कबूल?" शेतकरी म्हणाला—"हो कबूल. पण उगाच तूं आमच्या मध्यें पडून शंभर रुपये घालवून बसणार आहेस झालें."



"उगाच गप्पा मारूं नकोस. शंभर रुपयांची पैज ठरली. शंभर रुपये जाणार म्हणून आतां उडवाउडवी करूं नकोस" शेतकऱ्याचा मित्र विठू म्हणाला.

"बरें तर, चल माझ्या घरीं. मी आंत जातों. तूं ओसरींत बसून ऐक आमचें नवरा बायकोचें बोलणें." लखू म्हणाला.

दोघे लखूच्या घरीं गेले. विठूला बाहेर ओसरींत बसायला सांगून लखू घरांत गेला. बायकोनें विचारलें—"आलांत गाय विकून? काय किंमत मिळाली." लखू म्हणाला—"कोणी आपली गाय घ्यायला









तबारच नव्हता. म्हणून गाय देऊन एक घोडा घेतला."

"वाईट काय झालें? एक टांगा ठेवून घेऊं. भाड्याचे पैसे मिळतील आणि कधीं कोठें जायचें झालें तर जातां येईल." लखूची बायको म्हणाली.

" पण मी एक घोडा आणला नाहीं. घोडा देऊन एक बकरी घेतली!" लखू म्हणाला.

"तें हि बरोबर झालें. घोड्याचा खर्च कोणी करावा? बकरी काय फुकटाचें चरून येईल. आहे कोठें बकरी? पाहूं तर!" शेतकऱ्याची बायको म्हणाली.

"पण जरा ऐकशील तरी. मी बकरी आणली नाहीं. ती देऊन हें कोंबडें घेऊन आलों आहें." शेतकरी म्हणाला. "देव पावला! त्या बकरीच्या पाठीं-मागें मला सारें गांव फिरावें लागलें असतें. हा कोंबडा आला हें काय वाईट झालें. कोंबडा आरवला कीं मला उठायला सोपें झालें." बायको म्हणाली.

विठू नवराबायकोचें तें बोलणें लक्ष देऊन ऐकत होता. त्यानें अनुमान केलें होतें त्याच्या अगदीं विरुद्ध लखूची बायको बोलत होती. काय करावें या विचारांत तो होता. इतक्यांत लखूनें बाहेर येऊन विचारलें—"काय विठोबा! ऐकलेंत ना आमचें बोलणें. मी पहिल्यानेंच तुला म्हटलें होतें कीं आमच्यामध्यें पडूं नकोस. पण तूं तर पैज मारायला तयार होऊन बसला होतास."

विठूनें शंभर रुपये दिले. बायको नवऱ्याच्या शब्दाबाहेर नसल्यामुळें विठूला दामदुप्पट पैसे मिळाले.






१. ज्ञानान्वेषक

रानटी जनावरांचा स्वभाव ठीक ठीक माहीत नसल्यामुळें मनुष्याचा जीव केव्हां केव्हां विचित्र धोक्यांत सांपडला जातो. केव्हां केव्हां त्यांत गंमत वाटते तर कित्येकदां जिवाची काळजी वाटते. परंतु हेंच खरें कीं जो असल्या जीवनांत एकदां उतरतो त्याला त्या जीवनावर एक तऱ्हेचा मोह उत्पन्न होतो, नव्हे, असला पाहिजे. निदान मला तरी हें जीवन फार आनंदाचें व अभिमानाचें वाटत आहे.

सर्वांत भयंकर असा प्रसंग एकदां माझ्यावर गुजरला. मी सरकशीच्या गोल पिंजऱ्यांत नुकतेंच पाऊल टाकलें असेल. प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवून माझें स्वागत केलें. मी आभार मानण्यासाठीं म्हणून नम्रपणें एकदां वांकलों. पण त्यावेळीं पिंजऱ्यांत सहा सिंहांना सोडलें होतें तिकडे माझें लक्ष नव्हतें. त्यांपैकीं एकानें येऊन आपल्या पंज्यानें माझी मांडी फाडली. हें त्यानें मला खाण्यासाठीं केलें होतें असें नाहीं मला वाटत. त्यानें सहज पंजा मारला असावा. पण त्यामुळें मला हॉस्पिटलमध्यें जावें लागलें.

माझे या कामांतील गुरु हॉफमन मला हॉस्पिटलमध्यें भेटण्यासाठीं आले. ते माझ्या जवळ पलंगावर येऊन बसले व मला विचारलें—"कशी काय तब्येत आहे? हें बघ, तूं केलेंस हें काम अगदीं नवशिक्यासारखें केलेंस. नशीब बलवत्तर होतें म्हणून वांचलास. पहिल्यानेंच तुझ्यावर हा प्रसंग गुजरला आहे. पण हाच शेवटचा असें मात्र समजूं नकोस."

जिम फे

जखम भरल्यावर मी काल हॉफमन यांना जाऊन भेटलों आणि म्हणालों—"आज संध्याकाळपासून मी पुन्हां कामावर रुजू होत आहें." स्मित करून त्यांनीं माझी पाठ थोपटली आणि म्हणाले—"शाबास! मला वाटत होतें, तुझें मन कचरत तर नसेल? जिम! मनुष्याची लायकी संकटांतून बाहेर आल्यावर पारखावयाची असते. ज्याचें मन कच खातें, पुन्हां रानटी जनावरांशीं संबंध येणार म्हणून जो एक न एक कारण सांगून अंग चोरण्याचा प्रयत्न करतो तो असल्या कामाला लायक नाहीं असें समजावें. अशा लोकांनीं रानटी जनावरांच्या वाऱ्यालाहि जाऊं नये."

तो पहिला प्रसंग माझ्यावर केवळ माझ्या निष्काळजीपणामुळें आला होता. त्या प्रसं-गावरून मी एक गोष्ट शिकलों. रानटी जनावरांचा खेळ करणारांनीं वाहवाही ऐकून देहभान विसरूं नये. हें त्या रानटी सिंहा-पासून मी शिकलों. असे कित्येक धडे मी रानटी जनावरांकडून घेतले आहेत.

खरी गोष्ट अशी होती कीं मी फुशा-रक्या मारीत आलों होतों कीं मी रानटीं जनावरांकडून कामें करवून घेण्याचें काम शिकवितों. परंतु शिकलेल्या जनावरांकडूनच मी सर्व कामें करून घेत असें.

मला लक्ष ठेवायला हवें होतें कीं कोणत्या जनावराचा स्वभाव संवयी व आवडी निवडी कशा आहेत. जनावरांच्या स्वभावाची परख ही मी आपल्या गुरूकडून शिकलों होतों. स्वतःच्या अनुभवानें मी कांहींच शिकलों नव्हतों. म्हणून मला जनावरांच्या स्वभावाची खरी कल्पना आलेली नव्हती.

जनावरें माझ्या म्हणण्याप्रमाणें वागतात, मला वश झालेलीं आहेत, हें फार उशिरां मला कळलें. माझ्या इंगितांवर तीं कामें करीत. शिकल्यानंतर माणसाच्या संगतींत राहून त्यांच्या स्वभावांत पालट झाला होता. तीं "सभ्य" झालीं आहेत, हें देखील मला कळलें. कित्येकदां मला वाटतें, जनावरांत नसलेले गुण देखील त्यांच्यांत असावेत असें अनुमान मी करूं लागलों होतों. कारण त्यांच्याविषयीं मला एक तऱ्हेचा जिव्हाळा वाटूं लागला होता. म्हणूनच कदाचित त्यांच्यांत नसलेल्या गुणांची कल्पना मी मनानें करूं लागलों असेन.

परंतु त्यांच्या या काल्पनिक गुणांवरचा माझा विश्वास मात्र दिवसेंदिवस वाढत गेला.














मला असें वाटूं लागलें कीं जनावरांचा खरा स्वभाव जंगलांत नैसर्गिक स्थितींतच जाणून घेणें रास्त होईल. त्यांच्या स्वभावाची खरी ओळख पटल्या नंतर त्यांना वश करून घेणें जास्त सोपें जाईल.

साधारणपणें लोक रानटी जनावरांना झूमध्यें किंवा सरकशींत पाहतात. लहान मुलांना त्यांची भीति दाखवितात. मुलांच्या पुस्तकांत वाघ, सिंह, अस्वल, कोल्हा, हत्ती वगैरेवर आधारलेल्या गोष्टी असतात. परंतु माझ्यासारख्या रानटी जनावरांना शिक्षण देणाऱ्या शिक्षकाला या खोट्या गोष्टी वाचून चीड येते. रानटी जनावरांहून आपण माणसें कांकण भर मोठे आहोंत हें मानावयास मी तरी तयार नाहीं. हें ऐकून तुम्हांला कदाचित आश्चर्य वाटेल, रानटी जानवरें माणसाहून नीच आहेत असें कोणी म्हटलेलें मला खपत नाहीं.

माणसाचें मोठेंपण कशांत आहे, हें आजपर्यंत मला कळलें नाहीं. माणसाचें जीवन आणि जिणें रानटी जनावरांहून जास्त बरें आहे हें अगदीं सपशेल खोटें आहे. एक गोष्ट खरी आहे, जनावरांना माहीत नसलेल्या अनेक गोष्टींची आपणांस माहिती आहे. परंतु अशा अनेक गोष्टी देखील आहेत कीं ज्या त्यांना माहीत आहेत व आपणांस त्यांची कल्पना देखील शिवलेली नाहीं. नैतिक वागणुकीच्या बाबतींत तरी जनावरें खास माणसांपेक्षां थोर आहेत.

रानटी जनावरांच्या स्वभावाचें अध्ययन करण्याचें ठरवून मी फोटो माक-२ नांवाच्या आगबोटीनें फ्रेंच पश्चिम आफ्रिकेला निघालों आणि तेथें जाऊन मी जनावरांचा व्यापार करूं लागलों. माझा पहिला अनुभव एक सिंहाविषयीं होता.

(पुढल्या अंकांत "मृगराज")



# २. पायलटचा कुत्रा

गेल्या महायुद्धांत अमेरिकेंतील ब्रुक्लिन नांवाच्या एका रहिवाश्यानें पायलटची नोकरी केली होती. त्याच्या जवळ एक कुत्रा होता. तो "काकर स्पॅनियल" जातीचा होता. तो रंगानें भुरकट होता. १९४४ सालीं तो अडीच वर्षांचा असेल. दिसायला तो फारच सुंदर होता. त्याचें नांव 'पिस्टल हेड' असें होतें.

'पिस्टल हेड'च्या मालकानें विमानदलाच्या एकंदर पन्नास हल्ल्यांत भाग घेतला. त्यांपैकीं ४८ हल्ल्यांत 'पिस्टल हेड' देखील बरोबर होता.

दुरून शत्रूचें विमान आलें कीं तो फक्त आवाजा-वरून तें ओळखत असे. त्याला इतकें कळूं लागलें होतें. विमानांत बसलेल्या लोकांना किंवा विमान-तळावरील लोकांना कळण्यापूर्वी 'पिस्टल हेड'ला शत्रूचें विमान आल्याचें कळत असे.

दुरून विमानाचा आवाज ऐकूं आला कीं तो कान टवकारून ऐकीं व तें शत्रूचें विमान आहे कीं अमेरिकेचें हें ओळखी. तें शत्रूचें असेल तर तो एका विशेष प्रकारें भुंकूं लागत असे व अमेरिकेचें असेल तर आणखी एका तऱ्हेनें भुंके. कुत्र्याच्या या विलक्षण बुद्धिमत्तेची वाखाणणी विमानतळावरील सर्व लोक करीत असत.

'पिस्टल हेड'चा मालक आपल्या एकावनाव्या हल्ल्यावर निघाला. या खेपेस दुर्दैवानें तो बळी पडला. परत आला नाहीं.

मालक मेल्याचें कुत्र्याला कळलें असावें. मालक परत न आलेला पाहून कुत्र्यानें हाय खाल्ली. त्यानें खाणें-पिणें सोडून दिलें. त्याला करमेनासें झालें. मालकाच्या विरहदुःखानें तो वाळतच गेला.

शेवटीं विमानदलाच्या अधिकाऱ्यांनीं या मुकी कुत्र्याला मार्शल बेटावरून ब्रुक्लिन गांवीं पोंचतें केलें. तो मालकाच्या बायकोला व एकुलत्या एका मुलाला जेव्हां भेटला तेव्हां तो आनंदानें भुंकूं लागला,– जणुं कांहीं त्याचा पुनर्जन्मच झाला.







# महाभारत

चौथा दिवस उजाडला. दोन्हींकडील सेना युद्धांस सज्ज होऊन रणभूमीवर गेल्या. युधिष्ठिरानें पांडव सैन्याची रचना आज नव्या तऱ्हेनें केली होती. व्यूहाच्या अग्रभागीं अर्जुन कपिध्वज रथावर आरूढ होऊन शत्रु पक्षांतील वीरांची प्रतीक्षा करीत होता.

युद्धाला सुरवात झाली. भीष्म, द्रोण, कृप, शल्य, दुर्योधन सोमदत्त वगैरे योद्धा अर्जुनाशीं युद्ध करण्यास धांवले. अभिमन्यु अर्जुनाच्या मदतीस आला. तो पुढें होऊन युद्ध करूं लागला. परंतु भीष्मानें त्याच्याकडे लक्ष न देतां अर्जुनाशीं युद्धास सुरवात केली. त्या दोघांचें भयंकर युद्ध सुरू झालें. तोंपर्यंत अश्वत्थामा, भूरिश्रव, शल्य, चित्रसेन व साम्यमुनींचा मुलगा असे पांचजण एकदम एकट्या अभिमन्यूवर तुटून पडले. त्या सर्वांना मोठ्या शौर्यानें अभिमन्यु तोंड देत होता.

अभिमन्यूचें साहस पाहून अर्जुनानें आनंदानें शंख वाजविला. शंखध्वनि ऐकून दुर्योधनानें त्रिगर्त, मद्र, कैकय वगैरे राजांची पंचवीस हजारांची सेना अभिमन्यूशीं युद्ध करण्यासाठीं पाठविली. परंतु ह्या सैन्यानें अर्जुन व अभिमन्यूला घेरलें. सेनापति धृष्टद्युम्नाच्या नजरेंतून हें सुटलें नाहींत. तो सेना घेऊन अभिमन्यूच्या मदतीला धांवला.

तें पाहून साम्यमुनींचा मुलगा, धृष्टद्युम्न व त्याच्या सारथ्यावर बाण सोडींत पुढें आला. परंतु धृष्टद्युम्नानें त्याचें धनुष्य तोडून टाकलें. नंतर त्याच्या रथाचे घोडे मारले. सारथ्याला खालीं आणलें. तेव्हां साम्यमुनींचा मुलगा हातांत तलवार घेऊन धृष्टद्युम्नावर धांवला. त्यानें त्याला जवळ येऊं दिलें आणि एकाएकीं त्याच्यावर गदाप्रहार केला. तात्काळ त्याला वीरगति मिळाली.

अर्थातच साम्यमनींला चेव चढला. तो शल्याबरोबर आला व धृष्टद्युम्नाबरोबर युद्ध करूं लागला. बराच वेळ दोघांचें सारखेंच युद्ध झालें. धृष्टद्युम्नाकडील वीर थोडे ढिले पडले. त्याबरोबर कौरवांचाच विजय होण्याची हरुयें दिसूं लागलीं. तेवढ्यांत अभिमन्यु तेथें येऊन शल्याशीं युद्ध करूं लागला.

शल्याचें रक्षण करण्यासाठीं दुर्योधन, दुःशासन, विविंशति, विकर्ण, दुर्मर्षण, दुस्सह, दुर्मुख, चित्रसेन, सत्यव्रत, पुरुमित्र वगैरे अभिमन्यूवर धांवले.

अभिमन्यूच्या मदतीसाठीं भीम, धृष्टद्युम्न, उपपांडव नकुल सहदेव वगैरे वीर धांवून आले.

ह्या दोन्हीं तुकड्यांत फार मोठें युद्ध झालें. इतकें भयंकर कीं बाकी योद्धे युद्ध सोडून हें दृश्य पाहण्यासाठीं त्यांच्या भोंवती जमा झाले. शल्य नकुल सहदेवांचा मामा असून सुद्धां त्यांच्याशीं निकरानें युद्ध करीत होता.

युद्ध चालू असतां एकाएकीं भीम सिंह-गर्जना करीत हातांत गदा घेऊन रथांतून खालीं उतरला. वाटेंत येणाऱ्या हत्ती, घोडा व पायदळ सर्वांवर गदा प्रहार करीत शल्याच्या रोखानें निघाला. त्याचा तो



रुद्रावतार पाहून सर्व चकित झाले. धृष्टद्युम्नाला भीमाच्या ह्या जाण्याचा कांहीं अर्थ कळेना. भीमावर कांहीं अनिष्ट येऊं नये म्हणून धृष्टद्युम्नानें अभिमन्यूच्या मदतीनें पाठीमागून बाण सोडून त्याचें रक्षण केलें.

भीमाच्या गदाप्रहारानें हत्ती पायदळ सैन्याला तुडवीत रणभूमीवर सैरवैरां पळूं लागले. भीम तसाच शत्रु सैन्याचा संहार करीत पुढें जात होता. त्यानें शत्रु सैन्यांत हाहाकार उडवून दिला. भीमाचा आवाज ऐकला किंवा त्याची नजर आपल्याकडे फिरली आहे असा भास झाला कीं त्या

बाजूने सैनिक आपापल्या जागा सोडून पळून जाऊं लागले.

सैन्यांत खळबळ उडालेली पाहून भीष्म आपल्या रथांत बसून भीमाकडे आला. त्यानें भीमावर बाणवृष्टि करण्यास सुरवात केली. त्याला पाहून सात्यकी भीष्माच्या समोर येऊन युद्ध करूं लागला. तो नव्या दमानें कौरव सेनेच दमन करूं लागला. तोडीस तोड म्हणून अलम्बस राक्षस पुढें आला. परंतु शेवटीं त्यालाहि माघार घ्यावी लागली.

अलम्बस राक्षसाचा सुद्धां सात्यकी समोर टिकाव लागला नाहीं तेव्हां त्याच्या समोर येण्यास कोणी धजेना. भूरिश्रवानें हें पाहिलें व प्राण तळहातावर घेऊन त्याच्या समोर गेला. पाठोपाठ कौरव बंधु देखील त्याच्या मदतीस धांवले.

आपल्या चुलत भावांना आपल्या समोर पाहून भीमाला चेव चढला. हरणांच्या कळपा-वर सिंह जसा झडप घालतो तशी त्यानें त्यांच्यावर घातली व गदा फिरवूं लागला. ह्याच वेळीं दुर्योधन व त्याचे भाऊ नन्दक ह्या दोघांनीं मिळून भीमाला बाणांचा वर्षाव करून जखमी केलें. भीमाला चीड आली. तो आपल्या रथावर हातांतील धनुष्यबाण ठीक करीत आपल्या विशोक नांवाच्या सारथ्याला म्हणाला—"पहा तर! आज ह्या धृतराष्ट्राच्या मुलांना कसा यमसदनास पाठवितों तें."

भीमानें दुर्योधन व नन्दकावर बाण सोडण्यास सुरवात केली. इतक्यांत दुर्योधनाचा एक बाण सूंऽऽ सूंऽऽ करीत आला व भीमाच्या हाताला लागला. त्या बरोबर भीमाच्या हातांतील बाण गळून पडला. भीमाच्या सारथ्यालाहि बाण लागला. भीमानें हाताला लागलेला बाण काढून फेंकून दिला आणि दुर्योधनाला बाण मारला व त्याच्या हातांतील धनुष्याचे तुकडे तुकडे करून टाकले. त्या क्षणींच दुर्योधनानें एक दुसरें धनुष्य घेतलें व भीमावर रोखून बाण सोडला. तो नेमका त्याच्या छातीला लागला व भीम आपल्या रथांत मूर्छित होऊन पडला.

अभिमन्यु उपपांडव वगैरे वीरांनीं दुर्यो-धनाला चारी बाजूंनीं घेरलें व त्याच्यावर हल्ला केला. भीमाला लागलेला बाण साधारण होता. म्हणून त्याची मूर्च्छा लवकरच दूर झाली. तो ताबडतोब उठला व पुन्हां युद्ध करूं लागला. शल्य भीष्माच्या बाणवृष्टीनें भयभीत झाला. भीमाला तोंड देण्याचें सामर्थ्य त्याला न राहिल्यामुळें तो रणांगण सोडून पळून गेला.





सुषेणा, जलसन्धु, सुलोचन, उग्र, भीमरथ वीरबाहु, दुर्मुख, दुष्प्रधर्ष, विवित्स, विकट वगैरे धृतराष्ट्राचे मुलगे मिळून एकदम भीमावर तुटून पडले. भीमानें त्या प्रत्येकाला आपल्या बाणानें मारण्यास सुरवात केली. एकेक जण पडूं लागलेला पाहून बाकीचे आपला जीव मुठींत घेऊन पळून गेले.

भीष्मानें कौरव योध्यांना आज्ञा दिली. म्हणाला—"अहो ! राजकुमारांना तिकडे भीम मारतो आहे आणि तुम्हीं इकडेच ? चला, जा त्या बाजुला. व्हा पुढें." कांहीं वीर भीष्माच्या आज्ञेवरून भीमाशीं लढण्यास पुढें सरसावले. त्यांत भगदत्त एका मोठ्या हत्तीवर चढून भीमावर बाण सोडूं लागला. त्याला प्रत्युत्तर म्हणून पांडव वीरांनीं भगदत्तावर बाण सोडले. त्यांत त्याच्या हत्तीला बाण लागल्यानें तो उधळला व सर्व सैन्यांत त्यानें धुमाकूळ माजविला.

भगदत्त व भीम दोघांचें युद्ध सुरू झालें. भगदत्ताचा हत्ती उधळल्यानें त्याला राग आला. तो दुसऱ्या रथांत बसला व भीमाशीं युद्ध करूं लागला. त्यांत भगदत्ताचा एक बाण भीमाच्या छातीला येऊन लागला. त्या बरोबर तो ध्वजस्तंभावर जाऊन पडला. भीमाला पडलेला पाहून भगदत्ताला आनंद झाला. त्यानें आनंदाच्या भरांत गर्जना केली.

बापावर आलेल्या संकटानें घटोत्कच जागा झाला. त्यानें कौरवांचा समाचार घेण्यासाठीं माया युद्ध करण्याचा निश्चय केला. त्यानें एक हत्तीचें सैन्य बनविलें. तो स्वत: एका ऐरावतावर आडदांड पुरुषाचें रूप घेऊन बसला आणि युद्धभूमीवर आला. त्याच्या पाठोपाठ अष्ट दिक्-पाल सुद्धां हत्तीवर बसून आले होते.

घटोत्कच्याच्या हत्तींनीं भगदत्ताच्या हत्तीला घेरून त्याचे दांत, सोंड, शेपटी कान वगैरे ओढून त्याला पुरेसें करून सोडलें. त्यामुळें भगदत्ताला युद्ध करणें दुरापास्त झालें. तो मदतीसाठीं मागें पुढें बघूं लागला. त्याची ती स्थिति पाहतांच भीष्मानें द्रोणाच्या सैन्याला त्याच्या मदतीला पाठविलें. भगदत्त मोठा योद्धा होता. तो जर मारला गेला असता तर कौरव सैन्याची फारच मोठी क्षति झाली असती.

द्रोणाचार्यांना सैन्यासह येत असलेले पाहून युधिष्ठिर, नकुल, सहदेव, पांचाल वगैरे घटोत्कच्याच्या मदतीस गेले. घटोत्कच सारख्या विजय गर्जना करीत होता. त्या





ऐकून भीष्म द्रोणाला म्हणाला—"माझ्याच्यानें आतां ह्या राक्षसाशीं युद्ध करवत नाहीं. मी अगदीं थकून गेलों आहें. ह्या वेळीं माझ्या हातून हें काम होणार नाहीं. मला वाटतें आज युद्ध येथेंच थांबवावें." कौरवांना ही सूचना पसंत पडली. ते संधी साधून युद्ध थांबवून बाहेर आले व आपापल्या शिबिरांत गेले. त्यांना मार्गे जातांना पाहून पांडवांनीं शंखनाद केला आणि सर्व वीर आनंदानें विजयघोष करीत आपापल्या शिबिरांत परतले.

आपल्या कांहीं भावांच्या मृत्यूनें दुर्योधनास दुःख झालें. दुःखवेग थोडा कमी झाल्यावर तो भीष्माकडे गेला. म्हणाला—"आजोबा, तुम्ही, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कृतवर्मा सर्व जण महारथी आहांत. तिन्ही लोकांचें राज्य जिंकून आणण्याचा पराक्रम तुम्हांत असतां ह्या पांडवांनाच कसा सारखा विजय मिळत आहे. काय आहे ह्यांत विशेष कारण? मला कांहीं कळत नाहींसें झालें आहे."

"ह्याचें कारण आणि ह्या प्रश्नांचीं उत्तरें तुला माहीत आहेत. नव्यानें सांगण्याची कांहीं गरज नाहीं. मी तुला वारंवार सांगत होतों कीं पांडवांना जिंकणें सोपें नाहीं. त्यांच्याशीं युद्ध करूं नकोस. त्यांनीं कधीं कोणाचें वाईट केलेलें नाहीं. म्हणून न्याय त्यांच्या बाजूला आहे आणि शिवाय श्रीकृष्ण त्यांच्या बाजूला आहे. जों पर्यंत तो त्यांच्याकडे आहे तों पर्यंत त्यांना कोणीहि हारवूं शकणार नाहीं. कृष्ण व अर्जुन 'नर-नारायणा'चे अवतार आहेत." भीष्म म्हणाला.

भीष्माचें बोलणें दुर्योधनाला रुचलें नाहीं. पण तो कांहींहि न बोलतां खालीं मान घालून आपल्या शिबिरांत निघून गेला.





# काशाचा किल्ला

[ ११ ]

[चंद्रवर्मा गरुड पक्ष्याच्या पंखांत बसून शंख मांत्रिकाच्या पर्वताकडे जात असतां सरोवरांत पडला. सरोवरांतील मगरींच्या हातून स्वतःचा जीव वांचवून तो सरोवराच्या काठच्या उद्यानांत शिरला. त्या दिवशीं रात्रीं शंखाच्या पर्वतावर चढत असतां त्याला एकाएकीं कपालिनी एका खडकाळ जागीं पडलेली दिसली. पुढें वाचा.]

त्या खडकाळ जागीं कपालिनी जवळ जवळ बेशुद्ध स्थितींत कण्हत पडलेली होती. तिला पाहून चंद्रवर्मा चकित झाला. त्याला अग्निपक्ष्याचें गरुड पक्ष्यांशीं झालेलें बोलणें आठवलें. गरुड पक्ष्यांनींच हिला येथें आणून टाकलें असावें, असें त्याला वाटलें.

"कपालिनी तुला विशेष लागलें तर नाहीं? कांहीं बरें वाईट होण्यापूर्वीच सांग, मी कांहीं तरी उपाय करीन. ते गरुड पक्षी कोणीकडे गेले?" चंद्रवर्मानें विचारलें.

कपालिनी त्याला जवळ बोलावून हळूच म्हणाली—"हळू बोल, आपण वेळींच कोणत्या तरी गुहेंत निघून जाणें बरें. तेथें गेल्यावर मी सर्व कांहीं सांगेन. मला विशेष लागलेलें नाहीं. तूं थोडा जवळ ये. मी हात धरून उठतें. नंतर आपण दोघे कोठें तरी निवाऱ्याच्या जागीं जाऊं."




चंद्रवर्मा थोडा वांकला. त्याचा खांदा धरून कपालिनी उठून उभी राहिली. नंतर कपालिनी चंद्रवर्माचा हात धरून चालूं लागली. म्हणाली–" चंद्रवर्मा ! मला वाटतें त्या झाडीच्या आड एक गुहा आहेसें मला आठवतें. चल तिकडे जाऊं."

खडकाळ वाटेनें चढत उतरत तीं दोघें डोंगराच्या पायथ्याजवळ येऊन पोंचलीं. त्या गुहेचें तोंड तसें मोठें नव्हतें. त्यावर गवत व कांटेरी झाडें उगवली होतीं. आंतून गुहा पुष्कळ मोठी होती. वर छपराला भोकें होतीं म्हणून थोडा थोडा उजेड आंत येत होता.

कपालिनी आंत येऊन बसल्यावर चंद्रवर्मानें तिला विचारलें–" तुला त्या गरुड पक्ष्यांनीं येथें आणून टाकलें आहे, हें त्या शंखाला कळलें असेल का ?"

कपालिनीच्या तोंडावर चंद्रवर्माला स्मित दिसलें. मरणाचें भय तिच्या तोंडावर नव्हतें. ती म्हणाली–" अरे ! त्याला कळलें असतें कीं येथें येऊन पडलें आहे तर त्यानें मला यावेळेपर्यंत जिवंत सोडलें असतें का ? मी काल सकाळपासून येथें पडून आहें. ज्या गरुड पक्ष्यांच्या हातीं मी पडणार होतें ते कालसर्पाच्या हातीं सांपडून आपल्या प्राणास मुकले."

" असें असेल तर आपल्याला कसलीहि भीति नाहीं. मी या काळोखांत जाऊन त्या शंखाचें तें पूजागृह कोठें आहे हें पाहून येतों." चंद्रवर्मा म्हणाला.

कपालिनीनें चंद्रवर्माला आठवण करून दिली आणि म्हणाली–" सावध ! हं ! वर्मा, त्या अग्निपक्ष्याची गोष्ट विसरूं नकोस. रात्रीच्या वेळीं त्याच्या हातून स्वतःला वांचविणें सोपें नाहीं बरें का ? आणि दिवसा त्या शंखाची नजर चुकविली पाहिजे. आज रात्रीच्या आंत त्या अग्निपक्ष्याचा सोक्षमोक्ष झाला नाहीं तर आपला प्राण धोक्यांत आहे, समज. त्याचा समाचार घेण्यासाठीं मी कालसर्पाला नेमलें आहे."

" म्हणजे, कालसर्प देखील येथें आला आहे म्हणावयाचा ? तूं हें तर सांगितलेंच नाहींस ?" चंद्रवर्मा म्हणाला.

चंद्रवर्माकडे पाहून कपालिनी थोडी हंसली. म्हणाली–" चंद्रवर्मा ! कालसर्पाचा माझ्यापेक्षां तुझ्यावर जास्त भरंवसा आहे हें मला कळलें आहे. तूं एका एकीं मला येथें दिसलास त्याचें मला थोडें देखील आश्चर्य वाटलें नाहीं. तूं इतक्या लवकर येथें कसा पोंचलास हें विचारलें का मी तुला ? कारण कालसर्पानें मला तुझ्याविषयीं सर्व कांहीं सांगितलें होतें. तूं त्या विचित्र वृक्षाचें फळ खाल्लें आहेस, हें जेव्हां मला कळलें तेव्हां तूं येथें सुरक्षित पोंचशील याची मला खात्री वाटली."

कपालिनी बोलतच होती कीं एका एकीं वीज चमकल्यासारखा एकदम उजेड पडला. चंद्रवर्मा चकित होऊन गुहेच्या बाहेर येऊन पाहूं लागला कीं काय भानगड आहे. तेव्हां त्याला कळलें कीं झाडीच्या पलीकडे अग्निपक्षी उडत येत आहे. तो अगदीं जमिनीजवळ उडत आला. त्याला पाहताच



कालसर्प आपल्या फडा वर करून उभा राहिला. त्याला पाहूनच अग्निपक्षी खालीं उतरला आणि कालसर्पाला तेंच हवें होतें. तो त्याचीच वाट पहात होता.

" कपालिनी, अग्निपक्षी कालसर्पावर झडप मारायला आला आहे. मी जातों त्याच्या मदतीला त्याला एकटा सोडून भागणार नाहीं." चंद्रवर्मा म्हणाला.

" कांहीं जरूर नाहीं !" बाहेर गुहेच्या तोंडाजवळ येऊन कपालिनी म्हणाली–" शंखाच्या त्या नोकराचा समाचार घ्यायला कालसर्प एकटा पुरे आहे. अजून तूं काल-













सर्पाला पुरा ओळखला नाहींस. पण तो जर का मारूं शकला नाहीं तर मात्र आपणां दोघांचा जीव धोक्यांत आहे असें समज. अग्निपक्ष्याला हें कळलें असणार कीं गरुड मला घेऊन आले आहेत. ही गोष्ट तो आपल्या मालकाला सांगायला जाण्यापूर्वी त्याचा शेवट झाला पाहिजे."

इकडे कालसर्प व अग्निपक्षी दोघांची झुंज जुंपली होती. तीं झुंज पाहूनच पाहा-णाराच्या अंगाचा थरकांप उडाल्याशिवाय राहिला नसता. चंद्रवर्माच्या अंगावर शहारे उभे राहाले. अग्निपक्षी आपल्या अणकुचीदार चोंचीनें अग्निपक्ष्याला घायाळ करीत होता. त्याचीं तोंडें रक्तबंबाळ झाली होतीं. इकडे कालसर्प अग्निपक्ष्याचें पोट किंवा मानगुटीला चावा घेण्याचा प्रयत्न करीत होता. पक्ष्यानें एक दोनदां कालसर्पाला आपल्या पंज्यांत धरलें. पण कालसर्प पोटाला चावा घेतो की काय या भीतीनें त्यानें कालसर्पाला सोडून दिलें. अग्निपक्ष्याच्या अंगांतून ज्वाळा येत होत्या. त्यामुळें कालसर्पाचें अंग होरपळून जात होतें. पण कालसर्पानें माघार घेतली नाहीं. त्याच्या तोंडांतून येणाऱ्या विषारी वायूनें अग्निपक्ष्याला गुदमरून गेल्यासारखें होत होतें. त्याचे पंजे गारठूं लागले व अंगांत त्राण उरला नाहीं.

"या दोघांच्या झुंजीचा आवाज त्या शंखाच्या कानावर पडला तर तो आल्या-शिवाय राहणार नाहीं." चंद्रवर्मा म्हणाला.

"त्याची काळजी करण्याचें कारण नाहीं. तो आतां घोरत पडला असेल. अग्निपक्षी त्याचा पाहारेकरी आहे. तो जागेवर अस-ल्यावर शंखाला कसलीहि भीति वाटत नाहीं. सूर्यास्त झाल्यावरोबर तो झोंपतो व सूर्योदया-पूर्वीं उठतो. मला तें सर्व माहीत आहे." कपालिनी म्हणाली.



इतक्यांत अग्निपक्ष्यानें ओरडण्याचा प्रयत्न केला. परंतु तो ओरडूं शकला नाहीं. कोणी तरी त्याचा गळा आवळला. तें कालसर्पाचें काम होतें. त्याचें डोकें लोंबकळूं लागल्यावरच कालसर्पानें आपली पकड सैल केली आणि पुढील हल्ला करण्यासाठीं आपल्या तीनहि फडा वर उचलून उभा राहिला.

"जय कालसर्प की" असें ओरडावें असें चंद्रवर्माला वाटलें. परंतु तो सावध झाला आणि गुहेच्या बाहेर गंमत पाहायला उभा राहिला. कपालिनीच्या अंगांत देखील एकाएकीं कोठून शक्ति आली कोण जाणें, ती देखील बाहेर आली.

चंद्रवर्मा व कपालिनी दोघं ती झुंज पाहायला बाहेर येण्यापूर्वीच अग्निपक्ष्यानें मान टाकली होती व तो जमिनीवर लोळत पडला होता. कालसर्पाच्या अंगावर जागोजागीं जखमा झाल्या होत्या. दोघांनीं जवळ जाऊन त्याच्या अंगावर प्रेमानें हात फिरवला. कपालिनी म्हणाली—"कालसर्पा! आतां तूं शापमुक्त होण्याची वेळ जवळ येऊं लागली आहे. तो शंख माझ्या हातीं येऊन पडला कीं तुझें कार्य संपलें समज. तुला





पुन्हां मनुष्य रूप मिळेल व तुझ्या सर्व यातना संपतील. नंतर तूं तुला वाटेल तिकडे जा."

शंख मांत्रिकाच्या शंखाचें नांव ऐकतांच चंद्रवर्माला पूजागृहाची आठवण झाली व त्याच्या अंगावर शहारे उभे राहाले. तरी पण धीर करून तो कपालिनीला म्हणाला—"कपालिनी, सूर्योदयाला आतां फार वेळ उरलेला दिसत नाहीं. त्या शंखाच्या पूजागृहाकडे जातों."

कपालिनीनें पूर्व दिशेकडे पाहिलें, दिशा फांकूं लागल्या होत्या. ती म्हणाली—"या वेळीं त्या पूजागृहाकडे जाण्यांत शहाणपण नाहीं. त्या शंखाला वाटेला लावण्याचा दुसराच एक उपाय मी योजला आहे."

"तो काय बुवा?" चंद्रवर्मानें विचारलें.

"शंख दर रोज सूर्योदयाच्या सुमारास त्या पूर्वेकडील टेकडीजवळ जातो. तेथें एका दगडावर उभा राहून स्वतःभोंवती प्रदक्षिणा करीत कांहींतरी मंत्र पुटपुटतो. तो एक चौरस असा दगड आहे. त्या दगडाजवळ पलीकडे हजार फुटाहून जास्त खोल अशी एक दरी आहे. मी सांगतें तसें केलेंस तर त्या दगडा सकट त्या शंखाचा कडेलोट होईल व धुंडेबांचूनच खोकला जाईल." कपालिनी म्हणाली.

"मग सांग तो उपाय. तुला वाटेल तें करायला मी तयार आहें." चंद्रवर्मा म्हणाला.

"थोडा जवळ ये! सांगतें." चंद्रवर्मा जवळ आल्यावर कपालिनीनें कांहीं तरी त्याच्या कानांत सांगितलें व म्हणाली—"हें पहा! सावधगिरीनें वाग. जर चुकलास तर आतां पर्यंतची सारी मेहनत फुकट जाईल. एवढेंच नव्हे, तुझा जीव पण धोक्यांत पडेल! विसरूं नकोस."



चंद्रवर्मा क्षणभर विचार करीत जागच्या जागीं उभा राहिला. नंतर एका उंच झाडावर चढून त्यानें पूर्वेकडे पाहिलें. खालीं उतरून तो कपालिनीला म्हणाला—"कपालिनी! सूर्योदय व्हायला फार उशीर लागणार नाहीं. मी आपल्या कामावर जातों. तूं व कालसर्प गुहेंत स्वस्थ विश्रांति घ्या." असें सांगून त्यानें आपली तलवार म्यानेंतून बाहर काढली व झाडींत पार नाहींसा झाला. त्यानें वडाच्या पारंब्या भराभर कापल्या आणि त्या जोडून एक लांब दोरी तयार केली. त्या दोरीचें वेटोळें करून तें खांद्यावर टाकलें. आणि झपझप डोंगर चढूं लागला. कपालिनीनें सांगितल्याप्रमाणें टेंकडीच्या टोंकाला एका मोठ्या शिळेवर त्याला एक चौकोनी दगड दिसला. त्या दगडाला दोरीचें एक टोंक त्यानें घट्ट आवळून बांधलें. त्याच दगडावर मांत्रिक शंख येऊन रोज सूर्योदयापूर्वी उभा राहात होता आणि मंत्रोच्चार करीत होता. त्यानें दोरीचें दुसरें टोंक टेंकडीच्या खालीं दरींत सोडलें.

काम पुरें करून चंद्रवर्मा डोंगरावरून खालीं आला व कपालिनीला येऊन भेटला.



त्याला आल्याबरोबर कपालिनीनें विचारलें—"झालें का काम?"

"मी प्रयत्न तर केला आहे. यश अपयश दैवाधीन आहे! दोरीचें एक टोंक दगडाला बांधलें आहे व दुसरें टोंक दरींत खालीं सोडलें आहे. परंतु तो दगड पूर्वेकडे ओढला गेला तरच शंख खालीं पडणार! नाहींतर आपला प्रयत्न फुकट जाणार!" चंद्रवर्मानें शंका केली.

"म्हणजे तुझें म्हणणें असें आहे कीं जर ह्यांत कांहीं चूक झाली तर तुझा प्रयत्न फुकट जाईल." कपालिनी स्मित करून म्हणाली—"तें तूं माझ्यावर सोड. दोरीचें

दुसरें टोंक कोठें आहे तेवढें मला दाखव. मी तुझी शंका दूर करतें."

कपालिनी चंद्रवर्माबरोबर डोंगराजवळ गेली. तेथें चंद्रवर्मानें तिला दोरीचें दुसरें टोंक दाखविलें. कपालिनीनें तें हातांत घेऊन म्हटलें—"अरे, दोरीचें दुसरें टोंक ज्या दगडाला बांधलेलें आहे तो दगड टेंकडीच्या अगदीं कांठावर आहे. आतां तो दगड हालला कीं पुरें, तो शंख कांहीं वांचत नाहीं. तो खालीं पडणार आणि त्याचा कपाळमोक्ष होणार. ह्यांत तुला शंका वाटण्याचें कारण काय, हें नाहीं मला समजलें." तितक्यांत तिनें डोळे वटारून व तोंडावर बोट ठेवून चंद्रवर्माला सावध केलें आणि बोटानें शंखाला दाखवीत चंद्रवर्माच्या कानांत पुटपुटली—"तो पहा! शंख येतो आहे. त्याच्या हातांत ती जादूची कांडी दिसते आहे का तुला? तो दगडावर चढल्याबरोबर तूं दोरी ओढ!"

चंद्रवर्मानें डोकें वर करून टेंकडीच्या टोंकाला पाहिलें. सकाळच्या अंधुक उजेडांत त्याला शंख मांत्रिकाचें विकृत रूप दिसलें. त्याचें सर्व अंग एक क्षणभर थरारलें. परंतु लगेच स्वतःला सावरून व सर्व शक्ति एकवटून त्यानें दोरी ओढली. शंख दगडावर चढून हात वर करून मंत्रोच्चार करूं लागला होता.

चंद्रवर्मानें दोरी ओढून सैल सोडल्याबरोबर शंख मांत्रिकाचा तोल सुटला आणि तो स्वतःचा तोल सावरण्यासाठीं हवेंत हातवारे करूं लागला. परंतु त्याच्या दुर्दैवानें तो स्वतःला सावरूं शकला नाहीं. तो मोठ्यानें ओरडला—"दगलबाजी!" त्याच्या हातांतली जादूची कांडी सुटली व पूजा गृहाजवळ जाऊन पडली. त्याबरोबर पूजा गृहाजवळ एक मोठा स्फोट झाला आणि जादूची कांडी तलावांत जाऊन पडली. इकडे शंख टेंकडीच्या टोंकावरून खालीं दरींत पडला. [पुढें चालू]



# अंगारवती

विक्रमार्क पुन्हां वडाच्या झाडाजवळ गेला. प्रेत झाडावरून उतरवून खांद्यावर टाकलें आणि स्मशानाकडे जाऊं लागला. दोन पावलें गेल्यावर प्रेतांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा! धन्य आहे तुझ्या धैर्याची. तरी तुला वाट कंटाळवाणी वाटूं नये म्हणून मी तुला अंगारवतीची गोष्ट सांगतो." असें सांगून त्यानें गोष्टीस सुरवात केली.

उदयसेन हा वत्स राज्याचा राजा होता. राज्याची राजधानी कौशाम्बी येथें होती. त्यावेळीं लावणक नांवाच्या गांवीं बुद्धदत्त नांवाचा एक क्षत्रिय राहात असे. अंगारवती त्याची मुलगी होती. बुद्धदत्त ज्या गांवीं राहात असे तें अगदीं पद्धतीचें गांव असल्यामुळें अंगारवती आपल्या घराचा उंबरठा



ओलांडून कधीं कोठें जात नसे. त्यामुळें चार लोकांत जाणें येणें, त्यांच्यांत मिसळणें वागणें हें अंगारवतीला माहीत नव्हतें. तिचा बाप सुद्धां सदा सर्वकाळ घरांत कांहीं तरी करीत बसत असे.

अंगारवती मोठी झाली. आपल्या पुढील आयुष्याविषयीं तिच्या मनांत कांहींतरी कल्पना यायला हवी होती. परंतु ती इतकी अबोध होती कीं आपल्या लग्नाची कल्पना सुद्धां तिच्या मनांत आली नाहीं.

वत्स देशाचा राजा शिकारी साठीं त्या भागांत आला होता. त्याच्या बरोबरच्या मित्र मंडळींत चण्डसेन नांवाचा तिशीच्या घरांतला एक शूर योद्धा होता. वत्स राजाकडे नोकरीला लागून त्याला फार दिवस झाले नव्हते.

एक दिवस चण्डसेन जंगलांत गेला असतां त्याला पाऊलवाट दिसली. तो त्या रोखानें निघाला तर त्याला बुद्धदत्ताचें गांव लागलें. तेथें त्यानें अंगारवतीलाहि पाहिलें. त्यानें बुद्धदत्ताची ओळख करून घेतली. आपली ओळख सांगितली. नंतर त्यानें बुद्धदत्ताची माहिती काढून घेतांना अंगारवतीचीहि माहिती मिळविली. त्याला जेव्हां कळलें कीं ती अजून कुंवारी आहे तेव्हां त्यानें तिच्याशीं लग्न करण्याची आपली इच्छा तिच्या बापाजवळ व्यक्त केली.

चण्डसेनाचा विचार ऐकून बुद्धदत्ताला आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला. कारण मुलीसाठीं वर शोधणें किती कठीण काम आहे, हें कोणाला माहीत नाहीं? चण्डसेन सारखा कुलशीलवान जांवई त्याला शोधून मिळाला नसता. त्यानें होकार दिला.

बुद्धदत्त विचार करूं लागला माझी मुलगी आतांपर्यंत ह्या असल्या खेडे-गांवांत कष्टांत वाढली आहे. ती कौशाम्बीला गेली म्हणजे सुखी होईल.



अंगारवतीला बापाचा विचार अमान्य नव्हता. परंतु चंडसेनला पाहिल्याबरोबर तिच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें नाहीं. तरी पण तिला वाटलें कीं असा पति मिळणें म्हणजे भाग्यच असावें लागतें.

साधारण एक आठवड्यानंतर चण्डसेन बुद्धदत्ताकडे आला. म्हणाला—"मी आपल्या गांवीं जात आहे. तेथें माझ्या घरच्या लोकांचा व मित्रांचा विचार घेऊन लग्नाचा मुहूर्त ठरवून आपल्याला कळवितों. मग तुम्हीं लग्नाची तयारी करा." एवढें सांगून तो कौशाम्बीला निघून गेला.

चण्डसेन गेल्यानंतर त्याच्या विषयीं किंवा आपल्या लग्नाविषयीं अंगारवतीच्या मनांत कधींहि कसलाहि विचार आला नाहीं. तिच्या मनांत चण्डसेनाबद्दल प्रेमभाव सुद्धां उत्पन्न झाला नाहीं.

आठवड्यामागून आठवडे गेले तरी चण्डसेनाकडून कांहीं निरोप आला नाहीं. परंतु त्यामुळें तिला जरा सुद्धां निराशा वाटली नाहीं. कारण तिला वाटलें 'नसेल त्याला माझ्याशीं लग्न करावयाचें. माझें सारे आयुष्य खेडेगांवांत गेलेलें. कसें आवडणार हें त्याला. आणि खरेंच आहे, माझ्या



सारखीशीं त्यांचें लग्न होणें बरें नसावें. जाऊं दे, काय मोठेंसें त्यांत!'

बुद्धदत्त मात्र त्याच्यावर पूर्ण विश्वास आणि भरंवसा ठेवून स्वस्थ बसला होता. तो मधून मधून म्हणत असें—"ह्यांचें कुळ फार उत्तम आहे. ह्यांच्या कुळांतील विशेष गोष्ट म्हणजे प्राण गेला तरी शब्दास जगणारे आहेत हे लोक. अगदीं शब्दाचे धनी."

ह्या एवढ्या काळांत कौशाम्बींत अगदीं उलटापालट झाली होती. योगन्धराय उदयसेनाचा मंत्री होता. त्यानें बरीच खटपट करून मगध राजाची मुलगी










वासवदत्ता हिच्याशीं उदयसेनाचें लग्न करून दिलें आणि त्या दोन्हीं राज्यांत मैत्री जमवून आणली.

त्या नंतर यौगन्धरायाणें दिग्विजय करण्याचा निश्चय करून मगध देशाकडून सैन्य मागविलें. तेथून येणाऱ्या सैन्यानें लावणक गांवांत पडाव टाकला. आसपासचा प्रदेश हस्तगत करण्यासाठीं त्यांना तेथें कांहीं दिवस रहावयाचें होतें.

गांवांत सैन्य आल्यानें लोकांची त्रेधा उडाली होती. एकदां अंगारवती आपल्या घराच्या ओसरीवर उभी असतां तिनें आपल्या घरा समोरून एका सैनिकाला जातांना पाहिलें. तो साधारण पंचविशींतला तरणाबांड देखणा तरुण होता. परंतु त्याच्या चेहेऱ्यावर एका तऱ्हेचें औदासीन्य दिसत होतें. त्याला पाहातांच अंगारवतीच्या मनांत चलबिचल उत्पन्न झाली. न कळत तिचें त्याच्यावर मन बसलें. तीच स्थिति त्या सैनिकाची झाली. त्याचेंहि तिच्यावर मन बसलें. पण कोणी कोणाशीं बोललें मात्र नाहीं.

त्या दिवसापासून तो सैनिक रोज बुद्ध-दत्ताच्या घराच्या बाजूनें जात असे. अंगारवती सुद्धां त्याच्या दर्शनानें आनंदित होत असे. त्याचें नांव शतानीक होतें. एकदां तो अंगार-वतीच्या घरासमोरून जात होता. त्या वेळीं अंगारवती सुद्धां आपल्या घराच्या दरवाज्यांत उभी होती. शतानीक हिंमत करून तिच्याशीं बोलला. ती त्याच्याशीं थोडें मोकळेपणानें बोलली. तिनें त्याची हळूं हळूं सर्व माहिती काढून घेतली. तो उज्जयनीचा राहाणारा असून त्याच्या घरीं त्याच्या म्हाताऱ्या आई-शिवाय दुसरें कोणी नव्हतें. तो आपल्या आईची सेवा मनापासून करीत असे. परंतु जांवयाच्या दिग्विजयासाठीं मगधराजानें सेना पाठविल्यामुळें त्याला सैन्यांत भरती होऊन इकडे यावें लागलें. आपली आई फार कष्टानें दिवस घालवीत असेल म्हणून त्याला फार वाईट वाटत होतें. तो अंगारवतीला म्हणाला—“ ह्या जंगलांत कोणच्या मुहूर्तावर येऊन पडलों आहे. अजून किती दिवस राहावें लागणार आहे कां आणि कोठें जाऊन युद्ध करावें लागणार आहे कोण जाणे ! त्या युद्धांतून जिवंत घरीं पोंचलों तर ठीक आणि मी जाईपर्यंत आई जिवंत असली तर पुन्हां आमची भेट. केव्हां केव्हां वाटतें कीं आत्महत्या करून हें परावलंबी








आयुष्य संपवून टाकावें. पण तुला पाहिल्यापासून मला पुन्हा जगाचा मोह मनांत वाटूं लागला आहे."

अंगारवतीला शतानीकबद्दल एक तऱ्हेचा जिव्हाळा वाटूं लागला. प्रथम दर्शनीचें प्रेम दुणावलें. चण्डसेनकडून बरेच दिवस झाले. कांहींहि बातमी निरोप नव्हता. त्याला आपल्याशीं लग्न करावयाचें नसेल. अशीच तिची कल्पना झाली. म्हणून तिचें मन शतानीकबरोबर लग्न करण्यास प्रवृत्त झालें. पण तिला वाटत होतें कीं ही गोष्ट आपल्या वडिलांना आवडणार नाहीं.

असे कांहीं दिवस गेले. एक दिवस शतानीक अंगारवतीकडे आला व म्हणाला— "आज रात्रीं मी कोणालाहि कळविल्याशिवाय मगध देशाला निघून जाणार आहे. मला आतां जिणें नकोसें झालें आहे. आपल्या गांवीं लाकडें फोडून मी आपले दिवस कंठीन. त्यांत मला जास्त सुख आहे. मी एवढ्यासाठीं आलों आहें कीं तूं माझ्याबरोबर येणार असशील तर चल, आपण लग्न करून आनंदांत राहूं. माझी आई नकार देणार नाहीं."

अंगारवतीनें आपली संमती दिली. मग ठरला दोघांचा बेत. शतानीकनें तिला तिच्या घराच्या शेजारच्या वडाच्या झाडाखालीं आपलें सामान घेऊन येऊन वाट पाहण्यास सांगितलें. तिनें तें कबूल केलें.

अंगारवतीला माहीत होतें आपलें हें काम बापाला मुळींच आवडणार नाहीं, म्हणून बाप झोपीं गेल्यावर ती उठली. आपलें सामान बांधलें व तें घेऊन हलकेच घराबाहेर पडली व शतानीकनें सांगितलेल्या वडाच्या झाडाखालीं जाऊन त्यांची वाट पहात उभी राहिली.

थोड्या वेळानें दोन व्यक्ति बोलत बोलत त्या झाडाजवळ आल्या. अंगारवतीनें ओळखलें कीं त्यांतील एक व्यक्ति चण्डसेन आहे. ती एक बाजूला जाऊन उभी राहिली.

चण्डसेन आपल्या मित्रास म्हणत होता— "असेंच सरळ गेलें म्हणजे ह्या रस्त्याला दोन रस्ते फुटतात. एक बुद्धदत्ताच्या घराकडे व एक पडक्या देवळाकडे जातो. आपण सकाळपर्यंत त्या देवळांत राहूं आणि उजाडल्यावर बुद्धदत्ताकडे जाऊं. इतके दिवस झाले मी त्यांना कांहींहि निरोप पाठविला नाहीं. काय म्हणत असतील ते, कोण जाणें. पण काय करणार! शक्यच झालें नाहीं कळवायला." ते दोघे खरोखरच देवळाच्या बाजूला वळले.

थोड्या वेळानें शतानीक आला. त्यानें हळूच अंगारवतीला बोलाविलें. ती पुढें आली आणि म्हणाली—"मला क्षमा करा. मी तुमच्या बरोबर येऊं शकत नाहीं. हें सांगायलाच मी येथें आलें आहें."

शतानीकाला निराशा वाटली. "माझ्याशीं लग्न करणें तुला शक्य नाहीं काय?" त्यानें विचारलें.

"शक्य नाहीं. म्हणून तर सांगायला आलें. नाहींतर मी आपल्याबरोबर आलें असतें." अंगारवती म्हणाली. शतानीक एक निश्वास सोडून आपल्या वाटेनें



निघून गेला. अंगारवती आपल्या घरीं परतली.

दुसऱ्या दिवशीं चण्डसेन बुद्धदत्ताकडे आला. म्हणाला—"इतके दिवस मी नुसता राजाचा नोकर होतों. आपल्या बायकोचें पालनपोषण करण्यासारखी माझी स्थिति नव्हती. पण आतां मला राजानें जाहागीर दिली आहे. मी आपल्या मुलीशीं लग्न करून तिला घेऊन जाण्यासाठीं आलों आहे."

बुद्धदत्तानें ठरल्याप्रमाणें अंगारवतीचें त्याच्याशीं लग्न लावून दिलें व तिला त्याच्या बरोबर पाठवून दिलें.

इतकें सांगून वेताळ थांबला व राजाला म्हणाला- "राजा, अंगारवतीनें शतानीक-बरोबर लग्न न करतां चण्डसेनबरोबर कां केलें ? शतानीकवर तिचें प्रेम नव्हतें काय ? का चण्डसेन बरोबर लग्न केल्यानें धन-दौलत पुष्कळ मिळेल असें वाटलें ? तुला माहीत असून जर तूं उत्तर दिलें नाहींस तर पहा, तुझें डोकें फुटून तुझ्या पायाशीं पडेल."

"अंगारवतीमध्यें स्वार्थ मुळींच नव्हता. जर तसें असतें तर ती एकाद्या गरीब शिपायाबरोबर लग्न करण्यास तयारच झाली नसती आणि निस्वार्थी लोक प्रेमासाठीं धर्म सोडणार नाहींत. तिचें शतानिकावर प्रेम बसलें. पण त्याचा संबंध तिच्या पुरताच होता. चण्डसेनशीं लग्न करणें तिचें कर्तव्य होतें. कारण त्या कर्तव्यधर्माचा संबंध तिच्या वडिलांशीं होता. धर्म व प्रेम ह्या दोन गोष्टी तिच्यासमोर उभ्या होत्या तेव्हां तिनें विचार करण्यांत वेळ न घालवितां धर्माला प्रथम स्थान देऊन स्वार्थी प्रेमाचा त्याग केला." राजा म्हणाला.

राजाचें मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व वडाच्या झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





# सरळपणा

चीनच्या पूर्व भागांत एक सुताचा व्यापारी राहात असे. खूप जोरांत चालत होता त्याचा व्यापार. आतां तो थोडा वृद्ध झाला होता. त्याला साठ वर्षें पूर्ण झाली होती. मूलबाळहि कोणी नव्हतें. म्हणून तो नेहमीं म्हणे—"काय उपयोग माझ्या ह्या पैशांचा ? त्याचा उपभोग घ्यायला मला कोण आहे ?"

शेजारच्या बायकांनीं त्याच्या मनांतील गोष्ट ओळखली. त्यांनीं त्याचें लग्न लावून देण्याचें कबूल केलें. त्यानें सांगितलें कीं मला उच्च कुळांतील मानमर्यादा माहीत असलेली, सुंदरशी मुलगी पाहिजे.

एक मुलगी लहानपणापासून मंत्र्याच्या घरीं काम करीत होती. दिसावयास ती चांगली होती. आणि मोठ्याच्या घरांत वावरल्यानें त्यांच्या पद्धती चालीरिती तिला सर्व माहीत होत्या. त्या मुलीशीं त्या व्यापाऱ्याचें लग्न ठरलें.

म्हाताऱ्याचें त्या मुलीशीं लग्न झालें. ती म्हाताऱ्याच्या घरीं राहावयास आली. तिला खरी परिस्थिति समजली. तिला वाईट वाटलें. पण काय करते बिचारी !

कांहीं दिवस गेले. एकदां व्यापारी कामा-निमित्त दुकान सोडून कोठें तरी बाहेर गांवीं गेला होता. त्या दिवशीं ही मालकीण आपल्या एका दासीला घेऊन फिरावयास निघाली. त्यांचें दुकान जवळच होतें. ती दुकानांत गेली. तेथें दोन कारकून काम करीत बसले होते. त्यांतील एक उतार वयाचा होता. दुसरा पंचविशींतला होता. त्याचें अजून लग्न वगैरे झालेलें नव्हतें.

आपल्या मालकिणीला आलेली पाहिल्या-बरोबर दोघेहि उठून उभे राहिले. त्यांनीं



आदरानें हात जोडून मान वांकविली. तिनें प्रेमानें त्यांना विचारलें—"दोघे किती दिवसांपासून येथें काम करीत आहांत?"

"आपल्या कृपेनें, सर्व ठीक आहे." दोघे म्हणाले.

मालकिणीला काय वाटलें कोण जाणें, ती तशीच घरीं परत गेली. कांहीं पैसे आणले आणि दोघांच्या हातांत दिले. थोडा वेळ इकडे तिकडे हिंडून घरीं निघून गेली.

मालकिणीनें दोघांना बक्षीस म्हणून जे पैसे दिले ते देतांना तिनें केलेला भेदभाव कोणाच्या लक्षांत आला नाहीं. तिनें म्हाताऱ्या कारकुनाला चांदीचे दहा रुपये दिले आणि तरण्या चांगाला सोन्याच्या दहा मोहोरा दिल्या. कोणी कोणाला आपल्याला काय दिलें हें दाखविलें नाहीं.

दोघे कारकून पाळी पाळीनें रात्रीं दुकानांत निजत असत. एकदां चांगची पाळी होती. तो नेहमीं प्रमाणें दुकानांत निजला. थोड्याच वेळांत दार ठोठावल्याचा त्याला आवाज ऐकूं आला. त्यानें दाराजवळ जाऊन "कोण आहे?" म्हणून विचारलें.

"दार उघड." मालकिणीची दासी म्हणाली. तिचा आवाज ऐकून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें दार उघडून पाहिलें तर खरोखरच दासी उभी. "एवढ्या रात्रीं काय काम आहे? मला मालकिणीनें पाठविलें आहे." दासी म्हणाली.

"हं! ते सकाळीं दिलेलें बक्षीस परत....?" चांगनें विचारलें. "नाहीं! नाहीं!! तसें नाहीं! आणखी खूप खूप कांहीं देणार आहेत." असें सांगून तिनें आपल्या पाठीवरचें बोचकें खालीं ठेवलें.

त्यांत कांहीं कपडे होते. ते हातांत घेऊन ती म्हणाली—"हे तुझ्यासाठीं व तुझ्या आई साठीं आणि आणखी विशेष म्हणजे हें बघ." असें सांगून तिनें बरोबर आणलेली दोन शेर वजनाची चांदीची वीट त्याला दिली.

मालकिणीच्या ह्या कामाचा त्याला उलगडा होईना. ती रात्र त्यानें जागून काढली. सकाळ झाल्यावर नेहमीं प्रमाणें दुसरा मुनीम कामावर येतांच त्यानें दुकान त्याच्या स्वाधीन केलें आणि तो तेथून सटकला.

चांगनें आणलेलें सामान पाहून त्याची आई म्हणाली—"हे कोठून आणलेंस." चांगनें सर्व हकीगत सांगितली. तें ऐकून ती म्हणाली—"विचार तरी काय आहे तुझ्या मालकिणीचा? फारशी सोनें चांदी देऊं लागली आहे? चांग! तुझ्याशिवाय ह्या जगांत मला कोणी नाहीं आणि....नको. ह्या पुढें तूं त्या घरीं जाऊं नकोस."

चांग आज्ञाधारक होता. त्यानें अजूनपर्यंत कधींहि आपल्या आईचा शब्द मोडला नव्हता. आईच्या सांगण्यावरून त्यानें त्या दिवसापासून कामावर जाण्याचें सोडून दिलें. तो कां आला नाहीं हें पाहण्यासाठीं मालकानें त्याच्या घरीं निरोप पाठविला. "चांग



आजारी आहे. त्याला बरें वाटल्यावर तो कामावर येईल." त्याच्या आईनें सांगितलें.

कांहीं दिवसांनी मोठा कारकून आला व त्यानें विचारलें—"केव्हांपासून येणार आहे चांग कामावर? मी काम करून अगदीं थकून गेलों आहे."

"त्याची तब्येत तर फारच बिघडली आहे." आईनें सांगितलें.

ह्या नंतर मालकानें मधून मधून चौकशीसाठीं नोकरांना पाठविलें. प्रत्येक वेळीं आई सांगत असे—"चांग अजून बरा

झाला नाहीं." पुढें चांगच्या मालकानें हळूं हळूं त्याची चौकशी करण्याचें सोडून दिलें.

एक महिना झाला. चांगच्या जवळची मिळकत संपून गेली. आतां फक्त त्याच्या मालकिणीनें दिलेली सोनें चांदीच शिल्लक राहिली. पण ती विकण्याचें धाडस त्याला होईना. तो आईला म्हणाला—"आई असें किती दिवस निभणार ? नुसतें बसून कसें चालेल ?"

कांहीं दिवस लोटले. दीपोत्सव सुरूं झाला. तो आपल्या आईला म्हणाला—"आई, मी दिवे पाहून येतों. राजवाड्या जवळ मोठमोठे दिवे लावले आहेत. फार सुंदर सजवलं आहे तिथें."

"जा. पण संभाळून जा आणि आपल्या मालकाच्या घराच्या बाजूला मुळींच जाऊं नकोस आणि जावें लागलेंच तर एकटा जाऊं नकोस." आईनें बजाविलें.

चांग आपल्या एक मित्राबरोबर दिवे पाहण्यास गेला. राजवाड्यासमोर एक गर्दी होती. लोक ओरडाआरडा करूं लागले. धक्काबुक्की करूं लागले. कारण आतांच तेथें दान धर्म सुरू झाला होता.

"ह्या गर्दीतून पुढें कुठें घुसायचें. चला आपण प्रधानाच्या घराच्या बाजूचे दिवे पाहून येऊं. तेथें सुद्धां छान आरास केली आहे." असें म्हणत ते दोघे मंत्र्याच्या घराच्या बाजूला निघाले. तेथेंहि फार गर्दी होती. गर्दीत त्यांची चुकामूक झाली.

तो एकटाच इकडे तिकडे फिरूं लागला. इतक्यांत त्याला आपल्या जुन्या मालकाची आठवण झाली. कारण ह्या दिवशीं तो सुद्धां दिवे लावून फटाके उडवीत असे. ते पाहण्यासाठीं चांग त्या बाजूला वळला. घरांजवळ जाऊन पाहिलें तर त्याची फार निराशा झाली. तेथें फटाके नव्हते. दिवे नव्हते. गर्दी नव्हती, कांहीं नव्हतें. घर बन्द होतें आणि त्यावर एक नोटिस चिकट-विली होती. चांगनें जवळ जाऊन वाचलें. घरावर जप्ती येऊन मालकास कैद केलें आहे.

चांग वाचत होता, तोंच मागून एक शिपाई आला. त्यानें जोरानें चांगाला दरडावून विचारलें कोण तूं ? आणि येथें कशाला आलास ?" चांगाला त्याची भीति वाटली. तो घाबरून पळत सुटला. एका गल्लींतून जात असतां त्याला कोणी तरी हांक मारली व म्हणाला—"अरे, तुला कोणी







बोलावीत आहे." त्यानें वळून पाहिलें तर ओळखीचा माणूस वाटला. जवळ गेल्यावर त्याला कळलें कीं तो जुन्या मालकाचा नोकर आहे. चांग त्या नोकराच्या पाठोपाठ निघाला. तो त्याला त्याच्या जुन्या मालकिणीकडे घेऊन गेला.

"आपण इथें कुठें?" चांगनें विचारलें.

"खोटी नाणी पाडल्याबद्दल त्यांना कैद केलें आहे. आमची सर्व संपत्ति जप्त करून टाकली. मी आतां निराधार, अनाथ झालेली आहें. माझें कोणीहि राहिलेलें नाहीं. ह्यावेळीं तूं मला आपल्या घरीं घेऊन जातोस का?

"ती कांहीं होणारी गोष्ट नाहीं. माझ्या आईला तें मुळींच आवडावयाचें नाहीं." चांग म्हणाला.

"चांगा, तुला काय वाटतें. मी एकदां तुझ्या घरीं आले म्हणजे जाणारच नाहीं काय? हा बघ मोत्याचा हार." असें सांगून तिनें एक मोत्याचा सुंदर हार दाखविला. त्यांत एकशे आठ मोती होते. तो हार पाहून चांग चकित झाला.

"तूं जर मला तुझ्या घरीं राहूं दिलेस तर तुझ्यावर माझा भार पडणार नाहीं. आपण ह्या हारांतील एक एक मोती रोज विकून आपला खर्च भागवूं. मग झालें ना?" मालकीण म्हणाली.

"माझ्या घरीं यावयाचेंच असेल तर मी अगोदर आईला विचारून घेतों. आईनें कबूल केलें तर मी नेईन." चांगनें सांगितलें.

ती चांगाच्या पाठोपाठ त्याच्या घरापर्यंत गेली. चांग आंत गेला तेव्हां ती बाहेर उभी राहिली. चांगनें आपल्या आईला आपल्या मालकिणीची सर्व हकीगत सांगितली.

"बिचारी, कोठें आहे ती." आईनें विचारलें.



"बाहेर उभी आहे दारापाशीं." चांग म्हणाला.

"बोलाव आंत तिला." आईनें सांगितलें.

आंत आल्यावर मालकीण म्हणाली—"मला दुसरा कांहींच आसरा नाहीं म्हणून मी आलें आहे."

"रहा थोडे दिवस. पण आमचे गरिबाचें घर तुमच्या पुरेसें कसें असेल. ते तुम्हांला आवडणार पण नाहीं. चौकशी करा आणि तुमचे कोणी नातेवाईक असतील त्यांच्याकडे जा. तोंपर्यंत राहा येथें." चांगच्या आईनें सुचविलें.

मालकीण आपला मोत्याचा हार तिला दाखवून म्हणाली—"ह्यांतील कांहीं मोती विकून तुम्ही आपला सुताचा व्यापार पुन्हां सुरू करा."

चांगनें सुताचा व्यापार करण्यास सुरवात केली. हळूं हळूं त्याच्या मालकाचे सर्व गिऱ्हाईक त्याला मिळाले. धंदा चांगला चालूं लागला.

ह्या अवधींत चांगाला वळवण्यासाठीं नाना तऱ्हेचे प्रलोभन दाखविलें मालकिणीनें. परंतु चांगच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. तो तिला आई प्रमाणेंच मानीत असे.



थोडे दिवस गेले. आतां वसंतोत्सव आला. त्या दिवशीं उत्सव पाहून चांग परत घरीं येत असतां त्याला आपला मालक भेटला. त्याची परिस्थिति पाहून त्याला वाईट वाटलें.

"हें असें कां झालें?" चांगनें विचारलें.

"काय सांगूं? त्या मुलीशीं लग्न करून मी अगदीं फसलों. तिनें काय केलें माहीत आहे का? मला सांगायला सुद्धां लाज वाटते. तिनें मंत्र्याच्या घरांतून एक मोत्याचा हार चोरून आणला. एक दिवस मंत्र्याचे

लोक आले आणि हार कोठें आहे म्हणून विचारूं लागले. मला त्या विषयीं कांहींच माहीत नव्हतें. त्यांनीं घराची झडती घेतली. पण हार कांहीं मिळाला नाहीं. त्याच वेळीं माझ्या बायकोनें आत्महत्या केल्याची बातमी कळली. ह्यावरून मी दोषी नाहीं हें सिद्ध झालें. मोत्याचा हार सुद्धां मिळाला नाहीं. तरी सुद्धां मला त्यांनीं कैदेंत टाकलें." चांगाचा मालक म्हणाला.

त्या मालकाचें म्हणणें चांगाला विचित्र वाटलें. कारण त्याची मालकीण तर त्याच्या घरीं आहे आणि मोत्याची माळ सुद्धां तिच्या जवळ आहे. मग हा असें काय म्हणतो. त्याला कांहीं कळेना. तो मालकाला आपल्या घरीं घेऊन आला.

"धाकट्या मालकिणीला एकदां बाहेर बोलाविलें आहे म्हणून सांग." चांगानें आपल्या दासीच्या हातीं निरोप पाठविला. दासी आंत गेली व घाबऱ्या घाबऱ्या बाहेर येऊन म्हणाली—"आत्तांपर्यंत तर येथेंच होती. एवढ्यांत कुठें गेली कोण जाणें."

मालकानें जें सांगितलें तें खरें असलें पाहिजे. इतक्या दिवस आपल्या घरीं जी होती ती मालकीण नसून तिचें भूत होतें. चांगनें ती मोत्याची माळ आपल्या मालकाच्या स्वाधीन केली जे दोनचार मोती त्यानें विकले होते ते त्यानें पुन्हां विकत घेऊन त्याला दिले. मालकानें ती माळ व मोती मंत्र्याकडे नेऊन दिले. मंत्र्यानें त्याची जप्त केलेली माल-मत्ता त्याला परत दिली.

चांग फार चांगला मनुष्य होता. तो त्या मालकिणीच्या फंदांत फंसला नाहीं. म्हणूनच लोक त्याची स्तुति करूं लागले.



      




# ए मधल्या !

द्यूतामध्यें हारल्यावर पांडव जंगलांत राहूं लागले. तेव्हां कुरुजांगल देशांतील यूप गांवाचा केशवदास नांवाचा एक ब्राह्मण आपल्या बायको व तीन मुलांसह उद्यापक नांवाच्या गांवीं जाण्यास निघाला.

यात्रा करतां करतां केशवदास जेव्हां पांडवांच्या झोपडीजवळ आला तेव्हां त्याला तेथें एक भयंकर माणूस दिसला. त्याचे पिंजारलेले केस, हिरवे हिरवे मोठे मोठे डोळे, काळा कुळकुळीत रंग, बाहेर निघालेले दांत आणि बाहेर निघालेली दगडासारखी छाती पाहून त्या सर्वांना भीति वाटली.

हा भयंकर प्राणी म्हणजे घटोत्कच होता. भीमाची बायको हिडिंबा हिचा हा मुलगा. तो आपल्या आईच्या जेवणासाठीं एखाद्या मनुष्याच्या शोधांत होता. अशा वेळीं त्याला केशवदासाचें कुटुंब दिसलें. घटोत्कचाला पाहून सर्व मिळून पळून जाऊं लागले. "ब्राह्मणांनो, थांबा ! माझें ऐका." शेजारींच पांडवांची झोपडी आहे, हें माहीत होतें त्यांना. पण त्यांनीं ऐकलें होतें कीं भीमाला एकट्यालाच झोपडीच्या रखवालीसाठीं ठेवून बाकी सर्व धौम्य ऋषींच्या आश्रमांत गेले आहेत. भीम एकटा असला तरी आमचें रक्षण करूं शकेल. परंतु आमचें ओरडणें त्याला ऐकूं गेलें पाहिजे. ह्या किर्र झाडींत आपला आवाज तरी त्याच्या झोपडीपर्यंत कोण जाणें पोहोंचेल कीं नाहीं. म्हणून गोड बोलून घटोत्कचाला खूष केलें पाहिजे, त्या शिवाय सुटका नाहीं. असा विचार करून ब्राह्मण म्हणाला—"बाळा, कशाला आम्हांला त्रास देतोस, जाऊं दे आम्हांला आपल्या मार्गानें."

"आपण खुशाल जा. पण आपल्या मुलांपैकीं कोणा एकाला माझ्या स्वाधीन करून जा. आज माझ्या आईला नरमांस खाण्याची इच्छा झाली आहे. तिनें मला त्यासाठीं योग्य अशा माणसाला आणावयास सांगितलें आहे." घटोत्कच म्हणाला.

"अरे राक्षसाधमा ! मी दशग्रंथी ब्राह्मण आहे. जर तूं माझ्या मुलाला मारलेंस तर स्वर्गाचें दार तुझ्यासाठीं उघडेंका राहील ?" केशवदासानें विचारलें.

"एकालाच देतांना असें मागेंपुढें करूं लागलांत तर मी त्या पांचीजणांना क्षणार्धांत मारून टाकीन. काय समजलांत !" घटोत्कच म्हणाला.

ब्राह्मणानें आपल्या बायकोला विचारलें. म्हणाला—"माझें आयुष्य बरेंच संपलें आहे. तेव्हां मला वाटतें मी राक्षसाच्या स्वाधीन झालेलें बरें. म्हणजे तुम्हीं बाकी सर्व तरी सुखरूप राहाल."

"छे ! छे !! भलतंच. पतीसाठीं सर्वांचा त्याग करणें पत्नीचा धर्म आहे. माझें तरी आयुष्यांत काय राहिलें आहे ? मलाच त्या राक्षसाच्या स्वाधीन करा." बायको म्हणाली.



"पण माझ्या आईला म्हातारी माणसें नकोच आहेत." घटोत्कच म्हणाला.

तें ऐकून केशवदासाचे तिघे ही मुलगे त्या क्षणींच राक्षसाच्या स्वाधीन होण्यासाठीं पुढें सरसावले.

"तूं सर्वांत मोठा मुलगा. आतां कर्ता सवरता झालास. तूं नको जाऊस." वडील मुलाला बापानें सांगितलें. "हा अजून लहान आहे. ह्याला नको बाई." असें म्हणत धाकट्याला आईनें पाठीशीं घातलें.

"मी कोणाला नको आहे." मधला मुलगा म्हणाला.

"मला पाहिजे आहेस." चल माझ्या बरोबर." घटोत्कच म्हणाला.

मधल्या मुलानें आपल्या आई-वडिलांचा आणि भावांचा निरोप घेतला. नंतर तो घटोत्कचाला म्हणाला—"मला फार तहान लागली आहे. मी पाणी पिऊन येतों." असें सांगून तो तळ्याकडे निघाला.

बराच वेळ झाला तो परत आला नाहीं. तेव्हां घटोत्कचानें केशवदासास त्याचें नांव विचारलें. पण त्यानें सांगितलें नाहीं. म्हणून त्यानें वडील मुलास विचारलें. तो म्हणाला—"आम्हीं त्याला 'मधल्या' म्हणून बोलावितों."

"मधल्या ! चल लवकर" घटोत्कचानें गर्जना केली. त्याच्या आरोळीनें सर्व जंगल दुमदुमलें. भीमाच्या कानावरहि ते शब्द गेले. तोहि कुन्तीपुत्रांत मधला होता. त्याला वाटलें त्यालाच कोणी तरी बोलावीत आहे. म्हणून तोच त्या ठिकाणीं आला.

ज्या केशवदासाला घटोत्कचानें भयभीत करून सोडलें होतें त्याला पाहून भीमाला कौतुक वाटलें. घटोत्कच पुन्हां ओरडला—"ए मधल्या, चल लवकर."

"हा तुझ्यासमोर तर उभा आहें." भीम म्हणाला.

"आं ! तूं सुद्धां मधलाच काय ?" घटोत्कचानें विचारलें.

"होय. माझ्या आईच्या मुलांत मी सुद्धां मधलाच आहे." भीम म्हणाला.

"हा भीम आसावासा वाटतो." ब्राह्मण बायकोच्या कानांत कुजबुजला. इतक्यांत ब्राह्मणाचा मधला मुलगा पाणी पिऊन आला व म्हणाला—"हा मी आलों. चला जाऊंया. कोठें जायचें ?"

इकडे भीमाला ओळखून ब्राह्मणानें आपली सर्व हकीकत भीमाला सांगितली आणि आपले व आपल्या मुलाचें रक्षण करण्यास सांगितलें.

केशवदासाचा वृत्तांत ऐकून भीम घटोत्कचाला दरडावून म्हणाला—"ह्या ब्राह्मणाला उगाच कां दुःख देतोस. दे सोडून त्याच्या मुलाला."

"मी आपल्या आईच्या आज्ञेवरून ह्याला पकडून नेत आहें. म्हणून माझ्या वडिलांनीं जरी मला अडविलें तरी मी ऐकणार नाहीं." घटोत्कच करारीपणानें बोलला.

आईच्या आज्ञेचाच हा परिणाम आहे. असा विचार भीमाच्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं. त्यानें विचारलें—"कोण आहे रे तुझी आई ?"







“हिडिम्बा माझी आई आहे. आणि भीम माझा बाप आहे.” घटोत्कचानें सांगितलें.

म्हणूनच ह्याच्यांत माझें बळ आलें आहे पण स्वभाव आईवर गेला आहे. “सोडून दे ह्या मुलाला.” तो एकदम संतापून म्हणाला.

“मी कां सोडीन ?” घटोत्कचानें नकार दिला.

“घेऊन जा आपल्या मुलाला.” भीमानें केशवदासला सांगितलें. “जर ह्याच्या बरोबर जायची कोणावर पाळीच आली तर मी जाईन.”

“असें काय ! तर मग मी येथेंच मारून घेऊन जातो ह्या मुलाला. बघतो मला कोण अडवितो तें.” घटोत्कच भीमाला म्हणाला.

“मीच अडवितों तुला. दुसरा कोणी कशाला ?”

“तर मग चलच माझ्याबरोबर तूं.” घटोत्कचानें सांगितलें. “काढतो तुझा इंगा.”

“हो ! हो !! ये, चल मला जबरदस्तीनें घेऊन. बघूं दे तरी तुझी ताकद. जर तुझ्याच्यानें तें झालें नाहीं तर मी आपण होऊन येतों तुझ्या बरोबर.” भीम म्हणाला.

“माहीत आहे का तूं कोणाशीं बोलतो आहेस तें ? जरा संभाळून बोल.” घटोत्कचानें दरडावलें.

“माझाच मुलगा असशील आणि काय.” भीम स्मित करून म्हणाला.

हें ऐकतांच घटोत्कचाचा चेहरा लाल झाला. त्याच्या तळव्याची आग मस्तकाला जाऊन पोहोंचली आणि त्याचा राग पाहून भीमाला मजा वाटत होती.

भीम—“रागावूं नकोस. माझ्या सारख्या वीरानें तुझ्या सारख्या वीराला ‘पुत्र’



म्हटलें तर त्यांत काय बिघडलें ? जर तुला तसें वाटत असेल तर माफ कर.”

घटोत्कच—“म्हणें माफ कर ! अगोदर अपमान करावयाचा व मग भिऊन माफी मागावयाची, चांगला धंदा आहे.”

भीम—“भिऊन ? भिणें म्हणजे काय ? मला नाहीं बोवा माहीत. जरा मला दाखव ना तें.”

घटोत्कच—“दाखवितों भीति तुला. चे काय शस्त्र तुला घ्यायचें असेल तें हातांत.”

भीम—(आपला उजवा हात पसरून) ह्या हातानें मी शत्रूला मारतों.

घटोत्कच—“तुला काय वाटलें तूं खरो-खरच भीम आहेस होय ?”

भीम—“हा भीम आहे तरी कोण ? कोणी शिव आहे ? का कृष्ण, का इन्द्र, का यम ?”

घटोत्कच—“ह्या सर्वांना एकत्र केलें तरी सुद्धां त्याची बरोबरी होणार नाहीं.”

भीम—“साफ खोटें आहे.”

“माझ्या वडिलांचा अपमान करतोस ?” असें म्हणून घटोत्कचानें संतापानें एक झाड उपटलें आणि भीमावर फेंकलें. भीमानें सुद्धां तेवढ्याच सहजपणें तें बाजूस लोटलें. नंतर



त्यानें एक डोंगर उचलून फेंकला तोहि भीमानें दूर फेंकून दिला.

एवढ्यानें कांहीं झालें नाहीं म्हणून त्यानें कुस्तीला ओढलें भीमाला. त्यांतहि घटोत्कच हारला. नंतर त्यानें भीमाला आपल्या मायाजालांत आणण्याचा प्रयत्न केला. त्याचाहि भीमावर कांहीं परिणाम झाला नाहीं.

“तूं सांगितलें होतेंस ना कीं जबरदस्ती तुला नेलें नाहीं तर तूं स्वतः माझ्या बरोबर येशील ? चल तर माझ्या बरोबर.” घटोत्कच गुर्मीनें म्हणाला.








“दाखव रस्ता.” म्हणून भीम घटोत्कचाच्या मागून चालूं लागला. ते हिडिम्बाच्या घराजवळ आले. भीमाला घरा बाहेरउभा करून घटोत्कच आईला सांगायला आंत गेला. “आई! तुझ्या जेवणासाठीं मी मनुष्य आणला आहे. तूं सांगितलें होतेंस ना?”

“कसा काय आहे माणूस.” आईनें विचारलें.

“आहे मनुष्यच पण त्याची शक्ति अचाट आहे. ती कांहीं माणसाची वाटत नाहीं.” घटोत्कच म्हणाला.

“असं? बघूं तरी कोण माणूस आहे तो.” हिडिम्बानें बाहेर येऊन पाहिलें. “आपण” म्हणून स्मित करून तिनें मान खालीं घातली. नंतर आपल्या मुलाला म्हणाली—“बाळा! हे साधे मनुष्य नाहींत. आपल्याला दोघांना परमेश्वरासारखे आहेत, हे तुझेवडील आहेत.”

लागलीच घटोत्कच भीमाच्या पायां पडला. आपल्या उद्दामपणाबद्दल क्षमा मागितली आणि कौरवांच्यासाठीं दावाग्नि होण्याचें त्यानें अभिवचन दिलें. “हें काय चालविलें आहेस तूं हिडिंबा?” भीमानें विचारलें.

“तसं कांहीं नाहीं. मला आपल्या दर्शनाची इच्छा झाली म्हणून मी आपल्या घटोत्कचाला एखाद्या माणसास पकडून आणण्यासाठीं सांगितलें. मला माहीत होतें कीं आपण त्या माणसाचें रक्षण करण्यासाठीं याल.” हिडिम्बा म्हणाली.

“मला वाटलें अजून तुझा राक्षसी स्वभाव गेला नाहीं.” भीम म्हणाला.

त्या नंतर केशवदास भीमाचे आभार मानून आपल्या बायकोमुलांसह आपल्या वाटेनें निघून गेला. भीम मात्र आपल्या बायकोचें प्रेमाचें आदरातिथ्य घेण्यासाठीं तेथेंच राहिला.



# प्रसिद्ध खेळणीं



मुलांना द्यावयाचीं खेळणीं अशीं असावी कीं त्यामुळें मुलांच्या मनांत सद्भाव उत्पन्न होऊन सहृदयता वाढेल. सध्यां रशिया मध्यें असा नियम आहे कीं ज्या खेळण्यापासून मुलांच्या दुष्ट प्रवृत्ती वाढतील अशीं खेळणीं कोणी बनवूं नयेत. म्हणून त्या देशांत पिस्तूल बंदुकीसारखी घातक वृत्तीचीं खेळणीं बनवत नाहींत. आपल्या देशांत सुद्धां पूर्वी अशीच परंपरा असल्याचें आढळून येईल.

रशियांत ‘मत्र्योष्का’ नांवाची एक बाहुली असते. ही बाहुली म्हणजे एकच नसते. त्या बाहुलींत आणखी ३६ बाहुल्या असतात. एकाहून एक लहान. पण त्यांचे पोषाख सारखेच असतात.

ह्या ‘मत्र्योष्का’ बाहुल्या मागील शतकांत सुरू झाल्या आणि तेव्हांपासून त्यांची निर्यातहि चालू झाली. सुमारें सत्तर वर्षांपूर्वी ‘त्रियासे सेगियव’ कंपनीकडून लंडनमधील एका व्यापाऱ्यानें ह्या मागवून विकल्या. तेव्हांपासून जर्मनी व फ्रान्समध्यें ह्यांची विक्री सुरू झाली.

ही बाहुली पाहून जर्मनीवाल्यांनीं एक बाहुली तयार केली त्याविषयीं एक गोष्ट आहे. “ब्लू बीअर्ड” नांवाच्या एका गृहस्थानें आपल्या सात बायकांना एका मागून एक मारून टाकलें. हें दाखविण्यासाठीं त्यांनीं एक दाढीवाला बाहुला करून त्यांत एकांत एक अशा सात बाहुल्या बसविल्या आणि सातवीच्या आंत एक विषाची बाटली ठेविली. परंतु ह्या बाहुल्यांचें ग्राहकांकडून एवढें स्वागत झालें नाहीं जेवढें ‘मत्र्योष्का’चें झालें.

हल्लीं सुद्धां ह्या ‘मत्र्योष्का’ पूर्व युरोप, अमेरिका, फिन्लंड, ब्रिटन, स्वीडन वगैरे देशांत निर्यात होतात.










# खुजांच्या गमती

आल्पस् पर्वतावर राहाणाऱ्या खुजांच्या विषयीं आज सुद्धां कित्येक गोष्टी सांगितल्या जातात. असें म्हणतात कीं हे खुजे पर्वताच्या जंगलांत गुहेमध्यें राहात असत. परंतु ती जागा सोडून ते दुसरीकडे कोठें तरी निघून गेले.

ह्या खुजांची उंची दोन फूट होती. हे फार दयाळू होते. जर कधीं कोणी ह्यांची मदत केली तर ते कधींहि विसरत नसत. ह्यांचें मुख्य काम म्हणजे गुरें वळणें. ह्या शिवाय ते वैद्यकींत फार हुशार असत. ह्यांना खाण्यापिण्याची विशेष काळजी नसे. ह्या लोकांचें सर्वांत जास्त वैशिष्ट्य म्हणजे ह्यांच्याजवळ कांहीं विशेष सिद्धी असत. हे खुजे मनुष्यांच्या मुलांना कोळसा भेंट म्हणून आणून देत असत. ह्यांनीं दिलेला कोळसा मुलें कोठें तरी ठेवीत असत आणि दुसऱ्या दिवशीं पाहिलें कीं त्या कोळशाचें सोनें झालेलें आढळून येत असे. कांहीं खुजे तर डोंगरावर हिरे शोधीत असत.

एकदां एक खुजा उन्हाळ्यांत पर्वतावर हिरे शोधण्यासाठीं म्हणून जाई. तो आपल्या बरोबर सात पिशव्या घेऊन जात असे. कांहीं हिरे किंवा किमती दगड त्या पिशव्यांत भरी आणि कोणाशीं कांहींहि न बोलतां मुकाट्यानें परत जाई.

तो रात्रीं धनगरांच्या मुलांमध्यें गप्पा मारीत बसे. त्यांना आपल्या गांवच्या विचित्र गोष्टी सांगत असे. त्यामुळें मुलें त्याच्यावर खुश असत.

एक दिवस धनगराच्या मुलांना खुजांची गंमत करावीशी वाटली. त्यांनीं त्याची एक भरलेली पिशवी लांबवली आणि कोठें तरी लपवून ठेविली. संध्याकाळ होतांच खुजा परत आला. आपलें सामान पाहिलें. त्यांत त्याला त्याच्या रत्नांच्या पिशव्यांतील एक पिशवी नाहींशी झालेली दिसली. त्यानें त्या मुलांना विचारलें कीं माझी रत्नांची पिशवी तुम्हीं आणून देणार का मला घेऊन या म्हणतां?

"तुम्हांला आणतां आली तर आणा." धनगराचीं मुलें म्हणालीं.

खुजा डोंगरावर पिशवी ठेविली होती तेथें सरळ गेला आणि आपली पिशवी घेऊन आला. त्या नंतर मात्र कोणीहि कधींहि त्याच्या वस्तूंना हात लावला नाहीं.



हिवाळ्याचे दिवस सुरू झाले. डोंगरावर बर्फ पडूं लागलें. म्हणून खुजा आपल्या गांवीं निघाला. तो मुलांना म्हणाला—"मी आमच्या गांवीं निघालों आहें. तुमच्यापैकीं कोणी येणार असाल तर चला मी त्याला त्याबद्दल एक पिशवी भरून चांदीचीं नाणीं देईन."

सर्व मुलें एकमेकांकडे पाहूं लागलीं. एक धनगर चांदीच्या मोहानें जाण्यास तयार झाला. तो निघाला आणि पोहोंचला खुजाच्या गांवाला. त्या गांवाच्या चहूबाजूंनीं तटबंदी होती. बुरुज संगमरमरी दगडाचे होते. ते पाहात त्यानें नगरांत प्रवेश केला. पण आतां जायचें कुठें? कारण त्या खुजाचें नांव गांव त्याला कांहीं माहीत नव्हतें. कोणीकडे जावें काय करावें त्याला सुचेना.

असाच तो रस्त्यांतून भटकत चालला होता. तितक्यांत पाठीमागून कोणी तरी त्याच्या पाठीवर थाप मारली. त्यानें वळून पाहिलें तों एक स्वच्छ व ऐटबाज कपडे घातलेला खुजा त्याला दिसला. त्या खुजानें धनगरांच्या मुलांची खुशाली विचारली. त्यावरून त्यानें ओळखलें आपल्याकडे येणारा खुजा तो हाच.

नंतर तो खुजा आपल्या पाहुण्याला घरीं घेऊन गेला. काय त्याचा तो वाडा! बिचारा











धनगर आश्चर्यानें 'आ' वासून पाहातच राहिला. खुजानें त्याला सुग्रास जेवण वाढून संतुष्ट केलें. त्यानंतर एका मऊमऊ पलंगावर त्याला विश्रांति घेण्यास सांगितलें.

अशा तऱ्हेनें आनंदांत आणि ऐशारामांत दिवस जात होते. कांहीं दिवसांनीं त्याला आपल्या घरची आठवण येऊं लागली. आई वडील बहीणभाऊ स्वप्नांत दिसूं लागले. खुजानें त्याच्या मनांतील गोष्ट ओळखली. खुजानें ठरल्याप्रमाणें त्याला पिशवी भर चांदीचीं नाणीं दिलीं व घरीं पाठवून दिलें.

*  *  *

एका खेड्यांत एक माणूस राहात असे. त्याची पिठाची गिरणी होती. त्यावरच त्याचा उदरनिर्वाह चालत असे. तो फार लोभी होता आणि त्यांत त्याची बायको तर सदोदीत आजारी असे.

एका वर्षी या भागांत मुळींच पाऊस पडला नाहीं. दुष्काळ पडला. लोक जिकिरीला आले. अशा वेळीं डोंगरावर राहाणाऱ्या एका खुजानें त्या गिरणीवाल्याजवळ थोडें पीठ मागितलें. गिरणीवाल्यानें आरडाओरडा केला आणि त्या खुजाला हाकलून दिलें. गिरणीच्या मालकाचा एक मुलगा होता. त्याला त्या खुजाची दया आली. त्यानें आपल्या बापाची नजर चुकवून एका पिशवींत पीठ भरून त्याला दिलें.

एकदां तो मुलगा आपली मेंढरें घेऊन गेला असतां त्याला तो खुजा भेटला. त्यानें या मुलाला आपल्या घरीं जेवावयास बोलाविलें. खूप दूर गेल्यावर त्यांना झाडांत मोठें खिंडार दिसलें. त्यांतून ते आंत घुसले. तेंच दार होतें त्या खुजाच्या घराचें. पुढें त्यांना एक गुहा लागली. आणखी पुढें गेल्यावर नंतर त्यांना समोर एक मैदान दिसलें. तेथें एक मोठा मळा होता. पुष्कळसे खुजे तेथें खेळत, नाचत होते. हा मुलगाहि त्यांच्यांत जाऊन मजा करूं लागला. थोड्या वेळानें पाहातो तों एक एक करून सर्व खुजे नाहींसे झाले. फक्त त्याला बोलावणारा खुजा शिलक राहिला.

तो खुजा त्याला एक फळ देत म्हणाला— "हें फळ आपल्या आईला खायला नेऊन दे. शिळें होऊं देऊं नकोस, व हें फळ आपल्या वडिलांना दे आणि माझी आठवण म्हणून हा मोत्याचा हार तूं आपल्याजवळ ठेव." त्याला त्या सर्व वस्तू देऊन खुजानें त्या मुलाची बोळवण केली.













इकडे मुलगा घरीं आला नाहीं म्हणून आईबाप काळजींत होते. मेंढरें संध्याकाळीं संवयीप्रमाणें घरीं आलीं. रात्र गेली. सकाळ आली. दुसरा दिवस गेला. चार दिवस गेले. मुलगा परत आला नाहीं. सात दिवस झाले. सातव्या दिवशीं मुलगा परतला. आईवडिलांना फार आनंद झाला. मुलानें सर्व सांगितलें व आईला तें फळ खावयास दिलें. आश्चर्य, त्याचा थोडासा रस पोटांत जातांच तिला बरें वाटूं लागलें. वडिलांनीं आपलें फळ फोडलें तर त्यांतून मोठमोठे हिरे बाहेर पडले.

* * *

एकदां एका खुजाच्या बायकोचें बाळंतपण करायला एक शेतकऱ्याची बायको गेली. सर्व काम उरकून ती जेव्हां घरीं जाऊं लागली तेव्हां त्या खुजानें तिला पाच पोतें कोळसे दिले. शेतकरणीला हें बक्षीस पाहून रागच आला. तरी रागारागानें ती तें तसेंच घेऊन घरीं आली. पोतें फाटकें असल्यामुळें त्यांतून कोळसे खालीं पडत होते. पण तिनें त्याची मुळींच पर्वा केली नाहीं.

घरीं पोहोंचताच तिनें ते कोळसे परसांत ओतले व लुगडें झटकूं लागली. ती चकित होऊन पाहूं लागली. ते सर्व कोळसे सोन्याची नाणीं झालेले तिला दिसले. उलट्या पावलीं ती सांडलेले कोळसे वेंचण्यास निघाली. परंतु तिला वाटेंत एकहि कोळसा दिसला नाहीं आणि सोन्याचें नाणेंहि मिळालें नाहीं.

* * *

डोंगराळ प्रदेशांतील एका नदीकाठच्या टेकडीवर कांहीं घरें होतीं. तेथें एक विणकर राहात असे. जें त्याला मिळे त्यावर तो सुखासमाधानानें राहात असे. त्याच्या घरीं खुजे नेहमीं येऊन बसत असत.

एका वर्षी त्या नदीला भयंकर पूर आला. त्या विणकऱ्याला भीति वाटली कीं पाणी





आपल्या घरांत शिरेल. तो आपल्या घरांतील सर्व चीजवस्तू दूर गांवांत ठेवून आला. त्याचें अनुमान खरें ठरलें. त्याच्या घरांत पाणी शिरलें. घरांतून बाहेर पडून तो जाऊं लागला एवढ्यांत त्याला कोणाची तरी हांक ऐकूं आली. त्यानें मागें वळून पाहिलें तो एक खुजा त्याच्या घराच्या छपरावर उभा असलेला त्याला दिसला.

त्याला सोडून विणकऱ्याला पुढें जाववेना. तो परतला. त्या खुजाला खालीं उतरविलें आणि त्याला घेऊन तो सुरक्षित जागीं [illegible].

खुजा त्याला म्हणाला—"तूं संकटाच्या वेळीं माझे प्राण वांचविले आहेस. तुझे हे उपकार मी कधीं विसरणार नाहीं. फूल ना फुलाची पाकळी म्हणून मी हे पिशवीभर चणे तुला देतों. तुझ्या सर्व कुटुंबाचें पोट भरेल. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. ही पिशवी कधींहि रिकामी करूं नकोस. चार चणे तरी आंत ठेवीत जा." असें सांगून त्यानें आपल्या जवळची ती हरभऱ्याची पिशवी त्याला दिली.

विणकर आपल्याच काळजींत होता. खुजाची ही भेट त्याला मुळींच आवडली नाहीं. ती रात्र त्यानें आपल्या एका स्नेह्याच्या घरीं काढली. दुसऱ्या दिवशीं नदीचें पाणी ओसरलें. त्यांत त्याचें घर शाबूत असल्याचें त्याला दिसलें. त्याला आनंद झाला. आपल्या बायको मुलांना घेऊन तो घरीं आला. घर साफ करून ते सर्व स्वयंपाकाला लागले. त्यावेळीं त्यांना ते चणे उपयोगी पडले. खुजानें सांगितल्याप्रमाणें त्यांनीं दोन दाणे पिशवींत ठेवून दिले.

दुसऱ्या दिवशीं विणकऱ्यानें पाहिलें पुन्हां पिशवी भरलेलीच. अशा तऱ्हेनें त्याला रोज पोटभर अन्न मिळूं लागलें. कापडावर

मिळालेले पैसे जमा करून तो सुखानें राहूं लागले.

असें म्हणतात कीं ती पिशवी त्यांच्या जवळ कांहीं पिढ्या होती. एकदां त्यांच्या घरांत नवीन स्वयंपाकीण आली. तिला ही गोष्ट माहीत नव्हती. तिनें सर्व पिशवी उलटी करून हरभरे ओतले आणि पिशवी झाडून रिकामी केली. त्यानंतर कधीं पुन्हां भरली नाहीं.

* * *

पूर्वी आल्पस् पर्वतावर खुजे राहात असत. पण तेथील लोकांना त्यांच्याविषयीं साहानुभूति वाटत नसे. ते तिरस्कारच करीत. त्याचा परिणाम असा झाला कीं खुजांनीं तें स्थान सोडून दिलें आणि कोठें नाहींसे झाले त्याचा मात्र पत्ता नाहीं. नाहींसे होण्याविषयीं एक अशी गोष्ट सांगतात.

एकदां एक शेतकरी आपल्या शेतांत खत घालीत होता. त्याच्या मदतीला कांहीं खुजे आले. ह्या खुजांचे कपडे नेहमीं पायघोळ असत. त्यामुळें त्यांचे पाय दिसत नसत. परंतु लोक म्हणत असत कीं त्यांचे पाय बदकांच्या पायाप्रमाणें असतात. ही गोष्ट त्या शेतकऱ्यानें ऐकली होती. ह्या खुजांना आपल्या इतके जवळ आलेले पाहून त्याला त्यांचे पाय पाहण्याची इच्छा झाली. म्हणून त्यानें पोतंभर चुना त्यांच्या वाटेंत पसरून ठेविला.

खुजे नेहमींप्रमाणें त्याच्याशीं गप्पा मारीत काम करून निघून गेले. शेतकरी मोठ्या उत्सुकतेनें त्यांच्या पावलांच्या खुणा पाहण्या-साठीं धांवला आणि खरोखरच बदकांची पावलें उठलेली त्याला दिसलीं. पण गंमत अशी कीं त्या दिवसापासून त्या भागांत खुजे कधीं दिसलेच नाहींत.





# अहिंसेचा मूर्ति

[ १३ ]

उज्जयनीच्या राजाला ही गोष्ट कळल्यापासून कीं वैद्यानें त्याचें तेल तोडलें आहे, तो वैद्यावर फार संतापला. त्यानें जीवकला फांशी द्यायला सांगितलें. परंतु राजाचे नोकर जीवकच्या शोधार्थ गेले तेव्हां त्यांना कळलें कीं जीवक घरीं नसून पळून गेला आहे. राजानें आपल्या ओप्पणिक नांवाच्या नोकराला बोलावून सांगितलें कीं तूं जर जीवकला धरून आणलेंस तर तूं मागशील तें बक्षीस मी तुला देईन.

ओप्पणिक जीवकचा शोध काढीत कौशाम्बीला आला. तो जीवकला भेटला व म्हणाला—"महाराजांनीं आपणांस आदर पूर्वक बोलावून आणावयास मला पाठविलें आहे."

"मी येतों, पण माझी जेवणाची वेळ झाली आहे. जेवण झाल्यावर येतों. तूं सुद्धां माझ्याबरोबर जेवायला बस. दोघे जेवण झाल्यावर निघूं." जीवक म्हणाला. पण ओप्पणिक कबूल झाला नाहीं. तेव्हां जीवक म्हणाला—"तर मग हें एक फळ खा. मग निघूं." असें सांगून जीवकनें त्याला कसलें तरी फळ कापून अर्धें खायला दिलें. तें खाल्ल्याबरोबर ओप्पणिकच्या अंगाला




## २. मृगराज

रानटी प्राण्यांत सिंहाला मृगराज म्हटलें आहे. त्याचें चालणें, त्याची गर्जना, त्याचा रुबाब, सर्व कांहीं एकाद्या राजा प्रमाणेंच असतें.

सिंहांचे छावे दोन वर्षांपर्यंत आईवडिलां-जवळ असतात. थोडे मोठे झाले कीं ते टोळी करून राहातात आणि वयांत आले म्हणजे आपली जोडी शोधून नर-मादा मिळून राहा-तात. त्यांची ही जोडी जन्मभर राहाते. सिंहीण तरी आपला जोडीदार मरेपर्यंत बदलत नाहीं.

सिंहाला उष्मा सहन होत नाहीं. म्हणून तो दुपारच्या वेळीं उंच उंच गवतांत किंवा झाडाच्या सावलींत विसावा घेतो. असें दिसून आलें आहे कीं पकडून आणलेले सिंह साधारणपणें उन्हाळ्यांतच पकडले गेले आहेत. जोराचा वारा नसेल तर त्यांना थंडी मानवते.

एके काळीं 'ॲटलस्' पर्वतावर सिंह होते. ते फार मोठे होते. परंतु आतां त्या जातीचे सिंह आढळत नाहींत. आफ्रिकेच्या पठारावर आणि ॲबिसीनियाच्या मैदानांत काळ्या काळ्या केसांचे मोठमोठे सिंह अजून सुद्धां सांपडतात.

सिंह मांसाहारी असल्यामुळें तो सूर्यास्ता-नंतर आपलें भक्ष्य शोधण्यास बाहेर पडतो. संध्याकाळीं सर्व पशुपक्षी पाणी पिण्यास जातात. सिंह त्यांच्या मार्गावर पाळत ठेवून आपली शिकार साधतो. हरण किंवा जिराफ ह्यांच्यासारखा तो पळूं शकत नाहीं. म्हणून पहिल्या झडपेंत जर ते त्याच्या पंजांतून सुटले तर पुन्हां त्यांना पकडण्याच्या फंदांत पडत नाहींत.

जिम फ्रे

प्राण्यांचे अभ्यासू सिंहाकडून कामें करून घेतात. सिंह केव्हां काम करतात, केव्हां थकतात केव्हां खुश होतात ह्याचा त्यांना चांगला माहिती असावी लागते. सिंह जास्त वेळ काम करूं शकत नाहीं. जर तसेंच त्याला ताबडलें तर एक तर तो काम करणार नाहीं, नाहीं तर बंड करील. सिंह थकला म्हणजे तो फार लवकर वश होतो. त्याला वश करावयाचें झाल्यास दांडक्याच्या मदतीनें किंवा तिवईच्या पायांनीं थोडा वेळ दूर उभें करून आपलें रक्षण करावें. सुमारें वीस सेकंदांत तो थकून जातो. त्याचा पंजा ढिला पडला कीं समजावें तो थकून गेला आहे. मग त्याच्या नाकावर एक चाबकाचा फटका देऊन जें शिकवावयाचें असेल तें शिकवावें.

खाणें खाऊन झाल्यावर, त्यांच्याकडून काम करून घेणें ठीक नाहीं. त्यांच्याकडून जर कांहीं काम करवून घ्यावयाचें असेल तर तें त्यांच्या खाण्याच्या अगोदर घेतलें पाहिजे. काम करून घेतल्यावर जर त्यांना थोडें मांसाचे तुकडे खावयास दिले तर त्यांना फार आनंद होतो. आपलें कौतुक केलें असें वाटून ते खूष होतात.



एक सर्कसवाला शिकारी म्हणतो—"मी कित्येक वेळां कितीतरी सिंहांच्या टोळ्या पाहिल्या आहेत. त्यांचें बरेंच सूक्ष्म निरीक्षण केलें आहे. सिंह आपल्या शिका-रीच्या पाठोपाठ कधीं पळत सुटत नाहीं. ही गोष्ट नराच्या बाबतींत अक्षरशः खरी आहे.

मी एकदां एक गंमत पाहिली. एक सिंह शिकारीसाठीं झाडाआड दबा धरून बसलेला होता. थोड्याच अंतरावर एक हरीण काळ्याच्या कांठाला पाणी पीत होतें. सिंहानें त्याच्यावर झडप घालण्या-साठीं आपले पाय उचलले आणि उडी मार-



ण्यास अगदीं सिद्ध झाला. परंतु काय त्याच्या मनांत आलें. कोण जाणें त्यानें आपले पाय अलगद खालीं टेकले आणि त्या हरणाला पाणी पिऊन सुखानें जाऊं दिलें. सिंह त्या बाबतींत थोडा आळशीच. तो विचार करीत असावा कीं सिंहीण कोठून तरी एकादा रेडा, बैल, किंवा कांहीं तरी आणील आणि आपल्याला बोलावील. मग कशाला आपण विनाकारण श्रम करावे.

सिंहाच्या एका कुटुंबांत दहा बारा सिंह असतात. त्यांत त्यांचे आपापसांतील संबंध नियमबद्ध असतात. जर कोणी त्या नियमां-विरुद्ध वागलें तर त्यांना फार कडक शिक्षा भोगावी लागते. कुटुंबांतील सिंहीणच शिकार करून आणते. बहुतेक कुटुंबांतील एकच सिंहीण शिकार करून आणते. तिनें शिकार आणली म्हणजे ती मोठ्यानें गर्जना करते. मग बाकीचे सिंह खावयास येतात. पाळीव सिंहांच्या बाबतींत सुद्धां असाच अनुभव आला आहे. सिंहांना शिकवणाऱ्या शिक्षकाला जर का एकाद्या सिंहानें खालीं पाडला तर ही शिकारच आहे असें समजून सर्व सिंह तेथें जमतात. म्हणून सिंहांना शिकविणाऱ्या व्यक्तीला फार सावधपणें आपलें काम करावें लागतें.

जंगलांत जेव्हां टोळींतील सिंहांना भूक लागते तेव्हांच त्या टोळींतील सिंहीण शिकारीस निघते. तिला एकादी शिकार दिसली कीं ती तिचा पाठलाग करते. त्या वेळीं टोळींतील इतर सिंह त्या शिकारीला चहूं बाजूंनीं घेरतात म्हणजे सिंहिणीला ती सहजीं पकडतां येते. सिंहांचीं ज्ञानेंद्रियें इतर प्राण्याप्रमाणें तीक्ष्ण नसल्यानें त्यांचा जास्त भरंवसा दृष्टीवरच असतो. ह्याची प्रचीति पाहण्यासाठीं एकदां मी सिंह व सिंहीण पाठमोरी असतां त्यांच्या पाठीमागें मासांचा तुकडा धरला. त्यांना कांहीं कळलें नाहीं. नंतर त्यांना तो दाखविण्यांत आला. तेव्हां मात्र दोघांनींहि त्याच्यावर झडप घातली.

सिंहांना शिकविणाऱ्या शिक्षकांचें असें म्हणणें आहे कीं सिंहापेक्षां सिंहिणींना शिकविणें सोपें. कारण सिंहिणींचा स्वभाव फार शांत असतो. पण त्यांत सुद्धां जर का एकाद्या दळनायिका सिंहिणीशीं गांठ पडली तर मात्र कठीणच ज्या ज्या लोकांनीं सिंहांच्या बाबतींतील आपले अनुभव दिले आहेत ते म्हणतात कीं त्यांना एकाहि सिंहानें इजा केलेली नाहीं. ते जखमी झाले ते सर्व सिंहिणींमुळेंच. सिंहीणी केव्हां पिसाळतील ह्याचा कांहीं नेम नसतो. आणि त्यांच्या तावडींतून सुटणें फारच कठीण असतें.

वाघसिंहादि जंगली प्राणी 'ऋतु' काळांत फार भयानक होतात. अशा वेळीं त्यांच्याकडून कामें न करविणेंच बरें. कारण केव्हां केव्हां अशी भयंकर परिस्थिति येते कीं त्याची कल्पनाहि करवत नाहीं. ह्या स्थितींत कामें करीत असतां त्यांना पिसाळावयास थोडेंसें कारण झालें तरी पुरतें. कोठें बंदुकीचा आवाज झाला, कोठें जरा ढग गडगडले, प्रेक्षकांनीं टाळ्या वाजविल्या, जवळून कुत्री



     


मांजरीं गेलीं किंवा एकादा आवाज जरी कोठून आला तरी तेवढें कारण पुरतें त्यांना पिसाळायला. कधीं कधीं एकादा गांव सुद्धां ह्या प्राण्यांच्या प्रकृतीच्या विरुद्ध असल्याचें आढळतें. एका पशुपालाचें म्हणणें आहे कीं एकदां तो आजारी पडला, तेव्हां त्याचे हिंस्रप्राणी आपसांत भांडू लागले. तेव्हां त्याला विमानाची मदत मिळाली नाहीं. अशा समयीं त्यांना शांत करण्यासाठीं किंवा कह्यांत आणण्यासाठीं पाण्याचा हौदांचा उपयोग करावा लागला. ते अडूनच बसले.

एकदां सर्कशींत मी त्या प्राण्यांचा पिरामीड केला. लोकांनीं कौतुकानें टाळ्या वाजविल्या. मी त्यांच्या अभिनंदनाचा स्वीकार करून प्राण्यांना पिंजऱ्यांत पाठवीत होतों. आणि तेहि एकेक करून आपापल्या पिंजऱ्यांत जात होते. इतक्यांत एकाएकीं वीज बंद पडून अंधार झाला. प्रेक्षकांत एकदम गोंधळ माजला. त्यावेळीं माझ्याजवळ बरेच वाघसिंह होते. त्यांत एकाचे नांव 'नगेश' होते. म्हातारा होता तो सिंह. पण वेळोवेळीं तो माझ्यावर उठत असे. त्या वेळींहि त्यानें आपला राग दाखविला. अंधुक प्रकाशांत मी पाहिलें कीं वाघ सिंह आपल्या पिंजऱ्यांत घुसत आहेत. तरी सुद्धां मला वाटलें कांहीं तरी संकट उद्भवणार आहे. म्हणून मी वर चढून पिंजऱ्याच्या बाहेर सटकलों. पण मला दिसलें 'नगेश'नें झटकन पिंजऱ्यावर उडी मारली. एका क्षणाचा विलंब झाला असता तर 'नगेश'नें माझ्यावर उडी मारली असती. पण तेवढ्यांत माझ्या मित्रांनीं टॉर्च आणून उजेड पाडला. त्या उजेडांत मी पाहिलें 'नगेश' माझ्यापर्यंत येण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होता. मी त्याच्या नाकावर एक जोराचा चाबूक मारला तेव्हां तो वठणीवर आला.

(पुढें चालू)





# मधाचीं पोळीं

मागील अंकांत आपण कांहीं जातीच्या मुंग्यांविषयीं बरीच माहिती मिळविली. आतां मेक्सिकोंतील मुंग्यांविषयीं माहिती मिळवूं. ह्यांचीं कामें फार आश्चर्यकारक वाटतात.

अमेरिकेंतील कोलरेडो प्रांतांतील खडकाळ जमिनींत ह्यांचीं पोळीं शोधतांना अन्वेषकांनीं फारच आश्चर्यजनक माहिती गोळा केली आहे. ह्यांचीं वारुळें जमिनींत असतात. आंत जाण्याचे रस्ते फार साफ आणि गुळगुळीत असतात. रस्त्यांच्या टोंकाला एक अंधार कोठडी असते. हे त्यांचे माजघर, म्हणजे जेवणाची खोली. उन्हांत ज्याप्रमाणें द्राक्षें वाळवितात त्याप्रमाणें ह्या खोलीच्या आढ्याला मधाचीं पोळीं लटकत असतात. ह्यांच्यावर जिवंत मुंग्याच असल्यानें हीं पोळीं फार चकचकीत दिसतात. पोळीं जरी फार गुळगुळीत असलीं तर त्यांचा पृष्ठभाग खडबडीत असतो. म्हणूनच ह्यावर वावरणाऱ्या मुंग्या आपल्या पायांनीं त्याला घट्ट धरून असतात. त्या इकडे तिकडे हालचाल करतात. तरी आपल्या पायाची पकड मात्र सोडीत नाहींत.

जेव्हां दुसऱ्या मुंग्यांना भूक लागते तेव्हां त्या मुंग्या आढ्यावर चढून पोळ्याला बिलगतात आणि तेथें असलेल्या मुंग्यांच्याजवळ मध मागतात. मग ह्या पहिल्या म्हणजे पोळ्याच्या मुंग्या आपल्या पोटांतून मध काढून जो कोणी मागेल त्याला देतात.

कधीं कधीं ह्यांतील कामकरी मुंग्या मध घेऊन येतात व पोळ्यांतील मुंग्यांना पाजतात. ह्या मुंग्या 'आ' करून सर्व मध पिऊन टाकतात. ह्या मुंग्यांचें काम एवढेंच, कामकरी मुंग्यांनीं आणलेला मध पोटभर प्यावयाचा. ह्याशिवाय त्यांना दुसरें कामच नाहीं.



ह्या जातींतील सर्वच मुंग्या पोळ्याच्या मुंग्या होऊं शकत नाहींत. कांहीं मुंग्या ल्हानपणापासूनच पोळ्याच्या मुंग्या होण्याचा निश्चय करतात. कोणच्या मुंग्या आणि कां हा निश्चय करतात हें कांहीं सांगतां येत नाहीं. ज्या मुंग्या पोळ्याच्या मुंग्या होऊं इच्छितात त्या दुसऱ्या मुंग्यांच्या जवळून मध घेऊन पितात आणि आढ्याला लटकूं लागतात. मध पिऊन त्यांचीं पोटें इतकीं फुग्यासारखीं फुगतात कीं जरा कसलाहि स्पर्श झाल्यास तीं फुटून जातीलसें वाटतें. ह्या मुंग्या एकदां लटकूं लागल्या कीं इतर मुंग्याप्रमाणें दुसरें कांहींहि काम करीत नाहींत.

ह्या मुंग्या आपलीं वारुळें फार स्वच्छ ठेवितात. कांहीं मुंग्या संध्याकाळीं मध आणण्यासाठीं बाहेर पडतात. कांहीं मुंग्या घरीं राहून घराची राखण करतात. मध आणण्यासाठीं गेलेल्या मुंग्या मध घेऊन आल्या म्हणजे बिळांतील ल्हान मोठ्या मुंग्या आपल्याला पाहिजे असेल तेवढा मध त्यांच्या जवळून घेतात. त्यांतील कांहीं मुंग्यांचीं पिलें कितीहि मध प्यालीं तरी तृप्त होत नाहींत. ह्याचा अर्थ असा कीं हीं पिलें मधाची पोळीं होऊन आढ्याला लटकूं लागणार.

आणलेला मध सर्वांचा पिऊन झाल्यावर जो उरेल. तो त्या मुंग्या पोळ्यांतील मुंग्यांना नेऊन देतात. पोळ्यांतील मुंग्यासुद्धां मध पिऊन अगदीं टस होतात. त्या आपले हातपाय हलवूं शकत नाहींत. इतकेंच नव्हें तर त्यांना श्वास घ्यावयास सुद्धां त्रास पडतो. पोळ्यांतील ह्या मुंग्या वर्ष वर्ष अशाच आढ्याला लटकून असतात.

एकाद वेळीं पोळ्यांतील एकादी मुंगी अगदीं रिकामी होते. मग ती खालीं उतरून अंगणापर्यंत येऊन डोकावून जाते. पण ती बाहेर जाऊन मध आणीत नाहीं.

ह्यांच्या एका वारुळांत कमींतकमी दहा तरी अंधार कोठड्या असतात आणि एकेका कोठडींत तीसतीस मधाच्या मुंग्या आढ्याला लटकत असतात. ह्या मुंग्यांना दोन पोटें असतात. एक त्यांचें आणि एक त्यांच्या समाजाचें. म्हणजे लोकसेवेचें.

मधाच्या मुंग्यांना जेव्हां स्वतःसाठीं मध खावासा वाटतो तेव्हां त्या आपल्या सार्व-जनिक पोटांतील थोडा मध आपल्या पोटांत घेतात. परंतु असें करणाऱ्या मुंग्या फारच थोड्या असतात.

ह्या मधाच्या मुंग्यांची हिंडण्या फिरण्याची इच्छा पूर्ण नष्ट झालेली असते. म्हणूनच त्या एके ठिकाणीं वर्षानुवर्षें लटकत असतात. ह्या मुंग्या आपल्या मागच्या पायांनीं आढ्याला लटकतात आणि मधल्या पायांनीं आपलें शरीर साफ करतात. जर कधीं एकाद्या मुंगीनें आपलें अंग साफ केलें नाहीं तरी त्यांना चिंता करण्याचें कारण नाहीं. कारण दुसऱ्या मुंग्या येऊन त्यांचे शरीर साफ करून जातात. जसजशा नव्या नव्या मधाच्या मुंग्या होत जातात तशा तशा



जुन्या मुंग्या पडून जातात. पुष्कळ वर्षांपासून ज्या मुंग्या लटकून राहिलेल्या असतात त्यांच्या पायाची पकड पुढें पुढें सैल होते आणि ह्या मुंग्या खालीं पडतात. तेव्हां बहुतेकींचे हात पाय नाहींतर डोकें तुटतें व त्या निरुपयोगी होतात त्यांतून सुद्धां ज्या सरळ खालीं तोंड करून पडतात. त्या रांगत रांगत जाऊन पुन्हां आढ्याला लटकतात. पण बहुत करून त्या तशा पडत नाहींत. म्हणून पडल्या कीं त्या तशाच तेथें हातपाय आपटत बसतात. त्यांना पडलेल्या पाहून दुसऱ्या कामकरी मुंग्या त्यांच्याजवळ

येऊन त्यांची सेवा शुश्रूषा करतात. पण त्यांना पुन्हां आळ्यापर्यंत नेत नाहीत. कधीं कधीं अशा स्थितींत त्यांना दोन तीन महीने पडून राहावें लागतें. मग हळूं हळूं त्या मरून जातात.

कधीं कधीं ह्या मुंग्या उलट्या पडल्या तरी सरळ होऊन पुन्हां आळ्याकडे जातात. मधाच्या मुंग्या खालीं पडल्या तर कधीं कधीं त्यांतील मध सोडून जातात. त्या वासानें बाकीच्या मुंग्या तेथें जमतात व सर्व मध पिऊन टाकतात. त्यांतूनहि उरलाच तर कामकरी मुंग्या तो मध मधल्या मुंग्यांना नेऊन देतात.

केव्हां केव्हां मधाच्या मुंग्या तशाच लटकत असतांना मरून जातात. पण हें दुसऱ्या मुंग्यांना कळत नाहीं. त्या बाकीच्या मुंग्यांच्याबरोबर ह्यांनाहि साफ करून जातात. जेव्हां त्या मध चायला किंवा घ्यायला येतात तेव्हां जर त्या मुंग्यांनीं तोंड उघडलें नाहीं तर त्यांना संशय येतो. मग बऱ्याच मुंग्या येऊन त्यांना तोंड उघडावयास सांगतात. तेव्हां सुद्धां त्यांनीं तोंड उघडलें नाहीं म्हणजे त्यांचा संशय पक्का होतो कीं त्या मुंग्या आतां मेल्या आहेत.

ह्या मृत देहांची अंत्येष्टिक्रिया त्या मुंग्या शास्त्रोक्त रीतीनें करतात. कांहीं मुंग्या वर चढून मेलेल्या मुंगीचें शव तोडून तोडून खालीं टाकतात. नंतर त्या शवाला त्या एका विशिष्ट जागीं म्हणजे त्यांच्या खास स्मशानांत नेतात. तेथें पूर्वीं मेलेल्या मुंग्यांच्या ढिगांत त्यांचा देह मिसळतात. नंतर अंधार कोठडींत येऊन आळ्याला लटकत असलेले त्यांचे पाय काढून टाकून त्या मृत शरीरांत नेऊन टाकतात. ह्या त्यांच्या अंत्येष्टीक्रियेंत बऱ्याच मुंग्या भाग घेतात.



# मैत्री



[ श्री. शं. श्री. वाशीकर ]

विशाल होतें नील सरोवर
नीर जयाचें प्रशांत शीतल।

सूर्य चंद्रमा करस्पर्शानें
उजळति त्याचें ओलें अंतर।

शोधायाला अपुले तारे
तयांत पाही रात्रीं अंबर।

लबाड वायू शीळ घालतां
मोदें मोहक हंसे सरोवर।

फडफड करुनी गाणें गाई
कांठावरचा हिरवा पिंपळ।

तालावरती गीताच्या त्या
नाचत लहरी जलपृष्ठावर।

सांज सकाळीं सान पांखरें
कांठावरतीं करिती किलबिल।

वनराणीच्या वैभवासही
फुलवित होतें जीवन त्यांतिल।

सौंदर्यानें समृद्धीनें
शिणलेल्यांचें सुखवें अंतर।

जो तो त्याला मैत्रीमध्यें
मोदें म्हणतो 'रम्य सरोवर!'

  

दुर्दैवानें प्रखर उन्हाळा

जीवन जळलें विभव संपलें
दृश्य लोपलें सारें सुंदर!

कोळपलेला पिंपळ वाटे
काष्ठांचा जणु अस्थिपंजर।

धुत्कारानें घुबड घालते
औदास्यावर आणखीच भर।

तापदग्ध अन् भग्न मनाची
साक्ष देतसे खड्डा निर्जल।

दिसूं लागती आघाताचे
हृदय पटावर तडे भयंकर।

सहवासानें मृदु शब्दानें
कुणी न केलें त्याचें सांत्वन।

प्रेमवीण अन् मैत्रीविण तें
भयाण वाटे विदीर्ण जीवन!

युगा युगा सम पळ वाढती
किती तयानें कुढायचें पण?

  

त्या वेळीं मी जाता तेथें
ऐकूं आलें मजला हृद्गत।

सरोवराच्या उष्ण उरांतिल
उष्ण उसासे होते सांगत।

"ऐश्वर्याची मैत्री सारी



# महाभारत

पांचवा दिवस उजाडला. दोन्हीकडील सैन्यें सुसज्ज होऊन रणांगणावर पोहोंचलीं. आज कौरव सैन्य मकरव्यूहांत सज्ज झालें व पांडव सैन्य श्येनव्यूहांत उभें झालें. आघाडीला भीम उभा होता.

भीष्मानें जणूं पांडव सेनेचा नाश करण्याचा निर्धार केला होता. भीष्माचा उत्साह पाहून दुर्योधनाचा आनंद व उत्साह उफळूं लागला. तो द्रोणाचार्यांना म्हणाला— "गुरुवर जों पर्यंत आपण व पितामह आहांत तों पर्यंत आम्हांला देवादिकांचें सुद्धां भय नाहीं."

द्रोणहि युद्ध करूं लागला. सात्यकीनें जेव्हां द्रोणाचा आवेश पाहिला तेव्हां तोहि त्याच्यावर धांवून गेला. दोघांचें युद्ध सुरू झालें. ह्या त्यांच्या झटापटींत सात्यकीचे दोन्ही गुडघे फुटले.

सात्यकीला वांचविण्यासाठीं भीम त्याच्या मदतीला धांवला. म्हणून द्रोण त्याच्याशीं लढूं लागला. त्याच्या मदतीला अभिमन्यु, उपपांडव वगैरे धांवून आले. द्रोणाला एकटा पाहून भीष्म त्याच्या मदतीला आला.

त्याच वेळीं युद्ध करीत करीत शिखंडी तेथें येऊन पोहोंचला. आपल्या नियमाप्रमाणें भीष्म शिखंडीला वगळून बाण सोडूं लागला. द्रोण मात्र शिखंडीशीं लढूं लागला. ही संधि साधून सात्यकी तेथून निघून गेला. दोन्हीं सैन्यांत निकराचें युद्ध झालें. पांडव सैन्यांतील बरेच योद्धे भीष्माच्या बाणाला बळी पडले. कित्येक जखमी झाले. रक्ताची नदी वाहूं लागली. एवंच आज युद्धाला सुरवातीपासूनच जोर चढला होता.

अशा ह्या गडबडींत भीष्मानें एक तीक्ष्ण बाण सात्यकीवर सोडला. त्यामुळें तो घायाळ झाला. दुसऱ्या एका बाणानें भीष्मानें सात्यकीच्या सारथ्यास मारलें. तो कोलमडून रथांतून खालीं पडला. त्याबरोबर रथाचे घोडे बिथरले आणि वाट फुटेल तिकडे ते पळूं लागले. हें पाहून पांडव सैन्य घाबरलें.

ह्याच वेळीं दुसरीकडे अश्वत्थामा आणि अर्जुन यांचें युद्ध सुरू होतें. त्यांत अर्जुनाच्या बाणवृष्टीमुळें अश्वत्थामा रक्तबंबाळ झाला होता. तरीसुद्धां तो पाय रोवून नेटानें युद्ध करीत होता. त्याचें तें अवसान आणि रूप पाहून कृष्णार्जुनांना क्षणभर वाटलें कीं आपल्या समोर प्रत्यक्ष रुद्रच उभा आहे. त्याच्या उत्साहानें कौरवांना मात्र खूप आनंद झाला.

ह्याच वेळीं एका बाजूला लक्ष्मण व अभिमन्यूचें द्वंद्व सुरू झालें. लक्ष्मणानें आपल्या पराक्रमानें सर्वांना चकित करून सोडलें. परंतु बिचाऱ्याच्या रथाचे घोडे व सारथी मरून गेले. तरीहि पण तो तसाच युद्ध करूं लागला. अभिमन्यूसुद्धां कांहीं कच्चा वीर नव्हता. जेव्हां साध्या बाण वृष्टीनें कांहीं भागत नाहीं असें दिसलें तेव्हां लक्ष्मणानें शक्ति सोडण्यास सुरवात केली. पण अभिमन्यूनें त्या सर्व बाणांना



छाटून टाकलें. एवढ्यांत तेथें कृप आला व लक्ष्मणाला आपल्या रथांत घालून घेऊन गेला.

संध्याकाळच्या सुमारास सात्यकीचा जोर फार वाढला होता. तो शेतें कापल्या प्रमाणें कौरव सेना कापीत चालला होता. त्याचें हें काम पाहून दुर्योधनानें आपलें रथांचें सैन्य त्याचें पारिपत्य करण्यास पाठविलें. सात्यकीला अवसान चढलें होतें. त्यानें त्यांचाहि नाश करण्यास प्रारंभ केला. भूरिश्रवानें पाहिलें कीं सात्यकीचा नाश केल्याशिवाय भागणार नाहीं. म्हणून तो नव्या दमानें त्याच्यावर चालून गेला.






सात्यकीचें सैन्य भूरिश्रवापुढें टिकाव धरूं शकलें नाहीं. तें रणांगण सोडून पळून गेलें.

त्या नंतर सात्यकीचा पुत्र चित्रवर्मा भूरिश्रवाला म्हणाला—"तूं आमच्यापैकीं एकेकाशीं युद्ध करतोस का सर्वांशीं एकदम युद्ध करतोस!" भूरिश्रवा उत्तम योद्धा असल्यानें त्यानें सर्वांशीं एकदम युद्ध करण्याचेंच ठरविलें. सात्यकीच्या मुलांना वाटलें कीं आपण सर्वांनी त्याच्यावर एकदम बाण सोडले तर त्याचा पराभव होईल. म्हणून त्यांनीं एकदम भूरिश्रवावर बाण सोडण्यास सुरवात केली. पण भूरिश्रवापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. त्यानें त्या सर्वांचे बाण मध्येंच अडविले आणि मग एक एक करून त्यांना धारातीर्थीं निजविलें.

पुत्रांचा नाश झालेला पाहून सात्यकीला संताप आला. त्यानें भूरिश्रवाशीं घनघोर युद्ध सुरू केलें. दोघांनीं एकमेकांचें धनुष्य तोडलें, रथ मोडले, घोडे मारले व शेवटीं ते तलवार घेऊन आपसांत लढूं लागले. भीमानें सात्यकीला चटकन आपल्या रथांत बसविलें. तें पाहून दुर्योधनानें भूरिश्रवाला आपल्या रथांत बसविलें. पण हा वेळपर्यंत संध्याकाळ होऊन गेल्यामुळें युद्ध बंद करावें लागलें.



त्या रात्रीं कांहीं विशेष असें घडलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं दोन्ही पक्षांचीं सैन्यें सुसज्ज होऊन सूर्योदयाचे सुमारास रणांगणावर येऊन दाखल झालीं. त्या दिवशीं पांडव सैन्य मकरव्यूहांत उभें केलें होतें आणि कौरव सेना क्रौंच व्यूहांत रचली होती.

युद्धाच्या सुरवातीला द्रोण व भीम यांची गांठ पडली. द्रोणानें भीमाच्या मर्मस्थलांवर बाण मारण्यास आरंभ केला. अर्थातच भीमाला त्याचा राग आला. त्यानें क्रुद्ध होऊन द्रोणाच्या सारथ्याला एका बाणासरशी खालीं पाडलें. बिचारा सारथी गतप्राण होऊन रथाखालीं पडला. रथांत दुसरें कोणीहि नसल्यानें द्रोणाला स्वतःच आपलें सारथ्य करावें लागलें. त्याचें युद्धहि चालू होतें.

भीम आवेशानें लढत होता. त्यानें आपली नजर आतां कौरवबंधूंकडे वळविली. त्या सर्वांना एकत्र पाहून भीमाला भीष्माची आठवण देखील झाली नाहीं. तो निधड्या छातीनें कौरवांच्या घोळक्यांत शिरला. कौरवांना वाटलें, बरा सांपडला आहे. त्याला जिवंत पकडावें म्हणून दुःशासन, दुर्विषह, दुस्सह, दुर्मद, जय,





जयसेन, विकर्ण, चित्रसेन, सुदर्शन, सुवर्मा, चारुचित्र, दुष्कर्ण वगैरेंनीं त्याच्या भोंवतीं गराडा घातला तरी सुद्धां भीम जरासुद्धां भ्याला नाहीं. त्याला कळलें कीं ते त्याला पकडणार आहेत. म्हणून तो त्यांच्यावर हल्ला करूं लागला.

भीम आवेशानें कोठें तरी लढत गेल्याचें पाहून धृष्टद्युम्न द्रोणाचार्यांना सोडून भीमाच्या रथाजवळ आला. पण काय ? रथांत कोणी नव्हतें. तो घाबरला आणि त्याच्या सारथ्याला विचारलें कीं भीम कोठें आहे.

"मला थोडा वेळ येथेंच थांबण्यास सांगून ते कौरवांना मारण्याच्या इरावानें त्यांच्या सैन्यांत घुसले आहेत." विशोकानें सांगितलें.

भीमाशिवाय सर्व व्यर्थ आहे. असा विचार करून तो पुढें गेला. थोड्या अंतरावर त्याला भीम दिसला. तो आपल्या गदेनें हत्तींचा संहार करीत होता, रथ मोडत होता, मोठमोठ्यानें गर्जना करून कौरवांना आव्हान करीत होता. सर्व जण हाहाकार करीत होते आणि त्याच्यावर बाण सोडीत होते. त्यामुळें त्याला पुष्कळ बाण लागले होते.

धृष्टद्युम्नानें तेथें जातांच त्याला आपल्या रथांत बसवून घेतलें. त्याच्या शरिरांतील बाण काढले आणि त्याला कडकडून मिठी मारली. ह्या दोघांना पाहून दुर्योधनानें त्यांच्यावर बाण सोडण्यास सुरवात केली. कौरवांना एके ठिकाणीं असलेले पाहून धृष्टद्युम्नानें त्यांच्यावर सम्मोहनास्त्राचा प्रयोग केला आणि त्या सर्वांना मूर्च्छित करून टाकलें.

द्रोण द्रुपदाशीं लढत होता. त्याला जेव्हां समजलें कीं सर्व कौरव मूर्च्छित झाले आहेत तेव्हां तो तें युद्ध सोडून कौरव जेथें पडले होते तेथें आला. त्यानें आपल्या



प्रज्ञास्त्रानें सर्वांची मूर्च्छा दूर केली. थोड्याच वेळांत सर्व कौरव पुन्हां शुद्धीवर आले. लागलीच ते सर्व भीमावर तुटून पडले. दुर्योधन तर इतका तापला होता कीं त्यानें कांहीं विचार न करतां भीमाशीं भयंकर युद्ध आरंभिलें.

दुपार झाली होती. सूर्य डोक्यावर चढून पश्चिमेकडे झुकूं लागला होता. सकाळपासून युद्ध करीत असल्यानें भीम अगदीं थकून गेला होता. तरी युद्ध थांबण्याची लक्षणें न दिसल्यानें युधिष्ठिरानें अभिमन्यु, धृष्टकेतु केकेय वगैरेंच्या बरोबर बारा योध्यांना भीमाच्या मदतीस पाठवून दिलें. एवढी मदत येत असलेली पाहून कौरव रणांगणावरून पळून गेले. त्यानंतर भीम पण परतला. परंतु त्याला वाईट वाटलें. कारण त्या दिवशीं संधि मिळून सुद्धां एकहि कौरव त्याच्या हातून मारला गेला नाहीं.

दुपारपासून संध्याकाळपर्यंत दोन्हीं सैन्यांत फार मोठें युद्ध झालें. भीमानें आपल्या पराक्रमानें सर्व शत्रु वीरांना 'दे माय धरणी ठाय' करून सोडलें. इकडे भीष्म पांडव सेनेचा संहार करण्यांत गुंतला होता तर तिकडे अर्जुन कौरवसेनेला नामशेष करण्याच्या प्रयत्नांत होता. सूर्यास्त होतां होतां पुन्हां



भीम व दुर्योधनाचें जुंपलें. दोघेहि झुंजार वीर हत्तीप्रमाणें एकमेकांवर तुटून पडले. भीमानें आपल्या प्रखर बाणांनीं दुर्योधनाच्या सारथ्यास मारलें. घोडे मारले. रथ मोडला ह्या झटापटींत दुर्योधन बाण लागून जखमी झाला. कृपानें हें पाहिलें व तावडतोब आपल्या रथांत त्याला बसवून घेतलें.

दुर्योधन जातांच सैन्धव भीमावर तुटून पडला. जवळच असलेले अभिमन्यु केकेय आदि वीर त्याच्याशीं युद्धास पुढें झाले. ह्यावेळीं दुर्योधनाचा भाऊ विकर्ण अभिमन्यूच्या बाणांनीं मारला गेला.

श्रुतवर्मानें दुर्मुखाला मारलें. नकुल पुत्र शतानिकानें दुष्कर्णाला मारलें. ह्याप्रमाणें कित्येक कौरव राजकुमार मारले जाऊन त्या दिवसाचें युद्ध संपलें.

सूर्यास्त होतांच सर्व सैनिक आपापल्या शिबिरांत गेले. प्रत्येकजण आपापला पराक्रम वर्णन करून सांगत होता आणि रणांगणांत पाहिलेल्या पराक्रमाची मुक्त कंठानें प्रशंसा करीत होता.

आज दुर्योधन जखमी झाल्यामुळें फार दुःखी होता. तो भीष्माकडे गेला आणि म्हणाला—"आजोबा ! पहा हे पांडव आपला सर्वांत कठीण आणि अभेद्य म्हणून ठरलेले व्यूह सुद्धां सहज भेदून जात आहेत. आज तर भीमानें अगदीं उच्छाद मांडला आहे. केवढी जखम झाली आहे मला. मला वाटतें आज आपले बरेच वीर त्याच्या गदा प्रहाराला बळी पडले आहेत. एवढेंच नव्हें तर आज आम्हीं रणभूमीवरच मूर्च्छित होऊन पडलों होतों. तेव्हांपासून माझें मन अगदीं अस्वस्थ झालें आहे. आतां पांडवांच्यावर विजय मिळविणें केवळ आपल्या हातांत आहे."

दुर्योधनाला विशेष दुःखी झालेला पाहून भीष्म म्हणाला—"राजा, तुला जय मिळावा म्हणून मीच काय पण आपल्याकडील द्रोण, अश्वत्थामा शल्य आदि वीर प्राणपणानें लढत आहेत. ह्यांत आतां जय कोणाचा होईल, त्यांचा कीं आपला हें मात्र सांगतां येत नाहीं. कारण पांडव वीर आहेत. त्यांना जिंकणें कठीण आहे."

नंतर दुर्योधनाला शांत झोप यावी आणि चांगली विश्रांति मिळावी म्हणून "विशल्यकरणी" नांवाची एक वनस्पती देऊन त्याला त्याच्या शिबिरांत पाठवून दिलें.






[१२]

[शंख मांत्रिकाच्या डोंगराळ प्रदेशांत चंद्रवर्मा व कपालिनी यांची अचानक भेट झाली. दोघांनीं मिळून शंखाचा कडेलोट करावयाचें ठरविलें. ठरल्याप्रमाणें दोघें एका जागीं बसून राहिली. शंख सूर्योदयापूर्वी नित्याप्रमाणें त्या चौकोनी दगडावर येऊन उभा राहिला. चंद्रवर्मानें त्याच वेळीं दोरी ओढून त्याला खालीं पाडलें. परंतु शंखानें खालीं पडण्यापूर्वीं आपलें पूजागृह मंत्र टाकून तलावांत नेऊन टाकलें. पुढें वाचा.]

शंख मांत्रिकाला 'दगा' 'दगा' असें जोरानें ओरडतांना पाहून आणि हातांतील जादूची कांडी पूजागृहाकडे फेंकतांना पाहून कपालिनीचा सर्व धीर जणुं कांहीं एकाएकीं खचला व ती मटकन खालीं बसली. इतक्यांत शंखाचें पूजागृह हवेंत उडूं लागलेलें पाहून चंद्रवर्मा तर किंकर्तव्य विमूढ जागच्याजागीं उभा राहिला. तो स्वतःला सावरून पूजागृहाकडे पाहूं लागला. पण तेवढ्यांत तें खालीं सरोवरांत जाऊन पडलें. चंद्रवर्मा स्वतःच घाबरून गेला होता, तर मग तो कपालिनीकडे काय लक्ष देणार ? त्यामुळें ती खालीं पडल्याचें त्याला समजलें नाहीं.

"वर्मा" असा अगदीं खोल आवाजांत म्हटलेला शब्द त्याच्या कानांवर येतांच तो एकदम शुद्धीवर आला. इकडे तिकडे पाहिलें.



तों त्याला कपालिनी दिसली. ती मोठ्या प्रयासानें एका दगडाच्या आधारानें उठण्याच्या प्रयत्न करीत होती. लगेच पुढें जाऊन् चंद्रवर्मानें आपल्या हाताचा आधार देऊन तिला उठविलें.

उठतां उठतां ती म्हणाली–" वर्मा जें दुर्दैव माझ्या वाट्यांस आलें आहे तेंच तुझ्याहि वांट्यास आल्यासारखें वाटतें. शंखानें अगदीं शेवटल्या क्षणीं आमच्या सर्व प्रयत्नांवर पाणी ओतलें. पुन्हां आपली पहिल्या-प्रमाणेंच असहाय स्थिति झाली आहे. आपण आपलें ठिकाण सोडून वाटेंतील संकटांना तोंड देत देत, मरतां मरतां शंखाच्या ह्या डोंगरापर्यंत आलों. पण शेवटीं आपल्या वांटणीला काय आलें? निराशा, केवळ निराशा. दुर्भाग्य जणूं हात धुवून पाठीस लागलें आहे. त्यामुळें कष्ट करून तरी काय उपयोग झाला? कांहीं नाहीं. सर्व कांहीं माती मोल झालें."

कपालिनीच्या ह्या बोलण्यावरून चंद्रवर्मानें ताडलें कीं कपालिनीचे सर्व प्रयत्न फोल झाले. पूजागृह पाण्यांत पडल्यामुळें पाणी उसळून वर येत होतें. त्या लाटांच्याकडे एकदां पाहून तो म्हणाला–" त्या पूजागृहाबरोबर तो मंत्रवलेला शंख पण पाण्यांत बुडाला असेल असें वाटतें का तुला?"

"वाटतें नव्हें, खरोखरच तो पाण्यांत पडला आहे. एक शंखच काय? त्याच्या त्या घरांत अशा किती तरी वस्तु होत्या एकाहून एक मंत्रशक्ति असलेल्या. मी फक्त एक शंखच मागत होतें. शत्रूच्या हातून आपलें राज्य पुन्हां परत मिळविण्यासाठीं उपयोगी पडण्यासारख्या कित्येक वस्तू त्यांत होत्या. पुन्हां आपण मात्र 'जैसे थे'. सर्व प्रयत्न निष्फळ गेले." एक लांब सुसकारा सोडीत कपालिनी म्हणाली.



आपल्याला उपयोगी पडणाऱ्या वस्तू आपल्या हातांत येतां येतां निसटल्या. ह्याचें चंद्रवर्माला क्षणिक दुःख वाटलें. पण त्यानें मन घट्ट केलें. म्हणाला–" जें झालें तें झालें. आतां त्याच्यासाठीं दुःख करण्यांत काय फायदा आहे? आपण एवढ्यांतच समाधान मानूं कीं एक दुष्ट मांत्रिक ह्या जगांतून नाहींसा झाला." इतकें बोलून चंद्रवर्मा थांबला. क्षणांत कांहीं तरी त्याला आठवलें. तो डोळे विस्फारित करून म्हणाला– "कपालिनी, तुला तारुण्य देणारा शंख तर ह्या पाण्यांत बुडून गेला. मग तशी दुसरी कोणची वस्तु आहे? आणि ती कोठें मिळेल."

"आतां सारें जग पालथें घातलेंस तरी तशी वस्तु मिळणार नाहीं. तशी वस्तूच ह्या जगांत राहिली नाहीं." कपालिनी निराशेनें बोलत होती–" माझ्या इतकें वयोवृद्ध ह्या जगांत कोणीहि माणूस नाहीं आणि आतां हें असेंच जीवन कंठत राहाण्याची मला इच्छाहि नाहीं. मला एकहि अशी नवी वस्तु दिसत नाहीं कीं जिचा उपभोग घेण्याचा मला मोह होईल. आनंद तर राहूं देच, मला एका गोष्टीचें फार दुःख होत आहे. तूं माझ्यासाठीं इतके



कष्ट सोसलेस. इतक्या संकटांशीं झुंजलास. मृत्यूच्या मुखांत उडी घेतलीस आणि शेवटीं मी तुझी कोणच्याहि प्रकारें मदत करूं शकत नाहीं. हीच गोष्ट मनाला राहून राहून बोचत आहे."

कपालिनी जसजशी बोलत होती तसतसा तिच्या बद्दलचा आदर भाव चंद्रवर्माच्या मनांत वाढत होता. आपले सर्व प्रयत्न निष्फळ झाल्याचें तिला फार दुःख होत होतें आणि त्यांतल्या त्यांत चंद्रवर्माची मदत करण्याचें एका बाजूला राहून त्याला संकटांत पाड-ल्याचेंच तिला जास्त दुःख वाटत होतें.



"कपालिनी, तूं असं कां समजतेस ? तूं ऐन वेळीं माझी मदत केली आहेस. ज्यावेळीं मी नदींत पडून वाहात वाहात तुझ्या प्रदेशांत आलों तेव्हां मी जीवनाची आशाच सोडून दिली होती. पण आपल्या घरीं नेऊन तूं माझे प्राण वांचविलेस. तुझे हे उपकार काय कमी आहेत. तुझे उपकार मी कधींहि विसरूं शकणार नाहीं. तुला ह्याच्यासाठीं खेद वाटण्याचें कारण नाहीं." चंद्रवर्मा सांत्वना देत म्हणाला.

जवळच्या डोंगराकडे बोट दाखवून कपालिनी म्हणाली—"वर्मा, ह्या पुढील आपले दोघांचे मार्ग निरनिराळे आहेत. मी माझें राहिलेलें आयुष्य ह्या डोंगरावर घालविणार आहे. आयुष्याचे अखेरचे दिवस स्वस्थ चित्तानें एका जागीं राहून घालविणें बरें असतें."

"ठीक आहे. मग मी आणि कालसर्प मिळून तुझ्यासाठीं ह्या डोंगरावर एक झोपडी बांधण्याचा प्रयत्न करतों. चल आपण डोंगरावर जाऊं." असें म्हणत चंद्रवर्मा पाऊल वाटेनें डोंगराकडे निघाला. त्याच्या मागोमाग कपालिनी आणि कालसर्प सुद्धां जाऊं लागले.

चंद्रवर्मा डोंगरावर गेला व ज्या ठिकाणाहून शंख खालीं पडला होता तेथें जाऊन उभा राहिला. तेथून चहूं बाजूंना दृष्टि फेंकून त्यानें खालीं पाहिलें. तेथें दगडावर पालथा पडलेला शंख मांत्रिक त्याला दिसला. त्यानें थोडा वेळ त्याला निरखून पाहिलें. तेव्हां त्याला वाटलें कीं शंखाचा हात थोडा थोडा हलतो आहे. त्याला जिवंत असलेला पाहून त्याचा क्रोध बळावला. तो कपालिनीला म्हणाला—"मला वाटतें आहे कीं तो दुष्ट मांत्रिक अद्याप मेलेला नाहीं. जर का यदाकदाचित तो खराच जिवंत राहिला असेल तर मात्र आपली धडगत नाहीं. म्हणून म्हणतों त्याचा पूर्ण नायनाट केलेला बरा." असें म्हणत त्यानें एक भला मोठा दगड घेतला आणि नेम धरून त्याच्या डोक्यावर मारला.

थोड्या वेळानें दोघं शंखाचें पूजागृह ज्या ठिकाणीं होतें तेथें येऊन पोचलीं. त्या जागीं पूजागृहाचा फक्त पायाच दिसत होता. चंद्रवर्मानें तो पाया दाखविला व म्हणाला—"कपालिनी ! तुझ्यासाठीं या पायावरच घर बांधतां येईल."

कपालिनीनें मान हलवून होकार दिला. तोंपर्यंत सूर्य चांगला डोक्यावर आला होता. पूर्वेकडे पाहून चंद्रवर्मा म्हणाला—"फार भूक लागली आहे मला. कांहीं तरी खायला मिळेल तर खाऊन पिऊन कामाला लागावें, म्हणतों. फळांकरितां पुन्हां डोंगर उतरून खालीं जावें लागेल." त्यानें एकदां डोंगराखालीं दूरवर पाहून दीर्घश्वास सोडला.

चंद्रवर्मा दमला आहे हें पाहून कपालिनी कालसर्पाला म्हणाली—"कृष्णसर्पा ! घे तुझें मानव रूप. मी तुला तें परत देत आहें. आज पासून तूं स्वतंत्र आहेस. तुला वाटेल तिकडे तुला जातां येईल." असें सांगून तिनें कांहीं तरी मंत्र म्हटला आणि आपली जादूची कांडी फिरविली. त्याबरोबर एक सुंदर सहा फूट उंच तरुण त्यांच्यासमोर उभा राहिला. त्यानें कपालिनीला लवून नमस्कार केला आणि म्हणाला—

"कपालिनी, मी तुझ्या या उपकाराबद्दल आभारी आहें. जन्मोजन्मीं मी या उपकाराची फेड करूं शकेन असें मला वाटत नाहीं." असें सांगून त्यानें प्रथम कपालिनीला व नंतर चंद्रवर्माला नमस्कार केला.

"तुझें पूर्वी काय नांव होतें हें मला माहीत नाहीं. सर्पकेतु नांवाचा माझा एक शत्रु आहे. तूं माझा मित्र आहेस. म्हणून मी तुझें नांव कालकेतु असें ठेवितों." चंद्रवर्मा म्हणाला.





"कबूल! मला हें नांव फार आवडलें आहे. मी एक दिवस खात्रीनें तुझ्या शत्रूचा वध करून आपलें कालकेतु हें नांव सार्थक करीन." तो तरुण म्हणाला.

नंतर तो तरुण डोंगरावरून खालीं उतरला. तलावाकाठच्या मळ्यांत जाऊन त्यानें निरनिराळ्या प्रकारचीं फळें तोडून आणलीं. तिघांनीं मिळून पोटभर फळें खाल्लीं आणि पाणी पिऊन थोडा वेळ विश्राम केला.

थोडा वेळ विश्राम करून चंद्रवर्मा व कालकेतु दोघांनीं मिळून शंखाच्या पूजागृहाच्या पायावर कपालिनीसाठीं एक घर बांधण्यास सुरवात केली व संध्याकाळपर्यंत तें काम पुरें देखील झालें.

त्या घरांत त्यांनीं सर्वांनीं ती रात्र काढली. मध्य रात्र झाली तरी चंद्रवर्माला मात्र झोंप आली नाहीं. आपल्या पुढील आयुष्याविषयीं विचार त्याच्या मनांत घोळत होते.

कपालिनीच्या मदतीनें आपलें राज्य परत मिळविण्याचीं स्वप्नें आतां व्यास गेलीं होतीं. त्याचे सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले होते. आपल्या वडिलांचा विश्वासघातानें खून करणारा सर्पकेतु आतां माहिष्मतीच्या सिंहासनावर बसला असणार व प्रजेचा छळ करीत असणार. त्याला जिंकून परत आपलें राज्य मिळविणें म्हणजे सोपें काम नव्हें. मोठ्या सैन्याची जमवाजमव करावी लागेल आणि किती खर्च होईल!

मला हें एवढें सैन्य कोठून मिळणार आणि धन तरी कोठून मिळणार?

याच विचारांत चंद्रवर्माला झोंप लागली नाहीं. तो उठून बाहेर चांदण्यांत फिरत विचार करूं लागला. थोड्या वेळानें कालकेतूची झोंप मोडली. चंद्रवर्माला जागेवर न पाहून तो उठून बाहेर आला व विचारलें—"अहो! इतक्या लवकर उठून काय करतां



आहां? कसला विचार चालला आहे?"

"कालकेतु, माझ्यासमोर मोठा प्रश्न उभा आहे." चंद्रवर्मा इतकें सांगून पुढें म्हणाला—"तुला माहीतच आहे कीं मी स्वतःचें राज्य घालवून तें परत मिळविण्याच्या इच्छेनें रानोमाळ हिंडत होतों. कपालिनीच्या मदतीनें मी तें परत मिळवूं शकेन. असें मला वाटत होतें. परंतु आतां तें पूजागृह सरोवराच्या तळाला जाऊन बसलें आहे. मनुष्यवस्ती येथून किती दूर आहे व तेथें पोंचणें किती दुरापास्त आहे हें तुला माहीतच आहे." चंद्रवर्मा हताश होऊन म्हणाला.

"शंभर योजनांवर उत्तरेकडे मनुष्य वस्ती आहे. मी आपणांबरोबर आलों असतों. परंतु कपालिनीला सोडून कसें यायचें? ती दोन तीन वर्षांची पाहुणी आहे. पण मी आपणाजवळ खात्रीनें येऊन पोंचेन व आपली मदत करीन." कालकेतु म्हणाला.

परंतु चंद्रवर्माच्या मनांत त्याच्या बोलण्यानें थोडा देखील उत्साह वाढला नाहीं. हें शंभर मैल अंतर चालत जाणें म्हणजे एक समुद्रच पार करून जाणें आहे. चंद्रवर्मा उजाडेपर्यंत हाच विचार करीत बसला होता. उजाडल्यावर त्यानें आंघोळ केली. नंतर



कपालिनी जवळ जाऊन तिचा निरोप घेतांना म्हणाला—"आतां मला पुढला मार्ग पाहिला पाहिजे. तूं आपल्या शक्तीप्रमाणें प्रयत्न केलास. पण तुला यश मिळालें नाहीं. नाइलाज."

कपालिनी आशीर्वाद देत म्हणाली—"वर्मा! तुझ्यावर किती संकटें ओढवलीं तरी माझी खात्री आहे कीं तुला तुझें राज्य परत मिळेल.

नंतर चंद्रवर्मा कपालिनी व कालकेतूचा निरोप घेऊन डोंगराच्या पायथ्याशीं आला व उत्तर दिशेनें जाऊन जंगलांतून मार्ग

कादीत पुढें जाऊं लागला. दुपार झाली. सूर्य डोक्यावर आला. चंद्रवर्मा अगदीं थकून गेला होता. विश्रांतीसाठीं तो एका झाडाखालीं बसला. जरा आडवें व्हावें म्हणून तेथेंच झाडाखालीं तो निजावयास सोईची जागा पाहूं लागला. तोंच त्याला तेथें एक चार फूट लांबीची लोखंडाची सांखळी दिसली. असल्या निर्जन अरण्यांत ती सांखळी पाहून त्याला आश्चर्य वाटलें. कुतूहलानें तो निरखून पाहूं लागला. ती गंजलेली असून फार दिवसापासून तेथेंच पडली असावी असें वाटलें त्याला. ती सांखळी येथें कशी आली असेल? हा विचार मनांत येऊन तो थोडा वेळ स्तब्ध राहिला. तेवढ्यांत त्याला कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज आला. तो भयंकर व कर्णकठोर आवाज ऐकून तो भानावर आला. आपल्या संरक्षणासाठीं त्यानें तलवार उपसली आणि पवित्रा साधून सावधगिरीनें उभा राहिला. आवाजाच्या रोखानें त्यानें नजर वळविली. तेव्हां दुरून एक मोठा कुत्रा धांवत धांवत त्याच्याकडेच येत असल्याचें त्याला कळलें. त्याला पाहतांच हा कुत्रा साधारण नसून कोणीतरी भयंकर राक्षसानें असें रूप घेतलें असावें असें त्याला वाटलें.

जसजसा तो जवळ येऊं लागला तसतसा वर्मा जास्तच सावध होऊन त्याच्याकडे टक लावून पाहूं लागला. त्याच वेळीं तो कुत्रा इतका जवळ आला होता कीं जवळच्या झाडींतून त्याच्या भुंकण्याचा शब्द ऐकूं आला. तो बाणाप्रमाणें आपल्या अंगावर तुटून पडणार ह्या कल्पनेनें, वेळेला हत्याराप्रमाणें उपयोग करतां येईल म्हणून ती सांखळी सुद्धां हातांत घट्ट धरून कुत्र्याच्या हालचालीवर चंद्रवर्मानें नजर रोखली होती. (पुढें चालू)



# विनाकारण मोडलेलें लग्न

विक्रमार्क कांहींहि न बोलतां त्या वडाच्या झाडाजवळ गेला. तें शव उचलून खांद्यावर टाकलें आणि स्मशानाच्या वाटेनें चालूं लागला. चार पावलें गेला असेल नसेल तों शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, मला हें समजत नाहीं कीं तूं हें सर्व कशासाठीं करीत आहेस. मला असें वाटतें कीं तूं प्रमोदप्रमाणें व्यर्थ आपल्या सुखाला आंचवत आहेस. तो आपल्या सुखाला कसा आंचवला, ती गोष्ट तुला सांगतो. ऐक म्हणजे तुला चालण्याचे कष्ट पण भासणार नाहींत."

गौतमी नदीच्या डोंगराळ प्रदेशांत एके ठिकाणीं एक मोठें खोरें होतें. त्यांत कांहीं घरें होती. तेवढेंच तेथील गांव. त्यांत राहाणाऱ्या लोकांचा बाहेरील जगाशीं कधीं



संबंध येत नसे. तेथें सूर्यकिरणें उशीरां पोहोचत असत. त्या खोऱ्यांत जागोजागीं पाण्याचे ओहोळ असल्यानें तेथील लोकांनीं सुंदर बागा व मळे लावले होते. शेतें बनविली होतीं. त्यामुळें ती जागा स्वर्गातील नंदनवनासारखी वाटत होती.

प्रमोदचे वडील ह्याच गांवांत राहात होते. तेथेंच प्रमोदचा जन्म झाला. तो सुखवस्तु बापाचा एकुलता एक मुलगा होता.

एकदां प्रमोद आपल्या बापाबरोबर फिरावयास गेला. त्यावेळीं त्याचें वय पांच सहा वर्षांचें असेल. फिरत फिरत ते दोघे घाट चढून टेंकडीच्या एका टोंकावर पोहोंचले. दूर वरचा प्रदेश पाहून प्रमोदला आश्चर्य वाटलें. तो आपल्या बापाला म्हणाला—'बाबा, जग इतकें का मोठें आहे?"

"अरे जग फार मोठें आहे. त्यांत मोठमोठीं शहरें आहेत. मोठमोठे पर्वत आहेत, नद्या आहेत, समुद्र आहेत." बाप म्हणाला.

प्रमोद फार चौकस होता. तो रोज जगाविषयीं आपल्या बापाला विचारीत असे. जसजशी त्याला माहिती मिळत गेली तसतशी जग पाहाण्याची त्याची उत्सुकता वाढत गेली. तो नेहमीं त्याचाच विचार करूं लागला.

प्रमोद सोळा वर्षांचा झाला. त्याला जगाचा फेरफटका करून येण्याची आतां अनावर इच्छा झाली. त्याच सुमारास त्यांच्या गांवांत परगांवाहून एक रहस्थ आला. प्रमोदनें त्याच्याशीं ओळख करून घेऊन मैत्री केली. त्याच्याकडून जगांतील अनेक आश्चर्यकारक गोष्टीं विषयीं माहिती मिळविली. तो मोठ्या आवेशानें म्हणाला—"हाय, माझें सारें आयुष्य ह्या येथेंच गेलें. हें सर्व जग मी केव्हां एकदां पाहीन असें झालें आहे मला."

"ह्या विशाल विश्वाला पाहून किंवा पर्वत, खोरीं, नद्या व समुद्र पाहून का तुला जास्त सुख मिळेल? अरे, मोठमोठ्या राजवाड्यांत सुद्धां आनंद, सुख व शान्ति मिळत नाहीं. तुला आनंद आणि सुख पाहिजे असेल, तर तूं ही जागा सोडून कोठेंहि जाऊं नकोस." त्या परदेशी गृहस्थानें सांगितलें.

"एवढें मोठें जग असून ह्या एका ल्हानशा खोऱ्यांत बसण्यांत काय मजा आहे?" प्रमोद म्हणाला.

"हें जग एवढें मोठें आहे कीं त्यांतील सर्व ठिकाणीं हिंडणें कोणालाच शक्य होत नाहीं. आणि फक्त हें एक जगच काय? ही सृष्टि किती मोठी आहे ह्याचा विचार कर. हें आपल्या डोक्यावरचें आकाश पहा. ह्यांत असंख्य तारे आहेत, तेथपर्यंत पोहोंचणें काय शक्य आहे? आपल्या जगासारखीं कितीतरी जगें आहेत. हें सर्व पाहाणें काय शक्य आहे?" त्या गृहस्थानें प्रमोदला सृष्टिची कल्पना दिली. त्याचा परिणाम असा झाला कीं प्रमोदचा जग पाहण्याचा उत्साह कमी झाला. आपलें गांव सोडून सुद्धां तो कोठें गेला नाहीं. आपल्या संपत्तीची देखरेख करीत त्याच गांवांत सुखानें राहूं लागला.



प्रमोद तेथेंच राहिला खरा पण त्याच्या चित्ताला शांति नव्हती. गांवांत त्याची सर्वांशीं ओळखी असून सुद्धां सर्व त्याच्या पासून दूर राहात असत.

प्रमोद आतां लग्नाला झाला होता. गांवांत योग्य अशा बऱ्याच मुली होत्या. पण त्याला त्यांत एक सुद्धां पसंत पडली नाहीं. कांहीं दिवसांनीं त्यानें लग्नाचा विचारहि सोडून दिला.

त्या खोऱ्यांत कुलशेखर नांवाचा एक रहिवाशी होता. तो प्रमोदला म्हणाला—"मला एक महीनाभर तुझ्या घरांत राहावयास



जागा दे. कारण मी घर बांधायला काढलें आहे. आणि तें बहुतेक एका महिन्यांत बांधून होईल."

प्रमोद आपल्या दोघां नोकरांबरोबर राहात असे. त्यामुळें त्याचें घर रिकामेंच होतें. त्यानें कुलशेखरला राहावयास जागा दिली. तो आपली मुलगी मंदाकिनी हिला घेऊन तेथें राहावयास गेला.

प्रमोदनें ऐकलें होतें की मंदाकिनी सुंदर आहे आणि तिनें पुष्कळशा मुलांना लग्नाला नकार दिला होता. त्याच्या घरांत राहावयास आल्यापासुन प्रमोदला तिच्या विषयीं आकर्षण वाटूं लागलें होतें. दिवसें-दिवस त्याचें हें आकर्षण प्रेमांत बदललें. तरी त्यानें आपल्या वागण्यांतील मर्यादा सोडली नाहीं, किंवा कसल्याहि तऱ्हेचा उतावळेपणा दाखविला नाहीं. त्यानें कुल-शेखराजवळ गोष्ट काढली. तो म्हणाला—"तुम्हांला आणि तुमच्या मुलीला जर कांहीं हरकत नसेल तर मला तुमच्या मुलीशीं विवाह करण्याची इच्छा आहे."

कुलशेखरानें होकार दिला. लग्न ठरलें. फक्त मुहूर्तच ठरावयाचा बाकी होता. बाकी सर्व ठीक झालें.

अशा परिस्थितींत एकदां तीं दोघें डोंगरावरून बोलत बोलत येत होतीं. वाटेंत त्यांना एके ठिकाणीं सुंदर सुवासिक फुलें दिसलीं. मन्दाकिनीनें तीं तोडलीं आणि कांहीं आपल्या डोक्यांत घालून कांहीं हातांत तशीच घेऊन प्रमोदकडे आली.

तिच्या हातांत तीं सुंदर फुलें पाहून प्रमोद म्हणाला—"फुलें झाडांवरच चांगली दिसतात आणि ती पाहून मनाला आनंद होतो."

"मला तर फुलें पाहिल्याबरोबर ती तोडून घेण्याचा अनावर मोह होतो. मला फुलें फार आवडतात." मन्दाकिनी म्हणाली.

दोघें बोलत बोलत घरीं गेलीं. दुसरा दिवस उजाडला. सकाळीं मन्दाकिनी दृष्टीस पडतांच प्रमोद म्हणाला—"रात्रभर एक गोष्ट माझ्या डोक्यांत घोळत होती. तेव्हांच तुला विचारावी म्हणून प्रयत्न केला. म्हणून आतां विचारतों. हें बघ, आपण दोघें सध्यां किती प्रेमानें आणि आनंदानें राहात आहोत. आपल्या आनंदाला पारावर राहात नाहीं. मग लग्न केल्यानेंच काय मोठी त्या सुखांत जास्त भर पडणार आहे? तुला कसें काय वाटतें?"

मन्दाकिनीनें प्रमोदच्या विचारांत बदल झालेला पाहिला. ती म्हणाली—"तुमच्या इच्छेविरुद्ध तुम्ही माझ्याशीं लग्न करावें असें मला मुळींच वाटत नाहीं. लग्नाची गोष्ट तुम्हीच काढलीत. बरें! जें झालें तें झालें, आतां ह्याविषयीं कांहींहि बोलूं नका."

आपल्या विचाराचा मन्दाकिनीला राग आला आहे, हें त्यानें ताडलें. पण तो घालविण्यासाठीं काय करावें हें त्याला कळेना.

त्यानंतर मन्दाकिनीनें आपल्या वडिलांना सांगितलें. ती म्हणाली—"बाबा, मी बराच



विचार केला आणि शेवटीं निश्चय केला आहे कीं कोणत्याहि परिस्थितींत प्रमोदशीं लग्न करणार नाहीं."

मन्दाकिनीच्या ह्या सांगण्यामुळें लग्नाची गोष्ट तेथेंच थांबली. कुलशेखराचें घर बांधून तयार झाल्याबरोबर तो आपल्या मुलीला घेऊन आपल्या घरीं गेला. कांहीं दिवसांनीं सुयोग्य वर शोधून त्यानें आपल्या मुलीचें लग्न करून दिलें. ती आपल्या घरीं सुखानें नांदूं लागली. प्रमोद मात्र जन्मभर अवि-वाहितच राहिला. त्यानंतर तो दुसऱ्या कोणावरहि प्रेम करूं शकला नाहीं.

इतकी गोष्ट सांगून वेताळ थांबला. म्हणाला—"ज्या मुलीवर प्रमोदनें प्रेम केलें, ती मुलगी त्याच्याशीं लग्न करण्यास तयार असून सुद्धां प्रमोदनें नकार दिला. त्यानें हा मूर्खपणा कां केला? जर ह्या प्रश्नाचें उत्तर तूं दिलें नाहींस तर तुझ्या डोक्याचीं छकलें छकलें होऊन जातील."

"हा कांहीं मोठा गहन विचाराचा प्रश्न नाहीं. ह्याचें उत्तर अगदीं सरळ आहे. प्रमोदला नुसता आनंद पाहिजे होता. प्रत्यक्ष अनुभवाची त्याला इच्छा नव्हती. अनुभवाशिवाय नुसता आनंद मिळूं शकतो. ही गोष्ट तो सोळा वर्षांचा असल्यापासून त्याला कळली होती आणि म्हणूनच त्याची जगाचा फेरफटका करण्याची उत्कट इच्छा नाहींशी झाली. त्यानंतर मन्दाकिनीनें जेव्हां झाडाची फुलें तोडलीं तेव्हां त्याला कळून चुकलें कीं प्रत्यक्ष अनुभव घेतल्यावर मग आनंद कमी होतो. त्याचप्रमाणें मन्दाकिनीच्या सान्निध्यानें किंवा सहवासानें आपल्याला जो आनंद होत आहे तो लग्न झाल्यावर राहाणार नाहीं आणि मन्दाकिनीला नुसता आनंद नको होता. तिला अनुभवाचीहि इच्छा होती. म्हणूनच तिनें आपल्या अनुभवसुखासाठीं झाडावरचीं फुलें तोडून घेतलीं. अनुभवाशिवाय नुसता आनंद लुटण्याची इच्छा दाखविणाऱ्या व्यक्तीपासून अनुभव इच्छिणाऱ्या व्यक्तीला काय सुख मिळणार? ही गोष्ट समजूनच मन्दाकिनीनें प्रमोदशीं लग्न करण्याचें नाकारलें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग झाल्यावर वेताळ शवासह अदृश्य झाला आणि पूर्ववत झाडावर लटकूं लागला.

(कल्पित)



# ३. गोमटेश्वर

**फार** वर्षांपूर्वी आपल्या देशांत एक राजा होऊन गेला. त्याला दोन मुलगे होते. वडील गेल्यानंतर त्याचें राज्य कोणास मिळावें. ह्याबद्दल दोघांत वाद झाला. त्याचा परिणाम द्वंद्वांत झाला. त्यांत लहान भावाचा जय झाला. परंतु त्यानें आपल्या मोठ्या भावालाच राज्य दिलें. असें म्हणतात कीं तो उदार धाकट भाऊ म्हणजेच गोमटेश्वर होय.

म्हैसूरहून ६२ मैलावर 'श्रवण बेळगोळ' नांवाचें एक गांव आहे. ह्या गांवाजवळ चंद्रगिरि व इंद्रगिरि नांवाच्या दोन टेंकड्या आहेत. इंद्रगिरीवर गोमटेश्वराची मूर्ति आहे. तिची स्थापना इ. सन् ९८३ मध्यें चामुन्डरायनें केली. चामुन्डराय त्या वेळीं 'गंग' राजाचा मुख्य मंत्री होता. गोमटेश्वर हें जैनांचें क्षेत्र आहे. एके काळीं जैन संस्कृति तेथें भरभराटीस आली होती.

ही मूर्ति इंद्रगिरीच्या एका शिखरावर खोदली आहे. त्यामुळें ती अखंड आहे. ही मूर्ति ५७ फूट उंच आहे. डोकें ६ फूट, पाय ६ फूट पायाची करंगळी २ फूट ९ इंच आणि खांदे २६ फूट आहेत.

ही मूर्ति जगांतील आश्चर्यकारक वस्तूंमध्यें





महाराज दशरथानें श्रीरामचंद्राच्या राज्याभिषेकाचा दिवस निश्चित ठरविला. अयोध्या नगरी आनंद सागरांत बुडून गेली. अयोध्यावासी उत्साहानें राज्याभिषेकाच्या तयारीला लागले. सिंहासन तयार झालें. छत्र चामर तयार झालें. सुवर्ण कलश तयार झाले.

अशा ह्या मंगल प्रसंगीं लोकरंजनार्थ अभिनयकलावंतांना नाट्य प्रयोग करण्याची आज्ञा झाली होती. अवदातिका नांवाच्या सीतेच्या एका दासीनें रेवादेवीजवळ अशोक वृक्षाची एक शाखा मागितली. रेवादेवी ही अभिनेत्र्यांची वेशभूषा करणारी होती. तिनें अवदातिकेला फांदी देण्याचें नाकारलें. याचा तिला राग आला व तिनें वेशभूषा सामग्रींतील वल्कलाची चोरी केली. तिनें ही चोरी गमतीखातरच केली होती तरी खऱ्या चोरीप्रमाणेंच तिला भय वाटत होतें.

तिची ती परिस्थिति सीतेनें ओळखली. ती म्हणाली—“ जा, हीं वल्कलें परत देऊन ये.” तेवढ्यांत तिला वाटलें कीं आपण वल्कलें नेसून पाहावीं. म्हणून ती नेसली सुद्धां. अवदातिकेनें सीतेसमोर आरसा आणून ठेविला.

“ मी आरसा आणावयास गेलें होतें तेव्हां कोणाच्या तरी राज्याभिषेकाची गोष्ट माझ्या कानावर पडली. कोण राजा होणार आहे कोण जाणें.” ती म्हणाली.

“ मामंजींची प्रकृति तर चांगली आहे ना ?” सीतेनें चिंतातूर होऊन विचारलें.

“ महाराजांची प्रकृति उत्तम आहे आणि त्यांनींच राज्याभिषेक ठरविला आहे.” एका दासीनें सांगितलें.

इतक्यांत राजवाड्यांत मंगलवाद्यांचा ध्वनि ऐकूं आला. सर्व जणी आनंदानें घाईगडबडीनें शृंगार करूं लागल्या. इतक्यांत वाद्यें बंद झालीं.

“ हें काय ? राज्याभिषेक रहित झाला कीं काय ! हो, पुष्कळ वेळां एकादें कार्य करण्याचें ठरतें आणि रहित होतें.” सीता म्हणाली. इतक्यांत एका दासीनें येऊन सांगितलें कीं राज्याभिषेकानंतर महाराज वनवासी होणार आहेत.

“ म्हणजे हें अभिषेकाचें पाणी अश्रु धुण्यासाठीं आहे वाटतें ?” सीतानें विचारलें.

श्री रामचंद्र मांडवांत आले. चौरंगावर बसले. मंगलवाद्यें वाजूं लागलीं. पुरोहित सुनिश्रेष्ठ मंत्रोच्चार करून अभिषेक करण्यास आरंभ करणार एवढ्यांत महाराज दशरथानें रामाला बोलाविलें.

रामाला समजलें कीं मंथरेच्या कारस्थानामुळें माझा राज्याभिषेक थांबला आहे. त्याला ह्या गोष्टीचा फार आनंद झाला. आपल्या शिरावरील ओझें कमी झालें, त्याला वाटलें.

ही सर्व हकीगत रामानें सीतेला सांगितली. नंतर सीतेला वल्कलें नेसलेली पाहून तो म्हणाला—“ तुझ्याप्रमाणें वल्कलें धारण करण्याची इच्छा आहे.” म्हणून सीतेनें एका दासीला वल्कलें आणण्यासाठीं पाठविलें.



कैकेयीच्या महालांतून हाहाकाराचा शब्द ऐकूं आला. सर्वजण घाबरलीं. तोंच एका दासीनें सांगितलें कीं कैकेयीनें रामाला राज्य न देतां भरताला देण्यासाठीं हट्ट केला व महाराज दशरथ मूर्छित झाले आहेत. लक्ष्मण तेथेंच होता. तो रागानें म्हणाला—“ त्या कैकेयीला मी आत्ताच्या आत्तां मारून टाकतो.”

“ शांत हो लक्ष्मणा ! अरे, राज्यलोभानें मातापित्यांची हत्या करणार काय तूं ?” रामानें त्याला विचारलें.

“ मला राज्य न मिळाल्याचा राग नाहीं आला दादा ! मला राग आला तो कैकेयी



तुला चौदा वर्षें वनवासास पाठविणार आहे त्याचा." लक्ष्मण नतमस्तक होऊन म्हणाला.

"म्हणूनच महाराज मूर्छित झाले असतील." असें म्हणून रामानें सीतेजवळ वल्कलें मागितलीं आणि रानांत जाण्यासाठीं सिद्ध झाला. तें पाहून सीतेनेंहि त्याच्याबरोबर वनांत जाण्याचा हट्ट धरला. शेवटीं रामानें लक्ष्मणाला सीतेची समजूत घालण्यास सांगितलें. पण झालें उलटेंच.

"वहिनीचें म्हणणें ठीक तर आहे." असें म्हणून लक्ष्मण वल्कलें रामाच्या अंगावर घालून त्याला म्हणाला—"तूं आपल्या सर्व वस्तूंतील अर्ध्या वस्तू मला देतोस. मग ह्या वल्कलांतील अर्धी वल्कलें कां नाहीं मला दिलीस?"

रामानें त्याची समजूत घालण्याची कामगिरी सीतेला दिली. तिनें समजावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु लक्ष्मणानें कांहीं ऐकलें नाहीं. तोहि रामाबरोबर वनांत जाण्यास निघाला. त्यानेंहि वल्कलें परिधान केलीं.

त्या नंतर राम, लक्ष्मण, सीता तिघेहि वनांत जाण्यास निघालीं. राजपथावरून जात असतां त्यांच्या दर्शनासाठीं नगरवासी जमा झाले. ते चाललेच होते कीं दौवारिकानें लगबगीनें येऊन सांगितलें कीं जरा थांबा महाराज येत आहेत.

"वनवासींना कोणास भेटण्याची कांहीं जरूर नाहीं." असें लक्ष्मणानें सांगितलें. रामालाहि तसेंच वाटल्यावरून तोहि लक्ष्मण सीतेसह पुढें निघाला.

हे तिघे वनांत जाण्यास निघालेले ऐकून दशरथाला फार दुःख झालें. कौसल्या व सुमित्रेनें त्याला धीर देण्याचा यत्न करून पाहिला. परंतु जेव्हां सुमंतानें सांगितलें कीं राम, लक्ष्मण व सीता वनांत गेलीं तेव्हां तर त्याचें देहभान गेल्यासारखें झालें. "सुमंता,



भरताला बोलाव." तो म्हणाला. "हे रामा! अहो राम, सीता, लक्ष्मणा मी जातों आतां." असें म्हणत त्यानें प्राण सोडले.

अयोध्येच्या जवळच प्रतिमाशाळा होती. तेथें मृत राजांच्या मूर्ति ठेविल्या जात असत. दशरथ राजाच्या मृत्यूनंतर त्याची मूर्तिहि तेथें ठेविण्यांत आली होती. दर्शनासाठीं महाराण्या तेथें येत असल्यानें त्यांना सजविलें होतें.

भरत मामाच्या घरून येणार म्हणून शत्रुघ्नानें एका दूताला अयोध्येच्या वेशीवर त्याला भेटण्यासाठीं पाठविलें होतें. भरत येतांच दूतानें सांगितलें कीं गांवांतील वयोवृद्धांनीं कृत्तिका नक्षत्र उलटल्यावर आणि रोहिणी लागल्यावर नगरींत प्रवेश करण्यास सांगितलें आहे.

भरत थांबला. अयोध्येंतील कांहींहि हकीगत त्याला माहीत नव्हती. वेळ घालविण्यासाठीं त्यानें इकडे तिकडे हिंडून पाहिलें. त्याला दूर अंतरावर झाडांच्या आड एक गृह दिसलें. ती प्रतिमाशाळाच होती. भरताला त्याविषयीं कांहीं एक माहीत नव्हतें. त्याला वाटलें एकादें देऊळ असेल. म्हणून तो तिकडे गेला. आंत शिरून पाहिलें



तर तेथें कोणीहि नव्हतें. फक्त सजवलेल्या चार मूर्ति त्याला दिसल्या. असतील कोणा देवाच्या म्हणून त्यानें त्यांना दुरूनच नमस्कार केला. इतक्यांत तेथील व्यवस्थापक पुढें आला. म्हणाला—"ह्या मूर्ती देवांच्या नसून मृत राजांच्या आहेत." नंतर त्यानें भरताला त्या मूर्तींची माहिती सांगितली. पहिल्यानें त्यानें राजा दिलीपाची मूर्ति दाखवून त्याच्या पराक्रमाचें, मोठेपणाचें वर्णन केलें. नंतर रघुराजाची मूर्ति दाखवून त्याचें वर्णन केलें. त्यानंतर राजा अज याच्या मूर्तीचाहि परिचय करून दिला. त्याच्या जवळच असलेली

चौथी मूर्ति पाहून भरताला धक्का बसला. तो हतबुद्ध उभा राहिला.

त्यानें पहिल्या तीन प्रतिमांच्या संबंधीं पुनःपुन्हां प्रश्न केले आणि शेवटीं धीर करून म्हणाला–" काय ! येथें जिवंत राजांच्या मूर्ती सुद्धां ठेवल्या जातात ? "

" नाहीं फक्त मृत महाराजांच्याच प्रतिमा येथें ठेविल्या जातात." व्यवस्थापकानें सांगितलें. " थांबा, ह्या चौथ्या मूर्ती विषयीं सुद्धां माहिती करून घ्या. ही महाराज दशरथाची प्रतिमा आहे. ह्यांनीं आपल्या प्रिय पत्नीच्या सुखासाठीं आपले प्राण त्यागिले."

" बाबा ! हाय !!" असें म्हणतां म्हणतां भरताला मूर्च्छा आली. तेव्हांच व्यवस्थापकाला कळलें कीं हा राजकुमार भरत आहे. त्यानें त्याची मूर्च्छा घालविण्यासाठीं प्रयत्न केला. भरत शुद्धीवर आल्यावर त्यानें पित्याविषयीं सर्व माहिती विचारली. तेव्हां राम, लक्ष्मण आणि सीता वनांत गेल्याचेंहि त्याला समजलें. त्यामुळें पुन्हां तो मूर्च्छित झाला. त्याच वेळीं कौसल्या, सुमित्रा, कैकेयी आपल्या दासींच्याबरोबर तेथें येऊन पोहोंचल्या. सुमन्तपण त्यांच्याबरोबर होता.



भरताची मूर्च्छा दूर झाल्यावर त्यानें डोळे उघडले. तोंच नाटकांतील दृश्याप्रमाणें त्याच्या तिघी माता त्याच्यासमोर त्याला दिसल्या. त्यांना पाहातांच झटकन उठून त्यानें कौसल्या व सुमित्रेला नमस्कार केला. परंतु कैकेयीला नमस्कार करण्याऐवजीं दोष देऊं लागला.

भरतानें केलेल्या आरोपाकडे दुर्लक्ष करून ती म्हणाली–" बाळा, काय केलें रे मी. चल लवकर. तुला राज्याभिषेक करण्यासाठीं महामुनि वशिष्ठ तुझी वाट पाहात आहेत."

" ह्या महाराणीचा राज्याभिषेक करा. मला अयोध्येला जावयाचें नाहीं. जेथें राम तेथें माझी अयोध्या." सुमन्ताकडे पाहून भरत गरजला.

त्यानंतर सुमन्ताला घेऊन भरत चित्रकूटावर केला. तेथें त्याला रामाची पर्णकुटी दिसली. त्यानें सुमन्ताला पुढें पाठविलें. म्हणाला–" रामाला सांगा कीं लोभी कैकेयीचा लाडका मुलगा भरत आला आहे."

" वडील माणसाची निंदा करणें बरें नाहीं." सुमन्त म्हणाला.

" ठीक आहे." असें म्हणून भरत स्वतःच ओरडला–" क्रूर कृतघ्न, असभ्य, धूर्त असली तरी एक भावुक व्यक्ति आली आहे."





तो आवाज ऐकून राम म्हणाला—"अगदीं वडिलांच्या आवाजाप्रमाणें आवाज आहे. कोणी मित्र बंधु आले असले पाहिजेत. लक्ष्मणा, जा बरें पाहून ये कोण आले आहेत ते." लक्ष्मणानें पाहून भरत आल्याचें सांगितलें.

सीता त्याला सामोरी जाऊन आंत घेऊन आली. तेथें रामानें भरताला आलिंगन केलें. त्या ठिकाणीं भरतानें रामाबरोबर वनांत राहाण्याची इच्छा प्रकट केली. परंतु रामानें त्याचें म्हणणें ऐकलें नाहीं. तो म्हणाला—"तुला काय वाटतें? अहंकार, मय, अथवा वेडेपणानें मी येथें आलों आहे? नाहीं मी वडिलांच्या आज्ञेवरून आलों आहें. तूंहि वडिलांच्या आज्ञेचें पालन कर."

भरतानें तें कबूल केलें नाहीं. शेवटीं रामाच्या आग्रहावरून तो म्हणाला—"जर तूं वनवासांतून आल्यावर आपलें राज्य घेणार असशील तर मी फक्त तोंपर्यंत प्रजा पालन करीन. राज्याभिषेक माझा नाहीं. तुझ्या पादुकांचा होईल." त्याला रामानें सम्मति दिली. आणि आपल्या पादुका भरताला देऊन त्याला अयोध्येस परत पाठवून दिलें.

एक दिवस राम व सीता आपल्या पर्णकुटींत बसून दशरथ राजाच्या श्राद्धा-संबंधीं बोलत होते. त्याच वेळीं रावण संन्याशाच्या वेशानें आला. आणि म्हणाला—"कोण आहे आंत? मी अतिथि आलों आहे." खरें म्हणजे रावणाचा भाऊ खर याला रामानें मारलें होतें. त्याचा सूड घेण्यासाठीं म्हणून तो आला होता. त्यासाठीं तो सीतेला पळवून नेणार होता.

रामानें त्याला आंत बोलाविलें. आदर सत्कार केला आणि म्हणाला—"महर्षि, श्राद्धाला काय काय पाहिजे?" रावणानें सांगितलें कीं गवतांत दुर्वा, बीजामध्यें तीळ, दाण्यामध्यें उडीद, प्राण्यामध्यें गाय किंवा सांबर किंवा कांचनमृग. ह्या वस्तू मुख्य आहेत. परंतु कांचनमृग हिमालयांत असतात आणि गंगेचें पाणी पितात.

इतक्यांत रामाला दूरवर एक सोन्याचें हरण दिसलें. त्याला पकडून आणण्यासाठीं रामानें लक्ष्मणाला पाठवावें असें ठरविलें. पण त्यावेळीं लक्ष्मण कांहीं महामुनींच्या भेटी घेण्यासाठीं गेला होता. म्हणून स्वतः रामालाच त्याला पकडण्यासाठीं जावें लागलें. रामानें नेम धरून बाण मारला. परंतु पाहतां पाहतां बाण चुकवून हरण झाडींत निघून गेलें.

रामाला बाहेर गेलेला पाहून रावणानें आपलें खरें रूप दाखवून सीतेला पळवून नेलें. सीतेनें खूप आरडा ओरडा केला. ऋषि-मुनींना हांका मारल्या. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. थोडें दूर गेल्यावर जटायूनें सीतेचा आवाज ऐकला आणि तो रावणाशीं युद्ध करण्यासाठीं पुढें आला. थोडा वेळ झटापट झाली पण रावणानें त्याचे पंख उखडून फेंकून दिले आणि आपली वाट धरली.



इकडे अयोध्येमध्यें भरताला मधून मधून वनांतील वर्तमान समजत असे. राम-लक्ष्मणांनीं सुग्रीवाशीं मैत्री केली आणि वालीला मारलें, ही गोष्ट त्याला ठाऊक होती. त्याच प्रमाणें आतां सीताहरणाची गोष्ट सुद्धां त्याला समजली होती. ही बातमी ऐकतांच त्याला दुःख झालें आणि रागहि आला. त्या भरांत तो कैकयीकडे गेला आणि म्हणाला—"एक आनंदाची बातमी आहे रामाकडून आलेली. तुझ्यासाठीं रामानें वनवास पतकरला आणि आतां एकाकी जीवन. कारण सीतेचें अपहरण

झालें आहे. तुझ्या सारखी स्त्री घरांत असल्यामुळें सीतेसारख्या स्त्रीला घरास मुकावें लागलें."

भरताचें हें असलें बोलणें कैकयीला फार वेळ सहन झालें नाहीं. ती म्हणाली—"महाराज दशरथांना पुत्र-वियोगाचा शाप होता आणि तो माझ्याकडून सिद्ध व्हावयाचा होता, तो झाला."

"मग माझा वनवास कां नाहीं मागितलास?" भरतानें विचारलें.

"तूं नेहमीं दूरदूरच राहात होतास." कैकयी म्हणाली.

"मग चौदा वर्षांचाच कशाला वनवास मागून घेतलास?"

"मी खरें म्हणजे चौदा दिवसच म्हणणार होतें पण तोंडांतून एकदम 'वर्षेंच' आलें आणि एकदां तोंडांतून गेलेला शब्द मागें कसा घ्यावयाचा?"

"तुझ्याकडे तरी काय चूक आई! आई, मी तुला उगीचच कांहीं कांहीं बोललों. क्षमा कर मला." भरत म्हणाला.

कांहीं दिवस गेले. एक दिवस, आश्रमांतील लोकांना समजलें कीं राम-रावणाचें युद्ध झालें. रामानें रावणास मारलें. सीतेला कैदेंतून सोडविलें. बिभीषणास लंकेचें राज्य दिलें व आतां राम लवकरच सीता, लक्ष्मण आणि बिभीषणाला बरोबर घेऊन येणार आहे.

युद्ध संपल्यावर राम सीता, लक्ष्मण, बिभीषण वगैरेसह आश्रमांत पोहोंचले. तेथील लोकांनीं मोठ्या प्रेमानें त्यांचें स्वागत केलें. त्यांना भेटण्यासाठीं अयोध्येहून भरत आपल्या तिन्हीं मातांना घेऊन आला होता.

तेथून ती सर्व मंडळी पुष्पक विमानांतून अयोध्येस गेलीं. तेथें मोठ्या थाटानें रामाचा राज्याभिषेक झाला आणि सर्वत्र आनंदी आनंद नांदूं लागला.





# पुंड (टिल्लू)

एके काळीं जर्मनीमध्यें टिल्लू नांवाचा एक मुलगा होता. लहानपणापासूनच तो फार व्रात्य होता. खोटें बोलणें, लोकांना त्रास देणें ह्याचें जणुं बाळकडूच त्याला मिळालें होतें.

त्यानें कांहीं कामधंदा शिकावा, शेतीवाडी करावी म्हणून बापानें पुष्कळ प्रयत्न केला. कमींतकमी त्यानें घरांतील काम थोडें फार करावें म्हणून आईनें प्रयत्न केला. पण सर्व व्यर्थ. त्याचा उनाडपणा कांहीं गेला नाहीं. गांवांत तो पुंड म्हणून प्रसिद्ध होता.

टिल्लू सोळा वर्षांचा होता तेव्हां त्याचें वडील वारले. त्याची आई पतीच्या मृत्यूनें अगोदरच दुःखी होती, त्यांत आपल्या मुलाची पुंडगिरी. ती बिचारी बेजार होऊन गेली. आकाबाईला असलींच घरें आवडतात. मग काय विचारतां त्यांची अवस्था. "आमींच मर्कट...." सारखी त्यांची स्थिति झाली होती. टिल्लूच्या आईनें त्याला पुष्कळ सांगण्यासावरण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं त्यांच्या जवळ फुटकी कवडी देखील शिल्लक राहिली नाहीं कीं धान्याचा कण राहिला नाहीं.

आईला फार वाईट वाटत असे. ती नेहमीं मुसमुसून रडत असे. अराब झालें म्हणजे टाहो फोडून रडत असे. म्हणत असे—"मी फुटक्या कपाळाची म्हणूनच हें सर्व पाहावयास ह्यांच्या मागें जिवंत राहिलें आहे.

"आई! तूं रोटीच्या चार तुकड्यासाठीं रडत बसली आहेस? मी आणून देतों तुला." असें सांगून टिल्लू बाहेर गेला.

तो एका रोटीच्या दुकानांत गेला. म्हणाला—"आमचे मालक एक जमीनदार आहेत. ह्या गांवाच्या वेशीवरच्या एका



धर्मशाळेंत उतरले आहेत. त्यांनीं मला पुढील मुक्कामापर्यंत पुरतील एवढ्या पावरोट्या द्यावयास सांगितल्या आहेत. असें करा, आपल्या एका नोकराला माझ्याबरोबर पाठवा. मी त्याच्या हातीं पैसे पाठवितों."

रोटीवाल्यानें लगेच एक टोपलीभर पाव देऊन नोकराला टिल्ल बरोबर पाठवून दिलें. कांहीं अंतर गेल्यावर टिल्ल म्हणाला—"अरे! टोपली नीट धर. पाव पडतील सर्व." टोपली नीट करण्यासाठीं म्हणून नोकरानें ती थोडी खालीं केली. त्याबरोबर दोनचार पाव खालीं पडले.

"बघ. मी सांगत होतों ना! ह्या जर आमच्या मालकानें पाहिल्या तर आपल्या दोघांची चांबडी लोळवील तो. तूं जाऊन दुसरे घेऊन ये. तोंपर्यंत मी येथेंच थांबतों." टिल्लनें सांगितलें.

नोकर पाव बदलून आणण्यासाठीं परत फिरला. तो दृष्टिआड होताच टिल्ल ती टोपली घेऊन पसार झाला.

"रोटी, रोटी, रोटी. ह्या घे. हव्या तेवढ्या खा आणि वीक सुद्धां पाहिजे तर." टिल्लनें मोठ्या डौलानें आपल्या आईला सांगितलें.

पावरोट्या संपल्या. पुन्हां उपास करण्याची पाळी आली. आई रडूं लागली—"तूं तरी कसा रे इतका नालायक निघालास!"

"तूं रडूं नकोस, आई. मी कांहीं तरी काम धंदा करतों." टिल्ल म्हणाला.

त्यानें एका रोटीवाल्याच्या दुकानांत नोकरी धरली. दोन दिवस त्यानें पावरोट्या केल्या. तिसऱ्या दिवशीं दुकानदार म्हणाला—"आज मी शेजारच्या गांवीं जाऊन येणार आहें. म्हणून तूंच सर्व काम कर."

"बरं आहे मालक. पण मग मी काय काय करूं?" टिल्ल म्हणाला.

"काय सांगितलं तुला? कुत्रीं मांजरीं वाटेल तें कर उगीच बडबड नको करूंस." मालकानें सांगितलें व तो निघून गेला.

टिल्लच तो. मालकाची आज्ञा मिळतांच स्वयंपाकघरांत गेला. पीठ मळलें आणि त्याची खरोखरच कुत्रीं मांजरीं करून भाजून काढलीं. दुसऱ्या दिवशीं मालकानें येऊन पाहिलें तर त्याला कपटांत पिठाचीं कुत्रीं मांजरीं दिसलीं. तो संतापून म्हणाला—गाढव कुठला. काय केलेंस हें."

टिल्ल उदास चेहेरा करून म्हणाला—"आपलीच ना आज्ञा होती तशी? तुम्हीच नाहीं का म्हणालांत कुत्रीं मांजरीं कर म्हणून."

"अकलेच्या कांद्या! पुन्हां मला तोंड दाखवूं नकोस. जा चालता हो आणि एवढें पीठ फुकट घालविलेंस त्याचे पैसे चुकते कर." मालक गरजला.

"हें सगळें मला द्या. मी तुमचे पैसे देतों." टिल्ल म्हणाला. त्याला दोन दिवसांची मजूरी मिळावयाचीच होती. तो सर्व कुत्रीं मांजरीं उचलून घेऊन निघून गेला.

त्या दिवशीं चर्च मध्यें कांहीं विशेष कार्यक्रम असल्या कारणानें बरेच लोक तेथें येणार होते. म्हणून टिल्ल तें टोपलें घेऊन



तेथें जाऊन बसला. त्याच्याजवळ हा नवीन तऱ्हेचा माल असलेला पाहून लोकांना मौज वाटली आणि मौजेखातर त्यांनीं त्याचा माल विकतहि घेतला. तेंच पाहिजे होतें टिल्लला. त्याला थोडे पैसे मिळाले. त्यानें ते आईला आणून दिले.

* * *

टिल्ल कोठें चिकाटीनें काम करीत नसे. तें कधीं जमलें नाहीं. परंतु तो लबाडी आणि लुच्चेगिरीमध्यें तरबेज होता. त्या व्यवसायावरच त्यानें थोडे पैसे जमवले आणि एक घोडा विकत घेतला. आतां त्याला गांवांत

हिंडून लोकांना त्रास देणें फार सोपें झालें होतें.

एकदां एका गांवांत आठवड्याचा बाजार भरला असतां तो तेथें गेला. तेथें बऱ्याच गवळणी दूध विकावयास आल्या होत्या. टिल्ल एक मोठें बगोणें घेऊन आला. एके ठिकाणीं आपली कासंडी ठेवून गवळणींना म्हणाला—"मला दूध पाहिजे आहे. तुम्हीं जेवढें देऊं शकाल तेवढें द्या. मी तुम्हांला त्याबद्दल भरपूर किंमत देईन." बऱ्याच गवळणी तेथें आल्या. आपल्याजवळ असलेलें दूध त्याला देऊन पैसे मागूं लागल्या.

"थांबा ! जरा थांबा !! हें भांडें भरूं तर द्या. मग देतों सर्वांना पैसे." बगोणें भरेपर्यंत सर्व गवळणी तेथेंच उभ्या राहिल्या. तें भरतांच त्यांनीं पैसे मागितले. "आज मला हें एवढें दूध पुरें आहे. ह्याचे पैसे मी तुम्हांला पंधरा दिवसांनीं देईन." टिल्ल मोठ्या ऐटींत म्हणाला. "आणि जी कोणी तोंपर्यंत थांबूं शकणार नाहीं तिनें आपलें दूध परत घ्यावें."

कोणाच्या भरंवशावर त्या थांबणार ? सर्व जणी आपण दिलेलें दूध परत घेण्यासाठीं पुढें झाल्या. बगोण्या भोंवतीं एकच गर्दी जमली. हिसकाहिसकी सुरू झाली. थोडेंसें दूध जमिनीवर सांडलें आणि ह्या गडबडींत टिल्ल कोठेंतरी नाहींसा झाला.

* * *

एकदां टिल्लजवळचे सर्व पैसे संपून गेले होते. शेवटीं घोडा विकावयाची वेळ आली. परंतु घोडा विकायला तो तयार नव्हता. मग पैसे कसे मिळावे म्हणून तो विचार करूं लागला. त्याला एक युक्ति सुचली. तो एका खाणावळींत गेला. तेथें घोड्यांच्या पागेंत त्यानें आपला घोडा बांधला आणि आंत गेला. तेथें सर्व लोक जेवायला बसले होते. टिल्ल आंत शिरला आणि म्हणाला—

"माझ्याजवळ एक विचित्र घोडा आहे. तसा घोडा पृथ्वीच्या पाठीवर कोठेंहि मिळणार नाहीं. त्याची गंमत अशी आहे कीं शेपटीच्या जागीं डोकें आणि डोक्याच्या जागीं शेपूट आहे. त्याला पाहण्यासाठीं एक एक पैसा तिकिट आहे."

सर्वांना गंमत वाटली त्याची. त्यांनीं भराभर ते पाहण्यासाठीं एक एक पैसा टाकला. हां, हां, म्हणतां त्याची टोपी पैशांनीं भरली. त्यानंतर त्यानें तो घोडा सर्वांना दाखविला. टिल्लनें आपल्या घोड्याच्या शेपटीलाच दोरी बांधून ठेविली होती.







टिल्लच्या ह्या कामाबद्दल ज्यांनीं पैसे दिले होते त्यापैकीं कांहीं लोक चिडले आणि कांहींनीं त्याच्या सुपीक डोक्याच्या कल्पनेचें कौतुक केलें आणि म्हणूनच तो एवढ्या लोकांच्या जमावांतून सुखरूप बाहेर पडला.

*   *   *

एक दिवस टिल्ल आपल्या घोड्यावर बसून शहराबाहेर निघाला. वाटेंत त्याला बारा आंधळे भिकारी दिसले. तो त्यांना म्हणाला—"किती दिवस असे हिंडून हिंडून भीक मागणार? एखाद्या धर्मशाळेंत जाऊन कां नाहीं राहात?"

"त्याला भाग्य लागतें. कोण आम्हांला आपल्याकडे ठेवून घेऊन फुकट जेवावयाला घालणार?" ते म्हणाले.

"असें कां म्हणतां? दानाचें पुण्य महत्पुण्य आहे. मी देतों तुम्हांला पैसे, प्रत्येकाला एक एक मोहोर. जा वाटेल त्या खाणावळींत जाऊन पाहिजे तेवढे दिवस राहा." असें म्हणत त्यानें नाण्यांचा आवाज केला. परंतु कोणाच्याहि हातांत हीं नाणीं दिलीं नाहींत. त्या आंधळ्यांना वाटलें आपल्यापैकीं कोणाजवळ तरी नाणीं दिली आहेत. म्हणून ते त्याला आशीर्वाद देत निघून गेले.

ते आंधळे शहरांत आले. एक चांगली खाणावळ पाहिली आणि आंत शिरले. त्यांना पाहतांच खाणावळवाला ओरडला—"अरे! ही कांहीं भिकारी राहाण्याची जागा नाहीं. येथें पैसे देऊन रहावें लागतें. जा, जा बाहेर."

"आम्हीं काय फुकट राहावयाला आलों? आमच्याजवळ बारा मोहोरा आहेत. आमचा जो कांहीं खर्च होईल तो आम्हीं देऊन टाकूं." आंधळे म्हणाले. म्हणून खाणावळीच्या मालकानें त्यांची व्यवस्था केली.

सात दिवस ते भिकारी मोठ्या आनंदानें चैन करीत तेथें राहिले. मनसोक्त खाल्लें, प्याले. मऊमऊ गादीवर पहुडले. मनसोक्त आराम केला. एक आठवडा झाल्यावर खाणावळवाला म्हणाला—"सात दिवस झाले. तुमच्या प्रत्येकाच्या नांवावर एक एक मोहोर झाली आहे. द्या आमचे पैसे आणि जा येथून."

"संपलें आमचें सुख. कोण्या दात्याच्या कृपेनें आम्हांला हें लाभलें त्याचें कल्याण होवो." परंतु कोणीहि पैसे काढून देत नाहीं. हें पाहून मालक ओरडला—"हं काढा पैसे. कितीवेळ असे पाहात राहणार?"

"कोणाजवळ रे त्या दानी गृहस्थानें पैसे दिले? देऊन टाका ना खाणावळीचे पैसे." एक भिकारी म्हणाला. तेव्हां त्यांना कळलें कीं त्यांच्यापैकीं कोणाजवळच टिल्लनें पैसे दिले नव्हते. ते गयावया करून सांगूं लागले कीं आम्ही फसवण्यासाठीं आलों नव्हतों. एका गृहस्थानें पैसे देतों म्हणून सांगितलें आणि दिले मात्र नाहींत."

"तें सर्व मला काय सांगतां? देतां का नाहीं माझे पैसे? का पाठवूं कैदेंत?" असें म्हणून त्यानें भिकाऱ्यांना बाहेर काढलें. त्यानें त्यांना गोठ्यांत नेऊन कोंडून ठेवलें.



टिल्ल हें सर्व पाहातच होता. तो त्या खाणावळीच्या मालकाकडे आला आणि म्हणाला—"का हो त्या बिचाऱ्या आंधळ्यांना गोठ्यांत कोंडून ठेवलेंत? आतिथ्य सत्कार करण्याची तुमची ही कुठली रीत. सोडा बिचाऱ्यांना. जाऊं द्या त्यांना."

"तुम्हीं जाऊं दे म्हणतां. अन्न कांहीं फुकटचें नाहीं येत आमच्याकडे. हे सात दिवस मोठ्या मजेंत राहिले आणि पैसे देतांना का कुरकुर? पैसे देऊन खुशाल जाऊं देत. चोर आहेत चोर हे लुच्चे." मालक गरजला.

"ह्याचे पैसे दुसऱ्या कोणी दिले तर सोडाल ना ह्यांना." टिल्लनें विचारलें.

"मी पैसेच तर मागतों आहे तेव्हां पासून. ह्यांना घेऊन मी काय करूं?"

"ह्या गांवांत कोणी दानी नाहींतच का?" असें म्हणत टिल्ल एका मठाधिशाकडे गेला. म्हणाला—"एका माणसाच्या मानगुटीस भूत बसलें आहे. मेहेरबानी करून तें उतरवा. आपल्याला पुण्य मिळेल."

"ठीक आहे. घेऊन ये त्याला माझ्या समोर." मठाचा अधिकारी म्हणाला.

टिल्ल खाणावळीच्या मालकाकडे आला आणि म्हणाला—"एक मठाधीश मिळाला आहे. तो त्या भिकाऱ्यांना जें कांहीं द्यावयाचें आहे तें देईल. तूं आपल्या बायकोला पाठवून चौकशी करून येण्यास सांग."

खाणावळीच्या मालकाची बायको टिल्लबरोबर त्या मठाधिशाकडे गेली. टिल्ल मठाधिशाला म्हणाला—"मघां मी ज्याच्या विषयीं म्हटलें होतें त्यांची ही बायको आहे. ह्यांची इच्छा पूर्ण करणार ना?"

मठाधीश गंभीर वाणीनें म्हणाला—"तूं आपल्या पतीला सांग कीं कांहीं काळजी करूं नकोस. त्यांच्या सारख्यांची मदत करण्या एवढें दुसरें दानपुण्य काय असणार!"

मठाधिकाऱ्याचें वाक्य ऐकून त्या बाईला वाटलें कीं मठाधिकारी आपल्याला त्या भिकाऱ्यांचा झालेला खर्च देणार आहे. म्हणून ती घाई घाईनें घरीं आली आणि नवऱ्याला तें सांगितलें. त्यानें भिकाऱ्यांना सोडून दिलें आणि आपले पैसे वसूल करण्यासाठीं मठाधिकाऱ्याकडे गेला व आपले पैसे म्हणजे बारा मोहोरा मागूं लागला. त्यामुळें दोघांचें भांडण झालें. तेव्हां त्यांना समजलें कीं हें टिल्लचेंच काम आहे. पण तोंपर्यंत टिल्ल व आंधळे केव्हांच निघून गेले होते. बिचारा खाणावळवाला लहान तोंड करून परतला.

* * *

टिल्लची गुंडगिरी फार वाढली. त्याचें वागणें गांवाला फार त्रासदायक वाटूं लागलें. त्याला पकडून कैद करण्याशिवाय कांहीं उपाय नव्हता. म्हणून पोलिसांनीं त्याला पकडून कैदेंत टाकलें. त्याच्यावर खटला भरला आणि त्याला त्याच्या गुन्ह्याबद्दल फांशीची शिक्षा झाली.

निश्चित दिवस उजाडला. त्याला फाशी द्यावयाच्या वेळीं वधस्तंभाजवळ लोकांची गर्दी







जमली. कांहींना वाईट वाटलें. कांहींना विश्वास वाटत होता कीं तो कसें तरी करून सुटून जाईल. अशा प्रकारें लोक आपसांत बोलत होते.

टिल्लला वधस्थानीं आणलें. खांबाजवळ उभें केलें. त्याच्या गळ्या भोंवती फास टाकला. आणि तेथील अधिकाऱ्यानें विचारलें कीं टिल्लला कांहीं सांगावयाचें आहे का ?

टिल्ल 'हो' म्हणून बोलूं लागला. म्हणाला—"येथें जमलेल्या सर्वांना माहीत आहे कीं मी आतां थोड्याच वेळांत मरणार आहे. माझे अपराध पाहतां खरोखर ही शिक्षा त्या साठीं थोडीच आहे. मला सात वेळां जरी फांसावर चढवलें तरी सुद्धां ती पुरी पडणार नाहीं, एवढा मी दोषी आहे. तरी सुद्धां साहस करून मी एक विनंति करणार आहें. मला माझे प्राण मागावयाचे नाहींत किंवा धन दौलतीची मला इच्छा नाहीं. माझी इच्छा एवढीच आहे कीं आपला खर्च थोडा कमी करावा."

तेथें जमलेल्या अधिकारी वर्गानें विचार केला कीं जर आमचा खर्च कमी होणार असेल तर पाहूंया हा काय म्हणतो आहे तें. अधिकाऱ्यांनीं टिल्लची शेवटची इच्छा पूर्ण करण्याचें वचन दिलें आणि बजावलें कीं त्यामुळें मरणाच्या शिक्षेत बदल होता कामा नये.

"मी आपल्याकडून तीच अपेक्षा करीत होतों. माझ्या मनांत मला फांसावर चढविण्यांत आपला एका पैसा सुद्धां खर्च होऊं नये असें आहे. तुम्ही मला एक जुनी दोरी आणून द्या. मी स्वतः माझ्या गळ्याला फांस लावून घेतों. त्यामुळें नव्या दोरीचा आणि फास लावणाऱ्या मजुराचा दोन्हीं खर्च वांचतील." टिल्लनें शांतपणें सांगितलें.

टिल्लचें म्हणणें कबूल करण्यांत आलें. त्याच्या गळ्यांत घातलेला फास काढला. त्याला खालीं उतरविलें. त्याच्या हातांत एक जुनी दोरी दिली. आणि सर्व जण त्याच्याकडे पाहूं लागले कीं हा कसा फांस लावून घेतो.

टिल्ल पुन्हां बोलूं लागला. "मी आपला फार आभारी आहें. माझ्या हातांत दोरी आलेलीच आहे. आतां मी मला वेळ मिळतांच म्हणजे हाताला सवड होताच माझ्या गळ्याला फास लावून घेईन." असें म्हणत म्हणत टिल्ल लोकांच्या घोळक्यांत शिरला आणि एकदम पळून जाऊन कोठें नाहींसा झाला कोणाला कळलें नाहीं. त्याच्या समयसूचकतेचें लोकांनीं कौतुक केलें.

* * *

टिल्लची कीर्ति जर्मनीच्या बाहेर देशादेशांतरी पोहोचली. पोलंडचा राजा थट्टेखोर होता. त्याच्याजवळ दोन विदूषक सुद्धां होते. त्यानें टिल्लका निमंत्रण पाठविलें कीं आमच्या कडील दोन्हीं विदूषकांच्यावर तुम्हीं विजय मिळवा तुम्हांला दरबारी नोकरी देऊं.

टिल्ल पोलंडच्या राजासमोर हजर झाला. राजाजवळच त्याचे विदूषक बसलेले



होते. त्यांचीहि टिल्लनें ओळख करून घेतली. इकडच्या तिकडच्या थोड्या गप्पा झाल्यावर राजा म्हणाला—"तुमच्या तिघांत जो कोणी जास्तींत जास्त मागेल त्याला मी बक्षीस देईन."

एक विदूषक म्हणाला—"आकाशाला कागद करून आणि समुद्राची शाई करून जेवढें धन मी त्यावर लिहीन तेवढें मला द्यावें." "ठीक आहे." राजा स्मित करून म्हणाला.

दुसरा विदूषक म्हणाला—"माझ्या मित्रानें जेवढें धन मागीतलें आहे तें ठेवण्यासाठीं

आकाशांत जेवढे तारे आहेत तेवढे किल्ले मला पाहिजेत." "अगदीं कबूल." म्हणून राजा हंसला.

त्यानंतर राजानें टिल्लला विचारलें. तो म्हणाला–"माझी एवढीच इच्छा आहे कीं मला ह्या दोघांचा वारसा देऊन ह्यांना फांशी द्यावें." टिल्लचें उत्तर ऐकून राजाला मजा वाटली तो खदखदां मोठ्यानें हंसला आणि देऊं केलेलें बक्षीस त्यालाच दिलें.

टिल्ल फांसावर गेला नाहीं. तो सुखा-समाधानानें आपलें आयुष्य घालवूं लागला. म्हातारा झाला. आजारी पडला. आतां मरणार असें वाटल्यावर त्यानें मृत्युपत्र तयार केलें. त्यांत त्यानें लिहिलें–"माझ्या पलंगा-जवळ एक लोखंडी तिजोरी आहे. त्यांत मी मिळविलेलें धन आहे. त्या धनांतील एक हिस्सा देवळाला द्यावा. दुसरा हिस्सा माझ्या मित्रांना द्यावा. आणि तिसरा हिस्सा त्या गांवाला जावा. ज्या गांवांत माझा मृत्यू होईल, माझ्या मरणानंतर एका महिन्यानें नगरपित्यांनीं तिजोरी उघडून पैशांची वांटणी करावी.

त्या नंतर आठ दिवसांनीं टिल्ल मरण पावला. टिल्लची कीर्ति चहूंकडे पसरली होती. त्यानें आपली संपत्ति सुद्धां नगर-पालिकेला दिली होती. म्हणून त्याची अंत्य-क्रिया सरकार तर्फे मोठ्या थाटानें करण्यांत आली. त्याच्या समाधीवर एक संगमरवरी दगडाचा चबूतरा बसविण्यांत आला.

एक महीना झाला. नगरपिते टिल्लच्या तिजोरीशीं जमले. मोठ्या समारंभानें टिल्लची तिजोरी त्यांनीं उघडली. पाहातात तों त्यांचे डोळे पांढरे झाले. त्यांत दगडगोटे भरलेले होते.

व्रात्य टिल्लनें आपलें सर्व आयुष्य अशाच खोडसाळपणानें घालविलें आणि मरतांना सुद्धां व्रात्रटपणा करण्यास तो चुकला नाहीं.





बालमित्र हो! एक सांगतों
पुराणांतली गोष्ट जुनी,—
अवतरून गंगेनें कैसी
केली पावन ही धरणी ॥

एक प्रतापी राजा होता,
सगर तयाचें होतें नांव।
न्याय करितसे समदृष्टीनें
रंक असो कीं कोणी राव ॥

दोन तयाला होत्या राण्या
सुशील, सुंदर आणि उदार।
महाप्रतापी तसेच सुंदर
होते मुलगे साठ हजार ॥

अश्वमेध यज्ञाचा आला
एके दिवशीं मनीं विचार।
म्हणुनी त्यानें मंत्र्यां सांगुन
खास भरविला मग दरबार ॥

एक मतानें दरबाऱ्यांनीं
दिला दुजोरा यज्ञाला।
खूप सजवुनी तयार केलें
सुंदर एका अश्वाला ॥

पूजा करुनी त्या घोड्याची
त्यास सोडिलें राजानें।
रक्षण करण्या राजकुमारां
मागें पाठविलें त्यानें ॥

सैन्य पायदळ पुढें निघालें
रथदल गजदल अन् मागें।
खाई, हिंडे, थांबे घोडा
करी मनाला जें लागे ॥

धांवत घोडे खेंकाळत अन्
चालत रथ 'घर घर' करुनी।
पायांखालीं हत्तींच्या पण
कांपुं लागली ही धरणी ॥

आहे काय ? इतके लोक येथें कशासाठीं जमले आहांत ?"

"आम्हीं युद्ध करण्यासाठीं जमलों आहोंत." ते म्हणाले.

"तें का !" बुद्धानें विचारलें.

भांडण चालू झालें म्हणून शहरांतील बडी बडी मंडळी जमली. पण त्यांना भांडणाचें कारण समजलें नव्हतें. म्हणून ते उत्तर देऊं शकले नाहींत. शेवटीं तेथील शेतकऱ्यांनीं सांगितलें तेव्हां बुद्धाला समजलें कीं पाण्यासाठीं हें भांडण चाललें आहे.

त्यांनीं तेथें जमलेल्यांना विचारलें. ते म्हणाले—"सांगा बरें, पाण्याची काय किंमत आहे जमिनीची काय किंमत आहे आणि प्राणाची काय किंमत आहे ?"

ह्या प्रश्नावरून त्या सर्वांना कळून आलें कीं खरोखरच पाणी व जमिनीपेक्षां प्राणाचें मूल्य अधिक आहे.

नंतर बुद्धानें तेथें जमलेल्या सर्व लोकांना उपदेश दिला. त्याचा परिणाम असा झाला कीं दोन्हीं गांवांतील लोकांनीं आपल्यापैकीं उच्च कुटुंबांतील २५० व्यक्तींना त्यांचे अनुयायी म्हणून बुद्धाकडे पाठवून दिलें. ह्या ५०० लोकांच्याबरोबर बुद्ध महावन विहारांत कांहीं दिवस राहिले. हे पांचशें युवक मधून मधून आपल्या घरीं जात येत असत. त्यांच्या बायका त्यांना पुन्हां घरीं येऊन राहण्यासाठीं विनवीत असत. परंतु बुद्धाच्या उपदेशाचा त्यांच्या मनावर इतका परिणाम झाला होता कीं त्यांनीं आपला निश्चय सोडला नाहीं.

त्यांचा निश्चय पाहून त्यांच्या बायका ५०० राजकन्या प्रजावतीकडे गेल्या आणि म्हणाल्या—"आमचे पति बौद्ध संन्यासी झाले आहेत. पतिविणें जिणें व्यर्थ आहे. आम्ही तरी कशाला येथें राहावें ? आम्ही सुद्धां संन्यासिनी होऊन जातो." (पुढें चालू)






३. प्राण्यांना शिकविणें

१९५४ मध्यें नाताळच्या अदल्या दिवशींच मी एकोणिसाव्या वेळीं संकटांत सांपडलों. चांगल्या समजल्या जाणाऱ्या प्राण्यांत सुद्धां हिंसेची प्रवृत्ति असते हें ह्या संकटानें मला शिकविलें.

मनुष्यानें सुद्धां प्राण्यांच्या व्यवहारासंबंधी विचार करते वेळीं दोन गोष्टींचा विचार करणें जरूरी आहे. एक म्हणजे त्याची सहज प्रवृत्ति आणि दुसरी शिक्षण. "शिक्षण", "वशीकरण" आदि शब्दांवरून त्यांचा संबंध परस्पर सूचित होतो. परंतु पाळीव शब्दाचा अर्थ निराळा आहे. प्राण्यांपासून जर आपणाला कांहीं विशेष करामत करून घ्यावयाची असेल तर त्यांच्याशीं व्यवहारांत करुणा, कौतुक वगैरे दाखविणें आवश्यक आहे. अशा व्यवहाराचा परिणाम त्या प्राण्यांच्यावर तर होतोच, त्यांच्या संततीवरहि होतो. तज्ञांना ह्या गोष्टीला आक्षेप राहील. पण आमच्या अनुभवांत हें सत्य आहे.

प्राण्यांना शिकविण्याचें काम इतकें सोपें नाहीं मनुष्याला शिकविण्यास ज्या गोष्टींचा आपण आधार घेतों तो आधार इतर प्राण्यांच्या शिक्षणांत उपयोगी पडत नाहीं. सिंह, वाघ, चित्ता, अस्वल वगैरे प्राण्यांचा स्वभाव समजावून घ्यायला जी शक्ति लागते ती शक्तिच किती तरी वर्षांच्या अनुभवानंतर येते.

समजुतदार प्राणीशिक्षक मनुष्याच्या स्वभावावरून प्राण्यांना शिकविण्याचा कधींहि प्रयत्न करणार नाहीं. कारण वस्तु, रूप, रंग










परिमाण हे मनुष्याला जसे दिसतात तसेच बरोबर ते इतर प्राण्यांना दिसत असतील हें कशावरून? त्यांची श्रवणशक्ति आपल्या श्रवणशक्तिपेक्षां कितीतरी तीक्ष्ण आहे. त्याच प्रमाणें जो आवाज आपल्याला अगदीं असह्य होतो त्यापासून त्यांना मुळींच त्रास होत नाहीं. तसाच आपल्या आणि त्यांच्या रुचींत फरक असतो. उदाहरणार्थ त्यांना चमचमीत मांस फार आवडतें आणि जें खाण्यापासून मनुष्याला रोग होतात तें हे प्राणी फार आवडीनें खातात. जें ताजें मांस मनुष्यास आवडतें तें त्यांना आवडत नाहीं. आपण ज्याला सुगंध म्हणतो त्याला ते दुर्गंध समजतात. जें अत्तर आजकालच्या तरुण-तरुणी सदैव वापरतात त्याचा वास ह्यांच्या नाकाला असह्य होतो. ज्या वस्तू पाहून आपल्याला किळस येतो त्या वस्तू ह्यांना इतक्या प्रिय वाटतात कीं त्यांच्यांत हे लोळतात. थोडक्यांत म्हणजे त्यांच्या ज्ञानेंद्रि-यांत व आपल्या ज्ञानेंद्रियांत फरक असतो.

एकादें जनावर कधीं कधीं पिसाळतें किंवा अडून बसतें. त्यावेळीं त्याच्या ह्या वागण्याचें कांहीं ना कांहीं तरी जरूर कारण असतेंच. पण तें आपल्या लक्षांत येत नाहीं. सतत अनुभवास येणाऱ्या एकाद्या गोष्टीचा त्याच्या मनावर कांहीं विशिष्ट परिणाम झालेला असतो आणि नेमकी त्या गोष्टीचीच उपेक्षा केली जाते. अशा वेळीं त्याचें मन दुखावणें स्वाभाविकच आहे.

ही सर्व लांबलचक भूमिका देण्याचें कारण म्हणजे शान्ड नांवाच्या वाघाचा व्यवहार आणि त्यामुळें माझ्यावर ओढवलेलीं संकटें ह्यांची आपल्याला चांगली कल्पना येईल.

शारा कारित नांवाची एक फ्रेंच स्त्री होती. सर्कशीच्या क्षेत्रांत ती फार प्रसिद्ध होती. ती 'शान्डा' नांवाच्या सिंहाची मालकीण होती. तिचे वडील फ्रांसमध्यें एक मॅजिस्ट्रेट होते. शारा दोन वर्षांची असतांच तिचे वडील वारले. म्हणून तिच्यावर कोणाचा धाक राहिला नाहीं. ती स्वतंत्रपणानें वागूं लागली. तिला लहानपणापासून प्राण्यांची फार आवड असे. पहिल्या पहिल्यानें ती आजूबाजूच्या कुत्र्या मांजरांना, कोंबड्या बकऱ्यांना शिकवीत असे.

त्यांच्यांतच नेहमीं राहिल्यामुळें तिची भीति नाहींशी झाली. कार्यनिष्ठा, असाधारण बुद्धि आणि प्राण्यांच्या भावनेवर विश्वास ह्या तिच्या स्वभावामुळें तिनें पशुशिक्षकाचें काम सुरू केलें. ती ह्या कलेंत योग्य असल्यामुळें तिला आपल्या कामांत यशहि लाभलें.

प्रथम ती गमतीखातरच नाच व जादू दाखवीत असे. नंतर ती दोन अजगरांना घेऊन खेळ करूं लागली. तिची कीर्ति वाढूं लागली. जाहिरातींतून तिचें नांव ठळक अक्षरांत येऊं लागलें. तिच्या प्रत्येक कार्यक्रमांत कोणता ना कोणता तरी प्राणी असे. पुढें पुढें तर ती सिंहांच्याबरोबर खेळ करून दाखवी आणि हळूं हळूं पुढें



तर तिचा एकहि प्रयोग वाघ सिंहा शिवाय होत नसे.

जनावरांशीं खेळ करणें म्हणजे प्राण मुठींत घेऊनच काम करणें आहे. शारा एवढी त्यांतील तज्ञ पण तिच्यावर सुद्धां अनेक संकटें आलीं.

तिच्यावर पहिला हल्ला इन्की नांवाच्या सिंहानें केला. त्यानें तिला आपल्या पंजांत पकडलें आणि रिंगणभर फरपटत ओढत नेलें. ह्या अपघातांतून तिचें मी रक्षण तर केलें. परंतु तिचें शरीर खरचटलें जाऊन हातावर फार जखमा झाल्या होत्या.

दुसऱ्याच दिवशीं वार्ताहरांनीं विचारलें– "आतां ह्यापुढें आपण आपलें काम सोडून देणार काय ?"

"ह्या जन्मांत तरी मी ह्या धंद्याशिवाय दुसरें कोणचेंहि काम करणार नाहीं." तिनें उत्तर दिलें.

तिनें आपलें म्हणणें खरें केलें. कांहीं वाघ सिंह विकत घेतले आणि त्यांना स्वतः शिकविलें. त्यांच्याकडून ती आश्चर्यकारक कामें करवून घेत असे. तिच्या बरोबर एक नर्तकी असे. तिचें टोपण नांव होतें 'लुसिटानिया.' ती चित्त्याच्या चामड्यांचे कपडे वापरीत असे आपल्या नाचासाठीं आणि तिचा नाच वाघसिंहांच्या गोलांत एका गोल टेबलावर होत असे. शारानें शिकविलेले सिंह तो नाच अगदीं मजेनें पाहात असत. कांहीं दिवसांनीं त्या सिंहांतील एक सिंह मरून गेला. म्हणून शारानें एक नवीन सिंह त्याच्या जागीं आणला. त्या सिंहाला लुसिटानियाचा नाच मुळींच आवडत नसे. म्हणून शारानें तिला बजावले होतें. म्हणाली होती–"जों पर्यंत तुझ्या नाचाची त्याला संवय होत नाहीं तों पर्यंत तू आपलें नृत्य थोडें आवरते घे." परंतु लुसिटानियानें तिकडे दुर्लक्ष केलें. हा नवा सिंह ती नाचूं लागली कीं तिच्या पायाकडे टक लावून पाहात असे. तिचे बूट झालर फिता लावून फार सुंदर आकर्षक केलेले होते. त्या नव्या सिंहानें बुटाकडे पाहतां पाहतां एकदम तिच्या पायावर झडप घातली. शाराला ह्याची कल्पना होतीच. म्हणून ती तयारींतच होती. तिनें त्याला चुचकारून शांत करून आपल्या जागेवर बसविलें. तेव्हां पासून लुसिटानियानें बुटाची झालर काढून फेंकून दिली आणि शाराच्या म्हणण्याप्रमाणें वागूं लागली.

(साहसिक कृत्यें पुढील अंकीं)



## लहान भूत, मोठें भूत !







# मूर्ख जमीनदार

चीन देशांत मात्साय नांवाचा एक गरीब शेतकरी राहात असे. तो समयसूचक आणि चाणाक्ष होता. तो पिढीजात शेतकरी होता. परंतु त्यांची गरीबी कधीं दूर झाली नाहीं. एकदां मात्सायनें मनाशीं ठरविलें कीं जमीनदाराला पिकांतील एक दाणासुद्धां द्यायचा नाहीं. म्हणून कापणी होतांच त्यानें धान्य विकून टाकलें. त्यानें दोन सुंदर आणि चांगल्या कोंबड्या विकत घेतल्या आणि एका शिकाऱ्याकडून दोन लांडगे विकत घेतले.

त्यांतील एक लांडगा तो बांधून बंद करून घरीं ठेवीत असे. दुसरा गळ्यांत दोरी बांधून आपल्या बरोबर घेऊन हिंडत असे.

एक दिवस जमीनदार धान्य वसुलीसाठीं निघाला. वाटेंत तो मात्सायला भेटला. "आपलें धान्य तयार आहे. पाहिजे तेव्हां येऊन आपण घेऊन जा." मात्साय म्हणाला.

"ह्या लांडग्याला कशाला बरोबर घेतला आहेस? हा पळून नाहीं जाणार?" लांडग्याला पाहून जमीनदारानें विचारलें.

"जाऊं दे. काय मोठेंसें. जरा हिंडून परत येईल." मात्साय म्हणाला. लांडग्याच्या गळ्यांतील दोरी सोडीत तो म्हणाला—"जा, आणि चांगल्या कोंबड्या पकडून आण." धन्याची जणुं आज्ञाच समजून लांडगा झपाट्यानें पळून गेला.

"लांडगा तो. तो काय पुन्हां परत येणार आहे?" जमीनदारानें आश्चर्यानें म्हटलें.

"तुम्ही उद्यां आमच्याकडे जेवावयास या. म्हणजे कळेल. मी त्याला कोंबड्या धरून आणावयास सांगितल्या आहेत." मात्साय म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं मात्सायनें तऱ्हेतऱ्हेचे कोंबडीचे पदार्थ तयार करविले. ठरल्याप्रमाणें जमीनदार आला. मात्सायच्या घराजवळ येतांच त्याला खमंग वास आला. त्याच्या तोंडाला पाणी सुटलें.

"मात्साय! ज्यानें एवढ्या चांगल्या कोंबड्या पकडून आणल्या त्या लांडग्याला तरी आण पाहूं." जमीनदार म्हणाला.

"जेवण होऊं द्या. मग पाहूं." मात्साय म्हणाला.

दोघे जेवावयास बसले. सर्व पदार्थ फारच रुचकर झाले होते. जेवणें आटोपल्यावर त्यानें विचार केला 'असा लांडगा आपल्याकडे असेल तर काय बहार होईल.'

मात्साय घरांत बांधून ठेवलेल्या दुसऱ्या लांडग्याला घेऊन आला.

"फार चांगला आहे बोवा हा लांडगा. काय, विकणार काय त्याला? पांचशें तोळे चांदी देतों." जमीनदार म्हणाला.

"असें कसें मागतां सावकार. अहो, हें माझ्या उपजीविकेचें साधन आहे. विकणें म्हणजे उपासमार होणार. माझ्याकडून मिळावयाचें धान्य आणि जें कांहीं असेल तें कर्ज तुम्हीं वसूल करून घ्या पण हा लांडगा मागूं नका." मात्सायनें नकारार्थी मान हलवून म्हटलें.



"तें सर्व जाऊं दे. तें नको मला. मला हा लांडगाच पाहिजे. हजार तोळे चांदी घेतलीस तरी चालेल" जमीनदार म्हणाला.

"आतां मी काय सांगणार? तुम्हांला हा लांडगा हवाच असेल तर मला कमींत कमी दीड हजार तोळे चांदी द्या." मात्सायनें एक दीर्घ श्वास सोडून सांगितलें.

त्याच्या मागणीप्रमाणें दीड हजार तोळे चांदी देऊन जमीनदारानें तो लांडगा विकत घेतला. घरीं जाऊन बायकोला म्हणाला—"बघ, मी काय आणलें आहे. हा उत्तम उत्तम कोंबड्या चोरून आणतो."



"माझा नाहीं विश्वास बसत त्याच्यावर!" बायको म्हणाली. "आत्तां दाखवितों" असें म्हणून जमीनदारानें माल्सायप्रमाणें लांडग्याला चुचकारलें, गोंजारलें आणि "जा, उत्तम उत्तम कोंबड्या घेऊन ये." म्हणून त्याला सोडून दिलें. गळ्यांतील दोरी सुटतांच तो जो धूम पळाला तो पुन्हां येतो आहे कशाला? एक महिना झाला. पण लांडगा आला नाहीं. तेव्हां त्याला कळलें कीं माल्सायनें आपल्याला फसविलें आहे. त्याचा राग अनावर झाला. माल्सायच्या घरीं गेला आणि माल्सायला म्हणाला—"मला फसवतोस होय! काढ माझें सोनें चांदी. नाहीं तर बघ."

"आतां कोठलें मी सोनें चांदी आणूं? तें तर केव्हांच खर्च झालें." माल्साय म्हणाला.

"अस्सं!" जमीनदारानें आपल्या नोकरांना आज्ञा दिली—"ह्याला रात्रभर बाहेर कुडकुडत त्या तेलाच्या घाणीला बांधून ठेवा."

जसजशी रात्र वाढूं लागली तसतशी थंडीहि वाढूं लागली. अंगांत ऊब येण्यासाठीं तो शरिराची हालचाल करूं लागला. रात्रभर त्यानें तेलाची घाणी फिरविली. ह्या उद्योगानें त्याच्या अंगांत इतकी ऊब वाढली कीं त्याच्या शरिरांतून घाम गळूं लागला.

उजाडल्यावर जमीनदार उठला. त्याला वाटलें माल्साय थंडींत कुडकुडून गार पडला असेल. म्हणून त्यानें आपल्या नोकरांस पाहून येण्यास सांगितलें.

"मेलाय कसला! चांगला धापा टाकतो आहे आणि घामानें त्याचा सदरा अगदीं चिंब भिजला आहे." नोकरांनीं मालकाला येऊन सांगितलें.

मालकाला वाटलें ह्यांत कांहींतरी रहस्य असलें पाहिजे. माल्सायला म्हणाला—"अरे इतक्या थंडींत तुला घाम कसा येतो आहे?"

"एकाद्या निरपराध्याला विनाकारण शिक्षा दिली तर काय होईल? मी जो लांडगा आपल्याला दिला होता तो खरोखरच कर्तबगार होता. मला वाटतें, आपल्या धनीणीनें त्याच्यावर विश्वास ठेवला नसेल! त्या रागांत तुम्हीं त्याला डवचलें असणार! त्याला तें सारें कळतें. तर मग तो परत कसा येणार?" माल्साय म्हणाला.

"पण मी तुझ्याविषयीं विचारीत आहें. तुला आत्तां एवढ्या थंडींत घाम कसा आला?" जमीनदारानें विचारलें.

"मी अंगांत घातलेला सदरा पहा. नीट निरखून पहा. त्यांत अशी जादू आहे कीं उन्हाळ्यांत हा अंगांत घातला तर थंड वाटतो आणि हिवाळ्यांत घातला तर ऊब वाटते." माल्सायनें सांगितलें.

"तर मग मी पांचशें तोळे चांदी देतों." जमीनदार म्हणाला.

"छे! छे!! भलतंच!!! अहो, माझ्या जवळील सर्वच वस्तू काय घेतां? आणि हा सदरा तर आमच्या घरांत पिढिजात चालत आला आहे. तो मी कोणाला कधींहि देणार नाहीं." माल्सायनें मोठ्या निर्धारानें सांगितलें.



"बरं बाबा, हजार तोळे घे. पण मला तो पाहिजे." जमीनदारानें हट्ट धरला.

"आपल्याला अगदीं हवाच असेल तर कमींत कमी दोन हजार तोळे चांदी तरी द्याच. कारण मला उन्हाळ्यांत हिवाळ्यांत मरावें लागेल." माल्साय म्हणाला.

दोन हजार तोळे चांदी देऊन त्या जमीनदारानें वेडेपणानें माल्साय पासून त्याचा सदरा विकत घेतला. दुसऱ्या दिवशीं स्वच्छ धुवून वाळवून त्यानें तो घातला आणि मोठ्या ऐटींत तो आपल्या सासुरवाडी निघाला. थोडेसें अंतर चालत गेल्यावर त्याला



कळून आलें कीं माल्सायनें आपणास फसविलें आहे. यावेळीं त्याला आतां सोडतां कामा नये असा निश्चय करून त्यानें आपल्या नोकरांना माल्सायला पकडून आणण्यास सांगितलें.

माल्साय समोर येतांच जमीनदारानें त्याला एका पोत्यांत बंद करून नदीकाठीं नेलें. तेथें एका खडकावर एक झाड होतें. त्याची एक फांदी पाण्यावर गेली होती त्या फांदीच्या टोकाला तें पोतें बांधून आपल्या नोकराला ती फांदी तोडून टाकण्याची त्यानें आज्ञा दिली.

फांदी चांगली जाड होती. थोडी तोडून झाल्यावर नोकर म्हणाला—"मालक, अजून पुष्कळ वेळ लागेल ही फांदी तोडावयाला. मी जेवून येतों व मग तोडतों बाकीची फांदी."

"ठीक आहे. मीहि तोंपर्यंत जेवून येतों. आतां कोठें जाईल हा? असूं दे असाच लोंबत." असें म्हणत दोघेहि जेवण्यासाठीं निघून गेले.

ते निघून गेल्यावर माल्साय ओरडूं लागला—"मला उतरवा, मला उतरवा." त्याच वेळीं जमीनदाराचा सासरा आपल्या लेकीच्या भेटीला चालला होता. तो करुण स्वर ऐकून त्यानें विचारलें—"कोण आहे?"

त्या शब्दावरून माल्सायनें जमीनदाराच्या सासऱ्याला ओळखलें. त्याला कुबड असल्याचें माहीत होतें. म्हणून तो ओरडला—"कोणी अगदीं देवानें पाठविल्याप्रमाणें दत्त म्हणून आल्यासारखें वाटतें आहे. त्यानें मला खालीं उतरवावें. माझी पाठ अगदीं सरळ झाली आहे."

"आं! तुझें कुबड नाहींसें झालें? कसें?" सासऱ्यानें विचारलें. "मला वाटतें तुम्हाला माहीत नाहीं. ह्या पोत्यांत बसलें म्हणजे कुबड नाहींसें होतें. मी बाहेर आल्यावर तुम्हांला त्याची खात्री पटेल. खरें म्हणजे आमच्या लोकांनीं आतांपर्यंत यावयास पाहिजे होतें. कां नाहीं आले कोण जाणें. हं! हें पोतें द्यायला एक मिनिट उशीर झाला तरी शंभर तोळे चांदी द्यावी लागते." माल्साय म्हणाला.

"अरे मग मी देतों तुला शंभर तोळे चांदी. मला बसव थोडा वेळ यांत. माझ्या पाठीला सुद्धां मोठें कुबड आहे." सासरा म्हणाला. त्यानें माल्सायला उतरविलें.

येन केन करून माल्साय बाहेर आला. सासऱ्याला आपल्या जागीं पोत्यांत बसवून पुन्हां पोतें होतें तसें झाडाला टांगून तो आपल्या वाटेनें निघून गेला.

थोड्या वेळानें जमीनदार आला. नोकरानें फांदी तोडली. ती पोत्यासह पाण्यांत पडली व वाहून गेली. हुश्श करून छातीवर हात फिरवीत जमीनदार आपल्या घरीं निघून गेला.

कांहीं दिवस गेले. एकदां जमीनदार हिंडत हिंडत माल्सायच्या घराच्या बाजूला आला. तेथें माल्सायला बसलेला पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. "अरे! तूं तर मरून गेला होतास, मग पुन्हां येथें कसा आलास?" त्यानें विचारलें.



"सत्पुरुषांना असें कधीं मरण येत नाहीं. पाण्याला माझे पाय लागतांच वरुण देवानें आपल्या दूतांना पाठवून मला बोलावून नेलें. माझें मोठ्या प्रेमानें व आदरानें स्वागत सत्कार करून त्यानें सर्वांना एक मोठी मेजवानी दिली. राहाण्यासाठीं त्यानें फार आग्रह केला. तेथें अप्सरेशीं माझें लग्न लावून दिलें. फार मजा आहे तेथें. तेथील लोकांना खाण्या पिण्याशिवाय दुसरें काम नाहीं आणि तेथें सर्वच अप्सरा आहेत. थोड्याच दिवसांत मला तेथें कंटाळा आला. मी त्याच्या जवळ परत जाण्याची आज्ञा मागितली. परंतु त्यानें

नाकबूल केलें. मला तेथें स्वस्थ बसून आजाऱ्यासारखें वाटूं लागलें. म्हणून मी वर येण्याचा फारच आग्रह धरला. तेव्हां कुठें मला त्यानें परवानगी दिली. म्हणाला—"कधीं कधीं आमची आठवण होऊं दे. येतांना आपल्या मित्रांना सुद्धां बोलावून आणीत जा." मी येतांना माझ्या बायकोला 'चल' म्हटलें पण ती आली नाहीं.

'हा अगदीं मूर्खच आहे. ह्याच्या जागीं जर मी असतों तर तेथील सर्व अप्सरांशीं लग्न केलें असतें आणि त्या राजाला गचांडी मारून मी राजा झालों असतों.' असा विचार करून तो मात्सायला म्हणाला—"मला घेऊन चल रे एकदां."

हो, ना, करतां करतां मात्साय त्याला घेऊन जायला झाला तयार एकदाचा. "पण कोणालाहि सांगूं नका. नाहींतर सर्वच लोक माझ्या पाठीस लागतील घेऊन जाण्यासाठीं. मी उद्यां सकाळीं दोन होड्या घेऊन येतों. तुम्हीं तयार राहा." मात्साय म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं एक चिनीमातीची आणि एक लाकडी अशा दोन होड्या त्यानें किनाऱ्याशीं आणून ठेवल्या. जमीनदार आल्याबरोबर त्यानें त्याला चिनीमातीच्या होडींत बसविलें व आपण लाकडी होडींत बसला. दोघे वल्हवत वल्हवत खूप दूर गेले. एके ठिकाणीं आल्यावर मात्सायनें आपल्या होडीवर जोरानें वल्हें आपटलें आणि जरा वाट पाहिल्यासारखें केलें. "हा आवाज ऐकून जलराजाचे दूत येतात. अजून कां आले नाहींत!" तो आपल्याशी पुटपुटला. त्याचे शब्द ऐकून जमीनदार म्हणाला—"माझ्या होडीवर वल्हें आपटून पाहा."

मात्सायला तेंच पाहिजे होतें. त्यानें चिनीमातीच्या होडीवर जोरानें वल्हें मारलें. त्याबरोबर ती एकदम फुटून गेली आणि तो जमीनदार पाण्यांत पडून बुडून गेला.



# आई, मला एक बाहुली आण !

सौ. कल्पना जोशी, पुणे

गोरी गोरी पान, फुलासारखी छान । आई, मला एक बाहुली आण ॥

गोऱ्या गोऱ्या बाहुलीचे निळेनिळे डोळे
निळ्यानिळ्या डोळ्यांनीं माझ्याशीं खेळे
आम्हांला खेळायला घरकुल आण । आई, मला एक बाहुली आण ॥

घरकुलाच्या सामोरी बागेची शोभा
बागेच्या शेजारी छोटासा ओढा
ओढ्यांत सोडायला होड्या तूं आण । आई मला एक बाहुली आण ॥

बाहुलीला साजेसा छोटा छोटा नवरा
नवरीला साजेसा नवऱ्याचा नखरा
थाटाला साजेशी मोटार छान । आई, मला एक बाहुली आण ॥

नवरा नवरीचें लगीन लावूं
लग्नाच्या वेळेला वाजंत्री वाजवूं
वरातीच्या थाटाला दारूचें काम । आई, मला एक बाहुली आण ॥

लग्नाला बोलवायला घरोघरीं जाऊं
जेवणाच्या पंक्ती गोड गोड खाऊं
बाहुलीच्या लग्नाचा थाट मोठा छान । आई, मला एक बाहुली आण ॥





# महाभारत

सातव्या दिवशीं भीष्मानें आपल्या सेनेची मंडळ व्यूहांत रचना केली. त्याच प्रमाणें पांडवांनीं वज्र नांवाच्या व्यूहांत सैन्या रचना केली.

युद्ध आरंभ होतांच अर्जुनानें आपल्या बाणवृष्टीनें कौरव सैन्याला पळवून लावलें. त्यानें ऐन्द्रास्त्राचा उपयोग केला होता. त्यामुळें भयभीत झालेली कौरवसेना भीष्मा-कडे मदतीसाठीं गेली.

अर्जुनाशीं युद्ध करण्यासाठीं स्वतः भीष्म सिद्ध झाला. त्याच्या मदतीसाठीं दुर्योधनानें त्रिगर्तांचा राजा सुशर्मा यास पाठविलें

थोड्याच वेळांत युद्धानें भयंकर रूप धारण केलें. त्यांत विराटाचा रथ मोडला, घोडे मारले गेले. परंतु हताश न होतां तो त्याचा मुलगा शंख याच्या रथांत बसला आणि युद्ध करूं लागला. युद्ध करतां करतां द्रोणाच्या बाणानें शंख जखमी होतांच विराटानें तेथून पळ काढला.

इकडे शिखंडी व अश्वत्थामा यांचें युद्ध जुंपलें. शिखंडीनें अश्वत्थाम्याच्या डोक्यावर तीन बाण मारले. त्यामुळें त्याला फार राग आला. म्हणून त्यानें शिखंडीच्या सारथ्याला मारलें, रथाचे घोडे मारले व शेवटीं त्याच्या हातांतील धनुष्यहि मोडून टाकलें. तेव्हां तो दुसऱ्या रथांत बसून युद्ध करूं लागला.

एका दिशेला सात्यकी व आलंबस राक्षसाचें युद्ध सुरू झालें. आलंबसनें आपली माया सोडली. सात्यकीनें अर्जुनाजवळून ऐन्द्रास्त्र घेऊन त्याच्यावर सोडलें आणि त्याच्या मायेचा नाश केला.

धृष्टद्युम्न व दुर्योधनाचें द्वंद्व बराच वेळ चाललें होतें. या द्वंद्वांत दुर्योधनाचें शस्त्र तुटलें व रथहि मोडून गेला. नंतर तो तलवार घेऊन युद्ध करूं लागला पण त्यांत त्याचा पराजय झाला. शकुनीनें त्याला पाहिलें व त्याला आपल्या रथांत बसवून घेऊन गेला.

पराभव होऊन दुर्योधन मागें जात असतां त्याच्या डोळ्या. देखत भीमानें कृतवर्म्याचा रथ मोडून टाकला. शेवटीं असहाय्य होऊन तो कृपाच्या रथांत बसून निघून गेला. भीमाचें फावलें. त्यानें कौरव सेना उध्वस्त करण्याचा तडाखा चालविला.



अर्जुन व उलूपी यांचा मुलगा ऐरावत अवन्तीचे राजे विन्दानुविंद यांच्याशीं युद्ध करूं लागला. दोघांना त्रस्त केल्यावर त्यानें एकाला खालीं ओढलें आणि आपण त्या रथांत चढला. रथांतल्या रथांत त्या दोघांचें युद्ध झालें. संधी साधून ऐरावतानें रथाच्या सारथ्याला मारून टाकलें. लगाम ढिला पडल्याबरोबर रथाचे घोडे उधळले.

या दिवशीं सकाळपासून पांडवांचीच सरशी चालली होती. परंतु दुपार उलटल्यावर घटोत्कच व भगदत्त यांच्या द्वंद्वांत घटोत्कचाच पराभव झाला व तो पळून गेला. संधि मिळतांच भगदत्त पांडव सैन्यावर धांवून गेला.

नकुळ व सहदेव आपला मामा शल्य याच्याशीं युद्ध करूं लागले. शल्यानें नकुळाचा रथ नष्ट करतांच तो सहदेवाच्या रथांत बसून युद्ध करूं लागला. मध्येंच सहदेवानें एक तीक्ष्ण बाण सोडला. तो वर्मी लागल्यानें शल्य मूर्च्छित होऊन पडला. त्याचा सारथी रथ घेऊन शिबिराच्या दिशेकडे वळला.

त्या दिवशीच्या युद्धांत सर्वांत जास्त संहार अर्जुनानें केला. त्यानें सुशर्माला पराजित करून त्रिगर्तांचे अनेक योद्धा व सैन्य नष्ट केलें. कौरव पक्षांत भीष्मानें अर्जुनाप्रमाणेंच पराक्रम गाजविला.

सातव्या दिवशींचें हें युद्ध संपल्यावर रणभूमीवर लांडग्या गिधाडांचें युद्ध सुरू



झालें. घारी आकाशांत घिरट्या घालूं लागल्या. कोल्ह्या कुत्र्यांच्या टोळ्या त्या बाजूला धावा घेऊं लागल्या. सर्व दृश्य भयंकर भासूं लागलें.

सर्व योद्धे आपापल्या शिबिरांत परतले. जखमा धुऊन स्नान केलें. त्यानंतर औषधोपचार करून झोंपीं गेले. आज कोणीहि युद्धाच्या गोष्टी बोलत जागत बसले नाहींत.

दुसरे दिवशीं सूर्योदयाबरोबर युद्ध सुरू झालें. भीष्मानें आघाडी मारली. तो सोमक, सृंजय, पांचाल वीर वगैरे पांडव सेनेंतील वीरांवर विजेप्रमाणें तुटून पडला. या हल्ल्याला एकट्यानें तोंड देण्याचें साहस भीमांतच होतें. तोहि भीष्माच्या बरोबरीनें लढला. भीमानें आपली सर्व शक्ति एकवटून भीष्मावर असा हल्ला केला कीं 'देमाय धरणी ठाय' असें होऊन गेलें त्याला. भीष्माच्या मदतीस दुर्योधन आपल्या भावांसह तेथें होता तरी भीमानें भीष्माच्या सारथ्याला मारलेंच. अर्थातच भीष्माला रथ एका बाजूस न्यावा लागला.

त्या सर्वांना पळतांना पाहून भीमानें दुर्योधनाचा भाऊ सुनाभ याचें मुंडकें आपल्या बाणानें उडविलें. दुर्योधनास संताप आला व आपल्या सात भावांसह परतला आणि भीमावर हल्ला केला. आदित्यकेतु, बह्वाशि, कुण्डधार, महोदर, पंडितक, अपराजित, विशालाक्ष सर्वांनीं त्याला घेरून त्याच्यावर बाण सोडण्यास सुरवात केली. भीमाला याचा इतका राग आला कीं त्यानें त्या सातहि भावांना यमसदनास पाठविलें.

दुर्योधनानें नेहमीं प्रमाणें आपलें रडगाणें भीष्मापुढें गाइलें. म्हणाला—"आजोबा, बघा हा भीम कशी सैन्याची मारकाट करतो आहे. आणि तुम्ही आपले नुसते पाहात राहिला आहांत. आपली ही होत असलेली दुर्दशा तुम्हांला पाहवते तरी कशी!"





भीष्माचा राग अनावर झाला. तो म्हणाला—"मी तुला किती वेळां तरी समजावून सांगितलें. पण तूं कानाडोळाच करीत आहेस त्याकडे. कितीदां सांगितलें, तरी पुन्हां मला व द्रोणाला कशाला ओढतोस या युद्धांत? भीमाच्या हातांत तुझे भाऊ सांपडले तर तो काय त्यांना मारल्याशिवाय सोडील? अरे पांडवांना जिंकणें सोपें नाहीं! पण आतां माघार घेण्यांत तरी काय अर्थ आहे?"

त्या दिवशीं दुपारी फार भयंकर निकराची लढाई झाली. युधिष्ठिरानें आज्ञा केली आणि भीष्माला मारण्यासाठीं सगळी पांडव सेना त्याच्यावर तुटून पडली. अर्थातच बचावासाठीं कौरव सेना धावून आली. द्रोण सृंजय व सोमकांच्या सेनेचा नाश करूं लागला. तर भीम नकुल सहदेवांना घेऊन गजदलाच्या मदतीनें आधिकाच्या मागें लागला. ऐरावतानें आपल्या सैन्याची जमवाजमव करून कौरवांशीं युद्ध सुरू केलें. ऐरावताला पाहून शंखाचे साही भाऊ, गज, गवाक्ष, वृषभ, चर्मवन्त, आर्जव, शुक त्याच्यावर धांवले. या वेळीं ऐरावत फारच शौर्यानें लढला. एवढेंच नव्हें तर त्याच्या अंगांत जे बाण घुसत होते तेच घेऊन तो पुन्हां शत्रुवर सोडूं लागला. त्याच्या बाणांनीं शत्रू मूर्छित झाले व खालीं पडले. त्यांना मारण्यासाठीं तो तलवार घेऊन पायींच निघाला. परंतु पुन्हां ते शुद्धीवर येऊन त्याच्याशीं युद्ध करूं लागले. तरी पण त्यांना जास्त पराक्रम दाखविणें शक्य झालें नाहीं. शेवटीं ते ऐरावतच्या तलवारीनें मारले गेले. शिल्लक राहिला एकटा वृषभ.

भीष्मानें तेव्हांच दुर्योधनाला निक्षून सांगितल्यामुळें तो त्याच्याकडे गेला नाहीं. तो गेला एका राक्षसाकडे. त्याला म्हणाला—"अरे ज्यानें तुझ्या बकासुराला मारलें, त्याच्याच भावाचा मुलगा हा सारा संहार



करतो आहे. आणि तूं तर माया करण्यांत पटाईत आहेस. मग कांहीं तरी युक्ति करून मारून टाक ह्या पोराला."

दुर्योधनाच्या सांगण्यावरून तो ऐरावताशीं झुंज देऊं लागला. ऐरावत दमलेला होता. थोडा वेळ युद्ध केल्यावर तो बाण लागून मूर्च्छित होऊन पडला. मग काय. तो राक्षस तलवार घेऊन आला व त्याला मारून टाकलें.

ही गोष्ट अर्जुनाच्या कानावर फार नंतर गेली. कारण तो त्या वेळीं दुसरीकडे कौरवांशीं युद्धांत गुंतला होता. परंतु घटोत्कचाला तेव्हांच कळलें. तो एकदम गरजला. त्याची गर्जना ऐकून सारी रणभूमि हादरून गेली आणि तो आपल्या राक्षस सैन्यासह कौरवांच्यावर असा तुटून पडला कीं त्यामुळें स्वतः दुर्योधनाला त्याच्याशीं लढण्यास यावें लागलें. त्याच्याबरोबर वंग देशाचा राजा त्याच्या मदतीला होता.

दुर्योधनानें आपल्या बाणानें कित्येक राक्षसांना मारून टाकलें. त्यांना थोपविण्यासाठीं घटोत्कचानें एका शक्तिबाणानें त्याला मारण्याचें ठरविलें. तो शक्तिबाण काढून, सज्ज करून, दुर्योधनावर रोखून त्याच्यावर धावून गेला आणि बाण सोडला. परंतु त्याचा हा विचार वंग राजानें ताडला. दुर्योधनाला वांचविण्यासाठीं त्यानें आपला हत्ती दुर्योधनाच्या रथा समोर घातला, आणि आपण जीव संभाळून पळून गेला. त्याच्या अंदाजाप्रमाणें शक्तिबाण हत्तीला लागून तो मरून पडला. अशा तऱ्हेनें दुर्योधनावरचें संकट टळलें. आपला बेत फसल्या कारणानें घटोत्कचानें एकदम सिंह गर्जना केली. त्यामुळें सर्व सेना भयभीत झाली."

द्रोणाच्या कानाजवळ कोणी येऊन ओरडलें—"घटोत्कच दुर्योधनाला मारण्याच्या विचारांत आहे. जाऊन त्याचें रक्षण करा."



त्या वेळीं द्रोण, सोमदत्त, बाह्लिक, सैन्धव, कृप, भूरिश्रव, शल्य, बृहद्बल, अश्वत्थामा, विकर्ण, चित्रसेन, विविंशति वगैरे सर्व तेथेंच होते. ते सर्व मिळून त्याच्या मदतीला धावून गेले. ह्यांचें व घटोत्कचाच्या राक्षसांचें फार मोठें युद्ध झालें. घटोत्कचहि आपलें दानवी युद्धकौशल दाखवून लढूं लागला.

घटोत्कचाला निकरानें लढत असलेला पाहून भीम, अभिमन्यु वगैरे वीर त्याच्या मदतीसाठीं आले. कौरवांच्या बाजूनेंहि आणखी सेना आली आणि त्या ठिकाणीं फारच मोठें निकराचें युद्ध झालें. ह्या युद्धांत एक वेळ अशी आली कीं भीमाला वाटलें आतां आपल्याला वरचें बोलावणें आलें आणि तो जवळ जवळ हताश झाला. तरी पण योध्यांचा पीळ कसा सुटणार. तो तसाच युद्ध करीत राहिला. भीमाची परिस्थिति घटोत्कचानें ताडली. त्यानें आपलें मायावी रूप दाखविलें. तें पाहून अश्वत्थाम्यासारखे वीर सुद्धां थोडा वेळ घाबरले. मग सैन्याची काय वाट. तें तर पळूं लागलें. त्यानें मागें वळून सुद्धां पाहिलें नाहीं. ह्याच वेळीं घटोत्कचानें एक मोठी गर्जनाहि पण केली. मग काय विचारतां! पळापळ सुरू झाली.



राक्षसाला आवरायला राक्षसच हवा. भीष्म भगदत्ताला म्हणाला—"राजा, घटोत्कचाची बरोबरी करायला तुलाच गेलें पाहिजे. तुझ्याजवळ बरीच अस्त्रें आहेत. आणि तूं बऱ्याच राक्षसांना मारलेंहि पण आहेस." भीष्माची आज्ञा होतांच भगदत्त आपल्या सुप्रतीक नांवाच्या हत्तीवर बसून निघाला.

भगदत्त सरळ भीमाकडे गेला आणि त्याच्या रथावर आपला हत्ती सोडला. तेथें भीमाच्या मदतीला आलेला दशार्ण देशाचा राजा क्षत्रियदेव होता. तोहि एका उत्तम हत्तीवर बसून आलेला होता. त्यानें भग-

दत्ताच्या हत्तीला अडविलें. परंतु भगदत्ताच्या प्रहारापुढें तो टिकूं शकला नाहीं. सुप्रतीक बेफाम सुटून पांडवांच्या सेनेचा नाश करूं लागला.

घटोत्कच त्याला मारण्यासाठीं धांवला. त्यानें सुप्रतीक वर एक भाला फेंकला. पण तो हत्तीच्या शरिरांत घुसण्यापूर्वीच भगदत्तानें मोडून टाकला आणि उलट घटोत्कचावर एक शक्ति सोडली. पण त्यानें मध्येंच तिला अडवून उलट फेंकलें. घटोत्कचाच्या ह्या प्रतापानें भगदत्ताची गाळण उडाली.

पांडव सैन्यानें घटोत्कचाचा जयजयकार केला. तो ऐकून भगदत्त फार चिडला व पुन्हां नव्या जोमानें लढूं लागला. त्यानें सर्वांवर बाण सोडले. त्याच्या बाणानें भीमाचा सारथी विशोक मूर्च्छित झाला. त्याबरोबर भीम गदा घेऊन निघाला. ह्याच सुमारास अर्जुनहि तेथें येऊन पोहोंचला. येथेंच त्याला, कृष्णाला व भीमाला ऐरावताच्या मृत्यूची बातमी समजली.

पुन्हां एकदां अर्जुनाला विरक्ति आली. तो पुटपुटला—"हें कसलें युद्ध. दोन्हीकडील वीर त्यांचे नातेवाईक सर्व पटापट मरत आहेत." तरी सुद्धां युद्ध करणें जरूरी आहे, हें त्याला पक्कें माहीत होतें. त्या परिस्थितींत युद्ध करण्याशिवाय दुसरा कांहीं मार्गच नव्हता.

ह्या युद्धांत सामील होण्यासाठीं दुर्योधनाचे आणखी कांहीं भाऊ आले. त्यांना पाहतांच भीम उसळला आणि त्यांची बाकी वसूल करूं लागला. तें पाहून बाकीचे बंधू प्राण वांचवून पळून गेले. ह्या दिवशींच्या युद्धांत सर्वांना इतका आवेश चढला होता कीं अगदीं अंधार पडेपर्यंत ते लढत राहिले. शेवटीं अंधेरांत कांहीं दिसेनासें झालें तेव्हां त्यांनीं युद्ध थांबविलें.






[ १३ ]

[चंद्रवर्मा व कपालिनी कांशाच्या डोंगरावर गेले. तेथें चंद्रवर्मा आणि कालकेतूनें कपालिनीसाठीं एक घर बांधून दिलें. नंतर चंद्रवर्मा त्या दोघांचा निरोप घेऊन निघाला. त्याला जंगलांत एक लोखंडाची सांखळी दिसली. जंगलांत पडलेली ती सांखळी पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें ती उचलली. त्याबरोबर एक भयंकर कुत्रा धांवत व भुंकत त्याच्याकडे आला. पुढें वाचा.]

तो भयंकर कुत्रा जोर जोरानें भुंकत पळत आला तो त्यानें एकदम चंद्रवर्मावर झडप घातली. चंद्रवर्मानें त्याला मारण्यासाठीं तलवार उचलली. पण तेवढ्यांत डाव्या हातांतील ती सांखळी कुत्र्याला लागली. त्या बरोबर तो तीन ताड आकाशांत उडून दूर जाऊन पडला.

चंद्रवर्मा दोन पावलें मागें सरकला आणि हळूं हळूं कुत्र्याजवळ जाऊं लागला. कुत्रा उठला. चंद्रवर्माच्या हातांतील ती सांखळी निरखून पाहिली व मागें सरकत सरकत तो जवळपासच्या झाडीपाशीं जाऊन उभा राहिला.

ह्याचें चंद्रवर्माला आश्चर्य वाटलें. त्यानें सांखळी निरखून पाहिली. आणि कुत्र्याजवळ पडेल अशी फेंकली. त्यानें ती हुंगली व तोंडांत धरून चंद्रवर्माजवळ येऊन शेंपूट हालवूं लागला.













त्या सांखळींत कांहीं तरी जादू आहे असें वाटून त्यानें ती सांखळी घेतली आणि कुत्र्याच्या गळ्यांत बांधून एक टोंक आपल्या हातांत धरलें. कुत्र्यानें इकडे तिकडे पाहिलें व पुन्हां जोर जोरानें भुंकत चंद्रवर्माला ओढत ओढत झाडींत घुसला. तो कुत्र्याच्या पाठोपाठ जात होता खरा, पण त्याचें मन फार अस्वस्थ होतें. हा कुत्रा साधा कुत्रा नसून कोणी राक्षस भूत असावें असें त्याला वाटत होतें. आपलें सर्व धैर्य एकवटून जीव मुठींत घेऊन तो चालला होता.

जंगलांतून झाडींतून मार्ग काढीत कुत्रा त्याला एका टेंकडीवर घेऊन आला. तेथून टेंकडीच्या पायथ्याशीं एका ओढ्याच्या कांठीं त्याला एक झोंपडी दिसली. त्यानें अंदाज केला कीं त्या झोंपडींत ह्याचा मालक असला पाहिजे. म्हणून त्यानें सांखळी त्याच्या गळ्याभोंवती गुंडाळून त्याला सोडून दिलें. सांखळी सोडल्यावर सुद्धां कुत्रा पळून पुढें निघून गेला नाहीं. तो तसाच चंद्रवर्माच्या पुढें वाटाड्याप्रमाणें चालत होता.

झोंपडीजवळ चंद्रवर्मानें पाहिलें पण कोणी असल्याचें त्याला दिसलें नाहीं. कुत्रा जोरजोरानें भुंकत होता. पण आंतून कोणी आलें नाहीं. कुत्राहि एकदां आंत जाऊन आला. पण त्याच्या पाठोपाठ सुद्धां कोणी आलें नाहीं. त्यानें झोंपडी भोंवती एक चक्कर मारून पाहिलें पण तेथें त्यास कोणीहि दिसलें नाहीं.

शेवटीं चंद्रवर्मा आंत शिरला. आंत खरोखरच कोणी नव्हतें. मात्र एका बाजूला एक मोडकीशी खाट होती. दुसऱ्या बाजूला एक चूल आणि चुली भोंवती कांहीं भांडीं मडकीं पडलेलीं दिसलीं. पलीकडे भिंती-





जवळ एक दोरी होती व तिच्यावर दोन चार फाटके कपडे लोंबत होते.

ती झोंपडी कोण्या गरिबाची असल्याचा भास होत होता. परंतु तो गरीब तरी अशा एकान्त झोंपडींत राहून काय करीत असेल! ह्या ठिकाणीं वेळ कसा घालवीत असेल! वगैरे प्रश्न आपोआप चंद्रवर्माच्या मनांत आले. कदाचित येथें सुद्धां कोणी मांत्रिक तर रहात नसेल? ह्या विचारानें तो थोडा घाबरला पण तशा त्या ठिकाणीं तो काय करूं शकणार!

तो धैर्यानें पुढें सरसावला व गाडगीं मडकीं पाहिलीं. इकडे तिकडे कांहीं माणसाची हाडें तर दिसत नाहींत ना. म्हणून लक्ष पूर्वक पाहिलें. तो पाठमोरा बसला होता. तोंच त्याच्या कानावर हे शब्द पडले— "जसा आहेस तसाच्या तसाच बसून रहा. जरा जरी हाललास किंवा मागें वळून पाहिलेंस तर भाला पाठींत बसलाच म्हणून समज. प्रथम माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दे."

चंद्रवर्माच्या अंगाला दरदरून घाम सुटला. कोण असावा हा! त्यानें खरोखरच भाला रोखला आहे काय! मागें वळल्यास म्हटल्याप्रमाणें तो खरोखरच आपला अंत



करील काय, ह्याविषयीं त्याला कांहींच कल्पना करवेना. आपल्याला कोणच्या प्रश्नांस उत्तरें द्यावयाचीं आहेत तेंहि कोडें उलगडणें अशक्य होतें. पण प्रसंगावधान राखून तो म्हणाला— "मी तुझा शत्रु नाहीं, मित्र आहें. मला पाहिल्यावर तुला ह्याची खात्री पटेल."

"तूं आणि माझा मित्र! शक्यच नाहीं." मागें असलेला मनुष्य म्हणाला. नंतर त्यानें विचारलें— "तें राजाचे सैनिक कोठें आहेत?"

"राजाचे सैनिक! मी तर ह्या जंगलांत एकटाच भटकतों आहें. कुत्र्याच्या त्या सांखळीनेंच खरोखर आज माझ्यावर कृपा




केली आहे. नाहींतर मी केव्हांच त्या कुप्याच्या आहारीं पडलों असतों. तोच रस्ता दाखवीत मला ओढत येथपर्यंत घेऊन आला." चंद्रवर्मानें सांगितलें.

"होय, त्या सांखळीमुळेंच तुझे प्राण वांचले, यांत कांहीं शंका नाहीं. माझा मुलगा त्या कुप्याच्या गळ्यांत सांखळी घालून त्याला बरोबर घेऊन या सार्‍या जंगलांत हिंडत असे. पण राजाच्या शिपायांनीं जेव्हां त्याला पकडून नेलें तेव्हां ती सांखळी कोठें तरी पडून गेली. कुप्यानें तुझ्या हातांत सांखळी पहिल्यावर अनुमान केलें कीं तूं त्याच्या मालकाचा मित्र असशील. आणि म्हणूनच तुझे प्राण वांचले. बरें आतां सांग, माझा मुलगा जिवंत आहे कीं राजानें त्याला मारविलें!" त्या व्यक्तीनें विचारलें.

चंद्रवर्मा विचारांत पडला. त्याला त्यांतील कांहींच माहीत नव्हतें, पण त्या माणसाच्या बोलण्यावरून त्यानें एवढें ताडलें कीं याच्या मुलाला कोणा राजाच्या सैनिकांनीं पकडून नेलें आहे. आणि तेथें त्याचा छळ होत असला पाहिजे. हें सर्व असलें तरी आल्या प्रसंगाला कसें तोंड द्यावें. या विचारांत तो होता. इतक्यांत त्याला एक युक्ति सुचली. तो म्हणाला—"आपण कोण आहांत हें मला माहीत नाहीं. आणि कोणत्या राजाच्या सैनिकांनीं आपल्या मुलाला पळवून नेलें आहे त्यांलाहि मी ओळखत नाहीं. आपण विनाकारण केवळ गैर समज करून माझ्यावर संशय करीत आहांत. ही माझी तलवार. घ्या ही आपण, म्हणजे आपल्याला माझ्यापासून भितीचें कारण राहणार नाहीं. मग आपण मोकळेपणानें बोलूं."

चंद्रवर्मानें आपली तलवार पुढें करतांच त्या माणसानें ती हिसकावूनच घेतली व म्हणाला—"ठीक. वळ आतां मागें. पण तरी सुद्धां लक्षांत ठेव, जरा जरी गडबड केलीस तर जिवंत राहाणार नाहींस."

चंद्रवर्माच्या जिवांत जीव आला. त्यानें मागें वळून पाहिलें. त्याच्या समोर एक सत्तर वर्षांचा म्हातारा उभा असल्याचें त्याला दिसलें. त्याचे केस आणि दाढी अगदीं अंबाडी सारखी पांढरी झाली होती. तोंडावर सुरकुत्या पडल्या होत्या. डोळे लाल होते. त्याच्या एका हातांत भाला व दुसर्‍या हातांत तलवार होती.

चंद्रवर्मा आपलें सर्व धैर्य एकवटून चेहेर्‍यावर निर्भयता दाखवून म्हणाला—"मी







राजसैनिक नाहीं. उलट एकदां मीच एका देशाचा राजा होतों. पण दैवगतीनें आज जंगलांत भटकत आहें. आपण म्हणतां तसें कोणी व कोणत्या राजाच्या आज्ञेनें आपल्या मुलाला पकडलें आहे ! कोठें आहे त्याचें राज्य !"

"तूं आतां कोणाच्या राज्यांत आहेस ! हें सुद्धां तुला माहीत नाहीं ! आश्चर्य आहे." म्हातारा म्हणाला.

चंद्रवर्मानें नकारार्थी मान हलविली. क्षण भर म्हाताऱ्यानें त्याला निरखून पाहिलें आणि डोळे विस्फारून व थोडी मान डोलवून तो म्हणाला—"तुझ्या बोलण्यावरून आणि कपड्यावरून खरें. वाटतें आहे तूं म्हणालास त्याप्रमाणें खरोखरच तुझें राज्य गेलें असेल तर तें परत मिळविण्यास मी तुझी मदत करीन. पण तूंहि मला मदत करशील असें वचन दे."

"माझ्याकडून आपण कशा तऱ्हेच्या मदतीची अपेक्षा करतां !" चंद्रवर्मानें विचारलें.

"रुद्रपुरचा राजा शिवसिंह माझ्या मुलाला पकडून घेऊन गेला आहे. त्याच्या सैनिकांपासून लपत छपतच मी येथें राहात आहें. पण अशा तऱ्हेनें फार दिवस राहूं शकेन असें मात्र वाटत नाहीं. तो मला पकडण्याच्या टोहांत आहे. जर त्यानें आतांपर्यंत माझ्या मुलाला मारून टाकलें असेल तर आपण कांहीं करूं शकणार नाहीं आणि जर नसेल तर मी त्याला संतुष्ट करण्यासाठीं 'कांशाच्या किल्ल्याचा' मार्ग दाखवीन." म्हातारा म्हणाला.

"कांशाचा किल्ला !" चंद्रवर्मानें आश्चर्यानें म्हटलें. "कांशाच्या किल्ल्यासंबंधी लहानपणीं मी ऐकलें होतें. तेव्हां मोठी माणसें सांगत असत कीं कांशाचा किल्ला कुठें तरी



पश्चिमेच्या बाजूला समुद्र किनाऱ्यावर आहे. तो किल्ला शोधण्याचा कोणी प्रयत्न केला आणि जर त्याला तिकडे जाण्याचा रस्ता मिळालाच तर मनुष्य जिवंत परत येत नसे. त्या साठींच आपल्याला तो मार्ग माहीत आहे म्हणालांत म्हणून मला आश्चर्य वाटलें."

"होय. आश्चर्याची गोष्ट तर खरीच." असें म्हणत म्हातारा मान खालीं करून विचार करूं लागला.

थोड्या वेळानें त्यानें डोकें वर उचललें. चंद्रवर्माच्या नजरेला नजर भिडवून म्हणाला—"कांशाचा किल्ला कुठें आहे हें तर तुला माहीतच आहे. तूं म्हणतोस त्याप्रमाणें खरोखरच त्याचा मार्ग शोधून काढण्यांत पुष्कळ आपले लोक प्राण गमावून बसले आहेत. जो कोणी त्या वाटेला जाई तो मारला जात असे, हें अगदीं खरें आहे."

"असेंच तर आम्हीं ऐकलें होतें."

यावर म्हातारा स्मित करून म्हणाला—"मला पण आश्चर्य वाटत आहे कीं कांशाच्या किल्ल्यासंबंधी तुला हें सर्व कसें माहीत आहे ! माझ्याजवळ त्याच्या वाटेचा नकाशा आहे आणि तो आमच्या पूर्वजांपैकीं कोणीतरी मिळविलेला आहे. ही गोष्ट रुद्रपूरच्या राजाला माहीत आहे. म्हणूनच तो मला पकडूं पाहात आहे. त्याच्या शिपायांचा डोळा चुकवून मी रानोमाळ भटकत आहें. त्यानेंच माझ्या मुलाला पकडून नेलें. कांशाच्या किल्ल्यांत हजारों रत्न राशी आहेत. त्यांतील कांहीं हिस्सा मला देण्याचें जर त्यानें कबूल केलें तर मी त्याला तो नकाशा दाखवीन. त्या साठींच तुझ्या मध्यस्थीची मला आवश्यकता आहे. सर्वांत अगोदर माझा मुलगा देव याची सुटका केली पाहिजे. या सर्व कामासाठीं मला



तुझी मदत मिळाली तर मी माझ्या हिश्श्यांतील कांहीं वांटा तुम्हाहि देईन. त्या द्रव्याच्या बळावर तू सैन्य जमवून आपलें गेलेलें राज्य परत मिळव."

म्हाताऱ्याच्या बोलण्यावरून तो साधासुधा माणूस नसून पक्का कावेबाज आहे हें चंद्रवर्मीला कळून चुकलें होतें.

"आपली अट मला एकदम मान्य. बरें पाहूं दे तरी कांचाच्या किल्ल्याच्या रस्त्याचा नकाशा!" चंद्रवर्मानें विचारलें.

म्हातारा चंद्रवर्मावर खुश झाला. त्यानें त्याची पाठ थोपटली. त्याच्याकडे पाहात तो त्याला कांहींतरी सांगूं लागणार तोंच बाहेर त्यांना कोणाची तरी चाहूल लागली. म्हाताऱ्यानें डोकावून पाहिलें तर त्याला राजाचे शिपाई येत असल्याचें दिसलें. तावडतोब मागें वळून तो म्हणाला—"राजाचे शिपाई इकडेच येत आहेत. जर त्यांनीं माझ्या मुलाच्या केसालाहि धक्का न लावण्याचें वचन दिलें तर मी त्यांची भेट घेईन. तसेंच त्या किल्ल्यांतील संपत्तीचा किती हिस्सा मला देणार तेंहि विचारून वचन घेऊन ठेव." एवढें सांगून तो झोपडी बाहेर पडून जंगलांत घुसला व अदृश्य झाला.

म्हातारा आपल्याला संकटांत टाकून निघून गेला. त्याच्या धूर्तपणाचें चंद्रवर्माला आश्चर्य वाटलें. संकटाला तोंड तर द्यावेंच आहे. पण कसें? ह्या विचारांत तो पडला.

थोड्याच वेळांत सैनिकांनीं झोपडीला वेढा दिला. दरवाज्याशीं येऊन त्यांचा सरदार ओरडला—"आंत कोण असेल त्यानें बाहेर यावें. जरा जरी पळून जाण्याचा प्रयत्न केला तर हा भाला जाईल आरपार, लक्षांत असूं दे." चंद्रवर्मा निर्भयपणें झोपडीच्या बाहेर येऊन उभा राहिला व सर्व सैनिकांकडे आश्चर्य मुद्रेनें पाहूं लागला. (पुढें चालू)



## त्याला पश्चात्ताप पण झाला नाहीं!

विक्रमार्क वडाच्या झाडाजवळ गेला. शव खालीं उतरवून खांद्यावर टाकलें आणि स्मशानाच्या वाटेला लागला. आपल्या संवयीप्रमाणें शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"मला वाटतें, ह्या कामाची जबाबदारी शिरावर घेतल्यामुळें तुला आतां पश्चात्ताप वाटत असेल नाहीं? पश्चात्ताप न करणारा त्या काश्मीरवर्मा सारखा कोणी विरळाच मिळायचा. त्याचीहि गोष्ट ऐकून ठेव." त्यानें गोष्ट सांगण्यास प्रारंभ केला.

एकदां कपिल देशांत काश्मीरवर्मा नांवाचा एक तरुण राहात होता. तो चांगला सुशिक्षित होता. पण अतिशय गरीब होता. त्या वेळीं पंडितांचा आदर करणारा कोणी हरीचा लाल नसल्यामुळें ह्या पंडिताची ती दशा झाली होती. त्यानें आपल्या पांडित्याचा उपयोग करून

वेताळाच्या गोष्टी



चांगुलपणानें पैसे मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याला पोटापुरते पैसे सुद्धां मिळूं शकले नाहींत. तेव्हां कोणत्याहि रीतीनें पैसे मिळावें असें त्यानें ठरविलें. तो चोरीमारी, किंवा जुगारीनें पैसे मिळवूं लागला. फुकटाच्या मिळकतीचा उपयोगहि ज्या प्रमाणें व्हायचा त्याच प्रमाणें होऊं लागला. तो नशेबाज आणि रंगेल बनला. ज्यांना ह्याचें पांडित्य माहीत होतें ते ह्याला नावें ठेवीत. पण ह्यानें कधीं त्या लोकांची पर्वा केली नाहीं.

थंडीचे दिवस होते. स्मशानाजवळील झोपडींत कांहीं चोर जमले होते. तेथें ते खूप झिंगून पडले होते. जे अर्धवट गुंगींत होते. त्यांनीं जुगार खेळण्यास प्रारंभ केला. काश्मीरवर्मा पण तेथेंच होता. खेळतां खेळतां त्यांतील दोघांचें भांडण झालें. त्यांतील एक जण सारखा जिंकत चालला होता. म्हणून दुसऱ्याला राग आला. त्यांत जिंकणारा कुचेष्टेनें दुसऱ्याला हंसला. म्हणून तो जास्तच चिडला आणि त्यानें त्याच्या पोटांत एकदम सुरी खुपसली. त्याबरोबर तो तेथल्या तेथें मरून पडला. सर्व चोरांनीं तेथून पाय काढला. त्यावेळीं त्यांनीं थंडीवाऱ्याची परवा केली नाहीं आणि सर्व आपापल्या घरीं गेले. काश्मीरवर्मा मात्र त्या प्रेताजवळच बसून राहिला.

प्रेताजवळ बसून तो विचार करूं लागला. हत्या म्हटली कीं त्याच्यासाठीं कोणी तरी फांसावर चढणारच. ह्या प्रेताजवळ जर मी सांपडलों तर मलाच कदाचित तें शासन मिळेल." त्याच्या अंगाचा थरकांप झाला आणि दरदरून घाम सुटला. आतां येथें राहातां उपयोगी नाहीं. असा विचार येतांच तो झोपडीच्या बाहेर आला आणि शहराच्या दिशेनें वाट चालूं लागला. कोठें तरी एकाद्या घराच्या पडवींत किंवा रस्त्यावरील ओट्यावर रात्रभर पडून राहावें असा त्यानें विचार केला. वाटेंत कोठें गस्त घालणारे पोलीस दिसले कीं तो घराच्या आडोशाला लपत होता.

काश्मीरवर्मा शेवटीं आपल्या एका जुन्या मित्राच्या घरीं येऊन पोहोंचला व त्यानें त्याचें दार ठोठावलें. "कोण आहे!" आंतून आवाज आला.

"मी काश्मीरवर्मा. जरा दार उघड. मी पाहाटेपर्यंत येथेंच विश्रांति घेऊन लगेच निघून जाणार आहें." काश्मीरवर्मा म्हणाला.

बराच वेळ झाला आंतून कांहीं उत्तर मिळालें नाहीं. तेथून तो थोड्या अंतरावर असलेल्या दुसऱ्या एका मित्राकडे गेला. तेथेंहि त्याचें नांव ऐकल्यावर त्याला दार उघडलें नाहीं.

आपल्याला कोणी दार न उघडलेलें पाहून त्याच्या मनांत तऱ्हेतऱ्हेचे विचार आले. "नीच आहेत हीं माणसें. हीं मोठमोठीं घरें काय मेल्यावर आपल्या बरोबर का घेऊन जाणार आहेत? थंडीनें मरणाराला थोडा वेळ तरी आश्रय द्यायला काय हरकत आहे? उपाशीं मरणाराला घांसभर अन्न नाहीं कीं गरजवंताला मदत नाहीं. काय



करावयाची आहे एवढी मोठी दौलत जमवून." थंडींत कुडकुडत विचार करीत तो चालला होता.

त्यानें थंडीच्या दिवसांत घरादारांशिवाय रस्त्यावर राहणाऱ्या पोराबाळांना मरतांना पाहिलें होतें. ती आठवण होऊन त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला. त्याला वाटलें, आपल्याला सुद्धां आज तसेंच मरावें लागणार. तसें मरण्याची त्याची इच्छा नव्हती. त्याला उपाय म्हणून चोराप्रमाणें एकाद्या घरांत घुसण्याचा विचार त्याच्या मनांत आला.

समोरच एक मोठा वाडा त्याला दिसला. त्या वाड्यांतील स्वयंपाक घरांत शिरण्याचा त्यानें विचार केला. म्हणजे तेथें कांहीं तरी खायलाहि मिळेल. ऊब पण असेल. तेथेंच रात्र काढावी आणि पाहाटे चार चांदीचीं भांडीं घेऊन पसार व्हावें.

आंत शिरण्यासाठीं वाड्याच्या भोंवतीं फिरून त्यानें पाहिलें. पण आश्चर्य, त्याला आंत लख्ख प्रकाश दिसला. म्हणून त्यानें आपला बेत बदलला. चोरा-प्रमाणें जाण्यापेक्षां सरळ जावें असें त्याला वाटलें. त्यानें दार ठोठावलें. आंतून एक रुबाबदार आणि थोडा वयस्क माणूस आला. त्यानें दार उघडलें आणि त्याला पाहून म्हणाला—"आत्तां दार ठोठावून येण्याची काय गरज?"

"महाराज, थंडीनें आणि भुकेनें प्राण अगदीं कंठाशीं आले आहेत." तो म्हणाला.

"ये आंत." असें म्हणून तो माणूस त्याला घेऊन स्वयंपाक घरांत आला. घरांत त्याच्या शिवाय कोणीहि नसल्यानें त्यानेंच त्याला वाढलें. जेवत असतां त्यानें चारी बाजूला नजर फिरवली. एका मोठ्या कपाटांत बरीचशी चांदीचीं भांडीं त्याला दिसलीं. तो मनांत म्हणाला—"यांतील एकादें भांडें जरी उचलून नेलें तरी पुरें."

काश्मीर वर्मा जेवत असतां घर मालकानें त्याला विचारलें. म्हणाला—"बाबा, तुझ्या कपड्यावर हे रक्ताचे डाग कसे?"

"तें काम माझें नव्हे. चोरांचोरांत मारा-मारी झाली. त्यांत एक जण मारला गेला. त्या प्रेताची कल्पना आली तरी भीति वाटते." काश्मीर वर्मा म्हणाला.

"साधें प्रेत पाहिलें कीं तुला भीति वाटते! मी पुष्कळ प्रेतें पाहिलीं आहेत. मी किती तरी लढाया लढलों आहें. माझें नांव जगवीर. ऐकलें असशील कदाचित माझें नांव! बरें, पण तूं कोण?" त्यानें विचारलें.

"माझें नांव काश्मीर वर्मा. मी व्याकरण, तर्क आणि कायदा या तिन्ही विषयांचा पंडित, म्हणजे पदवीधर आहें आणि चोरी करून पोट भरणें हा माझा धंदा आहे." वर्मानें सांगितलें.

"असा सुशिक्षित असून चोरीचा धंदा करतोस!" मालकानें आश्चर्यानें विचारलें.

"मग त्यांत काय झालें. तुम्हीं नाहीं का योध्यांना मारतां, लुटतां!" काश्मीर-वर्मानें विचारलें.





"योद्धा आणि चोर यांची बरोबरी कशी होईल. योद्धा आपल्या देशासाठीं, धर्मासाठीं, प्रतिष्ठेसाठीं आपले प्राण तळहातावर घेऊन लढतो आणि चोर फक्त आपल्या स्वार्थासाठींच चोरी करतो." जगवीरवर्मा म्हणाला.

"चोरांना सुद्धां आपल्या प्राणाचे भय असतेंच. योद्धे एक दुसऱ्याला मारतात. चोरांना तसें दुसऱ्याला मारतां येत नाहीं. त्याच्या अगोदरच त्यांना फांसावर चढवलें जातें." काश्मीरवर्मा म्हणाला.

"सैनिक प्रजेचें रक्षण करतात. चोर प्रजेचें नुकसान करतात." जगवीर म्हणाला.

"त्या बाबतींत जरा शंका असते. एखाद्या शेतकऱ्याला विचारून पाहा, त्याला कोणाचें जास्त भय वाटतें, सैन्यांतील शिपायांचें का चोरांचें ? म्हणजे खरी गोष्ट लक्षांत येईल. चोर सैनिकाप्रमाणें एखाद्याचा अपमान नाहीं करीत." काश्मीरवर्मा म्हणाला.

"पण मलाच पाहा कीं सैन्यांत असून सुद्धां मी किती धन, मान व कीर्ति मिळविली आहे. सर्वजण माझा आदर करतात. नाहीं तर तूं, एक फटिंग भिकारी. नाहीं घर नाहीं दार! एवढेंच नाहीं तर खाण्याची सुद्धां भ्रांत. तुझा मान किती आहे हें तुलाच ठाऊक. शिकाऱ्याच्या भितीनें पळत सुटणाऱ्या त्या लांडग्याप्रमाणें आहे तुझी स्थिति." जगवीर म्हणाला.

तोंपर्यंत काश्मीरवर्माचें जेवण झाले होतें. तो म्हणाला—"महाराज, आपल्या दोघांत जर कांहीं फरक असेल तर तो फक्त पैशाचाच. जर आपल्याजवळ असलेले धन माझ्याजवळ असतें तर मीहि महा योद्धा झालों असतो. आणि आपण सुद्धां गरीब असतां तर चोरी केली असतीत. असें नका समजूं कीं चोरांच्या मनांतील मनुष्यता अगदीं नष्ट होते. आपण मला आंत बोलावून जेवावयास वाढलें त्या बद्दल मी फार आभारी आहें. आणि मला जर चोरीच करावयाची असेल तर मी आपला गळा दाबून हें सर्व सोनें, चांदी अगदीं सहज घेऊन जाऊं शकेन. आपण म्हातारे आहांत, एकटे आहांत, मी अजून तरुण आहें. माझ्या रक्तांत खुमखुमी आहे. परंतु मी आपल्या केसालाहि धक्का लावणार नाहीं."

हें ऐकून जगवीरवर्माला फार राग आला. तो एकदम ओरडून म्हणाला—"हलकटा! तुला माणसां माणसांतील फरक सुद्धां कळत नाहीं. काय उपयोग तुझ्या पांडित्याचा. तुला आंत येऊं दिलें हीच मी मोठी चूक केली.





जेवण तर झालेंच, पण आतां तूं एक क्षण भर देखील येथें थांबूं नकोस. चल चालता हो."

या वेळे पर्यंत पाहाट होऊं लागली होती. काश्मीरवर्मा तावडतोब उठला व म्हणाला—"आपल्याला कीर्ति मिळाली असेल, पण आपली मति मात्र गेलेली दिसते आहे." आणि तो बाहेर निघून गेला.

वेताळानें इतकी गोष्ट सांगून राजाला विचारलें कीं काश्मीरवर्मा धंदेवाईक चोर आहे, त्याचे मित्र चोर जुगारी आहेत. त्याला घरदार नाहीं. धन-दौलत नाहीं. कोणी त्याला आपला म्हणणारा नाहीं. भुकेच्या ओठीं अन्न घालणाराहि कोणी नाहीं. मग त्याला एवढा अभिमान कसला? त्याला वास्तविक परिस्थितीचा पश्चात्ताप कसा नाहीं वाटत. आपल्याहून गुणानें, विद्येनें थोर असतील त्यांचा आदर कां नाहीं करीत? जर उत्तर माहीत असून सांगितलें नाहींस तर तुझें डोकें फुटेल."

"ज्याला मरायची इच्छा नसते त्याला कसें तरी जगण्यावांचून उपाय नसतो. आणि जगण्यासाठीं जें काय करावें लागतें तें सर्व त्यानें केलें होतें. म्हणून त्याला आपल्या वागण्याची लाज वाटली नाहीं. ज्याला चांगुलपणानें जगतां येणें शक्य असतें, परंतु जो तसें जगत नाहीं त्यालाच पश्चात्ताप होतो. त्याला जगवीरवर्मा बद्दल जरासुद्धां आदर वाटला नाहीं. त्याचें कारण म्हणजे युद्ध करणाराबद्दल त्याला सहानुभूति कधीं वाटत नव्हती. जगवीरवर्माला चोराबद्दल जितका तिटकारा वाटत होता तितकाच तिटकारा काश्मीरवर्माला सैनिकाबद्दल वाटत असे. म्हणूनच त्यानें त्याच्याबद्दल कृतज्ञता तर दाखवली. परंतु त्याच्या मोठेपणाला मान देऊं शकला नाहीं." विक्रमार्क म्हणाला.

या प्रमाणें राजाचें मौन सुटतांच वेताळ शवासह त्या पूर्वीच्या वडाच्या झाडावर जाऊन लटकूं लागला. (कल्पित)





# यौगन्धरायची प्रतिज्ञा

उदयन वत्स देशाचा राजा होता. त्याला हत्तीच्या शिकारीचा अतिशय नाद होता. एकदां तो शिकारीसाठीं विन्ध्य पर्वतावर गेला होता. त्यावेळीं त्याचा मंत्री यौगन्धराय याला त्याच्या हेरांनीं येऊन सांगितलें कीं प्रद्योत राजानें नागवनांत एक मायावी हत्ती करून ठेवला आहे आणि त्यांत कांहीं सैनिकांना बसविलें आहे. त्या हत्तीचा आकार रंग सर्व विचित्रच आहे. त्या हत्तीबरोबर इतर साधे हत्तीहि आहेत. उदयन राजाला पकडण्यासाठींच प्रद्योत राजानें हें कारस्थान रचलें आहे. असेंहि त्यांनीं सांगितलें.

ही गोष्ट राजाला कळविण्यासाठीं यौगन्धरायनें सालक नांवाच्या एका दूताला एक चिट्ठी दिली व म्हणाला—"महाराज उद्यां वेणुवनांतून नागवनांत जाण्यासाठीं निघतील. निघण्या पूर्वीं ही बातमी त्यांना मिळाली पाहिजे. कसें तरी करून महाराजांना पकडावें म्हणून प्रद्योतनें हा डाव टाकला आहे. लवकर जा."

यौगन्धराय दूताला निरोप देत होता तेवढ्यांत महाराज उदयनचा संरक्षक हंसक तेथें आला. त्याच्या कडून यौगन्धरायला कळलें कीं महाराज आदल्या दिवशींच कांहीं शिकारी व नोकर यांच्या बरोबर एका पाऊल वाटेनें नागवनांत पोहोंचले आहेत. हा मार्ग जवळचा होता तरी फार धोक्याचा होता. हिंस्र पशु त्या वाटेनें नेहमीं वावरत असत. नर्मदा नदीच्या किनाऱ्यावर पोहोंचल्यावर ती पार करून महाराज महागम्भीर पर्वतावर गेले. तेथें एका डबक्यांत कांहीं हत्ती चिखल अंगावर उडवून घेत असलेले दिसले.

उदयन राजा तें दृश्य पाहाण्यांत गर्क झाला होता, इतक्यांत एका सैनिकानें सांगितलें कीं तेथून दोन मैलांवर एक विचित्र हत्ती



आहे. त्याचे दांत व नखें सोडून सर्व अंग निळ्या रंगाचें आहे. तो तेथील सागवानाच्या जंगलांत हिंडत आहे.

राजाचा संरक्षक पुढें म्हणाला—"राजाला तें खरेंच वाटलें आणि त्या सैनिकानें जणुं गजश्रेष्ठ कुवलयालाच पाहिलें आहे, असें समजून त्याला बक्षीस म्हणून सोन्याची कंठी दिली. नंतर राजा आपल्या नोकरांना व शिकाऱ्यांना तेथेंच थांबण्यास सांगून एकटाच हत्तीच्या शोधार्थ निघाला. तो वीणेच्या संगीतानें हत्तीला वश करून आणण्यासाठीं आपली वीणा घेऊन गेला."

"उदयन राजा एका घोड्यावर बसून गेला. त्याच्या मागून वीस निवडक शिपाई त्याच्या रक्षणार्थ म्हणून धांवले. दोन मैल गेल्यावर खरोखरच तेथें त्याला तो विचित्र हत्ती दिसला.

"राजाला पाहतांच प्रद्योतनें उदयनला व त्याच्या लोकांना घेरलें. उदयन चांगला योद्धा. त्याचे नोकर सुद्धां तयार होते. ते सर्व संध्याकाळपर्यंत लढत राहिले. शेवटीं दमलेला उदयन मूर्छा येऊन पडला. तेव्हां त्याला प्रद्योतनें पकडलें."

हंसक म्हणाला—"मी सर्व प्रकार प्रत्यक्ष पाहिला आहे. राजाला बऱ्याच जखमा झाल्या होत्या. त्याला पालखींत घालून प्रद्योत उज्जयिनीला घेऊन गेला. आम्हां मूठभर लोकांच्या मदतीनें त्यांचें रक्षण होणें शक्य नव्हतें म्हणून मी वृत्त कळविण्यासाठीं येथपर्यंत पळत आलों."

वृत्त ऐकतांच अंतःपुरांतील सर्व स्त्रिया रडूं लागल्या. त्यांचा आक्रोश ऐकून यौगन्धरायणें प्रतिज्ञा केली. म्हणाला—"मी राजाला सोडवून आणलें नाहीं तर नांवाचा यौगन्धराय नाहीं."

त्याच वेळीं आंत ब्राह्मण जेवत होते त्यांतील एका अर्धवट ब्राह्मण म्हणाला—

यौगन्धरायानें त्या ब्राह्मणाचे कपडे चढविले आणि वेड्याचें सोंग घेऊन तो घराबाहेर पडला. विदूषक वसन्तक भिकारी झाला आणि रूपवन्त मंत्री बौद्ध श्रमणाचा वेश करून त्याच्या बरोबर निघाले.

त्यांचा डेरा उज्जयनींत कात्यायिनी मंदिरांत होता. एक दिवस वसन्तकानें येऊन सांगितलें कीं आपल्या राजाच्या सर्व जखमा भरल्या आहेत. आतां तो नित्यनियमानें अंघोळ व नित्यकर्में करूं लागला आहे. राजा प्रद्योतानें त्याची फार चांगली व्यवस्था ठेवली आहे.

"आतां उगीच दिवस घालविण्यांत अर्थ नाहीं. उद्यांच राजाची सुटका करून घेऊन जाण्याचा प्रयत्न करूं. नलगिरि हत्तीच्या संबंधी सर्व बातमी मी काढली आहे. त्याला कुठें बांधतात, काय खायला घालतात आंघोळीला कोठें नेतात. कोठें निजवितात वगैरे सर्व माहिती मी आणली आहे. हत्तींना आगीची भीति वाटते. म्हणून उद्यां गज-शाळेला आग लावली कीं सर्व हत्ती घाबरून सैरावैरां पळूं लागतील. त्यांना आणखी बिथर-विण्यासाठीं देवळांतून मोठमोठ्यानें ढोलढमारे वाजवूं. गांवांत हत्तींचा गोंधळ माजला कीं



तेव्हां तो ज्या वीणेच्या नादानें हत्तींना वश करी ती 'घोषवती' वीणा सुद्धां सेवकांनीं आणली आणि राजा प्रद्योताच्या स्वाधीन केली. त्यानें ती वीणा आपल्या मुलीला दिली.

एक दिवस राणी सहज राजाला म्हणाली— वासवदत्तासाठीं इतक्या राजांच्या मागण्या आल्या, त्यांनीं आपापले दूत पाठविले. परंतु या वत्स देशाच्या राजानें कोणासहि पाठविलें नाहीं, पाहिलेंत !"

"तो मोठा घमेंडखोर आहे. आपण भरत वंशाचे आहोंत, वेदविद्येंत पारंगत आहोंत, वादन संगीतांत प्रवीण आहोंत, तरुण आहोंत सुंदर आहोंत, पराक्रमी आहोंत वगैरे गोष्टींचा त्याला फाजील गर्व आहे." राजा म्हणाला.

"आपल्या जावयांत जे गुण असावयाला हवेत ते सर्व गुण त्यांच्या ठिकाणीं दिसत आहेत." राणी म्हणाली.

राजाला आंतून क्रोध येत होता. स्वतःला कसें तरी आवरून रुक्ष स्वरांत तो फण-कारून म्हणाला—"जो आपलें म्हणणें मान्य करीत नाहीं. अशा शत्रूची तूं स्तुति का करीत आहेस ? मला नको ऐकवूं तें सारें."



यौगन्धरायानें त्या ब्राह्मणाचे कपडे चढविले आणि वेड्याचें सोंग घेऊन तो घराबाहेर पडला. विदूषक वसन्तक भिकारी झाला आणि रूपवन्त मंत्री बौद्ध श्रमणाचा वेश करून त्याच्या बरोबर निघाले.

त्यांचा डेरा उज्जयनींत कात्यायिनी मंदिरांत होता. एक दिवस वसन्तकानें येऊन सांगितलें कीं आपल्या राजाच्या सर्व जखमा भरल्या आहेत. आतां तो नित्यनियमानें अंघोळ व नित्यकर्मे करूं लागला आहे. राजा प्रद्योतानें त्याची फार चांगली व्यवस्था ठेवली आहे.

"आतां उगीच दिवस घालविण्यांत अर्थ नाहीं. उद्यांच राजाची सुटका करून घेऊन जाण्याचा प्रयत्न करूं. नलगिरि हत्तीच्या संबंधी सर्व बातमी मी काढली आहे. त्याला कुठें बांधतात, काय खायला घालतात आंघोळीला कोठें नेतात. कोठें निजवितात वगैरे सर्व माहिती मी आणली आहे. हत्तींना आगीची भीति वाटते. म्हणून उद्यां गज-शाळेला आग लावली कीं सर्व हत्ती घाबरून सैरावैरां पळूं लागतील. त्यांना आणखी बिथर-विण्यासाठीं देवळांतून मोठमोठ्यानें ढोलढमारे वाजवूं. गांवांत हत्तींचा गोंधळ माजला कीं





त्यांना शांत करण्यासाठीं आपल्या राजाला सांगण्यांत येईल. अशा तऱ्हेनें महाराज बंदि मुक्त होतील व त्या वीणेच्या ध्वनीनें नलगिरी शांत होईल. मग त्या गजराजावर बसूनच आपले महाराज कोणाला कळविल्या शिवाय कौशाम्बीला जातील. ज्याला हत्तीच्या सहाय्यानें पकडलें गेलें त्याची सुटका हत्तीकडूनच होऊं दे. वसन्तक, आतां तूं मात्र आपला हा विचार महाराजांना नीट समजावून सांग. चला आटपा. लागा आपापल्या कामाला."

"पण समजा, वत्स राजाला हें पसंत पडलें नाहीं तर?" वसन्तक म्हणाला.

"कारण सांगतो. या गेल्या गोकुळाष्टमीच्या दिवशीं वासवदत्ता मेण्यांतून दक्षिण मंदिराकडे चालली होती. ती कुमारी असल्यामुळें तिनें डोक्यावर पदर घेतला नव्हता आणि मेण्याचे पडदे देखील सोडले नव्हते. राजमार्गावर पाऊलभर पाणी झाल्यानें मेणा तुरुंगाच्या बाजूनें न्यावा लागला. विश्रांतीसाठीं म्हणून तुरुंगाच्या दाराशीं मेणा उभा करण्यांत आला. त्याच वेळीं महाराज तेथील अधिकाऱ्याच्या परवानगीनें मोकळ्या हवेंत हिंडण्यासाठीं बाहेर आले होते. त्यांनीं राजकुमारीला पाहिलें. मग काय, पलटलेंच पारडं." वसन्तकानें सांगितलें.

हें ऐकून यौगन्धरायाला थोडा राग आला आणि गम्मतहि वाटली. तो म्हणाला—"शरिरावरच्या जखमा बऱ्या होतां होतां एका मोठ्या जखमेनें हृदयांत बिवर केलेलें दिसतें आहे. इकडे हातापायांत हतकडी बेडी असतां हे उपद्व्याप कसे सुचले!"

"आपण त्यांचे विश्वासू नोकर. त्या दृष्टीनें आपणांस जें करणें होतें तें आपण केलें. चला आतां उलट पावलीं परत जाऊं." वसन्तक म्हणाला.

"तूं वसंतकच का म्हणतो आहेस असें? अरे आपण त्याचे विश्वासांतले. मग अशा स्थितींत त्याला सोडून जातां येईल का?" यौगन्धरायानें विचारलें.

"बरं तर केस पिकेपर्यंत येथें असेच राहून दिवस काढूं या. माझी मुळीच हरकत नाहीं." वसंतक म्हणाला.

"होय. ही वेळ येईपर्यंत सुद्धां जर आपलें काम झालें नाहीं तर तसेंच करावें लागेल आपल्याला. प्रयत्न करणें सोडून देतां येणार नाहीं." यौगन्धराय म्हणाला.

"राजाला तुरुंगांतून आणि राजकुमारीला अंतःपुरांतून आणि दास्यांच्या घोळक्यांतून एकाच दिवशीं आणि एकाच वेळीं जेव्हां आपण बाहेर काढूं तेव्हांच हें काम जमेल. म्हणजे तें झाल्या सारखेंच." वसंतक म्हणाला.

"काय लाखाची गोष्ट बोललास वसंतक. छान युक्ति सुचविलीस. यौगन्धराय आतां कांहीं तरी डोकें लढवून घडवा भेट या सुभद्रा अर्जुनांची." रूपवन्त म्हणाला.

"ओघानेंच आलें तें करणें." यौगन्धराय म्हणाला.

यौगन्धरायानें आपले शब्द खरे केले. त्यानें आपल्या एका सेवकाला वासवदत्ताच्या चंडवती हत्तीचा माहूत केलें. एक दिवस










त्या सेवकानें ताडीच्या दुकानांत जाऊन खूप ताडी प्यायल्या सारखें भासविलें. त्याच वेळीं वासवदत्ताच्या शिपायांनी त्याला येऊन सांगितलें कीं राजकुमारी पुष्करणीवर स्नानाला जाणार आहे. हत्ती तयार कर. त्याच वेळीं वत्सराज उदयन वासवदत्तेला पळवून घेऊन गेला. हत्ती तयारच होता. ते दोघे त्यावर बसून निघून गेले.

राजा प्रद्योतचे सैनिक उदयनला पकडण्यासाठीं धांवले. तें पाहून यौगन्धरायनें आपला वेड्याचा वेश टाकून देऊन तलवार काढली. उदयन पळून जाईपर्यंत त्या एकट्यानें सर्व सैनिकांना थोपवून धरलें. पण एकटा किती वेळ लढणार. शेवटीं त्याची तलवार तुटली. निःशस्त्र होऊन तो शत्रूच्या ताब्यांत सांपडला.

यौगन्धरायला पकडल्यावर उज्जयिनीचा मंत्री भरत रोहक यानें त्याची भेट घेतली. तेव्हां यौगन्धराय म्हणाला—"पित्याच्या मृत्यूचा सूड घेणाऱ्या अश्वत्थाम्याप्रमाणें मी रक्तानें माखलों आहे."

"असो. कपट करून वर साळसूदपणा. छान." भरत रोहक म्हणाला.

"नकली हत्ती दाखवून वत्स राजाला आणणारे कोणी दुसरे होते तर?" यौगन्धरायनें व्यंग केलें.

इतक्यांत राजा प्रद्योतनें पाण्यानें भरलेला एक सुवर्ण कलश देऊन यौगन्धरायचा बहुमान केला. तो म्हणाला—"जें झालें तें चांगलेंच झालें. त्यामुळें नुकसान तर नाहींच, उलट लाभच झाला आम्हांला. मी आपल्या गुण-कौशल्याची वाहवा करतो."

यौगन्धरायानेंहि राजा प्रद्योतच्या थोर मनाचें कौतुक केलें. त्यानंतर उदयन व वासवदत्तांच्या मूर्ति राजवाड्यांत बसवून त्यांच्या लग्नाचा सोहळा करण्यांत आला.





# अहंकार

कलिंग देशाच्या राजाची मुलगी मैनावती फार सुंदर होती. आपल्या सौंदर्याचा तिला फार गर्व होता. ती उपवर झाल्यावर तिच्या लग्नासाठीं तिचा पिता वर संशोधन करूं लागला. त्यानें तिच्या योग्य राजकुमारांची चित्रें मागवून तिला दाखविलीं. परंतु तिला त्यांतील एक सुद्धां पसंत पडला नाहीं. शेवटीं राजानें एका शुभ मुहूर्तावर तिचें स्वयंवर ठेवलें.

देशोदेशींचे राजकुमार राजाच्या निमंत्रणाला मान देऊन ठरल्या दिवशीं तेथें जमले. स्वयंवरमंडप खचाखच भरला होता.

मैनावती हातांत वरमाला घेऊन आली. सर्वजण उत्सुकतेनें तिच्याकडे पाहात होते. हळूं हळूं ती एकेकाला पाहात निघाली. प्रत्येकाला पाहून त्याला कांहीं नांवें ठेवून ती पुढें जाई. कोणाला लठ्ठ, कोणाला शेळपट कोणाला चेंढू, कोणाला बावळट, कोणाला काळा वगैरे म्हणून ती निघून गेली. सर्वांत शेवटीं एक राजकुमार बसला होता तो फार सुंदर व तेजस्वी होता. परंतु मैनावतीच्या गर्वांध डोळ्याला तें दिसलें नाहीं. त्याला नांवें ठेवायला कांहींच जागा नव्हती. म्हणून तिनें त्याला 'मिशावाला मेंढा' म्हणून नाकारलें.

स्वयंवर संपलें. सर्व निमंत्रित मंडळी आपापल्या घरीं निघून गेली. मैनावतीनें कोणासहि पसंत केलें नाहीं. त्यामुळें राजा काळजींत पडला कीं आतां काय करावें.

कांहीं दिवस गेले. एक दिवस राजानें मैनावतीला बोलाविलें आणि म्हणाला—"तुला आपल्या रूपाचा फार मद चढलेला दिसतो आहे. इतके राजकुमार आले. त्यांतील एकाला सुद्धां तूं पसंत केलें नाहींस!



काय एक सुद्धां तुझ्या योग्य नव्हता ? उद्यां सकाळीं जो कोणी भिक्षेकरी किंवा गायक राजवाड्याच्या दाराशीं प्रथम येईल त्याला मी कन्यादान करून मोकळा होईन." मैनावती घाबरली. आतां तिला कांहीं बोलायाला तोंड नव्हतें.

दुसरे दिवशीं सकाळीं अगदीं पहाटे एक भिकारी राजवाड्याजवळ येऊन गाणें म्हणूं लागला. त्याच्या अंगावर फाटके कपडे होते. त्याची दाढी वाढलेली होती. कित्येक दिवस अंघोळ केली नसल्यानें त्याचें अंग गलिच्छ वाटत होतें. राजानें प्रथमच आज्ञा देऊन ठेवल्यामुळें राजाचे शिपाई त्याला राजवाड्यांत घेऊन आले.

भटजी तेथें तयारच होते. भिकाऱ्याला आंत आणल्यावर राजकुमारीला बोलावून राजानें कन्यादान केलें आणि तिचा हात त्या भिकाऱ्याच्या हातांत देऊन तिला त्याच्याबरोबर पाठवून दिलें. मैनावती खूप रडली कढली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. राजाचें हृदय दगडासारखें झालें असल्यानें त्याला मुळींच पाझर फुटला नाहीं. त्यानें वरदक्षिणा म्हणून जांवयाच्या हातांत एक मोहोर ठेवली व म्हणाला—"जा आतां, आणि पुन्हां कधीं या बाजूला येऊं नका."

मैनावती आपल्या दैवाला दोष देत त्याच्या पाठोपाठ चालली होती. थोडें चालून गेल्यावर तीं दोघें एका जंगलांतून जाऊं लागलीं. "हें जंगल कोणाच्या राज्यांतलें आहे ?" मैनावतीनें विचारलें.

"हें का ? मिशाळ मैंदा आहे ना ? त्या राजाचें आहे." त्या नंतर त्यांनीं शेतें बागा, गावें, पार केलीं आणि एका सुंदर शहरांत आलीं. हें सर्व त्याच मिशाळ मैंद्याचेंच असलेलें ऐकून मैनावतीला पश्चात्ताप वाटला. पण करते काय ?

तो भिकारी मैनावतीला घेऊन एका झोपडीशीं येऊन थांबला. म्हणाला—"हें माझें घर, आतां आपलें म्हणायचें."

तीं दोघें तेथें राहूं लागलीं. दाढीवाला जंगलांतून वांबू आणीत असे आणि टोपल्या विणीत असे. मैनावतीला कामाची संवय नसल्यामुळें तिचीं बोटें दुखूं लागलीं.

"बुरडाचें काम तुला जमत नसेल तर शिवणाचें काम कर. माझे हे कपडे नीट शिवून रफू करून दे." दाढीवाला म्हणाला. पण तें हि काम कधीं केलेलें नसल्यानें तिच्या बोटांत सुया टोचून टोचून जाळें झालें. तिच्या नवऱ्याला दया आली. तो म्हणाला,—"खरंच, हें काम तुझ्या जोगें नाहीं."

दुसरे दिवशीं तिचा नवरा दाढीवाला कांहीं गाडगीं मडकीं घेऊन आला, व तिच्या डोक्यावर देऊन विकून येण्यास सांगितलें. तें घेऊन ती एके ठिकाणीं बसली. इतक्यांत एक घोडेस्वार आला. त्याची ठोकर लागून तिचीं सर्व मडकीं फुटलीं. काय करते बिचारी. हिरमुसलें तोंड करून घरीं गेली व आपल्या नवऱ्याला झालेली हकीकत सांगितली.

"हें काम सुद्धां तुझ्याच्यानें जमणार नाहीं. मला वाटतें राजाच्या घरीं स्वयंपाक घरांत एकादें काम मिळालें तर पाहातो." तिच्या नवऱ्यानें सहानुभूति दाखवीत म्हटलें.



तिला हें काम तर जास्तच आपमानकारक वाटलें. पण तिला तें काम करावें लागलें. तेथें दिवसभर काम करून रात्रीं घरीं येतांना आपल्या नवऱ्यासाठीं ती थोडेंसें बांधून आणीत असे.

साधारण आठ दहा दिवस गेले असतील. तिला नोकरांचाकरांच्या तोंडीं कळलें कीं राजाचें लग्न आहे. पण कोणाशीं केव्हां हें कांहीं कोणाला नीटसें माहीत नव्हतें. मैनावती मनांतल्या मनांत फार दुःखी झाली. नित्या-

प्रमाणें कामधाम संपवून ती घरीं जाण्यास निघाली. पण वाटेंत स्वयंपाकी म्हणाला– "आज अंगण किती छान सजवलें आहे. पाहा तरी. ती नाखुशीनेंच तें पाहावयास गेली. त्याच वेळीं मिशाळ मेंढा राजा स्वयंपाक्यावर ओरडला–"कोण आहे रे ती, अशी डोकावून डोकावून काय पाहाते आहे. तिला म्हणावं त्यापेक्षां एकादें नृत्यच करून दाखव."

राजाची आज्ञा. अमान्य करून कसें चालेल. तिनें हळूच अंगणांत पाय टाकला. राजाच्या इशाऱ्यानें वाद्यें वाजूं लागलीं. मैनावतीला नृत्यकला अवगत होती. म्हणून इच्छा नसतांना सुद्धां तिचीं पावलें तालावर पडूं लागली.

नाच करतां करतां तिच्या ओच्यांत बांधलेलें अन्न खालीं पडलें. तें पाहून सर्व हंसूं लागले. मैनावती खजील झाली. तिचा गर्व आत्तां पर्यंत अगदीं पार विरून गेला होता.

लाजेनें ती थबकली, तोंच राजा पुढें आला व तिचा हात धरून आपल्या महालांत घेऊन गेला. तेथें तिला म्हणाला–"मी मिशाळ मेंढा आहे. मला नीट ओळख. बघ दाढीवाला भिकारी पण मीच आहें. आणि तो आडदांड घोडेस्वारहि दुसरा तिसरा कोणी नव्हता. पटतें का ओळख! तुझ्या वडिलांनीं तुला मला देण्याचेंच ठरवुन तसें केलें. तुझा अहंकार, घालविण्यासाठींच मला भिकाऱ्याचा वेश घेऊन राहावें लागलें. बरें! झालं गेलें तें आतां विसरून जाऊन सुखानें राहा. तुला दुःख करण्यासारखें आंत कांहींच राहिलेलें नाहीं."

मैनावतीनें आपल्या नवऱ्याला ओळखून पश्चाताप व्यक्त केला. त्याची क्षमा मागितली. आणि तेव्हां पासून ती सुखानें राहूं लागली. तिनें आपला संसार विशेष काळजी घेऊन दक्षतेनें केला.





# मृत्युपत्र

सुमारे पांच सहाशें वर्षांपूर्वी चीनच्या एका प्रांतांत राजाचा एक प्रतिनिधि राहात असे. त्याचें नांव होतें 'निशा चिचेन.' त्यानें घरें, शेतें, रोकड पैसे मिळून खूपशी संपत्ति जमवून ठेविली होती. त्याला एका मुलाशिवाय कोणी नव्हतें. त्याची बायको मुलगा लहान असतांनाच मरून गेली होती. कांहीं दिवसांनीं त्यानें नोकरी सोडून दिली आणि शेतीवाडी पाहूं लागला.

त्याचा मुलगा शान ची नेहमीं त्याला म्हणत असे–"बाबा तुम्हीं आतां वृद्ध झालां आहांत म्हणून तुम्ही पूर्ण विश्रांति घ्या."

"जों पर्यंत माझ्या जिवांत जीव आहे तों पर्यंत हें शक्य नाहीं. माझें काम मीच पाहाणार." चिचेन म्हणाला.

एकदां तो आपल्या एका खेड्यांत गेला असतां नदीच्या कांठीं त्याला एक सोळा वर्षांची मुलगी दिसली. ती आपल्या आजी बरोबर नदीवर आली होती. तिचे आई-वडील लहानपणींच वारले होते. त्यामुळें आजीच तिचा सांभाळ करीत असे. त्या मुलीचें नांव 'मेय' असें होतें.

मेयला पाहिल्यावर चिचेनला तिच्याशीं लग्न करावेंसें वाटलें. त्यानें मुलीच्या आजीला विचारलें. ती कबूल झाली. मेयनेंहि नकार दिला नाहीं. म्हणून चिचेन तिला लग्न करून घरीं घेऊन आला. मेय लहान असली तरी फार हुशार होती.

म्हाताऱ्याचें हें काम त्याच्या मुलाला व सुनेला मुळींच आवडलें नाहीं. कांहीं दिवसांनीं मेयला मुलगा झाला. बापानें त्याचें नांव 'शान शू' असें ठेवलें. शान चीला बापावर राग होताच. तो एवढ्यावरच थांबला नाहीं तर आपल्या सावत्र आईला



कुल्टा म्हणूं लागला. आणि शान शू आपला भाऊ नाहीं म्हणून सांगूं लागला.

शान चीचा हा तऱ्हेवाईकपणा त्याच्या वडिलांच्या कानावर गेला. पण तो कांहीं बोलला नाहीं. कारण त्याच्या रागाचें कारण त्याला कळलें होतें. तेव्हां पासून त्याला थोडी काळजीच वाटत होती.

शान शू पांच वर्षांचा झाला तेव्हां चिचेननें त्याला शाळेंत घातलें. ज्या शाळेंत शानचीचा मुलगा जात होता, त्याच शाळेंत शान शू जाऊं लागला. अर्थातच शान चीला तें रुचलें नाहीं. त्यानें आपल्या मुलाला त्या शाळेंतून काढून दुसऱ्या शाळेंत घातलें. हें ऐकून चिचेनला वाईट वाटलें. एकदां त्याला वाटलें खूप रागवावें आपल्या मुलाला. पण पुन्हां विचार आला कीं बाला रागवून तरी काय फायदा! ह्याच्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं. म्हणून राग गिळून तो स्वस्थ राहिला.

कांहीं दिवसांनीं चिचेनला अर्धांगाचा झटका आला. ह्या आजारावर कांहींच उपाय नाहीं, असें डॉक्टरनें सांगितलें. मरण येईपर्यंत पडून राहावयाचें.

बापाला उठतां येत नाहीं असें पाहून शानचीनें सर्व कारभार आपल्या हातीं घेतला. सर्व ठिकाणीं आपला अधिकार दाखवूं लागला. आतां त्याचें राज्य सुरू झालें.

आपलें आयुष्य आतां मोजके दिवस राहिले आहे. असें वाटल्यावर एक दिवस चिचेननें शानचीला आपल्या जवळ बोलाविलें व एक चोपडी त्याला दिली. त्यांत त्याच्या सर्व संपत्तीचें सविस्तर वर्णन होतें. चोपडी देत तो म्हणाला—“शान ची, तुझा भाऊ फार लहान आहे. कांहीं दिवस तरी त्याचें पालन पोषण तुझ्यावर टाकणें भाग आहे. बरें, त्याची आई सुद्धां सर्व कामें पाहावयाला अजून लहान आहे. म्हणून मी वांटे केलेले नाहींत. सर्व तुझ्याच नांवें लिहिलें आहे. शान शू मोठा झाला म्हणजे त्याचें लग्न करून दे आणि त्याला दहा एकर जमीन व एक बंगला राहावयास दे. म्हणजे त्यांना खाण्या-पिण्याची राहाण्याची काळजी राहणार नाहीं. ह्या सर्व गोष्टी मी ह्यांत स्पष्टपणें लिहून ठेवल्या आहेत. त्या प्रमाणें कर. बरें, दुसरें म्हणजे शान शू ची आई जर दुसरें लग्न करणार असेल तर करूं दे आणि जर तिला तसेंच आपल्या मुलाकडे राहावयाचें असेल तर तसें करूं दे. मी लिहिल्या प्रमाणें केलेंस म्हणजे माझ्या मनाला शांति मिळेल.”

“बाबा, कांहीं काळजी करूं नका. आपल्या आज्ञेप्रमाणें सर्व कांहीं करतों.” असें सांगून ती चोपडी घेऊन शान ची आपल्या खोलींत निघून गेला.

तो गेल्यावर मेय आपल्या नवऱ्याला म्हणाली—“हा काय तुमचा मुलगा नाहीं? सर्व कांहीं मोठ्या मुलालाच देऊन टाकलेंत मग आम्ही काय करावें?” असें म्हणत असतां तिला रडूं कोसळलें.



“शान चीचा काय भरंवसा! समज, मी ही संपत्ति दोघांना वांटून दिली असती तर तो तुझ्या मुलाला मारून टाकायला सुद्धां. मागें पुढें पहावयाचा नाहीं. मत्सराला कारणच नको म्हणून मी सारी संपत्ति त्याच्या स्वाधीन केली आहे. त्याच बरोबर शान शूच्या पालन-पोषणाची सर्व जबाबदारी मी त्याच्यावरच टाकली आहे. तूं अजून लहान आहेस. तुला हें सर्व खटलं संभाळतां येणार नाहीं. माझ्या मागून तूं येथेंच राहिलीस तर तुझे हाल होतील. म्हणून तूं येथें कष्ट सोशीत राहूंच नकोस. कोणाशीं

तरी लग्न करून घे." चिचेननें मेयला सांगितलें.

"असं भलतेंच काय म्हणतां. कुळाला कलंक नाहीं का लागणार. सुख दुःख जें काय भोगावयाचें तें सर्व या मुलाजवळ राहूनच भोगायचें." मेय म्हणाली.

"असाच जर तुझा विचार असेल तर मी अशी व्यवस्था करतों कीं त्यामुळें तुम्हांला मुळींच त्रास होणार नाहीं." असें म्हणत त्यानें एक पाकीट आपल्या अंथरुणाखालून काढलें. तें मेयच्या हातांत देत म्हणाला—"ह्यांत माझें चित्र आहे. हें आपल्या जवळ ठेव. कोणाला दाखवूं नकोस. आणि शान शू मोठा झाल्यावर सुद्धां जर त्यानें त्याच्याकडे दुर्लक्ष केलें तर या प्रांतांत जेव्हां चांगला न्यायाधीश येईल तेव्हां त्याला दाखव आणि शान चीवर फिर्याद कर. म्हणजे तो न्यायाधीश असा न्याय देईल कीं त्यामुळें तुम्हीं दोघे सुखी व्हाल." त्या नंतर कांहीं दिवसांनीं चिचैन मरण पावला.

आतां सर्व राज्य शान चीचेंच होतें. वडिलांचें क्रिया-कर्म झाल्यावर त्यानें घराला रंग देण्याच्या निमित्तानें आपल्या सावत्र आईला अंगणांतील ल्हानशा झोपडीवजा घरांत जाऊन राहा म्हणून सांगितलें. ती बिचारी तेथें राहूं लागली. तिच्यासाठीं लागणारे डाळ तांदूळ हा देत असे. पण बाकी भाजी पाला वगैरे साठीं कांहीं व्यवस्था नव्हती. मेय शिवणकाम करून पैसे मिळवून बाकी खर्चाची तोंडमिळवणी करीत असे. तिनें जवळच्याच शाळेंत आपल्या मुलाला घातलें होतें.

एक दिवस शान चीनें आपल्या एका मित्राला आपल्या सावत्र आईकडे पाठविलें. आणि तिला पुन्हां लग्न करण्यासाठीं समजाव म्हणून सांगितलें. त्याच्याबरोबर तिच्याशीं लग्न करण्यास तयार असलेल्या इसमासहि पाठविलें. परंतु मेयनें त्या सर्वांना परतून लावलें. तिनें दुसरें लग्न न करण्याचा निश्चयच केला होता.

कांहीं दिवस गेले. शान शू चौदा वर्षांचा झाला. एक दिवस तो आपल्या आईला म्हणाला—"आई, मला रेशमी कपडे पाहिजे आहेत. सर्व मुलें मला हंसतात. म्हणतात तुझे वडील राजप्रतिनिधि होते. त्यांनीं पुष्कळ पैसे मिळवून ठेवले आहेत."

"तें खरं आहे. पण नाहीं रे बाळ माझ्याजवळ पैसे!" आई म्हणाली.







"तें ग कां ! आम्ही दोघेच तर भाऊ. शान चीच्या जवळ पुष्कळ पैसे आहेत आणि मला मात्र कांहीं नाहीं. ! तूं नाहीं दिलेस मला रेशमी कपडे तर मी त्याच्याजवळ जाऊन मागीन." शान शू म्हणाला आणि आपल्या भावाकडे जाऊन रेशमी कपडे मागितले.

"तुला काय पाहिजे असेल तें आपल्या आई जवळ माग." शान ची म्हणाला.

"पण साऱ्या संपत्तीची देखरेख तूंच तर करतोस." शान शू म्हणाला.

"लबाड, कपटी. कपड्याच्या नांवाखालीं आपला वांटा मागण्यासाठीं आलास होय ! चल जा. ही सारी संपत्ती माझी आहे. तूं कोण आला आहेस उपटसुंभ्या मध्यें." असें म्हणून शान चीनें त्याच्या फाडदिशी मुसकुटांत मारली. कळवळून गेला तो त्या तडाख्यानें. डोकें धरून रडत रडत गेला आपल्या आईकडे.

"तरी मी तुला बजावलें होतें. तूं जाऊं नकोस भावाकडे म्हणून." मेय म्हणाली. तिच्या डोळ्यांत अश्रूधारा येऊं लागल्या. तिनें एका दासीला पाठवून मुलाला क्षमा करण्याची प्रार्थना केली.

शान चीचें हृदय संपत्तीच्या मदानें दगडासारखें कठोर झालें होतें. त्यानें दुसरे दिवशीं आपल्या इष्ट मित्रांना आणि नातेवाइकांना बोलाविलें आणि मेयच्या समोर सर्वांना उद्देशून म्हणाला—"आपल्याला असें वाटत असेल कीं मी शान शू व त्याच्या आईला खर्चासाठीं पैसे अगर राहाण्यासाठीं जागा देऊं इच्छित नाहीं. पण तसें कांहीं नाहीं. पण काल शान शू माझ्याकडे आला आणि आपल्या वांट्या बाबत माझ्याशीं भांडू लागला. मला वाटतें हा आतांच एवढें करीत आहे तर पुढें काय करील ? म्हणून मी आपणां सर्वांसमक्ष वडिलांनीं लिहून ठेविल्याप्रमाणें त्याचा हिस्सा त्याला देतों. त्याप्रमाणें हें पूर्वेकडील घर व एकोणतीस सेंट जमीन आजपासून त्याची झाली. वडिलांच्या मर्जी विरुद्ध मी एक कवडी देखील कमी केलेली नाहीं. हें पाहा मृत्यु-पत्र. आपण सर्व ह्याला साक्षी आहांत." असें म्हणत त्यानें तेथें जमलेल्यांना ती चोपडी दाखविली.

शान चीचें सांगणें संपल्यावर सर्व आपापल्या घरीं गेले. कोणी अन्यायाची आपापसांत कुजबुज करीत, तर कोणी मनांतल्यामनांत ठेवून परतले.

माय लेक आपलें चंबूगवाळें घेऊन शान चीनें दाखविलेल्या घरीं राहावयास गेलीं. तें घर पडकें व जुनें होतें. त्यांतीलच एक दोन खोल्या साफ करून घेऊन ते राहूं लागले. त्यांच्या वांट्यास जी जमीन आली ती ओसाड होती. त्यांत कांहींच पीक येत नसे.

कांहीं वर्षें अशाच हाल अपेष्टांत त्यांनीं काढलीं. पुढें एकदां मेयला कळलें कीं त्यांच्या गांवांत एक फार सज्जन आणि न्यायपरायण न्यायाधीश आला आहे. लोक त्याच्या हुशारीची आणि सज्जनपणाची वाहवा करीत होते.



त्याचें कारण असें कीं त्या गांवांत एका शिप्याचा कोणी तरी खून केला. त्याच्या बायकोनें संशयावरून एका व्यक्तीचें नांव सांगितलें आणि न्यायाधिशानें त्याला मृत्यूची शिक्षा फरमावली. पण ह्याच वेळीं हा न्यायाधीश तेथें आला. त्यानें रीतसर चवकशी करून खऱ्या गुन्हेगाराला पकडून दिलें व ह्या निर्दोषी माणसाला सोडून दिलें. तेव्हांपासून लोकांवर त्याची छाप बसली.

ह्या न्यायाधिशाकडून आपल्याला योग्य न्याय मिळेल असें वाटून मेय आपल्या नवऱ्याचें चित्र घेऊन त्याच्याकडे गेली.

म्हणाली—"शान चीनें माझ्या पतीची सारी संपत्ति घेतली आहे, त्यानें माझ्या या मुलाला अर्धा हिस्सा दिला नाहीं, म्हणून मी न्याय मागण्यासाठीं आपल्याकडे आलें आहें. मृत्यू समयीं माझ्या पतींनी मला हें त्यांचें चित्र दिलें व सांगितलें कीं हें त्यांचें खरें मृत्युपत्र आहे. परंतु तें वाटेल त्याला न देतां चांगल्या न्यायाधिशाकडेच घेऊन जा. कारण तोच ह्यांतील गोष्टी नीट समजूं शकेल. म्हणून मी हें आपल्याकडे घेऊन आलें आहे. कृपा करून आपण न्याय करावा."

"बरं वघतों." म्हणून त्यानें मेयला पाठवून दिलें. नंतर तो बराच वेळ त्या चित्राकडे पाहात बसला. पण त्याला कांहीं कळेना. शेवटीं त्यानें तें कापडावर चिकटविलेलें चित्र बाजूला केलें. तेव्हां त्याच्या खालीं लिहिलेलीं अक्षरें त्याला दिसलीं. त्यांत असें लिहिलें होतें, मी म्हातारा झालों आहें. माझा दुसरा मुलगा शान शू अगदीं लहान आहे. माझा मोठा मुलगा दुष्ट आहे. तो आपल्या भावाला सहज फसवूं शकेल. माझी जमीन व दोन घरें मी शान चीच्या नांवावर लिहिलीं आहेत. आणि पूर्वेकडील घर शान शूच्या नांवावर आहे. हें घर जुनें पडकें आहे. पण त्याच्या पूर्वेकडील भिंतींत पांच हंड्यांत मिळून वीस मण चांदी आणि सहा हंड्यांत मिळून चार मण सोनें पुरून ठेविलें आहे. जमिनीबद्दल म्हणून मी हें शान शूला ठेविलें आहे. एवढें लिहून म्हाताऱ्यानें त्याच्यावर तारीख, वार वगैरे लिहिलें होतें.

दुसऱ्या दिवशीं न्यायाधिशानें शान चीला बोलाविलें आणि म्हणाला—"तुझ्या सावत्र आईनें तुझ्याविरुद्ध तकार आणली आहे. तूं तिला तिचा योग्य वांटा देत नाहींस, असें तिचें म्हणणें आहे."

"माझ्या वडिलांनीं मरते वेळीं जें लिहून ठेविलें आहे तें मी त्याला दिलें आहे. तुम्हीहि तें वाचून पाहा पाहिजे तर." शान ची म्हणाला.

"ठीक आहे. उद्यां सकाळीं मी तुझ्या घरीं येऊन तें वाचून तुमचा न्याय करीन." असें सांगून त्यानें शान चीला पाठवून दिलें. नंतर त्यानें मेयला कळविलें कीं तिनें उद्यां शान चीच्या घरीं सकाळीं हजर राहावें. बरोबर आपल्या मुलालाहि घेऊन यावें.







शान चीनें दुसऱ्या दिवशीं न्याया-धिशाच्या स्वागताची खूप तयारी केली. आपल्या मित्र-मंडळींना बोलाविलें. दिवाण-खाना सजविला. न्यायाधिशासाठीं एक खुर्ची सजवून ठेविली. त्यावर व्याघ्रचर्म अंथरलें.

थोड्याच वेळांत पालखींत बसून आपल्या हुजऱ्यांबरोबर न्यायाधीश शान चीच्या घरीं आला. पालखींतून उतरून तो दरवाज्याशीं आला. तेथें त्यानें कोणाचें तरी अगदीं वांकून स्वागत केलें. नंतर मार्ग दाखविल्या प्रमाणें करून 'असे या.' 'येथें बसा' असें म्हणत त्या सजविलेल्या खुर्चीकडे इशारा केला. आणि कोणाशीं तरी बोलत बोलत आल्याप्रमाणें आंत आला. व्याघ्रचर्माच्या खुर्चीवर त्याला बसावयास सांगून आपण दुसऱ्याच एका खुर्चीवर बसला. नंतर सुद्धां तो कोणाशीं तरी बोलत असल्याप्रमाणें बोलत होता. आपल्या बायकोनें माझ्याकडे एक फिर्याद आणली आहे. त्या बाबतींत मी काय करूं !.....हं, हं. असं आहे होय. पण आपल्या मुलाचें वागणें कांहीं ठीक दिसत नाहीं. आपण आपल्या धाकट्या मुलाला काय देण्याचें ठरविलें होतें ! पूर्वे-कडील घर ! तेवढ्यावर त्याचें कसें भागेल ! ओहो! असं सांगा. बरें तर मी तसेंच करतों. मग हें सर्व काय धाकट्या मुलाचेंच आहे ! ठीक जसें आपलें म्हणणें आहे तसेंच मी करतों."

न्यायाधीश भुताशीं बोलत असलेले पाहून तेथें जमलेली सर्व मंडळी घाबरली. या बाबतींत न्यायाधिशाशीं बोलण्यास कोणी तयार होईना. नंतर तोच उभा राहिला आणि जरा वांकून म्हणाला—"मला जाण्याची आज्ञा असावी." आणि मग ताठ उभा राहून चारी बाजूस पाहिलें. व शान ची ला पाहून म्हणाला—"तुझे वडीलच आतां माझ्याशीं बोलत होते आणि आतां ते त्या बाजूला गेले आहेत. तूं ऐकलेंच असशील आमचें बोलणें !"

"कांहीं नाहीं ना !" शान ची म्हणाला.

"असं काय ! चांगला उंच माणूस, गोल चेहऱ्याचा, गालाचें हाड जरा वर असलेला, भुरकट डोळे, लांब लांब भुंवया, मोठेले कान, विखरलेली पांढरी दाढी. अधिकाऱ्यांची टोपी होती डोक्याला. काळे बूट, लाल अंगरखा, कमरेला सोन्याचा पट्टा. बरोबर तेच राज-प्रतिनिधि चिचेनच होते ना !" न्यायाधिशानें विचारलें.

"जिवंतपणी ते हुबेहूब असेच दिसत असत." तेथें जमलेल्या नातलगांनीं व मित्रांनीं सांगितलें. चिचेनच्या चित्रावरून त्यानें हें वर्णन केलें आहे असें कोणासहि वाटलें नाहीं. म्हणून न्यायाधिशाच्या बोलण्यावर त्यांचा विश्वास बसला. त्यांना वाटलें, खरोखरच चिचेन भूताच्या रूपानें न्यायाधिशाशीं बोलला.

"तुमच्याजवळ दोन घरें आहेत ना ! आणि पूर्वेकडे आणखी एक घर आहे ! चला आणखी कांहीं गोष्टी तेथें सांगेन."



न्यायाधीश म्हणाला. शान ची त्याला घेऊन पूर्वेकडील घरांत गेला.

"हें घर आपल्या भावाला देण्यास तुमची कांहीं हरकत आहे?"

"नाहीं कांहीं नाहीं." शानची म्हणाला.

न्यायाधिशानें त्या घरांतल्या मधल्या खोलींत बसून शान चीची चोपडी पाहिली आणि म्हणाला—"ह्यांत तर स्पष्ट लिहिलें आहे. ह्या घराशिवाय शान शूला कांहींच दिलेलें नाहीं."

न्यायाधिशाचें बोलणें ऐकतांच मेय चिंतित झाली. तिला वाटलें. आपल्या मुलाला बहुतेक न्याय मिळणार नाहीं.

"पण ह्या घरांत चाळीस मण चांदी आणि चार मण सोनें पुरून ठेवलें आहे. हें तुझ्या वडिलांनीं मला त्याचा आतां सांगितलें. अर्थातच तें शान शूच्या हिश्याचें आहे." न्यायाधीश म्हणाला.

ह्यावर अविश्वास करून शान ची म्हणाला—"ह्यांत कांहींहि असूं दे कितीहि मण सोने चांदी असूं दे मला त्यांतील कांहीं नको."

"आणि जर तूं त्यावर अधिकार सांगूं लागलास तर मला त्याचा विरोध करावा लागेल." असें सांगून न्यायाधिशानें त्या घराच्या पूर्वेकडील भिंतीजवळ खणविलें. तेथें पांच चांदीचे हंडे मिळाले. त्याच प्रमाणें पश्चिमेच्या बाजूला खणलें तर तेथें आणखी चांदी भरलेले पांच हंडे मिळाले आणि एका ल्हान हंड्यांत सोनें मिळालें. न्यायाधिशानें तें सर्व सोनें चांदी शान शूला देवविलें.

ह्या वेळीं मात्र शान चीला वाटलें कीं जर आपण वडिलांची संपत्ति नीटपणें अर्धी अर्धी वांटून घेतली असती तर ह्यांतील अर्धे धन आपल्याला मिळालें असतें. पण आतां त्याचा काय उपयोग.





# अहिंसा मूर्ति

[१५]

महाराज शुद्धोधन मृत्यू पावले होते. त्यांचा अंत्यविधि चालू होता. त्यावेळीं बुद्ध कपिल-वस्तु जवळील निग्रोधाराम विहारांत आले होते. प्रजापति त्याच्याकडे गेली आणि म्हणाली—"गौतमा! शुद्धोधन महाराजांनीं शरीर ठेवलें. राहुल आणि नन्द तुझे शिष्य झाले. मी एकटीच कशी राहूं! म्हणून मला आणि माझ्याबरोबरच्या ५०० स्त्रियांना आपल्या शिष्यवर्गांत घे आणि आम्हांला संन्यासाची दीक्षा दे."

पण विचार करून गौतम म्हणाला—"ह्यांत स्त्रिया आल्या तर माझें हें कार्य अपवित्र होईल." बुद्ध पुढें निग्रोधाराम विहार सोडून विशाल नगराजवळील कुटागार शालेच्या जवळील विहारांत जाऊन राहूं लागले. प्रजापति आपल्या बरोबरच्या सर्व स्त्रियांना घेऊन तेथें गेली. ह्यावेळीं त्या सर्वजणींनीं केशवपन करून संन्याश्याचीं वस्त्रें धारण केलीं होतीं. हातांत एकेक मातीचें भिक्षा-पात्र घेऊन चालत चालतच त्या विशाल नगराला जाऊन पोहोंचल्या. त्या सर्व राज-कन्या असल्यामुळें फारच कौतुकांत वाढल्या होत्या. इतक्या नाजूक होत्या कीं खालच्या मजल्यावरून वरच्या मजल्यावर किंवा तेथून



नव्हती परंतु राजवाड्यांत राहून सुद्धां ती एक प्रकारें संन्यासिनीच होती. बुद्ध जेव्हां कपिलवस्तु नगरांत आले तेव्हां तिनें पुन्हां एकदां त्याच्याजवळ संन्यास घेण्याची परवानगी मागितली. परंतु त्यानें तिला परवानगी दिली नाहीं.

राहुल संन्यासी झाला तेव्हां तिला फार वाईट वाटलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं राजा शुद्धोधन निधन पावला. तेव्हां तिनें बुद्धाबरोबर जाण्याचा निश्चय केला. पण बुद्ध आपल्याबरोबर कोणाहि स्त्रीला येऊं देत नाहीं. हें ऐकून तिनें तो विचार सोडून दिला.

कोणी संन्यास घेऊन तर कोणी शरीर ठेवून सर्वांनीं आपापला मार्ग घेतल्यानें त्यांच्या सर्व धनसंपत्तिची अधिकारिणी यशोधराच झाली. अलोट संपत्ति तिच्या पायाशीं लोळत होती. पण तिचें खरें धन तिच्याजवळ नसल्यानें ती दुःखी होती. शेवटीं ती आपल्याबरोबर एक हजार स्त्रियांना घेऊन महाप्रजापतीकडे गेली. कपिलवस्तूंतील व कोली नगरांतील स्त्रियांनीं तिला पुष्कळ अडविलें परंतु तिनें कोणाचें ऐकलें नाहीं. तिला चालवणार नाहीं म्हणून पुष्कळांनीं रथ पण आणले तरी ती पायीं पायींच गेली.

त्या वेळेपर्यंत प्रजापतीचा आश्रम निराळा झाला होता. तेथें सर्व स्त्रियाच होत्या आणि त्यांचें नेतृत्व प्रजापतीकडे होतें. तेथेंच यशोधरा जाऊन पोहोंचली आणि त्या आश्रमांत राहूं लागली.

कांहीं दिवस गेले. यशोधरा अठ्याहत्तर वर्षांची होती. एक दिवस संध्याकाळीं तिला निर्वाण घेण्याची इच्छा झाली. लगेच तिनें बुद्धाकडे जाऊन परवानगी मागीतली. त्यानें आज्ञा दिल्यावर त्याच दिवशीं रात्रीं आपल्या झोंपडींत तिनें निर्वाण गमन केलें.



त्यानंतर दोन वर्षांनीं बुद्ध आपल्या शिष्यांना घेऊन पावा नगरीं गेले. ते तेथें एका आंब्याच्या बागेंत उतरले. ती बाग एका चंदन नांवाच्या लोहाराची होती. आपल्या बागेंत साक्षात बुद्ध उतरलेले पाहून त्याला परमानंद झाला. त्यानें त्या सर्वांना आपल्या घरीं बोलाविलें. त्यानें आज्ञानामुळें डुकराचें मांस भिक्षा म्हणून वाढलें.

बुद्ध जेव्हां तपश्चर्या करीत होते तेव्हां सुजातानें त्यांना खीर पाजली आणि आतां पंचेचाळीस वर्षांनंतर चंदनाकडच्या या भोजनामुळें त्यांना अतिसाराचें दुखणें आलें. त्यांना फार तहान तहान होऊं लागलें. तरी तशाहि स्थितींत ते आपल्या शिष्यवर्गासह कुशीनगरास निघाले. त्या बारा मैलांच्या अंतरांत ते कमींत कमी पंचवीस वेळां थांबले.

तेथें त्यांना वाटलें कीं आतां आपलें निर्वाण जवळ आलें आहे. त्यांनीं तसें आपल्या शिष्यांना सांगितलें. ते त्याला हिरण्यवती नगराच्या पलीकडे असलेल्या शाल नांवाच्या वनांत घेऊन गेले. तेथें बुद्ध उत्तरेकडे डोकें करून निजले.

आनंदानें ही बातमी मालव राजाला कळविली. तो त्याचें शेवटचें दर्शन करण्या-साठीं आपल्या बायकांमुलांसह तेथें आला. बुद्ध शेवटल्या क्षणीं आपल्या शिष्यांना म्हणाले—"माझ्या धर्मोपदेशांविषयीं तुम्हांला कांहीं शंका वगैरे विचारावयाच्या असतील तर आतांच विचारून घ्या." परंतु त्यावेळीं कोणीहि कांहींहि विचारलें नाहीं.

त्या नंतर बुद्धानें डोळे बंद केले. बुद्धाचा अवतार संपला. परंतु त्यांचा धर्म देशदेशांतरापर्यंत जाऊन पोहोंचला. अशा तऱ्हेनें ते अन्य देशवासियांना धर्माचरणांत मार्गदर्शक बनले. आजतागायत बौद्ध धर्म प्रचलित आहे.

[संपूर्ण]



# मार्कोपोलो



आगगाडी, विमान, टेलिग्राफ, टेलिफोन इत्यादि यांत्रिक साधनांमुळें जगांतील सर्व देश एक दुसऱ्या पासून फार जवळ आले आहेत. परंतु कांहीं शतकां-पूर्वी प्रत्येक देशाला आपला देश म्हणजे एक जग वाटत होतें. पश्चिमेकडील देशवासियांना पूर्वेकडील देशासंबंधीं कांहीं माहिती नव्हती. अशा त्या काळांत कांहीं धाडसी माणसांनीं पृथ्वीप्रदक्षिणा करून आपल्या देशाखेरीज इतर देशासंबंधीहि बरीच माहिती मिळविली.

या पृथ्वीप्रदक्षिणा करणारांमध्यें मार्कोपोलो एक होता. त्याचा जन्म इ.स. १२५५ मध्यें झाला. हा आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षींच आपले वडील व काका ह्यांच्या बरोबर धार्मीक यात्रेला निघाला. बरेच दूर चालून गेल्यावर त्यांना डोंगराळ प्रदेश लागला. डोंगर नद्या, जंगल सर्व पार केल्यावर ते एका वाळवंटांत आले. तोहि प्रदेश फार विस्तीर्ण होता. तो सर्व प्रदेश पायाखालीं तुडविल्या नंतर ते प्रवासी चीन देशांत येऊन पोहोंचले.

त्या वेळीं चीन वर मंगोलियन राजा राज्य करीत होता. त्याचें नांव कुब्लाय खान असें होतें. त्यानें इ.स. १२१६ ते १२७४ पर्यंत राज्य केलें. त्यानें या तिघा प्रवाशांचें स्वागत केलें. नंतर मार्कोपोलो त्याच्या दरबारांतच राहिला. तो मोठा झाल्यावर कुब्लाय खानानें त्याला आपला दूत बनवून हिंदुस्थानांत पाठविलें. तो कोचिनला आला त्यानें अन्यान्य भाषांचें ज्ञान अवगत केलें. राजदूताच्या कामा बरोबरच तो ज्या ज्या प्रदेशांत जात असे तेथील चालीरिती, राहाणी, राजकीय व भौगोलिक परि-स्थिति वगैरे विषयाचें वर्णन लिहून आपल्या राजास कळवीत असे.

व्हेनिस शहर सोडून तेवीस वर्षें होऊन गेलीं. तेव्हां त्याला घरीं जावेंसें वाटलें म्हणून त्यानें राजा जवळ आज्ञा मागितली. कुब्लाय खान त्याला सोडण्यास तयार नव्हता. पण नाइलाजानें त्याला परवानगी द्यावी लागली.

व्हेनिसला पोहोंचल्यावर मार्कोपोलोनें आपण जें पाहिलें व अनुभविलें त्याचें फार छान वर्णन लिहून ठेविलें. मार्कोच्या या पुस्तकांतील पुष्कळ गोष्टींवर लोकांचा विश्वासच बसला नाहीं. परंतु प्रवासी लोकांना मात्र तें वाचून प्रवासाची प्रेरणा मिळत असे. कोलंबसानेंहि आपल्या व प्रेपूर्वी हें पुस्तक वाचलें होतें. तो पश्चिमेच्या वाटेनें हिंदुस्तानाचा मार्ग शोधून काढण्यास म्हणून जो निघाला तों वाटेंत त्याला अमेरिकाच लागली. मार्कोपोलोचा प्रवास पथ प्रदर्शक म्हणून ख्याति झाली.

त्याच्या प्रवासाचें वर्णन पुढील अंकापासून चांदोबांत वाचावयाला मिळेल.










### ४. साहसाची कामें

शारा व तिच्या पतीनें शान्दलीच्या जवळपास एक मोठी जागा विकत घेतली. त्यांत मोठमोठीं घरें होतीं वातावरणहि जनावरांच्या तालमीला अनुकूल होतें. हवा पाणी उत्तम होतें. तरी कधीं कधीं जनावरें आजारी पडत.

त्यांत एक शान्डू नांवाची सिंहीण होती. तिच्या गळ्याला नेहमीं फोड होत असत. एकदां तर तिचा गळा फार सुजला म्हणून ती एका कोपऱ्यांत पडून राहिली. तिनें कांहीं खालें नाहीं कीं पाणी प्याली नाहीं. शाराला तिच्या जगण्याचीहि आशा उरली नाहीं. तिला फार वाईट वाटलें.

त्याच वेळीं मी त्यांच्याकडे पाहुणा म्हणून गेलों होतों. मी शान्डूला पाहिलें. तिच्या गळ्याखालीं चांगलीच सूज होती. तिला चांगलें तपासतां यावें म्हणून शारानें तिला मोठ्या पिंजऱ्यांत आणलें. तेथेंच त्यांना शिकवलें जात असे. तेथेंहि ती जमिनीवर पडून होती. तिला चुचकारून गोंजारून पाहिलें, आरडून ओरडून पाहिलें. रागावून पाहिलें पण ती जरा सुद्धां हालली नाहीं. तिचा आजार वाढला कीं काय हें पाहण्यासाठीं शारा त्या पिंजऱ्यांत गेली.

तिला काय वाटलें कोण जाणें. या पूर्वी सुद्धां तिला एकदां असेंच दुखणें आलें होतें. त्या वेळची तिला आठवण झाली कीं शारा आपल्या फोडाला धक्का लावील म्हणून भीति वाटली. पण तिला पाहतांच आपली सारी शक्ति एकवटून ती एकदम शारावर धावून आली.

शाराचा अनुभव दांडगा असल्यानें ती मुळींच घाबरली नाहीं. चाबूक व चिमट्यानें तिनें शाडूला अडवलें. शान्डू या वेळीं अगदीं पिसाळलेली असल्यानें तिनें शाराला किंवा तिच्या चाबकाला दाद दिली नाहीं. ती गर्जना करीत पुन्हां शारावर तुटून पडली. इकडे तिच्या पाठीवर चाबूक बसतच होते. तरी सुद्धां जणूं शाराच्या सूड घ्यायला ती उठली होती. शारा सिंहिणीला अडवीत स्वतःच एक एक पाऊल पाठीमागें सरकत होती. शेवटीं ती पिंजऱ्याच्या गजापर्यंत आली. आतां तिला मागे जाण्यास सुद्धां जागा नव्हती.



शाडूच्या रागाचा परिणाम काय होणार हें दिसत होतें. म्हणून संधि साधून मी पिंजऱ्यांत गेलों. पाठीमागून तिच्याजवळ जाऊन मी तिच्या पाठीवर जोरानें चाबूक मारला. यामुळें माझ्या कल्पनेप्रमाणें तिचें लक्ष माझ्याकडे गेलें व ती माझ्यावर धांवून आली. माझ्या हाताला तिच्या नखाचे चांगलेच ओरखडे उठले. पण जर मी तसें केलें नसतें तर शान्डूचा पंजा शाराच्या पोटांत घुसला असता.

मी फक्त एक चाबूक घेऊनच पिंजऱ्यांत घुसलों होतों. शान्डूनें माझ्यावर उडी मारली तेव्हां तिला अडविण्यासाठीं माझ्याजवळ दुसरें कांहीं नव्हतें. डाव्या हाताला तिची नखें बोचल्यानें तो हात जणूं कामांतून गेल्याप्रमाणेंच मला वाटलें. पण विचार करण्यास कुठला वेळ! मी उजव्या हातानें तिच्या नाकावर खूप ठोसे दिले. यामुळें मात्र ती नरमली. चार पावलें मागें सरकली. या अवधींत वेळ पाहून शारानें येऊन माझ्या मागील पिंजऱ्याचें दार उघडलें आम्हीं दोघे चटकन पिंजऱ्या बाहेर गेलों व दार पुन्हां बन्द केलें.

हे सांगायला जरी बराच वेळ लागला तरी प्रत्यक्ष कृति जलद झाली. कांहीं क्षणांतच



आम्हीं पिंजरा बंद करून बाहेर पडलों. त्यानंतर मी माझ्या जखमेकडे पाहिलें. मला वाटलें एवढी भयंकर ती जखम नव्हती. खरोखरच नुसते ओरखडे गेले होते. आम्हीं सुदैवानेंच प्राणानिशीं पिंजऱ्याबाहेर आलों. आम्हांला हा एक नवा अनुभव आला आणि ह्या झटापटीचा आणखी एक फायदा म्हणजे शान्डूचा फोड फुटला आणि तिला थोडा आराम वाटला. शान्डूला जेव्हां दुखत खुपत नसे तेव्हां ती फार सरळ व चांगली असे. किती झालें तरी ती सिंहीण होती.

प्राण्यांना शिकविण्यांत, मला वाटतें, रोलन्ड फ्रान्सचा हात धरणारा कोणी झाला नसावा. त्याचें साहस आमर्याद असें होतें. सरकशींच्या क्षेत्रांत तो रोलन्ड ह्याच नांवानें प्रसिद्ध होता. तो आपल्या वयाच्या चौथ्या वर्षापासूनच सरकशींत कामें करूं लागला. नवव्या वर्षी तो धावत्या घोड्यावर कसरत करीत असे आणि चौदाव्या वर्षा-पासून तो सिंह वाघांच्या बरोबर कामें करूं लागला. इतक्या लहान वयांत सर्कशींत धाड-साची कामें कोणी केल्याचें ऐकिवांत नाहीं.

रोलेन्डनेंच माझी टार्गाशी ओळख करून दिली. फार चांगली आणि सुंदर सिंहीण होती ती. तिच्याबरोबर कामें करणाऱ्या आणखी तीन सिंहीणी होत्या. पण एकदां झाडूवाल्यानें पिंजरा साफ केला व त्यांत कोरडें वाळलेलें गवत पसरावयाचें तो विसरून गेला. थंडीचे दिवस होते. खेळ करून झाल्या-वर त्या तशाच ओल्या गवतावर झोपल्या. कोणाचें त्याच्याकडे लक्ष गेलें नाहीं. पण सकाळीं पाहतात तों सर्वांना धक्काच बसला. त्यांतील तीन सिंहिणी मरून पडल्या व टार्गा त्या पंथाला लागली होती. तावडतोब तिच्या-वर औषधोपचार करण्यांत आले. तरी पण



तिला चांगलें बरें होण्यास सबंध एक आठवडा लागला. रोलेन्डनें ह्या अवधींत तिच्याजवळ राहून जातीनें तिची सर्व सेवा केली. इंजेक्शनें स्वतः दिलीं. औषधपाणी स्वतः पाजलें. शेवटीं आठव्या दिवशीं तिनें डोळे उघडून पाहिलें तों तिचा प्राणरक्षक रोलेन्ड तिला दिसला. नंतर कांहीं दिवसांनीं ती बरी झाली. परंतु तिला पूर्वीप्रमाणें शक्ति यावयास बराच वेळ लागला. अर्थातच ह्या मधल्या काळांत ती जरा चिडखोर झाली होती. पण ती जात्या गोड होती. रोलेन्डनें तिची मनापासून काळजी घेतली म्हणून तिचें रोलन्डवर फार प्रेम बसलें.

पुढें पुढें तर असें होई कीं रोलेन्डच्या हातून जर कधीं चाबूक खालीं पडला तर टार्गा आपल्या पंजांत धरून त्याच्या पुढें करीत असे. सर्कशींत काम करीत असतां जर कधीं कोणी सिंहानें अगर वाघानें रोलन्डवर पंजा उचलला तर आपल्या मालका-वरच हल्ला होत आहे, ह्या कल्पनेनें ती त्याच्यावर तुटून पडत असे. एवढेंच नव्हे तर ती त्याला मालकापासून दूर लोटीत असे. ह्या गोष्टी तिला कोणी शिकविलेल्या नव्हत्या. ती आपल्या मनानेंच सर्व



करीत असे. कृतज्ञता ही हिंस्र प्राण्यामध्यें सुद्धां असते.

खेळ संपल्यावर पिंजऱ्यांत जातांना टार्गा नेहमीं शेवटीं जात असे. तेव्हां ती डौलात मालकाच्या जवळ चालत येत असे. कुत्र्या-प्रमाणें आपलें अंग त्याच्या पायाला घाशीत असे व मग पिंजऱ्यांत जात असे. अल्जीयर्स मध्यें असेंच एकदां खेळ संपल्यावर पिंजऱ्यांत जातांना टार्गा नेहमीं प्रमाणें मालकाजवळ आली. तिला त्या दिवशीं काय सुचलें कोणास ठाऊक त्याच्या पायाला अंग घासण्या ऐवजीं ती दोन्ही पायामध्यें आली. पण

त्यामुळें रोलन्ड तोंडघशीं पडला. आणखी एक दिवस असेच 'पिरामिड' करून उतरत असतांना तिनें स्टुलाला लाथ मारली आणि ती नेमकी रोलन्डच्या डोक्याला लागली.

दुसऱ्या आठवड्यांत रोलन्डनें तिला नेहमींप्रमाणें खांद्यावर घेतलें. त्यावेळीं तिच्या पोटांत एकाएकीं कळ येऊन ते आंखडले गेलें. त्या सरशी तिच्या पायाचें हाड त्याच्या गालावर मारलें व तो पडतां पडतां सावरला.

एकदां सर्कस एका गांवाहून दुसऱ्या गांवाला जात होती. वाटेंत एक काफला आपलीं जनावरें चारण्यासाठीं आला होता. सिंहांना त्याचा वास लागतांच ते संधि साधून बाहेर पडले.

हें कळताच रोलेन्ड गाडींतून उतरला व टार्गाच्या मदतीनें त्यानें चार सिंहांना तर पकडलेंच. पण स्वतः टार्गाच त्याचें ऐकेना. फांस टाकण्याचा रोलेन्डनें प्रयत्न केला. पण ती निसटून पळाली ती एका लॉरीवर जाऊन बसली. चाबूक दाखविला धमकावण्या दिल्या. तरी ती खालीं उतरली नाहीं.

शेवटीं रोलेन्डनें माल डबा आणवला. त्या डब्यांतून टार्गा प्रवास करीत असे. त्याचें झाकण काढल्याबरोबर रोलेन्डच्या कल्पनेप्रमाणें ती त्यांत उतरली. त्यांत एक अस्वल होतें. पण गडबडीमध्यें तें कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं व रोलेन्डनेंहि पाहिलें नाहीं. त्यामुळें डब्यांत उडी मारतांच अस्वलानें तिला तोंडावरच मारलें. टार्गानें हल्ला करण्यांत कमी केलें नाहीं. दोघांची चांगलीच झुंज झाली. झटापट संपल्यावर काय झालें हें पाहण्यासाठीं डबा उघडून पाहिलें तर टार्गा एका कोपऱ्यांत पडून राहिली होती. तिला बऱ्याच जखमा झाल्या होत्या.





# गंगावतरण

(द्वितीय अध्याय)

व्याकुळ चिंतेनें पुत्रांच्या
बसला होता नृपति सगर।
कळे न कांहीं कुणी न बोले
दुःखि नागरिक, दुःखि नगर॥

दूत परतले, सैन्य परतलें
कुणी न वार्ता पण दिधली।
वर्षामागुन वर्षें गेलीं
नाहिं बातमी पण मधली॥

स्तब्ध नृपति अन् अवाक मंत्री
अवाक होते दरबारी।
एकाएकीं दूत पातला
धापा टाकित दरबारीं॥

"महाराज की जय!" वदला अन्
मुजरा केला कष्टानें।
शब्द एक ही उमटेना, पण
वदला मोठ्या कष्टानें-

"पूर्व नि पश्चिम, दक्षिण, उत्तर,
आलों जाउन व्यर्थ नृपा!
इच्छा भगवंताची, होतें,
असेल त्याची जशी कृपा॥

बसलों होतों समुद्रकाठीं
हताश होउनि नृपती मी।
वर्तमान कोळ्यांच्या तोंडीं
चकित जाहलों ऐकुनि मी॥

समुद्रामधें एका जागीं
म्हणे भोंवरा आहे एक।
अती भयंकर त्याच्या मध्यें
कुमार शिरले एकाएक॥"

शोकग्रस्त तें ऐकुनि झाला
सगर, म्हणाला मंत्र्याला-
"अंशुमंतला बोलवा कुणी
जवळ, अबोध बिचाऱ्याला॥

श्री. [illegible] आपटे, हैदराबाद



# महाभारत

आठव्या दिवशीं रात्रीं दुर्योधन, दुःशासन शकुनी आणि कर्ण विचार करण्यासाठीं बसले. तेव्हां दुर्योधन म्हणाला—“ आपल्या बाजूला भीष्म, द्रोण, कृप वगैरे सारखे वीर असून अजून आपल्याला जय कां नाहीं मिळत ? आणि ते पांडव पहा ? मोठ्या पराक्रमानें लढत आहेत ! काय कारण असेल कांहीं कळत नाहीं. आपलें सैन्य तर दररोज कमी कमीच होत चाललें आहे. हें युद्ध म्हणजे जसें कांहीं थट्टाच चालली आहे. माझ्या शौर्यानें कसा काय मला जय मिळतो कांहीं सांगवत नाहीं.”

कर्ण म्हणाला—“ महाराज, आपण एवढे निराश कां होता. तुम्ही भीष्माला युद्ध करूं नका म्हणून सांगून टाका. म्हणजे मी पांडवांना एका क्षणांत वीरगति देतों. तें पहा यमपुरीचें दार त्यांच्यासाठीं उघडें झालें आहे. किती झालें तरी पांडव भीष्माचे लाडके नातू आहेत. ते कसे पांडवांना मारतील ? महा घमेंडखोर आणि रागीट आहे तो म्हातारा. त्यानें शस्त्र सोडण्याचा अवकाश कीं मी उतरलोंच रणांगणांत. मग पाहाशील माझा पराक्रम.”

कर्णाचे तें उद्‌गार ऐकून दुर्योधनाला समाधान वाटलें. त्यानें दुःशासनाला दुसऱ्या दिवशीं युद्ध करण्यासाठीं सैन्य तयार करण्यास सांगितलें आणि म्हणाला—“ मी आतांच्या आतां भीष्माच्या शिबिरांत जाऊन तूं सांगितल्याप्रमाणें त्यांना सांगतों व शस्त्रत्याग करण्यासाठीं भाग पाडतों.”

सांगितल्याप्रमाणें खरोखरच दुर्योधन उठला, कपडे केले आणि भीष्माच्या भेटीस गेला. जातांना आपल्या बरोबर कांहीं निवडक लोक घेऊन गेला.

भीष्मानें मोठ्या प्रेमानें त्याचें स्वागत केलें. त्याला बसावयास आसन दिलें. प्रथम त्या दिवशीच्या युद्धाची टीका वगैरे झाल्यावर दुर्योधन एकाएकी म्हणाला—“ आजोबा, तुम्ही म्हणाला होतात कीं केकेय, पांचाल आणि सोमक वगैरेंच्या सेनांच्या संहार करीन. पण अद्याप त्यांतील एक सेना सुद्धां संपली नाहीं. मला वाटतें पांडवांच्या प्रेमामुळें तुमचा हात कचरतो आहे. एवढा जर माझ्यावर आपला राग असेल तर तुम्ही हें युद्धाचें जोखड कर्णाच्या खांद्यावर द्या. तो बघतां बघतां पांडवांना व त्यांच्या सर्व मित्रांना मारून टाकील.”



दुर्योधनाचें हें बोलणें भीष्माला फार लागलें. त्याला वाईट वाटलें आणि रागहि आला. तो आपल्या मनांतील राग बाहेर न दाखवितां शांतपणें म्हणाला—“ मी तुझ्यासाठींच युद्ध करीत आहें, हें तूं पहातच आहेस. तुला मी अर्जुनाच्या पराक्रमाविषयीं कित्येक वेळां सांगितलें आहे. पण तुझा त्याच्यावर विश्वास नाहीं. माझ्यावर ह्या वाक्‌बाणाच्या लाखोलीचा कांहीं उपयोग नाहीं. त्यापेक्षां अर्जुनावरच बाणवृष्टि कां नाहीं करीत ? गंधर्वांनीं तुला पकडल्यावर एकट्या अर्जुनानेंच ना येऊन तुला सोडविलें ? तेव्हां कोठें गेले होते तुझे भाऊ आणि अर्जुनाला हारविणारा कर्ण ? विराट नगराजवळच्या युद्धांत एकट्या अर्जुनानेंच ना सर्वांना हारवलें ? त्याच्या पराक्रमाचें आणखी काय प्रमाण पाहिजे ? अरे, तो अद्वितीय वीर आहे. ठीक आहे. तरी सुद्धां तूं म्हणतो आहेस म्हणून उद्यां मी सोमक व पांचाल सेनेशीं युद्ध करीन आणि त्यांत मी तरी मारला जाईन नाहींतर शिखंडी सोडून त्या दोन्ही सेना तरी नष्ट होतील. हेंच माझें शेवटचें युद्ध.”



भीष्माला पुन्हां युद्धाला प्रवृत्त करून दुर्योधन आपल्या शिबिरांत निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच कौरवांनीं आपली सेना 'सर्वतोभद्र' नांवाच्या व्यूहांत उभी केली.

नवव्या दिवशीं अभिमन्यूनें असाधारण युद्धकौशल्य दाखविलें. आज त्याच्या समोर द्रोण, कृप, अश्वत्थामा सैन्धव वगैरे सुद्धां टिकाव धरूं शकले नाहींत. ह्या सर्वांची माघार पाहून दुर्योधनानें अलम्बस नांवाच्या एका राक्षसाला अभिमन्यूशीं युद्ध करण्यासाठीं पाठविलें. अलम्बस घायाळ झाल्यानें त्यानें आपल्या मायेनें चहूंकडे अंधकार करविला. त्याला दूर करण्यासाठीं अभिमन्यूनें सूर्यास्त्र सोडलें. ह्यामुळें अलंबसचा पराभव होऊन तो निघून गेला. अभिमन्यु मात्र कौरव सेनेंतच राहिला.

ही संधि साधून सर्व कौरव वीर त्याच्या सभोंवतालीं गोळा झाले. तेवढ्यांत त्याचें रक्षण करण्यासाठीं अर्जुन आला. पुन्हां द्वंद्व सुरू झालें. युद्ध करतां करतां अर्जुन व अभिमन्यूची ताटातूट झाली.

इकडे कौरव सेना जशी मारली जात होती तशी तिकडे पांडव सेना हि भीष्माच्या बाणवृष्टीसमोर बळी जात होती. संध्याकाळ पर्यंत भीष्मानें अद्वितीय असें शौर्य गाजविलें. त्याचा तो पराक्रम पाहून पांडवांचा धीरच खचला. दुर्योधनाला मात्र आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या.

युधिष्ठिर कृष्णाला म्हणाला—"युद्धवीर भीष्म कौरवांच्या बाजूनें लढत असतां आपण युद्ध कसें काय जिंकूं शकणार? आज तर फारच भयानक युद्ध चाललें आहे. आज आमच्या पैकीं कोणी जिवंत राहील असें वाटत नाहीं. उगीच मरण्यापेक्षां जिवंत राहिल्यास कांहीं सत्कार्य तरी हातून घडेल.



म्हणून मला वाटतें युद्ध सोडून द्यावें. तुझें काय म्हणणें आहे?"

कृष्ण म्हणाला—"अरे एकटा भीष्म असला म्हणून काय झालें? तो मेल्यावर तर तुम्हांला विजय मिळेल ना? अर्जुन भीष्माला मारणार नाहीं खास. मग असें कर, मला युद्धाची आज्ञा दे. मी त्या आज्ञेप्रमाणें शस्त्र हातांत धरून त्याची व्यवस्था करतों. म्हणजे मग तर तुला विजय मिळेल कीं नाहीं?

"कृष्णा, तूं तर हातांत शस्त्र पकडणार नाहीं म्हणाला होतास. मग तें तुला करावयास लावणें अन्यायच नव्हे का? त्या शिवाय तूं जी काय मदत करशील ती दे. भीष्म आमचें हितच करूं इच्छितो आहे. युद्धाच्या प्रारंभीच त्यानें सांगितलें होतें कीं मी माझ्याकडून शक्य तेवढी मदत तुम्हांला करीन. म्हणून मी त्यांच्याकडे जाऊन विचारतों कीं तुमचें मरण कशांत आहे. हाय! धिःकार आहे आमच्या जिण्याचा. ज्यानें आम्हांला हाताखांद्यावर खेळवून वाढविलें. कौतुकानें आमचे लाड पुरविले त्याला मारण्याच्या विचारांत आम्हीं आहोत."



युधिष्ठिराची सूचना कृष्णाला पसंत पडली. मग पांची पांडवांनीं आपले मुकुट आणि शस्त्रें काढून ठेविलीं आणि अगदीं सामान्य माणसांप्रमाणें ते सर्व भीष्माच्या डेऱ्यांत गेले.

भीष्मानें त्यांचें स्वागत केलें. त्यांना बसावयास सांगून इतक्या रात्रीं येण्याचें कारण विचारलें.

युधिष्ठिर म्हणाला—"आजोबा रोज इतके लोक मारले जात आहेत. पण कोणाचाच विजय होण्याचें चिन्ह दिसत नाहीं. सर्वांत मोठी अडचण म्हणजे तुमच्याशीं कसें युद्ध



करावें? हेंच आम्हांला समजत नाहीं. कसेंहि युद्ध केलें तरी तुमचा पराभव करण्याची शक्ति आमच्यांत नाहीं. हींच एक मोठी चिन्ता समोर उभी राहाते."

भीष्म म्हणाला—"युधिष्ठिरा, जोंपर्यंत मी जिवंत आहें तोंपर्यंत तुमचा विजय होणें शक्य नाहीं. म्हणून जर विजयाची अपेक्षा असेल तर मला लवकर मोकळा करा. ते काम शिखंडीच्या हातूनच होऊं शकेल. तो मोठा महारथी आहे. उत्तम लढवैया आहे. परंतु तो प्रथम स्त्री होता. म्हणून कोणच्याहि परिस्थितींत मी त्याच्या विरुद्ध शस्त्र हातीं घेणार नाहीं. त्याला पुढें करून अर्जुनानें माझ्याशीं युद्ध करावें."

पांडवांचा भीष्माला भेटण्यांत तोच हेतु होता. कोणच्याहि डावपेचाशिवाय हेतु सिद्ध झाल्यामुळें पांडवांना फार आनंद झाला. त्यांनीं भीष्माला लवून नमस्कार केला आणि आपल्या शिबिरांत निघून गेले.

ह्या गोष्टीचें अर्जुनाला फार दुःख झालें. तो कृष्णाला म्हणाला—"धुळीनें भरलेल्या शरीराला पितृतुल्य प्रेमानें उचलून घेणाऱ्याला ...., नाहीं कृष्णा ती कल्पनाच मला असह्य होत आहे. लहानपणीं एकदां त्यांनीं मला उचलून घेतलें होतें, तेव्हां मी लाडिकपणानें त्यांना कवटाळलें व 'बाबा' म्हणून म्हटलें. त्यावर माझ्या गालावर प्रेमानें चापट मारून ते मला म्हणाले, मी तुझा बाप नाहीं आजोबा आहे. त्यांनीं आम्हां सर्वांना मारलें तरी हरकत नाहीं पण आम्ही कसें त्यांना मारावें?"

कृष्ण म्हणाला—"तें सर्व खरें, पण युद्धांत शत्रूला मारणें पाप नव्हे. शिवाय तुझी प्रतिज्ञा तुला पूर्ण करावयाची आहे."

दहावा दिवस उजाडला. कौरव सेनेच्या अग्रभागीं भीष्म उभा होता. पांडवांच्या सेनेपुढें शिखंडीला पुढें करून अर्जुन होता





युद्धाला सुरवात झाली. पांडव नव्या दमानें युद्ध करूं लागले. आपली सेना भराभर कमी होत असलेली पाहून भीष्माला राग आला. तो दुर्योधनाला म्हणाला—"मी आज शपथ घेतली आहे कीं कमींत कमी दहा हजार महारथी आज युद्धांत लोळवावयाचे."

पांडवांचाहि निश्चय झाला होता कीं आजच्या युद्धांत भीष्माला मारावयाचेंच. ते ह्या बेतानें युद्ध करीत होते. सर्व पांडवांनीं त्यांच्यावर हल्ला चढविला. त्याचें रक्षण करण्यासाठीं सर्व कौरव भीष्माभोंवती गोळा होऊन पांडवांशीं निकरानें लढत होते.

अर्जुन शिखंडीला म्हणाला—"भीष्म तुझ्यावर केव्हांहि बाण सोडणार नाहीं. म्हणून कांहीं झालें तरी आज भीष्माशीं युद्ध करून त्याला मोक्ष दिला पाहिजे. कौरव तुझ्यावर हल्ला करतील. पण त्यांच्यापासून मी तुझें रक्षण करीन. त्याची तूं काळजी करूं नकोस. चल माझ्याबरोबर."

अर्जुनाच्या सांगण्याप्रमाणें शिखंडी अर्जुनाच्या पुढें राहून भीष्माशीं युद्ध करूं लागला. सर्व पांडव त्याच्या मदतीला होते. इकडे भीष्माचें रक्षण करण्यासाठीं कौरव जिवापाड झटत होते. दुःशासनाच्या पराक्रमाला आज ऊत आला होता. त्याचा आजचा पराक्रम अगदीं बहारीचा होता. आजचें युद्ध फारच भयंकर होतें. युद्धाचा रंग पाहून कीं का कोण जाणें द्रोणाला जरा वाईट वाटलें. तो आपल्या मुलाला म्हणाला—"अश्वत्थामा! आजच्या युद्धाचीं लक्षणें कांहीं बरीं नाहींत. तूं हि भीष्माच्या मदतीला जा आणि कांहींहि करून त्याचे प्राण वांचविण्याचा प्रयत्न कर."

आज भीष्म प्राण तळहातावर घेऊन लढत होता. त्याला कशाचेंहि भान नव्हतें.

त्यानें म्हटल्याप्रमाणें आज खरोखरच दहा हजार महारथींना मारलें. त्यांत किरातांचा धाकटा भाऊ शतसीर होता.

युद्ध करतां करतां भीष्म दोन्हीं सैन्यांच्या मध्यें आला. त्यावेळीं कृष्णानें अर्जुनाचा रथ शिखंडीच्या रथामागें आणला. शिखंडी भीष्माशीं युद्ध करूं लागला. भीष्मानें शिखंडीला एकहि बाण मारला नाहीं. त्यानें त्याच्या रथाच्या घोड्यांना बाण मारले. सारथ्याला मारलें. पण त्याच्यावर एकहि बाण सोडला नाहीं. तेवढ्यांत शिखंडीच्या मागें राहून अर्जुन सर्व बाण मध्येंच तोडूं लागला.

शिखंडी सतत भीष्मावर बाण सोडत होता. परंतु भीष्माला त्याची पर्वा नव्हती. त्यांत एकदां जर का अर्जुनाचा बाण लागला तर मात्र त्याच्या तोंडून 'हाय' शब्द निघत असे व तो म्हणे हा बाण शिखंडीचा नाहीं. शिखंडीचे बाण त्याला बोंचत नव्हते.

युधिष्ठिरानें आपल्या सैन्याला आज्ञा दिली कीं त्यानें निर्भय होऊन भीष्मावर तुटून पडावें. राजाची आज्ञा होतांच सैन्यानें भीष्माला घेरलें. दोन घटका फारच भयंकर युद्ध चाललें. कौरवांना भय वाटलें. दुर्योधन सारखा भीष्माकडे लक्ष ठेवीत होता. परंतु त्याच्या देखत भीष्माची मान फिरली आणि तो रथावरून कोसळला.

त्याच्या शरिरावर इतके बाण लागले होते कीं तो कोसळून खालीं जमिनीवर न पडतां बाणाच्या आधारानें अधांतरी राहिला. हीच त्याची बाणशैय्या होय.

भीष्म पडल्याची बातमी कळतांच दोन्ही सैन्यांत हाहाकार झाला. दोन्ही पक्षांतील लोकांना दुःख वाटलें. भीष्म जेव्हां पडला तेव्हां दक्षिणायण चालू होतें. उत्तरायणांत प्राण सोडावा असा विचार करून त्यानें आत्मबळानें मृत्यूला थोपवून ठेविलें.



# कांशाचा किल्ला

[ १४ ]

[ चंद्रवर्मा टेकडीवरील झोपडींत गेला. तेथें एक म्हातारा होता. त्याला वाटलें कीं चंद्रवर्मा राजसैनिकांपैकीच एक आहे. पण जेव्हां म्हाताऱ्याला कळलें कीं तो सैनिक नाहीं व राजपक्षाचाहि नाहीं तेव्हां त्यानें आपल्याजवळ कांशाच्या किल्ल्याकडे जाणाऱ्या वाटेचा नकाशा असल्याचें त्याला सांगितलें. इतक्यांत सैनिकांनीं झोपडीला वेढा दिला, पण त्या पूर्वीच म्हातारा पळून गेला होता. चंद्रवर्मा एकटाच झोपडींत होता. तो बाहेर आला. पुढें वाचा.]

चंद्रवर्माला झोपडींतून बाहेर आलेला पाहून सैनिक विचारांत पडले. सैनिक म्हाताऱ्याला ओळखत होते. पण म्हाताऱ्याच्या जागीं एक तरुण त्यांना दिसला. त्यांना वाटत होतें कीं आपण म्हाताऱ्याला बरोबर पकडलें. पण त्यांची निराशा झाली होती. "तूं कोण? आणि ह्या झोपडींत राहणारा तो म्हातारा कोठें आहे?" सैनिकांच्या सरदारानें चंद्रवर्माला दरडावून विचारलें.

"कोणचा म्हातारा? मला नाहीं कोणी माहीत आणि प्रथम तुम्ही कोण आहांत हें कळूं दे, मग मी कोण हें मी सांगतों तुम्हांला." चंद्रवर्मा तलवार हातांत घेऊन म्हणाला.




चंद्रवर्माला तलवार हातांत घेऊन निर्भय-पणें बोलतांना पाहून सरदार थोडा चपापला. चंद्रवर्मानें तें ओळखलें. त्याच आवेशांत तो म्हणाला—“कोण आहे तुमचा राजा ? तुम्ही सर्व मिळून माझ्या एकट्यावर हल्ला करणार ? तरी तुम्हांला एकेकट्यानेंच लढावें लागेल. कारण माझ्या पाठीमागें झोपडी आहे आणि एकेकटे आलांत कीं मिळालीच गति म्हणून समजा.”

चंद्रवर्माची ती अधिकारयुक्त वाणी ऐकून तो एक कसलेला लढवय्या आहे हें कळण्यास सरदाराला मुळींच वेळ लागला नाहीं. आणि चंद्रवर्माचें म्हणणें सुद्धां बरोबर आहे असेंच सरदाराला वाटलें.

“आपण कोणी वीर पुरुष आहांत हें आपणांस पाहिल्याबरोबरच कळून येतें. आपल्या सारख्यांशीं विनाकारण युद्ध करण्याची आमची इच्छा नाहीं. आम्हीं राजाच्या आज्ञेवरून फक्त ह्या झोपडींत राहणाऱ्या म्हाताऱ्याला पकडण्यासाठीं आलों आहोंत. अचानक तुम्हीं आमच्या समोर आल्यामुळें आम्हांलाहि आश्चर्यच वाटत आहे. जें झालें तें विसरून जा. बरें, येतों आतां आम्ही.” असें म्हणत ते सर्व सैनिक मागें फिरले.

“पण तुम्हीं आपल्या राजाचें नांव नाहीं सांगितलेंत !” चंद्रवर्मा वरच्या आवाजांत म्हणाला.

“आपण सध्यां ज्या राज्यांत रहात आहां त्या राजाचें नांव आपल्याला माहीत नाहीं ? आश्चर्यच आहे मोठें.” सरदार म्हणाला.

चंद्रवर्मा स्मित करून म्हणाला—“राज्य व त्याच्या सीमा ह्यांची ओळख ठेवणें मी केव्हांच विसरून गेलों आहे. कारण माझ्या गुरूनें मरणापूर्वी मला एका राजाची भेट घेण्यास सांगितलें होतें. आणि तो राजा म्हणजे शिवसिंह. तो कोणत्या देशाचा राजा आहे, हें देखील मला माहीत नाहीं. त्याची गांठ घेण्यासाठीं मी पृथ्वीच्या पाठी-वर ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत भ्रमण करीत आहें. आणि म्हणूनच आपली भेट होऊं शकली.”

चंद्रवर्माचें बोलणें ऐकून सरदार चकित होऊन त्याच्याकडे पाहूं लागला. म्हणाला—“तुम्हीं ज्या शिवसिंहाविषयीं म्हणालांत तोच शिवसिंह ह्या देशाचा राजा आहे.”

“फार छान ! फार छान !! धन्य ! धन्य आहे मी !! किती दिवसांनीं ही शुभ वार्ता कानांवर पडत आहे. मला घेऊन चला तुम्हीं आपल्या राजाकडे. मी त्याच्या भेटीची मोठ्या आशेनें इतके दिवस वाट पाहात आहें.” चंद्रवर्मा म्हणाला.

नंतर सरदारानें एकदा साशंक नजरेनें त्याच्याकडे पाहून विचारलें. म्हणाला—“आपल्या गुरूनें इतक्या आग्रहानें आमच्या राजाची भेट कशासाठीं घेण्यास सांगितली आहे ?”

“तें एक फार मोठें गूढ आहे.” असें म्हणत चंद्रवर्मानें आकाशाकडे दृष्टि वळविली



आणि आनंदानें हंसत म्हणाला—“कांशाच्या किल्ल्या ! आतां तरी मिळालास ना ?”

कांशाच्या किल्ल्याचें नांव ऐकतांच सर्व सैनिक चपापले. ते आश्चर्यानें परस्परांकडे पाहूं लागले. “तुम्हांला त्या किल्ल्याची माहिती कशी समजली ?” सरदारानें विचारलें.

“त्या संबंधीं फक्त मला व माझ्या पूर्वजांनाच माहिती आहे. पण तुमच्या प्रश्नावरून असें वाटतें आहे कीं तुम्हांला सुद्धां त्या संबंधी माहिती आहे. आश्चर्य आहे हें खरोखरच.” चंद्रवर्मा विस्मयानें म्हणाला.



“त्या किल्ल्याचें रहस्य समजून घेण्या-साठींच तर आम्ही ह्या जगलांत हिंडून फिरून त्या म्हाताऱ्याला पकडण्याचा प्रयत्न करीत आहोंत.” सरदार म्हणाला.

चंद्रवर्मानें आपल्या उजव्या हातावरील रेषा निरखून पाहिल्या आणि म्हणाला—“आलें लक्षांत. समजलें सर्व कांहीं. त्या म्हाताऱ्याजवळ त्या किल्ल्याला जाणाऱ्या वाटेचा नकाशा आहे असें वाटून तुमच्या राजानें त्याच्या देव नांवाच्या मुलाला पकडलें आहे. होय कीं नाहीं? भोळा बिचारा राजा.”

सैनिकांच्या सरदारानें चंद्रवर्माचा हात न्याहाळून पाहिला. परंतु त्याला कांहींच समजलें नाहीं. तो म्हणाला—“तुम्हीं सर्वज्ञ आहांत असें वाटतें. नाहींतर हात पाहून तुम्हीं कसें असें सांगूं शकतां?”

“कसें सांगूं शकाल!” चंद्रवर्मा पुट-पुटला. नंतर रागानें सरदाराला म्हणाला—“तूं आतांच्या आत्तां येथून निघून जा. ह्या टेकडीच्या पलीकडील मैदानांत माझी वाट पाहा. मी हा मागोमाग आलोंच. मग तेथून आपण सर्वजण मिळून तुमच्या राजाकडे जाऊं.”

चंद्रवर्मांत कांहीं तरी दिव्यशक्ति आहे. असेंच वाटलें त्या सरदाराला. चंद्रवर्माचा हुकूम होतांच “जी हुजूर” म्हणून आपल्या शिपायांना घेऊन तो सांगितलेल्या जागेकडे गेला.

ते सर्व सैनिक दृष्टिआड झाल्यावर चंद्रवर्मा झाडींत शिरला व “सर्व काम अगदीं बिनबोभाट झालें आहे. घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. कोठें आहेस तूं जांबवान?” असें ओरडला.

चंद्रवर्माचा आवाज ऐकून तो म्हातारा त्याच्या जवळ आला आणि म्हणाला—“अरे, हा जांबवान नांवाचा कोण नवीन माणूस आहे?”

“तुम्हीच. तुम्हांला ‘म्हातारे बुवा’ असें हांक मारणें मला प्रशस्त वाटलें नाहीं. म्हणून असें म्हटलें मीं. बरें मी शिवसिंह राजाकडे जात आहें. तुमच्या मुलाला तर कैदेंतून सोडवीनच, कांशाच्या किल्ल्यांतील धनराशींचा कांहीं हिस्सा देखील देववीन. तिकडील मार्ग दाखविणारा नकाशा कोठें आहे तें मात्र मला सांगा.” चंद्रवर्मानें धीर करून विचारलें.

“मग काय तुझ्यावर विश्वास ठेवाव-याचा म्हणतोस?” म्हातारा अर्धवट शंकित मनानें बोलला.

“विश्वास ठेवलात तर तुमचें व तुमच्या मुलाचें कल्याण आहे आणि नाहीं ठेवलात तरी तो किल्ला शोधणें आतां कांहीं एवढें कठीण नाहीं. पश्चिमेच्या बाजूनें समुद्र किनाऱ्या किनाऱ्यानें गेल्यास कोठें तरी तो मिळेलच. परंतु जर नकाशा बघायला मिळाला तर काम कमी वेळांत व कमी कष्टांत होईल इतकेंच.” चंद्रवर्मा बेफिकीरीनें म्हणाला.

चंद्रवर्माच्या त्या सडेतोड उत्तरानें म्हातारा निरुत्तर झाला. त्याच्या मनांतील



शंकापण नाहींशी झाली. त्यानें आपल्या सदऱ्याच्या आंतल्या खिशांतील ताडपत्र काढलें. तें पंख्यासारखें पसरून म्हणाला—“हा बघ तो नकाशा.” चंद्रवर्मानें तो फार बारकाईनें पाहिला. त्यांत नद्या, पर्वत, वाळवंटें, जंगलें वगैरे सर्व व्यवस्थित दाखविलें होतें. जेथें समुद्राचें टोंक दाखविलें होतें. तेथें चारी बाजूंनीं भिंती असलेला एक किल्ला दाखविलेला होता. त्याच्या भिंतीवर पलीकडे धुरासारखें कांहीं तरी दाखविलेलें होतें.

“हा आहे कांशाचा किल्ला. हे सर्व डोंगर, नद्या ओलांडून जंगल, रेती तुडवून












त्या जागेपर्यंत पोहोंचणें, ही मनुष्याला शक्य होणारी गोष्ट वाटत नाहीं. जर कोणी पोहोंचला तर खरोखरच तो धन्य आहे म्हटलें पाहिजे." चंद्रवर्मा आश्चर्यानें म्हणाला. त्याला आंतून थोडें भयहि वाटलें.

"आमच्या एका पूर्वजानें पाहिला होता हा किल्ला. काय करूं रे! मी म्हातारा झालों आहे म्हणून. नाहीं तर मी एकटा सुद्धां जाऊन आलों असतों." म्हातारा म्हणाला.

ह्यावर चंद्रवर्मा हंसून म्हणाला—"तर मग हा नकाशा मला द्या. मी स्वतः शोधून काढतों तो किल्ला. तुमच्या मुलाला सुद्धां आपल्याबरोबर घेऊन जाईन. जातांना रुद्रपुरच्या शिवसिंह राजाची भेट घेऊन जाईन. तुमची सर्व व्यवस्था करून जाईन. काळजी करूं नका. आम्हीं दोघे परत येईपर्यंत तुम्ही ह्या झोपडींत सुखानें आणि आनंदानें रहा."

साशंक मनानेंच म्हाताऱ्यानें तो नकाशा चंद्रवर्माच्या हातांत दिला. म्हणाला—"तूं फंसवीत तर नाहींस ना? म्हाताऱ्यांना फंसवणें पाप आहे. पापाचें प्रायश्चित्त मिळाल्या शिवाय राहणार नाहीं.

"मी तसा मनुष्य नाहीं. तुम्हांला किंवा तुमच्या मुलालाच काय, पण शिवसिंह राजालाहि, जर तो सरळ असेल तर, मी फंसवणार नाहीं. तो माझा धंदा नव्हे. समजा, मला माझ्या कामांत यश आलें नाहीं तर मी...." चंद्रवर्मा बोलतच होता. इतक्यांत त्याला घोड्याच्या खिंकाळण्याचा आवाज ऐकूं आला. त्यानें झाडींतून डोकावून पाहिलें तर त्याला सैनिकांचा सरदार झोंप-डीच्या बाजूस येत असल्याचें दिसलें. त्याला पाहून चंद्रवर्मा म्हाताऱ्याला म्हणाला—"मी ह्या सैनिकांबरोबर रुद्रपुरच्या राजाकडे जात आहें. तेथून मी तुमच्याकडे निरोप पाठवितों. मग त्याप्रमाणें तुम्ही राजधानींत जाऊन निर्भयपणें व सुखानें रहा." असें सांगत तो तेथून निघाला व सरदाराजवळ आला.

चंद्रवर्माला पाहून सरदार घोड्यावरून उतरला. म्हणाला—"इतका वेळ तुमची वाट पाहिली. पण तुम्हीं आला नाहींत म्हणून येथपर्यंत आलों. हा घ्या घोडा. आपल्या साठींच आणला आहे. आपल्या आगमनाची बातमी मी महाराजांकडे मघांच पाठवून दिली आहे."

"मी माझ्या कांहीं शक्तींना आह्वान करण्यासाठीं जंगलांत गेलों होतों. परंतु माझी फार निराशा झाली. कोणीहि तुमच्या राजाबद्दल चांगले शब्द काढले नाहींत. इतका का तो वाईट आहे?" चंद्रवर्मानें विचारलें.

"राजा चांगला कां वाईट, हें त्याचा सैनिक काय सांगणार? तें त्याच्या प्रजेला विचारलें पाहिजे. नाहीं तर आसपासच्या राजांचें मत विचारलें पाहिजे. आम्हांला काय? जो महिन्याच्या महिन्याला आम्हांला वेळेवर पगार देतो तो राजा चांगला." सरदार म्हणाला.



सरदाराच्या बोलण्यावरून चंद्रवर्मानें ताडलें कीं राजाशीं बोलतांना आपल्याला खूप सावधगिरी बाळगली पाहिजे. कारण कांशाच्या किल्ल्यापर्यंत जाण्यासाठीं त्या राजाकडून सर्व प्रकारची सहायता घ्या-वयाची आहे. एकट्यानें तेथपर्यंत पोहोंचणें अशक्यच आहे.

त्याच बरोबर त्यानें ठरविलें कीं शिव-सिंहाला सर्व गोष्टींचा पुरेपूर परिचय देतां कामा नये. नाहीं तर तो मध्येंच कांहीं तरी गडबड करील. ह्या सैनिकाला जसा मंत्रविद्येचा प्रभाव दाखविला आहे तसाच

त्यालाहि पण दाखविला पाहिजे. म्हणजे जमलें तर जमेल थोडेंसें तरी काम.

"आपण आतां राजधानीकडे जाऊं." सरदारानें असें म्हटल्या बरोबर लगाम हातांत घेऊन चंद्रवर्मा घोड्यावर बसला. थोडा वेळ डोंगर, रानमाळ, ओढे वगैरे ओलांडून गेल्यावर ते सर्व लोक रुद्रपुर नगराजवळ येऊन पोहोंचले.

राजाला अगोदरच वर्दी पोहोंचली असल्यानें त्यानें वेशीवर तोरणें बांधून त्याच्या स्वागताची तयारी केली होती. रस्त्याच्या दुतर्फा लोकांची गर्दी जमली होती चंद्रवर्माला पाहण्यासाठीं. चंद्रवर्मानें सैनिकांसह नगरांत प्रवेश केला. तो राज-मार्गावर येतांच लोकांनीं टाळ्या वाजवून आणि रुमाल फडकवून त्याचें स्वागत केलें. "महा मांत्रिकाचा जयजयकार असो." अशा घोषणाहि केल्या.

"घोषणा ऐकून चंद्रवर्मा पेचांत पडला. हे लोक असें कां म्हणत आहेत? तेवढ्यांत त्याला आठवलें कीं आपण आपला हात पाहूनच तर म्हातार्‍या विषयीं, कांशाच्या किल्ल्याविषयीं तेथें जाणाच्या मार्गाविषयीं सरदाराला सांगितलें होतें. म्हणूनच त्यानें आपण महामांत्रिक आहोंत अशी वर्दी राजाला दिली असली पाहिजे. त्याचा हा परिणाम आहे. आणि म्हणूनच आपल्याला खूश करून वश करून घेण्याचा तो प्रयत्न करीत आहे. ठीक आहे. एका प्रकारें हें चांगलेंच झालें. आपण इतक्या संकटांत उडी टाकली. कपालिनीला किंवा महामांत्रि-काला देखील आपण भ्यालों नाहीं. आतां स्वतः महामांत्रिकाचें सोंग करावयाचें आहे! असा विचार करीत, स्वागताचा स्वीकार करीत दैवावर भरंवसा ठेवून तो राजवाड्यांत पोहोंचला.

(पुढें चालू)





# वासवदत्ता

उदयननें वासवदत्तेला पळवून आणल्यावर त्या दोघांचें लग्न झालें. कांहीं दिवस आनंदोत्सवांत गेले. दोघे जणुं कांहीं सार्‍या जगाला विसरलीं होतीं. राजाचें लक्ष विलासांत गुंतलें म्हणजे राज्यावर संकटें ओढवणारच. तेंच वत्सराज्याच्या वांटणीस आलें.

अरुणी नांवाच्या एका महत्वाकांक्षी व्यक्तीनें वत्सराज्याचा एक एक भाग करून बराच भाग बळकावला. नंतर त्यानें राज-धानी कौशाम्बी नगरावर पण हल्ला केला. उदयनचें जें राज्य अरुणीनें गिळंकृत केलें तें आतां परत कसें मिळवितां येईल? ह्या विषयीं दरबारांत विचार विनिमय झाला. त्यांत सर्वांचें मत पडलें कीं मगध राजाची मदत घेतली, तरच वत्सराज्य परत मिळूं शकेल. पण ती मदत मिळणार कशी? त्याला फक्त एकच उपाय. आणि तो म्हणजे दोन्हीं राज्यांचा संबंध जोडणें. मगध देशाचा राजा दर्शक ह्याची एक बहीण होती. उदयननें जर तिच्याशीं लग्न केलें तरच त्याची मदत मिळेल. पण वासवदत्ता आहे, तो पर्यंत उदयन दुसरें लग्न करणार नाहीं, हें सर्वांना माहीत होतें. ती असे पर्यंत दर्शक राजा सुद्धां आपली बहीण उदयनला द्यावयास तयार नव्हता. ह्यावर तोड म्हणून त्यांनीं एक नाटक रचण्याचें ठरविलें. ह्यांत यौगन्धराय तर होताच, वासवदत्तेनें सुद्धां भाग घेतला होता.

एकदां राजा उदयन शिकारीला गेला होता. तो आपल्या वीणेच्या नादावर हत्तींना गुंगवण्यांत गर्क झाला होता. त्याच वेळीं त्याचे दोघे मंत्री धांवत येत असलेले त्याला दिसले. ते म्हणाले—"अचानक शिबिराला आग लागली.



महाराणी वासवदत्ता आंत होत्या. त्यांना बाहेर काढण्यासाठीं यौगन्धराय आंत गेला. परंतु दोघेहि शिबिराबाहेर येऊं शकली नाहींत.

राजा घाईघाईनेंच शिबिराकडे आला. तेथें येऊन पाहातो तों खरोखरच त्याला वासवदत्ता आणि यौगन्धराय दिसले नाहींत. त्याला फार दुःख झालें. वासवदत्तेच्या विरहानें तो जवळ जवळ वेडा झाला.

इकडे यौगन्धरायानें साधूचा वेश घेतला व वासवदत्तानें ब्राह्मण स्त्रीचा. वत्सराज राजधानींत येतांच तीं दोघं बाहेर पडलीं, व सरळ मगध राज्याच्या राजधानींत राजवाड्याच्या बाहेरील आश्रमांत येऊन पोहोंचलीं.

त्याच वेळीं राजाची बहीण पद्मावती आश्रमाच्या पाहाणीस आली होती. त्या दोघांना फार आनंद झाला. आपलें काम आतां फत्ते होणार ह्याची त्यांना खात्री वाटली. पद्मावतीनें आश्रमांतील स्त्रियांची विचारपूस केली. ही संधि पाहून यौगन्धराय पुढें आला. म्हणाला—"माझी एक प्रार्थना आहे. ही माझी बहीण आहे. हिचा पति विदेशीं गेला आहे. म्हणून माझी अशी विनंति आहे कीं हिला मी परत येईपर्यंत राजकुमारीनें आपल्या सेवेशीं ठेवून घ्यावें."
राजकुमारीनें ही गोष्ट मान्य केली.

ह्याच वेळीं लावणकहून एक विद्यार्थी आला. तो राजगृहाचाच राहणारा होता. परंतु वेदाध्ययनासाठीं तो लावणकला गेला होता. त्यानें शिबिराला आग लागून त्यांत वासवदत्ता यौगन्धराय वगैरे जळून गेल्याचें सांगितलें. तो म्हणाला—"उदयन राजा शिकार सोडून परत आला व आपल्या बायकोचे दागिने छातीशीं धरून ढसढसा रडला. अग्नींत उडी घेऊन त्यानें आत्महत्येचा प्रयत्न करून पाहिला. पण सर्वांनीं त्यांना अडविलें. महाराज जवळ जवळ बेशुद्धच झाले.

विद्यार्थी हें वर्तमान सांगत असतां वासवदत्तेच्या डोळ्यांतून टिपें गळूं लागलीं. सर्वांना वाटलें कीं ती फारच हळव्या मनाची आहे. जेव्हां त्या विद्यार्थ्यानें सांगितलें कीं मंत्र्यांनीं नानाविध उपचार केले आणि आतां त्यांची प्रकृति ठीक आहे तेव्हां सर्वांना हायसें वाटलें. पद्मावतीनेंहि एक दीर्घ सुस्कारा सोडून आपली सहानुभूति दर्शविली.

अशा प्रकारें यौगन्धराय वासवदत्ताला पद्मावतीच्या स्वाधीन करून निघून गेला.

एकदां कामानिमित्त उदयन राजगृहाच्या बाजूला आला होता. दर्शक राजानें त्याचें तेज, रूप व तारुण्य पाहिलें तेव्हां त्याला वाटलें कीं हा पद्मावतीसाठीं अगदीं योग्य वर आहे. त्या प्रमाणें त्यानें आपली इच्छा उदयनला सांगितली. त्यानेंहि विरोध न करतां कबूल केलें. झालें, त्या दोघांचें लग्न ठरलें.

जसजसा लग्नाचा दिवस जवळ जवळ येऊं लागलो तसतशी वासवदत्ताची परिस्थिति फार विचित्र होऊं लागली. ती शक्यतोंवर एकांतांत राहूं लागली. लग्नाच्या दिवशीं तर





तिचा आपल्यावरील ताबाच जणूं गेला. ती दूर बागेंत एका झाडाखालीं जाऊन बसली. पण गंमत पहा, तेथें सुद्धां एक दासी येऊन पोहोंचली. तिनें बरीचशीं फुलें तिच्या पुढें ठेवून नवऱ्यामुलीसाठीं सुंदर गजरा आणि हार करून देण्यास सांगितलें. आपल्या मनांतील चलबिचल ती कोणास सांगणार? तिनें थरथरत्या हातानें ती माळ ओवून दिली. तीच माळ पद्मावतीनें लग्नाच्या वेळीं उदयनच्या गळ्यांत घातली.

एकदां पद्मावती, वासवदत्ता व त्यांची एक सखी बागेंत बसून गप्पा मारीत होत्या. तेव्हां वासवदत्तेनें पद्मावतीचें उदयनवर किती प्रेम आहे हें आजमावण्याचा प्रयत्न केला. बोलतां बोलतां पद्मावती म्हणाली—"तुम्ही हंसाल गडे, पण खरेंच सांगतें. किंनई हे जवळ नसले ना कीं मला अगदीं एकटं एकटं वाटतं. त्यांनीं सारखं डोळ्या समोर असावं असं वाटतं. वासवदत्ता तरी त्यांच्यावर असं प्रेम करीत असेल का? असाच विचार माझ्या मनांत येतो."

"तिचें प्रेम निराळेंच होतें. त्याची कशाला तुलना." वासवदत्ताच्या तोंडून शब्द निघून गेले.

"अवन्तिके, तुला ग काय तें माहीत?" पद्मावतीनें विचारलें.

वासवदत्ता थोडी गुटमळली. परंतु स्वतःला सावरून घेऊन ती म्हणाली—"म्हणजे काय? तिचें उदयन महाराजांवर अतिशय प्रेम होतें म्हणूनच नाहीं का ती घर सोडून त्यांच्या बरोबर निघून गेली."

नंतर पद्मावती म्हणाली—"खरोखरच वासवदत्तेला विसरले नाहींत वत्सराज. मी एक दिवस वीणा वाजवीत होतें. तर त्यांना तिची आठवण होऊन दीर्घ उसासा सोडून ते अंतरिक्षाकडे पहात बसले."

हें ऐकून वासवदत्ताला धन्यता वाटली.

त्याच वेळीं उदयन व वसंतक पद्मावतीला शोधीत उद्यानांत आले. वासवदत्ता बरोबर असल्यानें पद्मावतीला पतीची भेट घेण्याचें साहस झालें नाहीं. ती जवळच असलेल्या कुंज कुटिरांत शिरली. तिच्याबरोबर तिच्या सखीहि होत्या. वसन्तक तिला शोधण्या-साठीं गेला. पण एका सखीचा धक्का एका मधमाशांच्या पोळ्याला लागल्यामुळें तो तेथूनच परतला.

नंतर ते दोघेहि एका ंजांत बसून गप्पा मारूं लागले. वसन्तक विदूषकच होता. त्यानें मोठ्या ऐटींत राजाची परवानगी घेऊन प्रश्न विचारला. म्हणाला—"पद्मावती व वासवदत्ता ह्यांत आपली जास्त लाडकी राणी कोणती?"

राजानें वसंतकला कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यावरून पद्मावतीनें ताडलेंच, पण वसंतकनेंहि राजाच्या तोंडून वदविलें. तें ऐकल्यावर तर शंकाच राहिली नाहीं.

"आतां तरी महाराजांनीं असें म्हणावें का?" एक दासी म्हणाली.

"अग त्यांत वाईट काय आहे. ते गुणवती वासवदत्तेला विसरूं शकले नाहींत.



ही तर कौतुकाची गोष्ट आहे." पद्मावती म्हणाली.

"किती थोर मन आहे तुमचं." वासवदत्ता म्हणाली. नंतर पद्मावतीला राजाकडे पाठवून ती दुसरीकडे निघून गेली.

कांहीं दिवस अशाच तऱ्हेनें विलासांत गेले. एके दिवशीं मात्र पद्मावतीचें डोकें फार दुखूं लागलें. तिनें आपल्या अवंतिका नांवाच्या दासीला बोलावून आणण्यास सांगितलें, म्हणजे ती गोष्टी सांगून तिची करमणूक करील. दुसऱ्या दासीनें ही बातमी राजाला सांगितली.

निरोप कळतांच उदयन वसंतकाबरोबर तेथें गेला. परंतु त्या महालांत पद्मावती अजून आलेली नव्हती. उदयन पलंगावर आडवा झाला आणि वसंतकाला करमणुकीसाठीं गोष्ट सांगावयास सांगितलें. गोष्ट ऐकतां ऐकतां राजाला झोंप लागली, म्हणून तो निघून गेला.

निरोप मिळतांच वासवदत्ताहि तेथें आली. तेथें उजेडासाठीं फक्त एक पंती जळत होती. त्या उजेडांत तिला पलंगावर कोणी तरी निजलेलें दिसलें. तिला वाटलें पद्मावतीच निजली आहे. "बिचारीला



एकटीला सोडून सर्व जणी कशा निघून गेल्या ?" असें म्हणत ती जवळ गेली व हळूच पलंगावर बसली. त्याच वेळीं उदयन स्वप्नांत ओरडला—"वासवदत्ता! वासवदत्ता !!"

"हे तर वत्सराज आहेत. पद्मावती नाहीं." ती मनाशींच पुटपुटली—"अग बाई! मला यांनीं पाहिलें तर नाहीं ना ? यौगन्धरायाची सारी युक्ति फुकट जाईल." पण तेथें कोणी नसल्यानें ती निघून गेली नाहीं. आपल्या पतीकडे पहात तेथेंच उभी राहिली. उदयन स्वप्नांत कांहीं बरळत होता. त्याचीं उत्तरें तिनें दिली. पलंगाबाहेर आलेला त्याचा हात नीट पलंगावर सरकविला आणि आतां कदाचित त्याची झोंप मोडेल असें वाटून ती तेथून निघून गेली. त्याच वेळीं उदयन उठला व वासवदत्तेकडे पाहून तिला हांक मारली. पण ती थांबली नाहीं. तो उठून वासवदत्तेच्या मागें धांवला. पण झोंपेंत असल्यानें त्याला दरवाज्याची चौकट लागली. तेव्हां आपण स्वप्न पहात असल्याचें त्याला कळलें.

राजाचा आवाज ऐकून वसन्तक धांवत आला. राजानें सांगितलेली हकीगत ऐकून म्हणाला—"अहो, तें सर्व स्वप्नच होतें."



त्याच सुमारास उदयनचा मंत्री रुमण्वन्त सेना गोळा करून अरुणीशीं युद्ध करण्याच्या तयारीनें आला. दर्शक राजानेंहि आपली सेना सज्ज करून उदयनच्या मदतीला पाठविण्याचें ठरविलें. उदयनला निरोप कळतांच तो युद्धाच्या तयारीसाठीं निघून गेला.

ठरल्याप्रमाणें युद्ध झालें. उदयनचा जय होऊन त्याचें गेलेलें राज्य त्याला परत मिळालें. एवढेंच काय पण योगायोग असा कीं त्याची वीणा 'घोषवती' ती देखील त्याला परत मिळाली. ती नर्मदा नदीच्या कांठीं पडलेली कोणाला तरी मिळाली. तो ती वाजवीत कौशाम्बीच्या राजवाड्याजवळून जात असतां उदयननें तिचा आवाज ओळखला. तेव्हां त्याला वासवदत्ताची आठवण झाली. तिचा विरह त्याला असह्य झाला.

त्याच वेळीं प्रद्योत राजानें वासवदत्ता व उदयन ह्यांचीं चित्रें पाठविलीं. तीं चित्रें ठेवूनच प्रद्योतनें आपल्या कन्येचें लग्न लावलें होतें. वासवदत्ताचें चित्र पाहतांच पद्मावतीनें अवन्तिकेला ओळखलें. तिनें विचारलें—"वासवदत्तेंत आणि ह्या चित्रांत कांहीं साम्य आहे?"

"हें वासवदत्तेचेंच चित्र आहे." तो म्हणाला.

"होय का? मग ह्या चित्रासारखीच एक स्त्री येथें आहे." असें समजतांच राजानें तिला बोलावून आणण्यास सांगितलें.

पद्मावती अवन्तिकेला घेऊन आली. तिच्याबरोबर साधूच्या वेषांत यौगन्धराय पण आला. त्यानें राजाला सर्व हकीगत सांगितली व ह्या नाटकाबद्दल क्षमा मागितली. अर्थातच त्याच्या बुद्धिचातुर्याचें राजानें कौतुक केलें.

त्या नंतर राजा उदयन आपल्या दोन्हीं राण्यांसह आनंदानें राहूं लागला.



# गर्वाचें घर खालीं!

एका राज्यांत एक पहिलवान होता. तो कुस्ती खेळण्यांत फार पटाईत होता. त्याच्याकडे कुस्ती शिकण्यासाठीं फार दूर दूरहून लोक येऊं लागले.

त्याच्या शिष्यांत एक तरुण फार हुशार होता. म्हणून त्यानें कुस्तींतील सर्व डावपेंच त्याला शिकविले. सर्व विद्या शिकून झाल्यावर तो राजाकडे गेला आणि म्हणाला—"आपल्या राज्यांत माझ्यापेक्षां उत्तम पहिलवान कोणी नाहीं. मी आपल्या गुरूला सुद्धां चीत करीन. कारण ते आतां म्हातारे झाले आहेत." त्याचें तें उर्मटपणाचें बोलणें ऐकून राजाला राग आला. तो म्हणाला—"असें काय? पाहूंच या मग खरी गोष्ट. तुम्हां दोघांची कुस्ती ठेवूनच पाहूं."

ठरल्या दिवशीं कुस्ती पाहण्यासाठीं लोकांची गर्दी जमली. गुरुशिष्य आखाड्यांत उतरले. गुरु जाणत होता कीं शिष्याची शक्ति जास्त आहे. येथें युक्तीनेंच काम केलें पाहिजे. शिष्य जोरांत त्याच्यावर धांवून येतांच तो बाजूला सरला व एक नवीनच पेंच घालून शिष्याला पाडलें. तो चीत झाला.

धूळ झाडींत गुरगुरत शिष्य म्हणाला—"वा! वा!! हा पेंच कधीं मला शिकविला होतांत?" "कांहीं कांहीं पेच तुझ्यासारख्या शिष्यांसाठीं राखून ठेवावे लागतात." गुरूनें सडेतोड उत्तर दिलें.





#  सूड 

वज्रगिरीचा राजा विक्रमसिंह ह्याला पद्ममुखी नांवाची एक मुलगी होती. ती फार सुंदर होती. म्हणून तिच्याशीं लग्न करण्यासाठीं दूर दूर देशांच्या राजकुमारांनीं प्रयत्न केला. त्यांत रत्नगिरीच्या इंद्रवर्माला विक्रमसिंहानें पसंत केलें. पद्ममुखीलाहि तोच राजकुमार आवडला. शृंगपुरचा राजा कालकेतु ह्याच्या मनांतून सुद्धां पद्ममुखीशीं लग्न करावयाचें होतें. त्याच्या आईनें त्याला सुचविलें कीं तू विक्रमसिंहाला जाऊन भेट. बहुतेक तो तुझें म्हणणें कबूल करील.

आईच्या म्हणण्याप्रमाणें कालकेतु विक्रमसिंहाला भेटला. आपली इच्छा व्यक्त केली. परंतु विक्रमसिंहानें त्याला होकार दिला नाहीं. बिचारा उलट्या पावलीं परतला. तो परतल्यावर विक्रमसिंहानें इंद्रवर्माला बोलावून त्याच्याशीं पद्ममुखीचें लग्न ठरविलें. तो आनंदानें रत्नगिरीस आला व लग्नाची तयारी करूं लागला.

त्याच वेळीं डोंगरी लोकांच्या टोळीनें रत्नगिरीवर हल्ला केला. इंद्रवर्मानें वज्रगिरीच्या विक्रमसिंहाजवळ मदत मागितली. जावयाचा निरोप कळतांच राजा व त्याचा मुलगा शक्तिसिंह दोघेहि निघाले.

ही बातमी शृंगपुरला पोहोंचली. तेव्हां कालकेतूची आई त्याला म्हणाली—"आत्तां वज्रगिरीला कोणी नाहीं, तूं सैन्य पद्ममुखीला पळवून आण. येथें तुम्हां दोघांचें लग्न लावूं. तसें केलेंस तरच विक्रमसिंहाचे डोळे उघडतील. मग बसेल तो पश्चात्ताप करीत."

आईच्या आज्ञेप्रमाणें त्यानें पद्ममुखीला कैद करून आणलें.

रत्नगिरीच्या युद्धांत विक्रमसिंह मारला गेला. इन्द्रवर्माला पदच्युत केल्यामुळें तो राज्य सोडून निघून गेला होता. ही सर्व बातमी शृंगपुरला पोहोंचावयास मुळींच वेळ लागला नाहीं. इंद्रवर्माची अशी स्थिति झालेली ऐकून सर्वांना वाईट वाटलें. त्यांनीं विचार केला कीं पद्ममुखी आतां कालकेतुशीं लग्न करील. पण तिनें नकार दिला. "माझ्या वडिलांनीं ज्यांना मला देण्याचें ठरविलें आहे त्यांच्याशींच मी लग्न करीन. दुसऱ्या कोणालाहि वरण्यास मी तयार नाहीं."

कालकेतूच्या आईनें पद्ममुखीच्या इच्छेविरुद्धच तिच्याशीं लग्न करण्यास सांगितलें. परंतु तोहि स्वाभिमानी होता. म्हणाला—"जेव्हां तिला वाटेल तेव्हांच मी लग्न करीन. पाहूं या किती दिवस अशी राहते ती."

कालकेतूच्या आईनें पद्ममुखीची समजूत घालण्यासाठीं रागावून, धाक दाखवून सर्व तऱ्हेचे प्रयत्न करून पाहिले. पण पद्ममुखीनें आपला निश्चय बदलला नाहीं.

"मला वाटलें होतें कीं तूं माझ्या मुलाशीं लग्न करून माझी सून होऊन माझा मान राखशील. पण तुझे डोळे अजून उघडले नाहींत. ठीक आहे. रहा येथें कैदी म्हणून." आई म्हणाली.



तिनें आपल्या म्हणण्याप्रमाणें खरोखरच तिच्याकडून बेगार करून घेण्यास सुरवात केली. भांडी घासणें, स्वयंपाक करणें, कपडे धुणें, राजवाडा झाडणें वगैरे कामें तिला करावी लागत. रात्रीं कोठें तरी ती एका कोपऱ्यांत आडवी होई. आपल्या आईचें हें काम कालकेतू व त्याची बहीण दोघांनाहि आवडलें नाहीं. कालकेतू नेहमीं आईला म्हणे—"ती राजकुमारी आहे. तिला मानानें वागवण्यांतच आपला मोठेपणा आहे."

"आला आहे मोठा शहाणा. तिला वठणीवर आणायला हाच उपाय आहे.









बघते कशी नाहीं कबूल होत तें. तुझ्याशीं तिचें लग्न लावूनच मी प्राण सोडीन."

आईच्या ह्या बोलण्यावर कालकेतू कांहींच बोलूं शकला नाहीं.

तीन वर्षें गेलीं. काळजीनें, दुःखानें आणि कामाच्या भारानें पद्ममुखी अगदीं अशक्त झाली.

एक दिवस नित्याप्रमाणें पद्ममुखी कपडे धुण्यासाठीं नदीवर गेली होती. तिनें नदीच्या पैल तिरावर एक नाव डुलत असलेली पाहिली. कपडे धुतां धुतां ती नावेकडे सारखी पाहात होती. नाव हळूं हळूं जवळ येत होती. थोडी जवळ आल्यावर तिला त्यांत दोन माणसें दिसलीं. नाव आणखी जवळ आल्यावर तिनें त्या दोघां व्यक्तींना ओळखलें. एक तिचा भाऊ शक्तिसिंह होता व दुसरा मनानें वरलेला पति इन्द्रवर्मा. तिला खूप आश्चर्य वाटलें व आनंदहि झाला. जर तिनें त्यांना ओळखलें नसतें तर कदाचित त्यांची भेट झाली नसती. कारण ते तिला ओळखूं शकले नव्हते.

"शृंगपूर हेंच का? ह्या देशाच्या राजाचेंच नांव कालकेतू नाहीं काय?" शक्तिसिंहानें पद्ममुखीला विचारलें.



पद्ममुखीनें 'हो' म्हणून सांगतांच त्यानें विचारलें कीं कालकेतूनें वज्रगिरीच्या राज-कुमारीला पळवून आणलें होतें ती जिवंत आहे काय?"

"तिला कालकेतूची राणी होणें पसंत नसल्यानें ती राजकुटुंबाचे कपडे धुण्याचें काम सध्यां करते आहे. गुलामच आहे त्यांच्या घरची." असें सांगतांना तिला गहिंवरून आलें. म्हणाली—"शक्ति, मला ओळखलें नाहींस का रे?" आपल्या बहिणीला अशा तऱ्हेनें कष्ट करीत असतांना पाहून त्याला फार वाईट वाटलें. इन्द्रवर्माच्याहि डोळ्यांना पाणी आलें.

"तुझी भेट झाली फार चांगलें झालें. रत्नगिरीच्या राजानें डोंगरी लोकांच्या राजाचा पराभव करून पुन्हां आपलें राज्य मिळविलें आहे. इन्द्रवर्माच त्याचा राजा आहे. परंतु तुझा पत्ता लागल्याशिवाय तो राज्याभिषेक करून घ्यावयास तयार नाहीं. आम्हीं तेव्हां पासून तुझ्या शोधासाठीं सारखें हिंडत आहोंत." शक्तिसिंह म्हणाला.

"आपण आत्तांच हिला आपल्या नावेंत घालून घेऊन जाऊं." इन्द्रवर्मा म्हणाला.

"पण त्याला मी असा सोडणार नाहीं! ज्यानें माझ्या बहिणीला पकडून आणून इतका













त्रास दिला आहे. त्याला असें नुसतें सोडीन होय? तें कांहीं नाहीं. उद्यां सकाळीं अचानकपणें आपण किल्ल्यावर हल्ला चढवूं या. इतक्या दिवस घालविलेस तसाच आजचा एक दिवस घालव. उद्यां सकाळीं तुझी सुटका करून घेऊन जातों." एवढें सांगून शक्तिसिंह नाव घेऊन निघून गेला. "मी आतां एका राजपुत्राची बहीण आहें. एका राजाची बायको होणार आहे. मी आतां कपडे कशाला धुवूं?" असें समजून पद्ममुखीनें सारे कपडे नदी कांठींच टाकून दिले व घरीं परतली. पद्ममुखीला घरीं येण्यास उशीर झाला होता. अर्थातच म्हातारीचें पित्त खवळलें. ती एकदम गर्जना करून म्हणाली—"नदीवर ऐवढा वेळ लावलास तर बाकी काम केव्हां करणार? मला वाटतें तुझी एकदां चांगलीच कानउघाडणी केली पाहिजे."

"जरा तोंड संभाळून बोला." पद्ममुखीनें जरा कठोर स्वरांत म्हटलें.

"हं! इतकी घमेंड? थांब तुला चाबकाचे फटकेच हवेत." असें म्हणत आईनें शिपायांना बोलाविलें.

पद्ममुखी म्हणाली—"मी राणी होण्याचा काल निश्चय केलाच आहे. जर माझ्या अंगाला कोणी हात लावाल तर उद्यां चामडीच लोळवीन एकेकाची.

पद्ममुखीच्या तोंडून ते शब्द ऐकतांच कालकेतूची आई फार खुश झाली. एका क्षणांत तिचा राग कोठल्या कोठें लयास गेला. हें वर्तमान तिनें क्षणाचाहि विलंब न लावतां कालकेतूला कळविलें. त्यालाहि फार आनंद झाला. शेवटीं पद्ममुखी माझ्यावर प्रसन्न झाली असें वाटून त्यानें लग्नाच्या तयारीला सुरवात केली.

दुसरा दिवस उजाडला. पहाटे पासूनच राजवाड्यांत धावपळ चालली होती. लग्नाच्या तयारीची गडबड चालू होती. इतक्यांत कांहीं सैनिक धापा टाकीत टाकीत राजवाड्यांत आले. ते म्हणाले—"वाड्यासमोर फार मोठें युद्ध चाललें आहे." तें पाहून आंतले सर्व सशस्त्र सैनिक तिकडे गेले आहेत. हें ऐकताच अंतःपुरांतील सर्व स्त्रिया भयभीत झाल्या.

हळूं हळूं युद्धाचा कोलाहल जवळ ऐकूं येऊं लागला. सैनिक पुन्हां पुन्हां येऊन पराजयाची बातमी देऊन जात होते. शेवटीं तर एका सैनिकानें कालकेतू मारला गेल्याची बातमी दिली. तेव्हां मात्र त्याच्या आईचे





डोळे पांढरे झाले. चेहेरा फिका पडला. ती मटकन तेथेंच खालीं बसली.

थोड्या वेळानें एक सेनापति आला आणि म्हणाला—"आपल्यांत पद्ममुखी कोण आहे? महाराज शक्तिसिंहाची आज्ञा आहे कीं त्या व त्यांच्या दासी ह्यांना सोडून बाकी सर्वांनी मरणास तयार व्हावें." हें ऐकतांच इंदुमतीनें एकदां सेनापतीकडे व एकदां पद्ममुखीकडे पाहून मान खालीं घातली. पद्ममुखीनें एकदां चारी बाजूस पाहिलें. सर्व स्त्रियांच्या चेहेऱ्यावर दुःखाची छाया पसरलेली तिला दिसली. तत्क्षण ती पुढें होऊन म्हणाली—"मीच पद्ममुखी आहें आणि येथील बाकी सर्व स्त्रिया माझ्या दासी आहेत."

"ह्यावर सेनापति तिला प्रणाम करून निघून गेला. थोड्या वेळानें आणखी कांहीं शिपाई येऊन राजमातेला व तिच्या दासींना हातकड्या घालून घेऊन गेला.

कांहीं दिवसांनी शक्तिसिंहानें आपल्या वहिणीचें व इंद्रवर्माचें मोठ्या थाटानें लग्न लावून दिलें व इंद्रवर्मानें आपला राज्याभिषेक पण करविला. त्या नंतर पद्ममुखीनें इंदुमतीची आपल्या भावाला ओळख करून दिली आणि म्हणाली—"ह्या मुलीनें मला आपली वहिनी होण्यासाठीं पुष्कळ सांगितलें. परंतु मला कधीं त्रास दिला नाही. उलट माझ्याबद्दल तिला सहानुभूतीच वाटत होती. फार चांगली आहे ही. म्हणून हीच जर माझी वहिनी झाली तर मला फार आनंद होईल."

शक्तिसिंहानें ती गोष्ट मान्य केल्या-वरून दोघांचें लग्न झालें. इंदुमति शक्ति-सिंहाची राणी झाली, पण राजमाता मात्र जन्मभर पद्ममुखीची दासी म्हणूनच राहिली. अशा तऱ्हेनें पद्ममुखीनें आपल्याला दुःख व कष्ट दिल्याचा सूड उगवला.





सुमारें सातशें वर्षांपूर्वी वेनिस नगरांत दोघे भाऊ राहात होते. एकाचें नांव निकोलो पोलो व दुसऱ्याचें नांव माफिटो पोलो असें होतें. ते दोघे व्यापाराच्या निमित्तानें बरेच देश हिंडून आले होते. इ.स. १२६० मध्यें ते कॉन्स्टॅंटिनोपलपर्यंत जाऊन पोहोंचले होते. तेथून जवळ जवळ एक वर्षभर प्रवास केल्या-नंतर ते चीन देशाचा राजा कुबिलाय खान ह्याच्या दरबारीं गेले. त्यावेळीं चीनवर तार्तार वंशांचे राजे राज्य करीत होते. हे लोक मंगोलियांतीलच एका जातीचे पुण्यक्षेत्र काराकोरम येथें जमले. चंगेज खानाला आपला नेता केलें. त्यानें बारा वर्षें नेतृत्व केलें. पण त्या अवधींत त्यानें चीनच्या उत्तरेस असलेला 'काते' देश जिंकला. नंतर त्यानें इंडोचीन, भारत, अरबस्तान, युरोप वगैरे देश सोडून बाकी सारा आशिया खंड जिंकून घेतला. त्याच्या दोन पिढ्यांनीं मिळून एवढें राज्य पादाक्रांत केलें कीं त्याच्या पूर्वी वा नंतर एवढें मोठें साम्राज्य स्थापन होऊं शकलें नव्हतें. त्यांच्या परा-क्रमामुळें चंगेज खानाच्या वारसांना 'बडे खान' असें नांव मिळालें. 'काते' प्रदेशाचा अधिकार त्यानें स्वतःकडे ठेवून घेतला होता आणि बाकी प्रदेश तीन भागांत वांटून तीन खानांकडे सोंपविला आणि त्यावर पुन्हां बडे खानांचा अधिकार कायम ठेवला. 'काते' प्रदेशावर राज्य करणाऱ्या बडे खानांत कुबलाय खान हा पांचवा अधिकारी होता. हा चंगेज खानाचा नातू होता.

## मार्कोपोलोच्या साहसपूर्ण सफरी



ह्याच कुबलाय खानानें पोलो बंधूंचें मोठ्या आदरानें स्वागत केलें. त्यानें त्यांच्या पासून जगांतील निरनिराळ्या देशांविषयीं माहिती करून घेतली. नंतर त्यानें रोम नगराच्या पोपकडे आपला दूत म्हणून त्यांना पाठविलें. ही कामगिरी त्या दोघां भावांनीं आनंदानें स्वीकारली आणि रोमला जाण्या-साठीं निघाले. परंतु वाटेंतच त्यांना कळलें कीं रोमला पोप मरण पावला असून अद्याप दुसऱ्या पोपची नेमणूक झाली नाहीं. ह्यामुळें ते रोमला न जातां वेनिसलाच गेले. तेथें कांहीं दिवस राहिल्यावर त्यांना बडे खानाची आठवण झाली. आपल्याला येऊन बरेच दिवस झाले आहेत, बडे खान आपली वाट पाहात असेल म्हणून ते पुन्हां कातेकडे जाण्यासाठीं निघाले.

ह्यावेळीं निकोलोचा मुलगा मार्कोपोलो हाहि त्यांच्याबरोबर निघाला. ह्यानेंच पंधरा वर्षें बडे खानाच्या दरबारीं घालविलीं व स्वदेशीं परत जाऊन आपले अनुभव लिहून काढले.

* * *

जॉर्जियाच्या राजाचें नांव 'डेविड मालिक' असें होतें. हा राजा तातार राजांचा मांडलीक असे. जॉर्जियाचे लोक फार सुंदर व उत्तम योद्धा म्हणून प्रसिद्ध होते. सिकंदर देश जिंकण्यासाठीं म्हणून जेव्हां निघाला, तेव्हां तो जॉर्जियाचा मार्ग न घेतां दुसऱ्या मार्गानें गेला. कारण त्याला ज्या वाटेनें जावयाचें होतें तो १५ मैलांचा प्रदेश एक लहान चिंचोळा मार्ग होता. त्याच्या एका बाजूला समुद्र व दुसऱ्या बाजूला डोंगर असल्यामुळें शत्रूला अडविण्यास थोडें सैन्य सुद्धां पुरत असे. त्यांत ज्योर्जियाचे लोक लढवैये होते. सिंकदरानें देखील ह्या लोकां-कडून धोका होऊं नये म्हणून त्या वाटेच्या तोंडाशीं एक भक्कम बुरूज व किल्ला बांधून



ठेविला. त्याला 'पोलादी फाटक' असें म्हणतात.

जॉर्जियाच्या उत्तरेला काळा समुद्र असून पूर्वेला कास्पियन समुद्र आहे. वास्तविक पाहतां हा समुद्र नसून एक फार मोठें सरोवर आहे. ह्याचा घेर २,८०० मैल आहे आणि ह्या सरोवरांत कांहीं मनुष्य-वस्ती असलेलीं बेटें आहेत. मोठमोठीं शहरें पण त्यांत आहेत. तारतरी लोकांनीं जेव्हां इराण देशावर हल्ला केला. तेव्हां बरेच लोक पळून ह्या बेटांतून येऊन राहिले आणि कांहीं लोक जॉर्जियाच्या डोंगरांत जाऊन राहिले.

बगदाद हें सर्वांत मोठें शहर होतें. तेथील लोक मोत्यांना भोकें पाडण्यांत फार पटाईत होते. भारतांतून तेथें मोती जात असत. तेथील लोक त्यांना भोकें पाडून ते युरोपीय देशांत विक्रीसाठीं पाठवीत असत. ह्या ठिकाणीं मुसलमान धर्म प्रचलित होता. येथें जादूटोणा वगैरे सारख्या विद्यांचें फार प्राबल्य होतें. त्या विद्या येथें शिकवीत असत.

त्यावेळीं तेथील खलीफांच्या जवळ फार मोठी धनदौलत होती. इ. स. १२५८ मध्यें ह्या शहरांवर हुलुग खान नांवाच्या एका तातारानें मोठ्या सैन्यासह हल्ला केला. हा



मोंग खानाचा धाकटा भाऊ होता. ते एकंदर चौघे भाऊ होते. काते जिंकल्यावर त्यांनीं दिग्विजय करण्याचा निश्चय केला. चौघे जण चारी दिशाला गेले. त्यांत हुलुग हा दक्षिणेकडे गेला आणि दक्षिण प्रदेश जिंकून तो बगदादपर्यंत आला. बगदादला युद्ध करून जिंकण्यापेक्षां युक्तीनें जिंकणें बरें असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें तसा डाव रचला. त्याच्या जवळ वीस हजार घोडेस्वार असून पायदळ सैन्य बरेंच मोठें होतें. तरी त्यानें खलीफाला असें भासविलें कीं त्याच्या जवळ फारच थोडी सेना आहे.

बगदाद शहरावर हल्ला चढविण्यापूर्वी त्यानें आपल्या सैन्यांतील बऱ्याच शिपायांना शहराबाहेरील सडकेच्या दुतर्फा असलेल्या झाडावर लपून बसण्यास सांगितलें आणि नंतर वेशीवरील दरवाज्यावर हल्ला केला.

खानाजवळ थेंतांचेंच सैन्य आहे असें समजून खलीफा सुद्धां थोडेंसेंच सैन्य घेऊन गेला. त्याला आलेला पाहतांच हुलगनें आपण भिऊन पळून जात असल्याचें भासविलें. खलीफानें अर्थातच पुष्कळ दूरपर्यंत त्याचा पाठलाग केला. तो पुढें जातांच झाडावर लपून बसलेल्या सैन्यानें पाठीमागून त्याच्या सैन्याला घेरलें. ह्या अचानक हल्ल्याला तोंड देणें खलीफाला अशक्य झालें. तो कैद झाला. अशा तऱ्हेनें हुलगनें बगदाद शहर जिंकलें.

शहराच्या पाहाणींत जेव्हां हुलगनें पाहिलें कीं बुरुजांत सोनें भरून ठेवलें आहे तेव्हां त्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें खलीफाला बोलावून विचारलें–"हे सोनें कशासाठीं जमा करून ठेविलें आहेस ? ह्याचें काय करण्याचें ठरविलें आहेस ? तुला काय स्वप्न पडलें होतें कीं मी सैन्य घेऊन येऊन बगदाद शहर लुटून नेणार आहे म्हणून ? आपल्या योध्यांना वांटून देऊन आपल्या शहराचें रक्षण करण्यास कां नाहीं सांगितलेंस ?" तो म्हणाला.

खलीफा ह्यावर काय उत्तर देणार ? तो बिचारा गप्प बसला.

"ठीक आहे. तुला सोन्यावर फारच प्रेम आहे असें वाटतें. तर मग तूं सोनेंच खाऊन रहा." असें सांगून हुलगनें खलीफाला त्या बुरजांत कोंडून ठेविलें. चार दिवस अन्न न मिळाल्यानें खलीफा तेथेंच मरून गेला आणि त्यानंतर मात्र एकहि खलीफा झाला नाहीं.

[पुढें चालू]

# गरिबाचा भार

विक्रमार्क शिरस्त्याप्रमाणें वडाच्या झाडाजवळ गेला. शव उतरवून खांद्यावर घेतलें व सरळ स्मशानाच्या वाटेनें चालूं लागला. थोडी वाट चालल्यावर शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला–"राजा ! खरोखरच तुझें धैर्य अचाट आहे. तुला पाहून मला मित्रबिन्दु नांवाच्या कोळ्याची आठवण येते. तुझ्या करमणुकी साठीं मी तुला त्याची गोष्ट सांगतों. ऐक." त्यानें गोष्ट सांगण्यास सुरवात केली.

फार वर्षांपूर्वी पूर्व किनाऱ्यावरील समुद्र तटीं मित्रबिंदु नांवाचा एक कोळी रहात असे. रोज तो आपल्या होडींत बसून समुद्रांत जात असे आणि मासे धरून आणीत असे. त्यावर बायको, पांच मुलें व तो स्वतः एवढ्यांचा उदरनिर्वाह चालत असे.

## वेताळाच्या गोष्टी



समुद्रांत एका विशेष जागीं मासे मिळत असत आणि ती जागा त्याला माहीत असल्यानें तो नेमका तेथेंच मासे धरायला वसे. मग मोठें वादळ आलेले असूं दे किंवा जोराचा पाऊस पडत असूं दे. ज्या दिवशीं तो जात नसे त्या दिवशीं सर्वांना उपास घडत असे.

अशा तऱ्हेनें काबाडकष्ट करून तो आपले दिवस कंठीत होता. त्याला कोणाची मदतहि मिळत नसे. त्याची बायको जी मदत करील तेवढीच. ती त्याचें जाळें विणून देत असे, फास नीट करून देत असे. घरांतील सर्व काम काज करीत असे. नवरा समुद्रावर गेला म्हणजे आपलें काम काज संपवून ती त्याची वाट पाहात बसत असे. तेव्हां तिच्या मनांत येई कीं माझा नवरा कोणत्या संकटांत सांपडला असेल! किती श्रम करीत असेल, ह्या विचारांनीं तिच्या मनाला हुरहुर लागून रहात असे.

मित्रविन्दु देखील घरांतून निघाल्या पासून आपल्या बायकोचाच विचार करीत असे. तिला करावे लागणारे कष्ट पाहून त्याला वाईट वाटे. तीं दोघें नवराबायको सुखा समाधानानें रहात होतीं.

एकदां त्याच्या शेजारचा एक गरीब माणूस मरण पावला. त्यामुळें त्याची बायको व मुलें निराधार झालीं. मित्रविंदूनें आपल्या शेजारीं एक झोपडी बांधून देऊन त्यांना तेथें रहावयास सांगितलें. ती बाई त्या झोपडींत राहून कांहीं तरी काम धंदा करून आपलें व आपल्या दोन मुलांचें पोट भरीत असे.

एक दिवस मित्रबिंदु समुद्रावर जाण्यास निघाला आणि एकाएकीं मोठें वादळ सुरू झालें. मित्रबिंदूच्या बायकोनें मुलांना पेज पाजवून निजविलें आणि ती स्वतः नवऱ्याची वाट पहात बसली. तिच्या मनांत विचार आला, आपला नवरा आपल्या साठीं अशा संकटांत सुद्धां त्रास सोशीत आहे. मुलें मोठीं झालीं म्हणजे करतील बापाला मदत. मग त्याचा भार थोडा कमी होईल. पण तों पर्यंत तरी कष्ट करावयास पाहिजेत. असल्या विचारांनीं तिचें मन अगदीं विह्वल झालें. अर्धी रात्र झाली. तरी मित्रबिंदु आला नाहीं. त्याच्या बायकोचा जीव खालीवर होऊं लागला. तिनें दिवटी पेटविली आणि समुद्र काठीं जाऊं लागली.

वाटेंत तिला त्या अनाथ बाईची झोपडी दिसली. परंतु झोपडीचें दार अर्धवट उघडें असून वाऱ्यामुळें थडथडत होतें. तिला आश्चर्य वाटलें कीं दार उघडें कां? म्हणून ती आंत शिरली. तिला समोरच त्या अनाथ बाईचें मृत शरीर दिसलें. वरून तिच्या तोंडावर पाणी टिपकत होतें. असें वाटे कीं तिच्या डोळ्यांतून आसवें गळत आहेत. जवळच कोरड्या जागेंत तिचीं दोन्ही मुलें निजलीं होतीं.

तिच्या मनांत आलें, बिचारी मुलें कोण आहे आतां ह्या मुलांना. कशीं कशीं संकटें झेलावी लागतील देव जाणे. अगोदरच बाप सोडून गेला आणि आतां आईदेखील तिकडेच गेली. तिला फार वाईट वाटलें.












त्या मुलांचा विचार मनांत येतांच तिला आपल्या मुलांची आठवण झाली. त्यांना केव्हां पाहीन असें होऊन गेलें तिला. तिनें लगवगीनें त्या दोघां मुलांनाहि उचललें व आपल्या घरीं घेऊन आली. तिच्या पांच मुलांत त्या दोघांना निजविलें. नंतर पुन्हां तिला नवऱ्याची आठवण झाली.

पण ती पुन्हां समुद्राच्या बाजूला गेली नाहीं. घरांत बसून ती त्याची वाट पाहूं लागली. ती मनांत म्हणाली—" मी ह्या मुलांना आणलें आहे खरें, पण जर का त्यासाठीं नवऱ्यानें मारलें तर त्याचा काय दोष ! अगोदरच आपला प्रपंच चालवितांना नाकी नऊ येत आहेत. त्यांतून हे दोन जीव आणले मीं ; म्हणजे कष्टांत भर. पण अगो-दर सुखरूप घरीं येऊं दे. बाहेर वादळ अगदीं मी म्हणत आहे. मुसळधार पाऊस पडतो आहे. समुद्राच्या लाटांचा आवाज येथपर्यंत ऐकूं येत आहे. काय होतें आहे कोण जाणें."

बसल्या बसल्या ती आडवी झाली. तशांतच पाहाट झाली. तिचा थोडा डोळा लागला तेवढ्यांत दरवाजा खडखडला. दार उघडतें तों नवरा समोर उभा. त्याला पाहून तिला बरें वाटलें. त्याचें सर्व अंग व कपडे ओले चिंब झालें होतें. ती म्हणाली—" मला सारखी काळजी लागून राहिली होती. देवानें कृपा केली.

" काय वादळ ! काय पाऊस !! ह्या पावसांत तुमची काय अवस्था झाली असेल म्हणून माझें सर्व चित्त घरांकडे लागलें होतें. मला आज एक सुद्धां मासा मिळाला नाहीं. वाऱ्यामुळें जाळ्याच्या चिंध्या चिंध्या झाल्या आहेत. होडी देखील खिळखिळी झाली आहे. तशीच तिला पाण्यांतून रेटत आणली नसती तर आज खरोखर घडगत नव्हती. पण सर्व कांहीं देवाची कृपा." कोळी म्हणाला.

" ही झाली समुद्रावरची हकीगत. इकडे ती अनाथ बाई, बिचारी रात्रीं मरून गेली. काय होईल त्या मुलांचें कोण जाणें." बायको म्हणाली.

" मग एवढा विचार कसला. जा घेऊन ये त्यांना आपल्या घरीं. ह्या पांचांत ती आणखी दोघें. आपलीं मुलें खातील त्यांतीलच ही दोघें खातील. जो देव आपल्या मुलांना देत आहे तो या लेकरांना नाहीं का देणार ? काय ती आपल्याला थोडी अंग मेहेनत करावी लागेल. तेवढें केलेंच पाहिजे." कोळी म्हणाला.





बायको जात नाहीं असें पाहून. "जात कां नाहींस? जा ना! तेवढ्यांत जागीं झालीं तर घाबरतील दोघें. त्यांचें ओझें कशाला असें वाटतें आहे तुला? जा."

"तसें नाहीं. बघा ना आंत येऊन." ती म्हणाली.

आपल्या बायकोनें त्या मुलांना आणलें आहे, हें पाहून त्याला तिचें कौतुक वाटलें.

इतकी गोष्ट सांगून वेताळ थांबला. पुढें तो राजाला म्हणाला—"राजा, मित्रबिंदु इतका मूर्ख होता कीं काय? आपलाच प्रपंच रेटता रेटता त्याला पुरेसें झालें होतें. मग हें कशाला त्यानें व्याघ्रांच्या घोड्या-प्रमाणें गळ्यांत बांधून घेतलें? देवावर भार समजून जर त्यानें आपली जबाबदारी वाढ-विली असती तर त्यानें आपली स्वतःची जबाबदारी सुद्धां कां नाहीं देवावर टाकिली? काय असेल कारण? बघ, उत्तर माहीत असून दिलें नाहींस तर त्याचें प्रायश्चित्त काय मिळेल माहीत आहे ना?"

विक्रमार्क म्हणाला—"मित्रबिंदु मूर्ख नव्हता. तो आपला प्रपंच आपल्या कष्टा-नेंच चालवीत होता. कष्टाची किंमत त्याला माहीत होती. परंतु तेवढें करून सुद्धां ओढाताण होत असल्यानें त्यानें देवावर भार टाकला होता. पण तो स्वस्थ बसला नव्हता. देवावर अगर दैवावर त्या मुलांचा भार टाकावयाचा असता तर त्यानें ती जबाबदारी घेतलीच नसती. त्याला आप-ल्या मेहनतीचा भरंवसा होता. म्हणूनच त्यानें त्या मुलांना आपल्या घरीं आणून ठेवून घेतलें."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह अदृश्य झाला व पुन्हां वडाच्या झाडावर जाऊन लटकूं लागला.

(कल्पित)





मास्तर: "आपल्या नाटकांत भीमाचें काम कोण करणार?"
मध्यम: सर! मी.



"तोंडाला हा वारा कशासाठीं?"
"मी कढत कढत कॉफी प्यालों आहे ना!"




सुदैवच म्हणा. इस्पितळ जवळच आहे.



# राजा व चोर

पूर्वींची गोष्ट आहे. पाटलिपुत्रावर उग्रसेन नांवाचा राजा राज्य करीत होता. तो फार शूर होता. त्याचे सरदार सुद्धां त्याच्या सारखेच पराक्रमी होते. ह्यामुळें शत्रूंवर सुद्धां त्याचा वचक होता. त्याला पाहतांच ते थरथर कांपत असत. इतके असून सुद्धां त्याच्या सरदारांमध्यें कांहीं सरदार अन्यायी व अत्याचारी होते. पण ते राजाच्या विश्वासांतील असल्यानें त्यांच्या विरुद्ध कोणी कांहीं बोलूं शकत नव्हते.

उग्रसेनाच्या सैन्यांत एक सहदेव नांवाचा सैनिक होता तो फार शूर होता. त्याला आढळून आलें कीं कांहीं दुष्ट सरदार प्रजेला त्रास देत आहेत व त्यामुळें विनाकारण राजाचें नांव बदनाम होत आहे. सहदेवाला हें मुळींच आवडलें नाहीं. म्हणून त्यानें प्रजेच्या कल्याणासाठीं त्या सर्व दुष्ट लोकांचा नायनाट करण्याचा निश्चय केला. जेव्हां जेव्हां संधि मिळे तेव्हां तेव्हां सहदेव त्या अत्याचारी दुष्ट सरदारांवर हल्ला करीत असे व त्यांना लुटून तें धन तो गरीब प्रजेला वांटून देत असे.

कांहीं दिवसांनीं त्या दुष्ट सरदारांनीं राजाकडे तक्रार केली कीं सहदेव डाकू झाला आहे. तो लोकांच्यावर हल्ले करून त्यांना लुबाडतो. अर्थातच राजानें त्याला पकडण्यासाठीं सैनिक पाठविले. पण तो त्यांच्या हातीं लागला नाहीं. त्यामुळें राजानें त्याला लुटेरा ठरवून ज्याच्या हातीं तो सांपडेल त्यानें त्याला मारून टाकावें असा हुकूम सोडला.

कांहीं दिवस गेले. एक दिवस रात्रीं उग्रसेन राजाला स्वप्नांत एक देवी दिसली. ती म्हणाली—"राजा! ऊठ. जाऊन चोरी करून ये. ही देवाची आज्ञा आहे असेंच समज." राजा खडबडून जागा झाला. ह्या विचित्र स्वप्नानें त्याला फार आश्चर्य वाटलें. तरी तो तसाच डोळे मिटून पडून राहिला. तितक्यांत त्याला पुन्हां तीच देवी दिसली. म्हणाली—"जर तूं चोरी केली नाहींस तर तुझें राज्य जाईल ही देवाची इच्छा आहे."

दोन वेळां त्याला तेंच स्वप्न पडलें. तरी त्यानें चोरी करण्यास जाण्याचा विचार केला नाहीं. परंतु ह्यांत कांहीं तरी गूढ असलें पाहिजे असें त्याची मनोदेवता सांगूं लागली. पुन्हां त्यानें डोळे मिटून झोंपण्याचा प्रयत्न केला. पण तिसऱ्यांदाहि त्याला तसेंच स्वप्न पडलें. आतां मात्र तो स्वस्थ बसूं शकला नाहीं. त्यांत खरोखरच कांहीं तरी दैवी शक्ति आहे असें त्याला वाटलें.

तो उठला. चूळ भरली आणि कोणाच्याहि न कळत राजवाड्याच्या बाहेर निघून गेला.

माझ्या नोकरपैकीं कोणी जर मला पाहिलें तर काय म्हणतील? असा विचार करीत तो तबेल्यांत गेला. आपला घोडा काढला आणि जंगलाच्या बाजूला निघून गेला. सुदैवानें त्याला कोणी पाहिलें नव्हतें म्हणून



बरें. चोरीच करावयास निघालेला तो चोराप्रमाणें आपलें तोंड झांकून घेतलें त्यानें.

चोराविषयीं त्याच्या मनांत विचार घोळूं लागले. चोरी करणें हें सुद्धां एक कौशल आहे. किती विचार करून पावलें टाकावी लागतात. त्यांना धैर्य आणि साहस कमालीचें असलें पाहिजे. पुढील परिणामाला तयार राहिलें पाहिजे. समजा लोकांच्या हातीं सांपडलों तर त्यांचा मार खाण्याची तयारी पाहिजे. फांशीची शिक्षा जरी झाली तरी त्याला सिद्ध झालें पाहिजे. असे नाना तऱ्हेचे विचार येऊन त्याचें मन राजा

श्री. भा. मो. पाटील









असून सुद्धां कचरूं लागलें. त्याला वाटलें जर आपण चोरी केली आणि सांपडलों तर मार खावा लागेल. कदाचित आपण कोण हें कळण्यापूर्वींच आपल्याला मारून टाकलें तर? आणि चोर म्हणून आपल्याला कोणी पकडलें आणि राजा असल्याचें त्याला कळलें तर लोकांत किती अपमान होईल? छे! छे!! आपल्या ऐकट्याच्यानें हें काम होणार नाहीं. कोणा तरी चोराला गांठून त्याच्याशीं दोस्ती केली पाहिजे.

राजाच्या मनांत विचार येत होते आणि तो जंगलांतून पुढें पुढें चालला होता. तेव्हांच काळ्या घोड्यावर स्वार होऊन येत असलेली एक व्यक्ति त्याला दिसली.

"इतक्या रात्रीचा कुठें निघालास? काय नांव तुझें?" राजानें विचारलें. पण तो मनुष्य कांहीं बोलला नाहीं. राजानें लागलीच आपली तलवार उपसली आणि हो तयार म्हणून त्याला सावध केलें. दोघांचें द्वंद्व सुरू झालें पहिल्यानें त्यांनीं घोड्यावरूनच युद्ध केलें. पण मग खालीं उतरून त्यांना युद्ध करावें लागलें. थोड्याच वेळांत तो मनुष्य पडला. तो राजास म्हणाला—"तुझ्या सारखा योद्धा मी अद्याप पाहिला नाहीं.



तुझें युद्ध कौशल्य अचाट आहे. तूं पाहिजे तर मला मारून टाक."

"तुला मारण्यांत माझा कांहींहि फायदा नाहीं. तूंहि एक उत्तम योद्धा असावास असें वाटतें. तुझ्यामुळें झालें तर माझें हितच होईल. काय तुझें नांव?"

"माझें नांव सहदेव." त्यानें सांगितलें.

"तर मग तूंहि चोर आहेस? बरें झालें. चल आपण दोघे जण मिळून कोठें तरी जाऊन चोरी करूं. आपण राजवाड्यांत जाऊन चोरी करूं या का?" राजानें विचारलें.

"नाहीं. चांगल्या माणसांना मी कधीं त्रास देत नाहीं. महाराजांना मी कांहींहि त्रास देणार नाहीं, शूरसेनाच्या घरीं जाऊं पाहिजे तर." सहदेव म्हणाला.

शूरसेन चांगल्या दरबाऱ्यांपैकीं एक होता आणि शिवाय राजाचा मेहुणा होता.

"राजाविषयीं तुझ्या मनांत फार आदर आहे अं? मग त्याच्या बहिणीच्या घरांवर डाका घालावा म्हणून कसें वाटलें तुला?" राजानें विचारलें.

"शूरसेनाच्या राजभक्ति पेक्षां माझी राजभक्ति निराळी आहे. मी वेळ पडल्यास





राजासाठीं प्राण सुद्धां देण्यास तयार आहे. मी असें ऐकलें आहे कीं शूरसेनाच्या वागण्यामुळें राजाच्या बहिणीला कांहीं सुख नाहीं." सहदेव म्हणाला.

हें ऐकतांच राजाला धक्का बसला. वाईटहि वाटलें. तो समजत होता कीं शूरसेन आपल्या बायकोवर फार प्रेम करीत आहे. "चल. आज त्याच्याकडे जाऊन चोरी करूं या." राजा म्हणाला.

दोघेहि घोड्यावर बसून शूरसेनाच्या किल्ल्यांत शिरले. सहदेव चांगला कसलेला चोर असल्यामुळें पाहारेकऱ्यांचे डोळे चुकवून तो किल्ल्यांत शिरला. राजा त्याच्या ह्या चातुर्यावर फार खूश झाला. तो मनांत म्हणाला—"जर का मी एकटांच असतों तर नक्की पाहारेकऱ्यांनीं मला पकडलें असतें."

राजाला पाठीमागें घुटमळतांना पाहून सहदेवानें ओळखलें कीं आपला साथीदार अगदीं नवा आहे. त्यानें राजाला काळोखांत उभें केलें. म्हणाला—"मी जाऊन चोरी करून येतों. तोंपर्यंत येथून कोठें जाऊं नकोस."

थोड्या वेळानें तो पैसे व दागिने एका गाठोड्यांत बांधून घेऊन आला. तें पाहून राजाला फार आश्चर्य वाटलें.

"आपण येथून लवकर निघून गेलों नाहीं तर कदाचित पकडले जाऊं." राजा म्हणाला.

"थांब! अशी घाई करूं नकोस अजून एक चोरी करावयाची आहे. वरच्या मजल्यावर त्याच्या निजावयाच्या खोलींत शूरसेनाचें रत्नजडित सोन्याचें खोगीर आहे. तें आणलें पाहिजे." सहदेव एवढें सांगून झटकन तेथून निघून गेला.

तो सरळ दुसऱ्या मजल्यावर गेला. तेथें तो व त्याची बायको पलंगावर निजली होती. सहदेवानें खोगीर हळूच उचललें आणि जाऊं लागला. पण तेवढ्यांत कसला तरी आवाज झाला. तो ऐकून शूरसेन उठला आणि "कोण आहे? तलवार कुठें आहे माझी" म्हणून ओरडला.

"काय झालें! कां ओरडलांत?" म्हणून त्याची बायको खडबडून जागी होऊन म्हणाली.

"कोणी आल्याची चाहूल वाटली. आंत कोणी तरी आल्यासारखें वाटलें."

"कांहीं नाहीं हो. झाडाच्या फांद्या वाऱ्यानें हलल्या असतील झालं. रोजच तुम्हीं कांहीं तरी स्वप्न पाहून उठतां. मनांत कांहीं तरी असल्याशिवाय रोज असें तुम्हीं उठणार नाहीं." बायको म्हणाली.

"अशी घाई करूं नकोस. उद्यां माझी सर्व काळजी दूर होईल. उद्यां संध्याकाळ-पर्यंत अर्धे राज्य माझ्या ताब्यांत येणार आहे." शूरसेन मोठ्यानें हंसून म्हणाला.

"उद्यां मी दरबारांत जाणार आहे. म्हणून म्हणालांत. परंतु राजा अर्धे राज्य देणार आहे म्हणून सांगितलें नाहींत?" बायको म्हणाली.

"देणार कोण? मी आणि माझे कांहीं मित्र दरबारांत जाऊन राजाला मारून टाकून



त्याचें राज्य वांटून घेणार." असें सांगून शूरसेनानें त्या कारस्थानांत कोण कोण आहेत त्यांचीं नांवें सांगितलीं.

"भलतंच? मी आपल्या भावाची हत्या होऊं देणार नाहीं." असें म्हणत ती उठूं लागली. परंतु शूरसेनानें तिला अगदीं बेदम मारलें. थोड्या वेळानें पुन्हां दोघं शांतपणें झोपलीं.

सहदेव राजाकडे आला आणि सर्व ऐकलेला प्रकार सांगितला आणि म्हणाला—"दे माझी तलवार. त्या राजद्रोह्याला मारून येतों. जर थोड्या वेळांत मी परत आलों

नाहीं तर मी मेलों असें समज व तूं निघून जा."

खरें म्हणजे सहदेवाच्या बोलण्यावर राजाचा विश्वास बसला नाहीं. कारण शूरसेनावर त्याचा फार विश्वास होता.

म्हणाला—"अरे, पण तुला काय करावयाचें आहे मध्यें पडून? राजासाठीं प्राण द्यायला तूं एवढा जिवावर उदार कां बरें होतोस. सांग! काय केलें आहे राजानें तुझ्यासाठीं?"

"तूं मला प्राणदान दिलेंस म्हणून, नाहीं तर तुलाच प्रथम मारलें असतें. आण माझी तलवार मला जाऊन त्या दुष्टाचा नाश करून येऊं दे." सहदेव म्हणाला.

"नको. आपण जाऊन राजालाच सांगूं या मग तो पाहील त्याला काय करावयाचें तें." राजा म्हणाला.

"माझ्या म्हणण्यावर राजा विश्वास करणार नाहीं. कारण मी चोर आहे व मला हद्दपार केलें आहे. पाहिल्याबरोबरच माझे डोळे काढून टाकतील ते. मग माझें म्हणणें ऐकणार तरी कोण?" सहदेव म्हणाला.

"पण मला तर हद्दपार केलेलें नाहीं. मी राजाला जाऊन सांगतों." राजा म्हणाला.

नंतर पुन्हां कोठें भेटावयाचें तें ठरवून दोघे आपापल्या मार्गाला लागले. पहाट होण्यापूर्वीच कोणाच्या नकळत राजा आपल्या महालांत पोहोंचला. तेव्हांच्या तेव्हां त्यानें आपल्या सरदारांना बोलाविलें. अर्थातच त्या कारस्थानांत असलेल्यांना वगळूनच.

तो म्हणाला—"मी सहदेवाला भेटलों होतों. त्यानेंच मला ह्या कारस्थानाचा सुगावा लावून दिला. शूरसेन त्यांचा मुख्य आहे."

"आपण शूरसेन व त्याच्या साथीदारांशीं लढून त्यांचें पारिपत्य केलें पाहिजे." सर्व सरदार म्हणाले.

"पण ते लोक एकदम हल्ला मुळीं करणारच नाहींत. एकेक एकेक येतील, मग त्यासाठीं एवढी लढाई कशाला. तुम्ही सर्वजण सुसज्ज रहा म्हणजे झालें. एकेकाला एकेक जण पुरे."

राजाच्या सांगण्याप्रमाणें आलेल्या सर्व कारस्थानी सरदारांना कैद करण्यांत आलें. त्यांचीं शस्त्रें काढून घेतलीं. शेवटीं शूरसेन आला. त्याला पकडून राजा समोर आणलें. त्याला समजलें कीं त्याचें बाकीचे सर्व साथीदार कैद झाले आहेत. तरीसुद्धां तो शांतपणें म्हणाला—"हें काय प्रकरण आहे?














अहो, मी तुमचा मेहुणा आहे. अशाच तऱ्हेनें आपण आपल्या सरदारांचा आदर करतां ?"

"राजद्रोह्यांचें स्वागत असेंच करावयाचें असतें." राजा म्हणाला.

"कोणी हें तुम्हाला सांगितलें ? बोलवा पाहूं त्याला. ऐकूं दे तरी !" मेहुणा म्हणाला.

राजानें ठरलेल्या जागीं एका माणसाला पाठवून सहदेवाला बोलावणें पाठविलें. सहदेवाला वाटलें कीं आपला साथीदार पकडला गेला आहे आणि आपल्याला पकडण्यासाठीं त्यानें राजाला आपलें नांव सांगितलें आहे. परंतु लगेच त्याच्या मनांत आलें कीं कांहीं झालें तरी राजा असा नीच नाहीं. म्हणून तो त्या माणसाबरोबर राजवाड्यांत गेला. तो म्हणाला—"महाराज, मी चोर आहें. मला आपण हद्दपार केलें आहे. तरी सुद्धां आपल्या चांगुलपणावर विश्वास ठेवून मी येथें आलों आहे. केवळ आपल्या आज्ञेनें."

"काल ज्याला मी प्राणदान दिलें त्याला आज मारीन !" राजा म्हणाला.

"काल महाराजच का होते !" त्यानें आश्चर्यानें विचारलें.

"होय. काल तूं मला चोरी करावयास शिकविलेंस. आज तुझ्याकडून आणखी एका गोष्टीची मदत मागावयाची आहे. तू ह्या राजद्रोह्याशीं युद्ध करतोस काय ?"

सहदेवानें तें कबूल केलें. बराच वेळ दोघांचें द्वंद्वयुद्ध झाल्यावर शेवटीं शूरसेन मारला गेला.

नंतर राजानें सहदेवावरचे सगळे आरोप दूर केले. शूरसेनाची जहागिरी त्याला दिली आणि पुन्हां त्याला आपला सरदार केलें.



# गलिवरच्या सफरी





माझें नांव लेम्यूल गलिवर आहे. इ. स. १७०० मधील गोष्ट आहे. मी "ॲन्टिलोप" नांवाच्या ब्रिटिश जहाजांतून यात्रा करीत आहें.



वाटेंत एक भयंकर वादळ आलें, त्यांत आमचें



मी एका लहान होडक्यांत उडी मारली. त्यांत



आमचें जहाज बुडून गेलें आणि त्यांत बरी-चशीं माणसेंहि बुडालीं.




अर्ध्या तासानें सुमारें तीन मैल गेल्यावर आम्हांला किनारा दिसला.



आम्हीं फार थकलों होतों. त्यांतच एक मोठी लाट आली व आमची होडी उलटली.



माझ्याबरोबर सर्व मित्र पाण्यांत बुडाले. दुदैवानें मला होडीची डोलकाठी मिळाली आधाराला.



थोड्या वेळानें पायाला जमीन लागली. तेथून एक मैल चालत गेल्यावर किनाऱ्यावर आलों.



किनाऱ्याहून अर्धा मैल आंत गेलों तरी कोणीहि भेटलें नाहीं.



दमल्यामुळें डोळ्यावर झापड आली, म्हणून तेथेंच गवतावर निजलों.



झोंप मोडली तेव्हां मला उजाडलेलें दिसलें. उठण्याचा प्रयत्न केला, पण उठूं शकलों नाहीं.



चारी बाजूंनीं मला कांहींतरी आवाज ऐकूं येत होता. मी हात पाय डोकें हलविण्याचा प्रयत्न केला. परंतु मला ते जखडून ठेवल्यासारखे वाटले. केसांच्या बटा बटा बांधून ठेवल्या आहेत असें भासलें.



सहा इंच उंचीचा माणूस हातांत तलवार घेऊन माझ्या छातीवर चढून तोंडाकडे येत होता.




त्याच्या पाठोपाठ बरेच लोक येत होते. मग मी जोरानें ओरडलों.



मी दोऱ्या तोडण्यासाठीं म्हणून कुशीस वळण्याचा प्रयत्न केला. त्यामुळें डाव्या बाजूच्या दोऱ्या तुटल्या व मान वळवतांच केसांच्या मेखा सुद्धां उखडून आल्या



'टोल्गो फोनाक' चा शब्द ऐकूं आला आणि माझ्या तोंडावर लहान लहान बाण आदळले.



दीड फूट उंचीच्या व्यासपीठावरून एका व्यक्तीनें कांहींतरी भाषण केलें.



मी त्याला खुणेनें सांगितलें कीं मला भूक लागली आहे. त्याला तें समजलें.



बरीचशीं लहान लहान माणसें खाण्यापिण्याच्या वस्तू घेऊन माझ्या छातीवर चढूं लागलीं.



# गंगावतरण

(तृतीय अध्याय)

मुनिवाणीनें अंशुमंतला
धीर वाटला, पण थोडा ;
त्यास मिळाला अनायासही
अश्वमेध करण्या घोडा ॥

समाधान पण मनास नव्हतें ;
मनींस वदला म्हणूनि तो–
"महामुने! मी धन्य जाहलों
कृपा असूं द्या मी येतों ॥

"एक विनंती करतों आतां
त्याचा मानूं राग नये ।
शिरोधार्य वडिलांची आज्ञा
उलटें उत्तर देउं नये ॥

माहित मज ही रीत जगाची
मनास नाहीं शांति तरी ।
वार्ता वडिलांची चुलत्यांची
नाहिं, कसा मी जाउं तरी ॥

"त्यांचा आत्मा फिरेल भूवर ;
मिळेल त्यांना मुक्ति कधीं?
किंवा त्यांचें कशा तऱ्हेनें
घडेल दर्शन कुणां कधीं?"

हृदय मुनींचें द्रवलें त्याच्या
काकुळतीच्या वचनांनीं ।
पाठीवरती हात फिरवुनी
म्हटलें प्रेमानें त्यांनीं–

"गंगा स्वर्गीची पृथ्वीवर
शकेल आणूं जो कोणी,
तोच उद्धरूं शकेल सर्वां
तिचें शिंपडुनिया पाणी ॥"

अंशुमंत तें आश्चर्यानें
ऐकुनि वदला–"हे मुनीवर!
माहित मजला तिचा न उद्गम
सांगा करुनि कृपा मजवर ॥

श्री. भालचंद्र आपटे, हैदराबाद



# डोळ्यांत अंजन

आठ शें वर्षांपूर्वी चीनमध्यें हंग चौ, ही सून्ग साम्राज्याची राजधानी होती. राजधानीचेंच शहर तें. अर्थातच पूर्ण वैभवानें भरलेलें. त्या वैभवांत भिकाऱ्यांचें वैभव ही ओतप्रोत होतें. त्यांत त्यांचा एक राजाहि होता. तो बाकी सर्व भिकाऱ्यांकडून त्यांच्या प्राप्तींतील एक निश्चित वांटा घेत असे व त्याच्यावर सावकारीचा धंदा पण करीत असे. अशा तऱ्हेनें त्याला पैसे मिळविण्याचें एक उत्तम साधन मिळत असे.

भिकाऱ्यांचा राजा घरांत जरी राजासारखाच राहात असे तरी दारा बाहेर त्याला कोणी विचारीत नसे.

हंग चौ नगरांत त्या वेळीं 'चिन लाओतो' नांवाचा भिकारी त्यांचा राजा होता. सात पिढ्यांपासून हें राज्यपद त्यांच्याकडे चालत आलें होतें. त्यामुळें त्याच्याजवळ अलोट संपत्ति सांठली होती. गांवांत त्याच्या मालकीचीं किती तरी घरें होतीं. बरीचशी धान्याचीं कोठारें होतीं. तिजोऱ्या पैशांनीं भरलेल्या होत्या. घरांत नोकर चाकर होते. गांवांतील गर्भश्रीमंतांत तो एक होता.

एवढें सर्व होतें तरी गांवांत त्याला मान नव्हता. तो मिळावा म्हणून त्यानें आपलें हें पिढिजात चालत आलेलें पद सोडून दिलें. त्या ठिकाणीं त्यानें आपल्याच एका नातेवाईकाची नेमणूक केली. तरी सुद्धां सर्व त्याला भिकाऱ्यांचा राजा म्हणूनच म्हणत असत.

त्याला एक मुलगी होती. व तिला जन्म देऊन त्याची बायको मरण पावली. नंतर त्यानें पुन्हां लग्न केलें नाहीं. आपल्या मुलीचेंच संगोपन करण्यांत त्यानें मन रमविलें.

सौ. गंगादेवी आपटे



तिला त्यानें उत्तम शिक्षण दिलें. तऱ्हेतऱ्हेची कलाकुसरीचीं कामें शिकविलीं. लिहावयास वाचावयास शिकविलें. एवढेंच नव्हे तर तिला उच्च शिक्षण देऊन सुविद्य केलें. ती मुलगीहि सुशील व गुणवति होती. सुंदर होती. खरोखर थोरामोठ्याच्या घरांत शोभण्यासारखी होती. तिचें नांव होतें यून्.

चिन लाओतोच्या मनांतून आपल्या-मुलीला मोठ्याच्या घरांत द्यावी असें होतें. परंतु भिकाऱ्याच्या राजाची मुलगी म्हणून तिच्याशीं लग्न करण्यास कोणी तयार होईना.

यून् अठरा वर्षांची झाली तरी तिचें लग्न कोठेंच जमलें नाहीं.

त्याच गांवांत मोची नांवाचा एक मुलगा होता. तो फार सुंदर होता. त्याला आईवडील कोणी नव्हते. तो फार गरीब होता. परंतु हुशार होता. तशा गरीबींत सुद्धां त्यानें कांहीं तरी सरकारी परीक्षा दिल्या होत्या. त्याचें वय वीस वर्षांचें होतें तरी पण त्या गरीबीमुळें त्याचें अद्यापि लग्न झालें नव्हतें.

चिननें त्या मुलाची चौकशी केली. चांगला होतकरू होता तो म्हणून त्याला घर जांवई करून घेतलें चिननें. मोची पण अगदीं गरीब निराधार होता. म्हणून लग्नास तयार झाला.

सुंदर, संपन्न व सुविद्य पत्नी मिळाल्यामुळें मोची फार खूष झाला. त्याच्या मित्रांनीं-सुद्धां त्याचें त्या बद्दल अभिनंदन केलें. त्यानें लग्नानिमित्त आपल्या सर्व मित्रांना बोलावून सासऱ्याकडेच मेजवानी दिली.

त्या जेवणावळीची बातमी चिनचा नातलग भिकाऱ्यांचा राजा याला समजली. तो रागारागानें आपल्याबरोबर पन्नास साठ भिकाऱ्यांची टोळी घेऊन चिनच्या घरीं आला, "तोच कोण मोठा. आम्ही काय



त्याच्या पेक्षां कमी आहोंत काय?" असें म्हणत तो चिनच्या घरांत शिरूं लागला.

भिकाऱ्यांना येतांना पाहून मोची व त्याचें मित्र पानावरून उठून निघून गेले. चिनला फार वाईट वाटलें. त्यानें भिकाऱ्यांना सांगितलें, हें जेवण जांवयानें त्याच्या मित्र मंडळींना दिलें आहे. माझ्याकडील जेवण मी तुम्हांला देणार आहें. आलेल्या भिकाऱ्यांना थोडी थोडी दक्षिणा देऊन शांत करून त्यानें त्यांना परतविलें.

त्या दिवशीं मोची आपल्या एका मित्राकडे राहिला. दुसरे दिवशीं तो घरीं गेला. त्याला पाहून चिनला लाजल्यासारखें झालें. यूनूला अपमान झाल्याचें भासलें. परंतु मोची कोणालाच कांहीं म्हणाला नाहीं.

तेव्हां पासून मोचीनें आणखी खूप शिकावें म्हणून यूनू त्याला पुस्तकें आणून देऊं लागली. पंडितांना घरीं बोलावून मोचीला शिकवण्याची व्यवस्था करून दिली. मोची देखील संधीचा योग्य फायदा घेत होता. त्यानें भराभर एकेक वरच्या परीक्षा दिल्या. मोठा विद्वान पंडित झाला आणि अखेरीस इन्लिन परिषदेचा सभासद झाला. तो रोज दरबारी पोषाक करून दरबारांत जाऊं लागला. तरी पण रस्त्यांत जातांना टवाळ पोरें त्याला पाहून ओरडत—"भिकारी राजाचा जांवई! झाला आहे, मोठा अधिकारी."

मोची सर्व परीनें सुखी होता. तरी हा गांवच्या पोरांचा आक्षेप त्याला दुःख देई. त्याचें मन कच खाऊं लागलें. त्यामुळें वरवर तो चिनबद्दल आदर दाखवी. तरी मनांतून त्याचा जळफळाट होत असे. त्याच्या मुलीशीं आपण कशाला लग्न केलें म्हणून पश्चात्ताप वाटत असे. त्याला वाटे कीं जर आपण एवढ्या हुद्यावर पोहोंचणार आहोंत हें अगोदर समजलें असतें



तर एखाद्या कुलीन मुलीशींच लग्न केलें असतें. ह्या बायकोला सोडून देऊन दुसरीशीं लग्न करावें तर हिला सोडावयास तरी कांहीं सबळ कारण पाहिजे. ह्या खोट्या आत्म-प्रतिष्ठेच्या विचारांत तो आपल्या बायकोचें प्रेम, कर्तव्य व त्याग सर्व गोष्टी पार विसरून गेला.

हा अशा मनःस्थितींतच मोचीची दुसऱ्या गांवीं बदली झाली. तेथें त्याला खानेसुमारीचा अधिकारी म्हणून काम मिळालें. हंग चौहून वूवेय गांवीं जावयाचें म्हणजे बोटींतून जावें लागे. तें गांव फार दूर होतें. आपण दूर जात आहोंत. ह्याचा त्याला एका तऱ्हेनें आनंद होत होता.

अधिकाऱ्याची आज्ञा मिळतांच तो आपल्या बायकोला घेऊन वूवेय गांवीं जाण्यास निघाला. कांहीं दिवसांनीं बोटीनें त्साईश डोंगराजवळ विश्रांतीसाठीं नांगर टाकला. त्या दिवशीं पौर्णिमेची रात्र असल्यामुळें तो चांदण्याचा आनंद लुटण्याकरितां बोटीच्या वर गेला.

तेथें त्याला युनूच्या नीच कुळाची आठवण झाली आणि झटकन त्याच्या मनांत एक भयंकर विचार डोकावला. युनूला नाहींसे



करण्याची युक्ति त्याला सुचली. तो खालीं गेला. युनू निजली होती तिला उठवून वर चांदण्यांत नेलें आणि बोलतां बोलतां तिला पाण्यांत ढकलून दिलें.

त्यानें घाई-घाईनें नाविकांना उठविलें आणि बोट शक्य तेवढ्या लवकर दूर नेण्यास सांगितलें. त्यांना अशा घाईचें कारण समजलें नाहीं. पण आज्ञेचें पालन करण्या-साठीं त्यांनीं नांगर उचलला आणि बोट चालू केली. सुमारें चार मैल गेल्यावर त्यांनीं पुन्हां नांगर टाकला. तेथें मोची म्हणाला—"चांदण्याची शोभा पाहतां पाहतां युनू

पाण्यांत पडली." सर्वांना वस्तुस्थिति कळून चुकली, पण कोणी कांहीं बोलले नाहीं.

युनू पाण्यांत पडली खरी पण ती कांहीं मेली नाहीं. तिच्या पायाला कशाचा तरी आधार मिळाला. त्याच्या सहायानें ती किनाऱ्यापर्यंत जाऊन पोहोंचली. तेथें बसून ती आपल्या परिस्थितीवर विचार करूं लागली. आपल्याला मारून टाकून आपला पति दुसरें लग्न करणार आहे. ह्या विचारानें तिला फार दुःख झालें. पण ती बिचारी काय करणार ?

मोची निघून गेल्यावर त्याच वाटेनें आणखी एक बोट आली. तिनेंहि त्याच ठिकाणीं नांगर टाकला. त्या बोटींत वाहतुक खात्याचा एक अधिकारी होता. त्याचें नांव झाटे हो असें होते. सर्व निजानीज होण्यापूर्वी त्यानें व त्याच्या बायकोनें सर्वकडे हिंडून जहा-जाची तपासणी केली. नंतर एकदां आपल्या खोलींतील खिडकींतून डोकावून पाहिलें तर त्यांना किनाऱ्यावर कोणी रडत असल्याचा आवाज ऐकूं आला. त्यांनीं नावाड्यांना सांगून युनूला बोटीपर बोलावून घेतलें. तिला चांगले कपडे देऊन माहिती विचारली. ती ऐकून ते म्हणाले—"तूं घाबरूं नकोस. आम्ही तुझी सर्व व्यवस्था करतों. तूं आम्हांला



मुलीप्रमाणेंच आहेस." त्यांनीं बोटीवरील सर्वांना बजावून सांगितलें कीं ही वार्ता कोणासहि कळतां कामा नये.

कांहीं दिवसांनीं झाटे हो वूवेयला पोहोंचला. तेथें त्याला सर्वांत मोठा अधिकारी म्हणून पाठविलें होतें. मोची त्याच्या हाता खालीं एक अधिकारी होता. अधिकाऱ्या-च्या स्वागतासाठीं सर्व नोकर गेले. त्यांत मोचीहि होता. त्याला पाहतांच झाटे हो मनांत म्हणाला—"हा मनुष्य सुशिक्षित आणि चांगला दिसतो आहे. तरी सुद्धां त्यानें हें असें नीच काम कां केलें ?"

कांहीं दिवसांनी झाटे होनें सांगितलें कीं माझी एक वीस वर्षांची मुलगी आहे. तिच्या योग्य वर कोणी दिसला तर सुचवा. मी त्याला घरजांवई करून घेणार आहें.

तेथें सर्वांना माहीत होतें कीं मोची दुसरें लग्न करण्यास तयार आहे. म्हणून सर्वांनीं त्याचें नांव सुचविलें. झाटे होला तो पसंत पडला व त्याच्या विषयीं पूर्णपणें तपास करण्यास सांगितलें. आपलें भाग्य इतकें अनुकूल झाल्याचें पाहून त्याला फार आनंद झाला. तो लग्न करण्यास तयार झाला.



झाटे होनें त्याला बोलावून प्रत्यक्ष विचारलें. म्हणाला—"आम्हीं फार लाड केल्यामुळें मुलगी थोडी बिघडली आहे. ती कोणाचेंच ऐकत नाहीं. तूं तिच्या मर्जीप्रमाणें तिच्या आज्ञेंत वागण्यास तयार असशील तर ठीक, नाहींतर ह्या भानगडींत न पडलेलें बरें." मोची कबूल झाला.

इकडे युनूला जेव्हां समजलें कीं तिचा पुनर्विवाह लावणार आहेत, तेव्हां तिनें त्या गोष्टीला नकार दिला. म्हणाली—"मला दूर करण्यासाठींच त्यांनीं एवढें कारस्थान केलें. माझ्या बरोबर राहण्यांत त्यांना अपमान वाटला. पण त्यांना सोडून मी दुसरें लग्न करणार नाहीं."

झाटे होनें जेव्हां तिच्या होणाऱ्या पतीची माहिती सांगितली तेव्हां आपल्याच नवऱ्याशीं झाटे हो आपलें लग्न लावणार म्हणून ती तयार झाली.

दोघांचें लग्न झालें. नवरा नवरीला एका खोलींत नेण्यांत आलें. मोचीनें युनूच्या खोलींत प्रवेश करतांच चारी बाजूंनीं आठ दहा दासी आल्या व त्यांनीं मोचीला दांडक्यांनीं मारण्यास सुरवात केली. तो ओरडला—"धांवा! धांवा!! वांचवा!!!"

"मारूं नका त्यांना. इकडेच घेऊन या." युनू म्हणाली. मोची तिच्याजवळ गेला व म्हणाला—"मी काय गुन्हा केला आहे. म्हणून मला ही शिक्षा दिली?" युनू कांहींहि बोलली नाहीं. तिनें फक्त आपला बुरखा बाजूस केला. "भूत भूऽऽऽत," तो ओरडला. तेथें असलेले नोकर चाकर सर्व हंसूं लागले.

गडबड ऐकून श्री व सौ. झाटे हो तेथें आलीं. त्यांनीं मोचीला समजावून सांगितलें. मोचीनें युनूची माफी मागितली. तेव्हां पासून तीं दोघें सुखानें राहूं लागलीं.



# संध्यादेवी

[कवि: श्री. ना. गं. ढेकणे-पुणें]



संध्यादेवी हांसत येई शांत शांत चहुंकडे
सूर्यराज मग घाइ घाईनें जाती ते बापुडे,
गाई वळती मजेंत अपुल्या घराकडे सत्वरी
गुराखिही तो हांसत खिदळत येई अपुल्या घरीं ॥ १ ॥

दिनभर दमुनी गेलेला मग शेतकरी हर्षुनी
नांगर ठेवीं, गप्पा गोष्टी करी बसुन अंगणीं
द्विजगण सारे गगनांतुनि ते येती घरट्यांत
पिलांस गोंजारून भरविती खाऊं प्रेमांत ॥ २ ॥

संध्यादेवी बघुनी सारें हांसतसे मन्मनीं
हळूंच येती पाठिमागुनी निशानाथ धांवुनी
जोडी जाई दोघांची ती रंगुनि प्रेमांत
प्रसन्नता मग दिसे खरोखर साऱ्या विश्रांत ॥ ३ ॥





# महाभारत

भीष्माला शिखंडीचा बाण लागला व तो खालीं पडला. त्याच्या सर्व अंगावर शर म्हणजे बाण रुतून बसले असल्यामुळें तो शर शय्येवर निजल्याप्रमाणें भासत होता. त्यानें सतत दहा दिवसपर्यंत पांडवांच्या सेनेचा संहार केला होता. आज त्याला खालीं पडलेला पाहून पांडवांना फार आनंद झाला होता.

त्या दिवशींचें युद्ध तेथेंच थांबलें द्रोणाचार्यानें प्रथम आपल्या सैन्याला युद्ध थांबविण्यास सांगितलें. त्यावरोबर युधिष्ठिरानेंहि युद्ध थांबविलें.

दुश्शासनानें भीष्म युद्धांत पडल्याची बातमी द्रोणाचार्याला दिली. ती वार्ता ऐकून द्रोण हताश होऊन मटकन खालींच बसला. सर्व योद्धे आपापलीं चिलखतें व शिरस्त्राण उतरवून भीष्माचार्यां भोंवतीं गोळा झाले. त्यांत कौरवां बरोबर पांडव वीरहि होते.

भीष्मानें एकदां चारी बाजूस दृष्टि फिरविली आणि म्हणाला—"माझ्या डोक्याखालीं कांहीं तरी आधार पाहिजे आहे." त्यावरोबर दुर्योधनादि वीरांनीं मऊ मऊ उशी मागविली व त्याच्या डोक्यास आधार देण्याचा प्रयत्न केला. पण जो वीर शय्येवर पहुडला होता तो तसल्या उशीचा स्वीकार करील काय? तो अर्जुनाकडे वळून म्हणाला—"बाळ अर्जुना, माझ्या डोक्याला नीट आधार देऊन तें जरा सावर बरें."

भीष्माची इच्छा ओळखून अर्जुनानें चटदिशीं तीन बाण अशा तऱ्हेनें सोडले कीं त्यामुळें भीष्माच्या डोक्याला पाहिजे होता तसा आधार मिळाला. भीष्मनें लगेच अर्जुनाची प्रशंसा करून म्हटलें—



"वीरच वीरांचें मनोगत जाणतो. तूं मला पाहिजे असलेलीच उशी दिल्यामुळें मला फार आनंद झाला." पुन्हां एकवार भीष्मानें आजूबाजूला पाहिलें व म्हणाला—"माझ्या चारी बाजूला खंदक खणा. मी येथेंच राहून उत्तरायण येईपर्यंत सूर्योपासना करणार आहें."

इतके होईपर्यंत दुर्योधनाच्या आज्ञेवरून तेथें राजवैद्य आले. त्यांनीं भीष्माच्या शरिरांत घुसलेले बाण काढण्याचा प्रयत्न केला. परंतु भीष्मानें दुर्योधनाला सांगितलें कीं वैद्यांना त्यांचा मोबदला देऊन पाठवून दे. मला असेंच मरावयाचें आहे."

त्यानंतर सर्वांनीं भीष्माचें वंदन केलीं. पांडवांनीं त्याच्या संरक्षणाची व्यवस्था केली आणि सर्व योद्धे आपापल्या शिबिरांत निघून गेले.

सर्व गांवभर ही वार्ता कळली. रात्र उलटली. सूर्योदय झाला. भीष्माच्या दर्शनासाठीं आबालवृद्धांची गर्दी झाली. त्यांनीं भीष्मावर पुष्पवर्षा केली. गायन-वादनानें त्याला सुखविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यामुळें त्याचें दुःख व वेदना कमी होऊं शकल्या नाहींत. तो आपल्या वेदना प्रकट न करतां म्हणाला—"मला फार तहान लागली आहे."

भीष्माची इच्छा कळतांच क्षणार्धांत खाण्यापिण्याच्या उत्तम उत्तम वस्तू तेथें हजर झाल्या. परंतु भीष्मास पाहिजे असलेली वस्तु मात्र नव्हती. त्यानें पुन्हां अर्जुनाला बोलाविलें. तो पुढें आला आणि हात जोडून म्हणाला—"काय आज्ञा आहे?"

"बाळा, तुझ्या ह्या बाणांनीं माझ्या शरिरांत सारख्या वेदना होत आहेत. घशाला कोरड पडली आहे. मला थोडें पाणी पाहिजे आहे. हे जे पदार्थ येथें आले आहेत ते फुकट आहेत."



भीष्माची आज्ञा शिरसावंद्य मानून अर्जुनानें त्याला प्रदक्षिणा केली. नंतर त्याच्या उशाशीं उजव्या बाजूला उभा राहिला आणि एक पर्जन्य बाण काढून जमिनींत मारला. त्या बरोबर त्या जागेंतून पाण्याचा फवारा निघाला. त्या पाण्यानें भीष्मानें आपली तहान भागविली. अर्जुनाच्या ह्या कामाचें सर्वांनींच कौतुक केलें. सर्वांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं.

त्यावर भीष्म क्षीण स्वरांत म्हणाला—"ह्यांत आश्चर्य कांहींच नाहीं. क्षत्रिय धर्माचें मर्म जाणणारा प्रत्येक व्यक्ति अर्जुनाच्या शक्तींशीं परिचित आहे आणि ही गोष्ट विदुरानें कित्येक वेळां दुर्योधनाला सांगितली. तरी पण त्यानें त्याच्याकडे दुर्लक्ष केलें. पण आतां काय त्याचा उपयोग." ह्या वाक्यानें दुर्योधनाचें तोंड उतरलें. तें पाहून भीष्मानें पुन्हां एकदा त्याला समजाविण्याचा प्रयत्न केला. म्हणाला—"मंत्रांतंत्रांनीं कांहीं विजय मिळत नाहीं. जोंपर्यंत त्याच्या बाजूनें कृष्ण लढत आहे तोंपर्यंत युद्धाचा कांहींच उपयोग होणार नाहीं. म्हणून विनाकारण रक्तपात करण्यापेक्षां तह केलेला बरा. माझ्याबरोबर थांता युद्धाचाहि पूर्णविराम होऊं दे. तूं अर्धे राज्य पांडवांना देऊन त्यांना इंद्रप्रस्थांस पाठव. तुला हें जर अर्जून सुद्धां कबूल नसेल तर परिणाम होणार नाहीं." भीष्माच्या ह्या शेवटच्या उपदेशाचाहि दुर्योधनाच्यावर मना परिणाम झाला नाहीं.

भीष्म घायाळ झाल्याची बातमी कळतांच कर्ण धांवत धांवत त्या ठिकाणीं आला व भीष्माचे पाय धरून म्हणाला—"पितामह, मी आपला कोंधाग्नी भडकविला. मला क्षमा करावी."

भीष्मानें डोळे उघडून कर्णाकडे पाहिलें व म्हणाला—"तूं पांडवांचें अहित इच्छित होतास. तेव्हां तुझा गर्व कमी करण्यासाठीं मला कठोर वचन बोलावें लागलें. तूं कांहीं खरोखर माझा शत्रु नाहींस. व्यास व नारदाच्या सांगण्यावरूनच आम्हांला कळलें कीं तूं कुंतीचा मुलगा आहेस. तुझा पराक्रम काय आम्हांला माहीत नाहीं! खरोखरच तुझा पराक्रम अचाट आहे. देवदेवतांच्या तोडीचा आहे. म्हणून मला वाटतें तूं जर पांडवांशीं सामोपचारानें काम घेतलेंस तर मला फार आनंद होईल. म्हणजे ह्या पुढें तरी युद्ध होणार नाहीं. झाला तेवढा रक्तपात पुरे."



"आजोबा, हें सर्व खरें आहे. पण मी आजपर्यंत दुर्योधनाचें मीठ खाल्लें आहे. मी त्याचा विश्वासघात करूं इच्छित नाहीं. त्याची सर्व भिस्त माझ्यावर आहे. तेव्हां मी त्याला निराश करणें बरें दिसणार नाहीं. रणभूमीला रक्ताभिषेक तर होणारच. माझें अर्जुनाशीं युद्ध झाल्यावांचून राहात नाहीं. तेव्हां मी तर म्हणतों अर्जुनाशीं युद्ध करण्याची मला आज्ञा द्यावी. ह्या शिवाय माझ्या हातून कांहीं चूक होत असेल तर मला क्षमा करा." कर्ण भीष्माला म्हणाला.

"तुझा निश्चयच झाला आहे तर कर युद्ध. पण त्यांत अहंकाराचा नाश करून वीरगति प्राप्त करण्याचा हेतु असूं दे. मी तुला शान्तीचा मार्ग म्हणून सांगितला. पण नाहीं तुला पटत त्याला मी काय करणार!" भीष्मानें एवढें सांगून एक दीर्घ सुस्कारा सोडला.

कर्णाच्या म्हणण्याप्रमाणें दोन्हीं सैन्यें युद्धास तयार झालीं. परंतु कौरवांना भीष्माचा अभाव फार जाणवला. त्यांचा मार्ग दर्शक हरपला होता. नव्या सेनापतीची निवड करणें फार जरूरी होतें. बऱ्याच



वीरांनीं त्या जागेसाठीं कर्णाचें नांव सुचविलें. आणि खरोखरच तोच त्या जागेसाठीं योग्य होता.

कर्णानें प्रतिज्ञा केली होती कीं जों पर्यंत भीष्म रणांगणांत युद्ध करीत राहील तों पर्यंत तो रणभूमीवर येणार नाहीं. पण जेव्हां त्यानें पाहिलें की भीष्म आतां उठून पुन्हां युद्धभूमीवर येणार नाहीं, तेव्हां पासून युद्धभूमीवर जाण्यासाठीं तो फार उत्सुक झाला होता. त्यानें आपल्या सारथ्याला त्याची कवच कुंडलें व शस्त्रास्त्रें तैयार ठेवण्याची आज्ञा देऊन ठेविली होती.

दुर्योधनाचा निरोप येतांच कर्ण सुसज्ज होऊन रणांगणावर गेला. प्रथम भीष्माकडे गेला. त्यांच्या पायावर डोकें ठेवून नमस्कार केला. भीष्मानेंहि त्याच्या पराक्रमाची स्तुति करून त्याला आशीर्वाद दिला.

त्यानंतर तो मोठ्या उत्साहानें कौरव सैन्यांत गेला. त्याला पाहतांच कौरव सेना आनंदानें जयघोष करून गर्जना करूं लागली.

कर्णाला पाहतांच दुर्योधनाला देखील अत्यंत आनंद झाला. तो म्हणाला—"कर्णा, बघ कसा वेळेवर आलास. आपली सेना सनाथ झाली. सांग, आतां पुढें काय करावयाचें तें."

सर्व महारथी योग्यच होते. तरी एक कोणी तरी संचालक राहणें फार जरूरी होतें. म्हणून दुर्योधनानें कर्णाला विचारलें.

"राजा, मला वाटतें सर्व योद्धा सेनापतित्वाच्या लायकीचेच आहेत. त्यांत जर एका कोणाला सेनापति केलें तर बाकीचे उगाच ईर्ष्या करतील. म्हणून मला वाटतें आपण द्रोणाचार्यांना सेनापति करावें. ते ह्या कामासाठीं योग्य आहेत. तुझे गुरु आहेत. सर्व विद्या संपन्न आहेत. त्यांना सेनापति केल्यास आपल्याला नव्वद टक्के विजय मिळाल्याप्रमाणेंच आहे." कर्णानें सांगितलें.

दुर्योधनाला कर्णाचा विचार पसंत पडला. तो सैन्यांत उभे असलेल्या द्रोणाचार्यांकडे गेला आणि म्हणाला—"गुरुदेव, आम्हां सर्वांचा विचार आहे कीं आपण अनुभवी आहांत, आमचे गुरू आहांत, महावीर आहांत. म्हणून आपणच आमचे सेनापतिपद स्वीकारावें. आपल्या शिवाय आम्हांला उत्तम मार्गदर्शन कोण करणार?"

द्रोणाचार्यांनीं दुर्योधनाच्या म्हणण्याला मान वांकविली. म्हणाला—"माझ्या ज्या गुणांवर भरंवसा ठेवून तूं मला सेनापतिपद देत आहेस त्या सर्व गुणांचा व शक्तीचा उपयोग करून मी तुझ्या वतीनें पांडव सेनेशीं युद्ध करीन. त्यांचा नाश करीन. पांडवांशीं युद्ध करून तुला विजयश्रीचा मार्ग दाखवीन. माझा सामना करणें पांडवांना सोपें नाहीं."

द्रोणाची संमति मिळतांच दुर्योधनानें त्याला कौरव सेनेचा सेनापति केलें. ही निवड सर्वांनाच पसंत पडली. म्हणून त्याच्या सर्व सैन्यानें द्रोणाचार्यांचा जयजयकार करून आनंद घोष केला. ब्राह्मणांनीं शुभ आशीर्वाद देवून मंत्रोच्चार केला. गवयांनीं गायन करून



नर्तक्यांनीं नृत्य करून आपला आनंद प्रकट केला.

त्यावेळीं सर्व सैन्याच्या मध्यभागीं उभा राहून द्रोण दुर्योधनाला म्हणाला—"दुर्योधना, तूं भीष्माचार्यांचें पद मला देऊन माझा योग्य मान राखलास त्या बद्दल मी तुला वर देतों. माग, तूं ह्या वेळीं कोणचाहि वर."

"माझी एकच इच्छा आहे कीं आपण युधिष्ठिराला जिवंत पकडून माझ्या स्वाधीन करावें." दुर्योधन म्हणाला.

"त्याला मारून टाक म्हणून न सांगतां त्याला जिवंत पकडून आणण्यास सांगतो








आहेस, याचा अर्थ काय!" द्रोणानें आश्चर्यानें विचारलें.

"गुरुदेव, जों पर्यंत अर्जुन रणांगणावर आहे तों पर्यंत आमचे प्राण सुरक्षित नाहींत. अशा स्थितींत युधिष्ठिराला मारून मला काय मिळणार? पण जर आपण त्याला पकडून माझ्या स्वाधीन केलेंत तर मी त्याच्याशीं पुन्हां द्यूत खेळून त्याला हारवीन आणि तेरा वर्षेपर्यंत वनवास देवून सुखानें राज्य करीन. त्यामुळें या युद्धांत होणारा रक्तपात सुद्धां थांबेल व प्रजा सुखी होईल." दुर्योधनानें खुलासा केला.

दुर्योधनाचा डाव द्रोणाच्या लक्षांत आला. तो म्हणाला—"बरें आहे. मी त्याला पकडून आणतों. पण त्या वेळीं अर्जुन त्याच्या मदतीला येतां उपयोगी नाहीं. कारण तो जवळ असेपर्यंत कोणालाहि पकडणें शक्य नाहीं. म्हणून तूं त्याला दोन घटका त्याच्या पासून दूर कोठें तरी थोपवून धर म्हणजे माझें काम ठीक होईल."

युधिष्ठिराला कसें तरी करून जिवंत पकडण्यासाठीं दुर्योधनानें अर्जुनाला रडवून भरण्याची प्रतिज्ञा केली. ही ह्या प्रमाणें सर्व सैन्याला समजली तशी पांडवांनाहि समजली. तें ऐकून युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला—"ऐकलेंस ना! तिकडे काय चाललें आहे तें! हें पहा पुढें युद्धाच्या वेळीं तूं नेहमीं माझ्या जवळच राहा."

"तूं कांहीं काळजी करूं नकोस. ह्या जन्मांत तरी तूं जिवंत दुर्योधनाच्या हातीं सांपडणार नाहींस. द्रोणाचीहि प्रतिज्ञा निष्फळ ठरेल. मी त्याची प्रतिज्ञा पुरी होऊं देणार नाहीं, हीच माझी प्रतिज्ञा." अर्जुन आवेशानें म्हणाला.





[ १५ ]

[राजसैनिकांना वाटलें कीं चंद्रवर्मा कोणी महामांत्रिक आहे. म्हणून ते मोठ्या आदरानें त्याला आपल्या राजाकडे घेऊन गेले. जातांना चंद्रवर्मानें म्हाताऱ्या जवळून कांशाच्या किल्ल्याच्या वाटेचा नकाशा मागून घेतला होता. रुद्रपुरच्या महाद्वाराशीं पोहोंचतांच नागरिकांनीं महामांत्रिकाचा जयजयकार केला. नंतर—]

चंद्रवर्माला नागरिकांच्या जयघोषांत राज-द्वारापर्यंत आणण्यांत आलें. तेथें राजा शिवसिंह त्याच्या स्वागतासाठीं तयारच होता. चंद्रवर्माला हाताचा आधार देऊन उतरवीत शिवसिंह मोठ्या कौतुकानें म्हणाला—"इतक्या लहान वयांत तुम्हीं एवढी विद्या अवगत केलीत. आमच्या राज्यांत राहून तुम्हीं महा मांत्रिक शंखाचा नाश केलात. केवढे उपकार झाले आमच्यावर. ह्यामुळें आमची प्रजा व आम्ही फार खुश आहोंत तुमच्यावर."

राजाच्या बोलण्याचें चंद्रवर्माला आश्चर्य वाटलें. परंतु तें प्रगट न करतां तो म्हणाला—"शंख फार दुष्ट होता. त्याला त्याचें प्रायश्चित्त देणें भाग होतें. म्हणून दिलें पाठवून त्याला यमपुरीला."

"वर्मा शंखाच्या डोंगरावर तुझा मित्र कालकेतु राहातो ना? त्याच्याकडून सम-



जली मला सर्व हकीगत. तुझ्याविषयी सुद्धां मला त्यानेंच माहिती सांगितली. त्याच्याच सांगण्यावरून मी तुला कांशाच्या किल्ल्या-कडे जाण्याची प्रार्थना करणार आहे. तूं आल्यामुळें मला किती बरें आनंद होत आहे म्हणून सांगूं."

"कांशाच्या किल्ल्यासंबंधीं म्हणतां होय?" चंद्रवर्मा स्मित करून म्हणाला. चंद्रवर्मा पुढें कांहीं म्हणणार तेवढ्यांत मंत्र्यानें राजाच्या कानांत कांहींतरी सांगितलें. राजा चंद्रवर्माच्या खांद्यावरून हात बाजूला करून आणि राजवाड्याच्या दिशेकडे वळून

दूरच्या प्रवासामुळें तूं फार थकला असशील म्हणून जेवणखाण करून थोडावेळ विश्रांति घे. त्यानंतर आपण शांतपणानें बोलूं."

चंद्रवर्माची राहण्याची व्यवस्था राज-वाड्यांतच केली होती. खाणें पिणें आटो-पल्यावर चंद्रवर्मानें झोंपण्याचा बराच प्रयत्न केला पण त्याला झोंपच येईना. त्याच्या मनांत सारखे विचार येऊं लागले. शंख पर्वतावर राहणाऱ्या कपालिनी आणि काल-केतूकडून शिवसिंहानें माझ्या विषयीं सर्व माहिती काढून घेतली आहे. पण कालकेतूनें तरी कां सांगितलें कीं मी एकटाच कांशाच्या किल्ल्यापर्यंत जाऊं शकतो म्हणून.

शेवटी विचार करतां करतां कालकेतूचा हेतू त्याच्या लक्षांत आला. कांशाच्या किल्ल्यावर अलोट धनराशी आहे. त्या धनाच्या सहाय्यानें सेना उभी करून आपलें गेलेलें राज्य आपणांस पुन्हां मिळवितां येईल. हाच त्याचा हेतु असला पाहिजे.

थोड्या वेळानें प्रधानानें येऊन चंद्रवर्माला सांगितलें कीं राजा तुमची वाट पाहात आहे. चंद्रवर्मा त्याच्या बरोबरच राजाकडे गेला. राजानें मोठ्या आदरानें त्याला

बसावयास आसन दिलें व म्हणाला—"वर्मा, कांशाच्या किल्ल्यांत असलेल्या धनाचा मला मुळींच लोभ नाहीं. तुला वाटेल मग मी एवढा त्या किल्ल्यापर्यंत जाण्यासाठीं उत्सुक कां? आणि तसें वाटणें साहजिक आहे. त्याचें कारणहि फार विचित्र आहे. पण आहे मात्र खरें. तुला हें तर माहीत आहेच कीं कांशाचा किल्ला समुद्र किनाऱ्यावर आहे." राजा म्हणाला.

"हो, पश्चिमी समुद्रकिनाऱ्यावर आहे. आणि सुमारें हजार वर्षांपासून कोणीहि मनुष्य तेथें जाऊं शकलेला नाहीं." चंद्रवर्मा म्हणाला.

हें ऐकतांच मंत्र्यानें आश्चर्यानें राजाकडे पाहिलें. राजा मान हालवून म्हणाला—"होय असेल तसें. पुष्कळांचें असें म्हणणें आहे कीं त्या किल्ल्याची एका बाजूची भिंत अगदीं समुद्रकिनाऱ्याला लागून आहे. होय ना!"

"मी सुद्धां असें ऐकलें आहे." चंद्रवर्मा म्हणाला.

"आमच्या पूर्वजांचें असें म्हणणें होतें कीं त्या भिंतीच्या बाजूच्या समुद्रांत कांशांच्या हंड्यांतुन एका मांत्रिकानें कांहीं



सुंदर प्राण्यांना कैद करून ठेविलें आहे. माझ्या वडिलांनी त्यांना सोडविण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु त्यांना त्या कामांत यश आलें नाहीं. तुझा तो मित्र आहे ना कालकेतु म्हणून? तो म्हणे वाटेल तेव्हां मनुष्य होतो वाटेल तेव्हां काळा सांप होतो. त्याच्या सांगण्यावरून असें वाटतें कीं तूं तें कांशाचे सर्व हंडे आम्हांला आणून देऊं शकशील. अर्थात त्याला थोडे फार कष्ट पडणारच." शिवसिंह म्हणाला.

शिवसिंहाचें हें बोलणें ऐकुन चंद्रवर्मानें तेव्हांच ओळखलें कीं कोठें तरी पाणी मुरतें

आहे. कारण कांशाच्या किल्ल्यांत असलेल्या वनराशीला सोडून कोणी त्या प्राण्यांच्या नांवें लागणें शक्य नाहीं. शिवसिंहाला धनच पाहिजे होतें. त्यानें तें मिळविण्याचा प्रयत्न सुद्धां केला. पण त्याला यश आलें नाहीं. चंद्रवर्मा मोठा मांत्रिक आहे. त्याच्या मदतीनें तें धन आपल्याला मिळवितां येईल या बुद्धीनेंच शिवसिंहानें चंद्रवर्माचा मोठा सत्कार केला व त्याच्या विषयीं आपलेपणा दाखविला.

"जर खरोखरच त्या किल्ल्यावर धन मिळालें तर त्यांतील फुटकी कवडी सुद्धां मी त्याच्या हातीं लागू देणार नाहीं. मला फसवूं पाहतो काय! तें कांहीं नाहीं टकास महालक्ष होऊनच याच्याशीं वागलें पाहिजे." चंद्रवर्मानें विचार केला.

चेहरा गंभीर करून चंद्रवर्मा म्हणाला—"आम्हां मांत्रिकांचें कामच तें आहे. अशा तऱ्हेचें कसलेंहि दुरापास्त काम करून दाखविण्यासाठींच आमची मंत्रशक्ति आहे. मी अवश्य कांशाच्या किल्ल्यापर्यंत जाईन. त्या साठीं तुम्ही माझ्याबरोबर थोडें सैन्य पाठवा. आणि त्यांत मुख्यतः देव नांवाचा जो एक तरुण आहे त्याला पाठवा." असें



खून पाहिला.

राजा आणि मंत्री परस्परांकडे बघूं लागले. कांहीं क्षणा नंतर शिवसिंह म्हणाला—"त्या देव नांवाच्या मुलाचा बाप जंगलांत राहातो. तूं भेटलास काय त्याला?"

"ओ होऽऽऽऽ! हं, तो म्हातारा ना?" असें म्हणत चंद्रवर्मानें आपल्या उजव्या हाताचा तळवा पुन्हां एकदां न्याहाळून पाहिला. म्हणाला—"तो जंगलांत एका झोंपडीमध्यें राहातो, त्याला पाहिजे असलेल्या सर्व जरूरी वस्तू द्या. आणि जर तो नगरांत येऊन राहूं इच्छित असेल तर तशीहि त्याची व्यवस्था करा. त्याला कसल्याहि प्रकारचा त्रास होता कामा नये. अहो, माझा प्रवास यशस्वी होण्याशीं त्या पिता पुत्रांचा फार संबंध आहे. किंबहुना त्यांच्यावरच माझी सर्व भिस्त आहे."

चंद्रवर्मानें एवढें सांगितल्यावर राजानें किंवा मंत्र्यानें कोणीच विरोध केला नाहीं. "बरें तर तूं म्हणतोस त्याप्रमाणें मी करतों. तूं त्याला बरोबर घेऊन जा. तुझ्याबरोबर मी एक हजार सैनिक पाठवतों. पुरतील ना?" राजानें विचारलें.





तें ऐकून चंद्रवर्मा जोरानें हंसला. मी कोठें देश जिंकायला चाललों आहे असें का वाटलें तुम्हांला? मला युद्ध करावयाचेंच झालें तर.........मी सैन्याच्या मदतीनें का करणार? माझ्याजवळ जी मंत्रशक्ति आहे तिचा उपयोग केव्हां करावयाचा? मंत्रशक्तीचें उत्तर मंत्रशक्तीनेंच द्यावें लागणार. तुमचें हें सैन्य काय उपयोगी? मला सामान व रसद नेण्यासाठीं खेचरें व गाढवें व तीं हांकण्यासाठीं चार सहा नोकर पाहिजेत. दहा जणांहून जास्त लोकांची मला गरज नाहीं आणि सैनिकांची तर मुळींच गरज नाहीं."

"तें नाहीं चालायचें! आपल्या अधिकाऱ्यांपैकीं मी निवडक व विश्वासू पांच-दहा ज्यांना तुझ्याबरोबर पाठवतों. त्यांच्याबरोबर पन्नास सैनिक येतील. आमच्या राज्याची सरहद्द ओलांडून पलीकडे तूं गेलास म्हणजे तुला पश्चिमेकडील घाट लागेल. त्या डोंगरी मुलखाचा अधिकारी वीरमल्ल तुला वाटेंत्यास तुला मदत करील." राजा ऐटींत म्हणाला.

वीरमल्लचें नांव ऐकतांच चंद्रवर्माला त्याचा सेनापति धीरमल्ल याची आठवण झाली. तो आणि त्याचा स्वामीभक्त अनुयायी सुबाहु कोठें बरें असतील!

थोड्या वेळानें तो म्हणाला—"महाराज! आपणांस वाटेल तसें आपण करावें. मी मात्र उद्यां उजाडतांच निघणार. कांशाच्या किल्ल्यापर्यंत वाटेंत डोंगर, रानें, दऱ्याखोरी व वाळवंटें पार करावी लागतील. जसा प्रदेश येईल तसें माल वाहणारे प्राणी बदलावे लागतील. वाळवंटांत उंटांची गरज पडेल. आपल्या आज्ञेप्रमाणें वीरमल्लनें एवढें केलें म्हणजे पुरे." चंद्रवर्मा म्हणाला.

"मी सर्व पहून घेइन. तूं कांहीं काळजी करूं नकोस." राजा शिवसिंह म्हणाला.



दुसऱ्या दिवशीं सकाळीं चंद्रवर्मा कांशाचा किल्ला सर करण्यासाठीं निघाला. शिवपुरच्या सरहद्दीपर्यंत राजा, मंत्री आणि प्रजा त्याला निरोप द्यायला आले होते. त्याच्याबरोबर त्याचा मुख्य अनुयायी म्हणून देव आला होता. त्याला अदल्या दिवशींच्या रात्रींच तुरुंगांतून सोडण्यांत आलें होतें.

रानांत चंद्रवर्मा व त्याचे सर्व अनुयायी कित्येक योजन चालत गेले. म्हाताऱ्यानें दिलेला नकाशा कांशाचा किल्ल्याचा मार्ग दाखविण्यास तितका उपयोगी पडला नाहीं. वाटेंत एकहि मनुष्य भेटला नाहीं. डोंगर आणि दाट अरण्यें एका मागून एक पार करीत तो चालला होता. सूर्याच्या उदयास्तावरच दिशेचें ज्ञान त्याला होत होतें.

अशाच प्रकारें कांहीं दिवस प्रवास केल्यावर एके दिवशीं सूर्योदयाच्या वेळेस देव एका उंच टेकडीच्या टोंकाला गेला आणि जोरानें टाळी वाजवून ओरडला— "तें पहा, एक पडकें नगर दिसत आहे. हाच कांशाचा किल्ला तर नसेल?"

त्याचें तें ओरडणें ऐकून चंद्रवर्मा व त्याचे दोघे तिघे अनुयायी धांवत टेकडी चढून त्याच्याजवळ गेले. त्यांनीं देवनें



दाखवलेल्या दिशेकडे पाहिलें. समोर खरोखरच एक मोठें नगर त्यांना दिसलें. तें जुनाट व पडकें नगर होतें. माणसांची हालचाल त्यांत दिवस नव्हती. भिंतीमधून मोठमोठीं झाडें उगवलेलीं दिसत होतीं. सर्व दृश्य भयाण वाटत होतें.

"हा कांशाचा किल्ला असणें शक्य नाहीं. जुनें पडकें नगर असलें तरी आपण तें जाऊन पाहिलें पाहिजे. कदाचित पुढील मार्गाचा कांहीं सुगावा लागेल. चला जाऊं या." चंद्रवर्मा म्हणाला आणि डोंगर उतरून त्या पडक्या नगराकडे जाऊं लागला.

सर्व नगराजवळ पोंचले तेव्हां एका पडक्या इमारतीसमोर त्यांना सिंहाचे तीन छावे दिसले. ते चंद्रवर्मा व त्याच्या अनुयायांना पाहून गुरगुरत एका पडक्या भिंतीच्या आड जाऊन लपून बसले. कांहीं वेळानें त्यांना सिंहाची गर्जना ऐकूं आली. ती गर्जना ऐकून चंद्रवर्मा म्हणाला—"तिकडे जाणें बरें होणार नाहीं. चला आपण दुसऱ्या बाजूला जाऊं या."

तें पडकें नगर फारच मोठें होतें. त्याचा घेर कमींत कमी पांच सहा मैलांचा असेल. पण वाटेंत त्यांना कोठें मनुष्य म्हणून दिसला नाहीं. प्रत्येक घर पडकें होतें. कित्येक घरें तर जाळपोळ झाल्यानें जळून गेल्यासारखीं भासत होतीं. ज्या घरांत एका काळीं माणसें रहात होतीं त्यांत आज रानटी श्वापदें वाघ, सिंह, चित्ते व रानटी डुकरें रहात होतीं.

चंद्रवर्मा नगराच्या मध्य भागीं एका चौरस्त्यासारख्या जागीं पोंचला. तेथें एका उंच शिळेवर कांहीं तरी लिहिलें असावें असें त्याला वाटलें. तो एक शिलालेख होता. अक्षरें जुळवून त्यानें वाचण्याचा प्रयत्न केला.

"हें कर्वीरपुर नगर होय. एक हजार वर्षेंपर्यंत एक वैभवशाली शहर म्हणून हें प्रसिद्ध होतें. उत्तरेकडून कांहीं बर्बर जातीच्या लोकांनीं हें नगर लुटलें आणि यांत होतें नव्हतें तें सर्व धन घेऊन जाऊन त्यांनीं कांशाच्या किल्ल्यांत तें सांठवून ठेवलें आहे.

हें वाचल्यावर चंद्रवर्मा आपल्या अनुयायांना म्हणाला—"आतां वेळ व्यर्थ घालविण्यांत अर्थ नाहीं. येथें दगडां धोंड्यांशिवाय काय आहे? हा कांशाचा किल्ला नाहीं. चला पुढें." सर्व पश्चिमेकडे चंद्रवर्माच्या पाठोपाठ जाऊं लागले.

(पुढें चालू)





# काळा चोर

विदर्भ देशाच्या एका राजाला तीन मुलें होतीं. त्याची पहिली राणी वारल्यावर त्यानें दुसरें लग्न केलें. सावत्र आईनें मुलाला त्रास देऊं नये म्हणून त्यानें आपल्या तिघां मुलांना एका निराळ्या राजवाड्यांत ठेवलें. त्या वाड्यांत सर्व सुखसोयी होत्या.

कांहीं दिवसांनीं दुसऱ्या राणीला मुलगा झाला. तिला वाटूं लागलें कीं तिच्या सवतीचीं मुलें जिवंत असेपर्यंत तिच्या मुलाला राज्य मिळणें शक्य नाहीं. तिनें ही गोष्ट आपल्या एका दासीला सांगितली. ती दासी स्वभावानें मंथरेसारखीच दुष्ट व कुटिल बुद्धीची होती.

दासी म्हणाली—"मी एक उपाय सांगतें. तूं तिघांना केव्हां तरी बोलावून सोंगट्या खेळायला सांग. त्यांत जो हारेल त्यानें ऋतुपर्ण राजाकडून तीन घोडे आणून द्यावेत. माझ्या जवळ जादूचे फासे आहेत. तुझा मुलगा डाव जिंकणार हें निश्चित. ऋतुपर्ण राजाकडे जाऊन घोडे आणणें म्हणजे मृत्यूच्या मुखांतून परत येणें आहे. कारण राजा मागून देणार नाहीं आणि घोडे चोरी करून आणण्याचा प्रयत्न केल्यास राजा जिवंत सोडणार नाहीं." राणीला त्या दुष्ट दासीचा सला पसंत पडला.

राणीनें एका सणाच्या दिवशीं तिघां राजकुमारांना जेवायला बोलाविलें. जेवणें उरकल्यावर सर्व सोंगट्या खेळायला बसले. त्यांनीं अट कबूल केली होती आणि खेळांत हारले. म्हणून ठरल्याप्रमाणें तिघांना ऋतुपर्ण राजाचे घोडे आणावयास जावें लागलें.

तिघे त्याच दिवशीं आपापल्या घोड्यांवर बसून ऋतुपर्ण राजाच्या राज्याकडे निघाले. वाटेंत त्यांना एक घोडेस्वार भेटला. त्याचे



सर्व कपडे काळे होते. त्यानें त्यांना विचारलें—"तुम्ही कोण व इकडे कोठें आलांत ? काय काम आहे तुमचें ?"

"आम्ही विदर्भ देशाचे राजकुमार आहों आणि ऋतुपर्ण राजाचे विलक्षण घोडे घेऊन जाण्यास आलों आहों." राजकुमार म्हणाले.

"बरें झालें कीं माझी तुमच्याशीं भेट झाली. ते घोडे घेऊन जाण्यासाठीं जो कोणी आला तो जिवंत परतला नाहीं हें तुम्हांला माहीत असेलच. मी या भागांतला एक अट्टल चोर आहें. मला काळा चोर म्हणून लोक ओळखतात. मी सुद्धां ते घोडे चोरण्याचें साहस आजपर्यंत केलें नाहीं. पण मी तुम्हांला माझ्याकडून होईल तितकी मदत करावयास तयार आहें." काळाचोर म्हणाला.

मध्यरात्रीच्या सुमारास काळाचोर गुप्त-मार्गानें राजकुमारांना किल्ल्यांत सरळ राजाच्या तबेल्याकडे घेऊन गेला. राज-कुमारांनीं घोड्याच्या पायांच्या दोऱ्या सोडल्याबरोबर घोडे खेंकाळूं लागले. त्यांचें खेंकाळणें ऐकून पाहारेकरी जागे झाले आणि त्यांनीं राजकुमार व काळ्या चोराला घेरलें आणि त्यांच्या मुसक्या बांधून राजा-समोर नेऊन हजर केलें.

आपल्या घोड्यांना चोरून नेणाऱ्यांना शिक्षा देण्यासाठीं राजानें एक मोठी कढई तयार केली होती. त्या कढईंत उकळत्या तेलांत गुन्हेगारांना बुचकळून काढावयाचें ही शिक्षा राजा देत असे.

राजानें काळ्या चोराला विचारलें—"तुझ्या नादीं लागून कशाला या बिचाऱ्यांनीं स्वतःवर हें संकट ओढवून घेतलें ? यांना मी काय शिक्षा देणार आहे, तुला माहीत आहे का ? ती पहा कढई आणि त्यांत तापत असलेलें तेल ? सर्वांत धाकट्याचें मरण किती जवळ येऊन ठेपलें आहे हें माहीत आहे ना तुला ?" राजानें विचारलें.

"महाराज ! पण माझें मरण ह्या पेक्षां अधिक जवळ आलें असूनहि मी त्या संकटांतून सुटलों होतों." काळा चोर म्हणाला.

"तूं म्हणतोस तें खरें निघालें तर मी याला मुक्त करीन !" राजा म्हणाला.

काळा चोर, तो मृत्युमुखांतून कसा सुटला याची गोष्ट सांगूं लागला—

* * *



**मी** एका सरदार घराण्यांत जन्मास आलों. परंतु तीन राक्षसिणींनीं मिळून माझी सर्व धनदौलत लुबाडून घेतली. म्हणून मला हा चोरीचा धंदा स्वीकारावा लागला. त्या तिघी राजकन्याच होत्या. परंतु शापानें त्यांना राक्षसिणींचें रूप मिळालें होतें. त्या तिघी दिवसभर सुंदर राजकन्या दिसत. पण रात्र झाली कीं राक्षसिणी होत. त्यांनींच माझी सर्व संपत्ती चोरून नेली आणि मला भिकारी करून सोडलें.

एके दिवशीं मी त्यांना पकडावयाचें ठरवून त्यांच्या पाठीमागून निघालों. त्या एका गुहेंत शिरल्या. मी देखील त्यांच्या पाठोपाठ आंत गेलों. डोंगरापलीकडच्या एका नदीकाठीं त्या गुहेचें दुसरें तोंड निघालें. तेथें एका खड्ड्यांत त्या रहात असत. चुलीवर एका मोठ्या मडक्यांत त्यांचा सैंपाक सुरू झाला. तिघी चुलीच्या चारी बाजूला बसून गप्पा मारीत होत्या. त्यांच्या गप्पा ऐन रंगांत आल्यावर मी एक मोठी धोंड उचलली आणि मडक्याला मारली. मडकें फुटलें आणि त्या तिघींचें अंग भाजलें. त्यांनीं मला पाहिलें व धरायला धांवल्या. मी पळालों पण त्यांच्या हातून

सुटका मिळणें अशक्य झाल्यावर एका झाडावर चढलो. एका राक्षसिणीनें लगेच दुसरीला दोन्ही हातांनीं धरून उचललें. त्या बरोबर तिची कुऱ्हाड झाली. तिसरी एक कुत्रें होऊन खालीं पडल्यावरोबर मला धरून खाण्यासाठीं झाडाखालीं टपून बसली. पहिल्या राक्षसिणीनें कुऱ्हाडीनें झाड तोडायला सुरवात केली. तिनें दोन घावांत अर्धें अधिक झाड कापलें. तिसरा घाव मारण्यासाठीं हात उचलल्या बरोबर कोंबडा आरवला. लगेच तिघींना राजकन्येचें रूप मिळालें आणि त्या आपल्या वाड्यांत परत गेल्या.

इतकी गोष्ट सांगून काळ्या चोरानें विचारलें—"महाराज! आतां आपणच सांगावें कीं आपण म्हणाला त्यापेक्षां कठीण प्रसंग माझ्यावर ओढवला होता कीं नाहीं?"

राजा म्हणाला—"तुझें म्हणणें बरोबर आहे. तर मग मी सर्वांत धाकट्या राजकुमाराला आपल्या वचनाप्रमाणें माफ करतों. पण या मधल्याला मी सोडणार नाहीं. सांग, याचें मरण जवळ आलें आहे कीं नाहीं?"

काळा चोर म्हणाला—"महाराज, माझें मरण त्याहि पेक्षां जास्त जवळ आलें असूनहि मी सुटका मिळविली आहे."



"मला ऐकू दे तरी! तू म्हणतोस तें खरें निघालें तर मी या राजकुमारालाहि माफ करीन." राजा म्हणाला. काळ्या चोरानें गोष्ट सांगावयास सुरवात केली.

* * *

मी त्या राक्षसिणींचें मडकें फोडून त्यांना एक दिवस उपाशी ठेवलें याचा त्यांना राग आला व त्यांनीं सूड घेण्यासाठीं माझें सर्वस्व लवाडून मला या चोरीच्या धंद्यांत ढकलेलें.

एके दिवशीं रात्रीं मी एका शेतकऱ्याची म्हैस व गाय चोरी करून घेऊन चाललों होतों. चालून चालून अगदीं दमून गेलों होतों. थोडासा विसांवा घेण्यासाठीं एका झुडपाखालीं जाऊन बसलों. म्हशीला व गाईला झाडाला बांधून ठेवलें. थोड्या वेळानें पाहतों तों आठदहा वाघ पळत येत असलेले मला दिसले. त्यांना म्हशीचा व गाईचा वास लागला असावा. त्यांना पाहतांच मी झाडावर चढून बसलों. वाघांची मेजवानी सुरू झाली. मी चोरून आणलेला माल अशा तऱ्हेनें फस्त होऊन गेला. मी तोंडा-वाटे एक ब्र शब्द देखील काढला नाहीं. सर्व अंग थरथर कांपत होतें. त्यांना माझा वास देखील आला कीं काय कोणास ठाऊक





त्यांनीं वर पाहिलें आणि वर चढून येण्याचा विचार करूं लागले. त्यांनीं झाडाच्या बुंधाला आपलीं नखें घासून साफ केलीं. त्यांच्या धक्कानें सर्व झाड हालूं लागलें. मला वाटलें मी आतां खालीं पडणार.

परंतु माझें नशीब थोर. आठदहा सिंह त्याच वेळीं कोठून तरी धांवत आले आणि वाघ-सिंहाची झुंज सुरू झाली. एका मागून एक वाघसिंह मरून पडत होते. मी वर बसून तें भयंकर दृश्य पहात होतों. आतां फक्त एक वाघ आणि एकच सिंह उरले होते व त्यांचें द्वंद्व चालू होतें. तेवढ्यांत सोसाट्याचा वारा सुरू झाला. मी फांदी घट्ट धरून बसलों होतों. पण झाडच मुळासकट उपटून खालीं पडलें. मला वाटलें, आतां ते वाघसिंह माझ्यावर तुटून पडणार. पण झाडच त्यांच्या अंगावर पडलें व ते तेथेंच ठार झाले. मी हात जोडून देवाला नमस्कार केला. इतकी गोष्ट सांगून काळाचोर म्हणाला.

"आतां महाराज तुम्हीच सांगा कीं मी मरणाच्या अधिक जवळ होतों कीं हा राजकुमार ?"

"तुझें म्हणणें बरोबर आहे. मी या दुसऱ्या राजकुमारालाहि माफ करतों. आतां या मोठ्या राजकुमाराला कढईंत टाकायला सांगतों. मला वाटतें मरण इतकें जवळ आलेलें कोणी कधीं पाहिलें नसेल व ऐकलेंहि नसेल." राजा म्हणाला.

"कां महाराज ? मी तर याहून जास्त कठिण प्रसंगांतून आपली सुटका करून बाहेर निघालों आहे !" काळा चोर म्हणाला.

"तूं म्हणतोस तें खरें निघालें तर मी या राजकुमारालाहि माफ करीन." राजानें असें म्हटल्याबरोबर काळ्या चोरानें गोष्ट सांगावयास सुरवात केली.

* * *



अट्टल चोर म्हणून माझी कीर्ति देश देशांतरांत पसरली. पुष्कळ लोक या कलेचा अभ्यास करण्यासाठीं माझ्याकडे येऊं लागले. त्यांपैकीं एक जण फार हुशार होता. त्यानें मला देखील एकदां फसविलें.

मी ज्या भागांत चोरी करीत असें त्या भागांत एक राक्षस असे तो घरफोडी व खून हेच धंदे करीत असे. त्यानें पुष्कळ सोनें व चांदी चोरी करून एका विहिरींत जमा केली होती. खरें पाहतां तो त्याच विहिरींत रहात असे.

एकदां राक्षस आपल्या घरांत नाहीं असें पाहून आम्ही त्या विहिरीजवळ गेलों. दोरी आंत सोडून मी आपल्या शिष्याला आंत उतरायला सांगितलें. विहिरींत उतरून एका मोठ्या पोत्यांत सोनें चांदी भरावयास सांगितलें. पण तो म्हणाला—"मी उतरून जाईन पण चढून बाहेर येऊं शकणार नाहीं. आपणच उतरावें. मी पोतें वर ओढून घेऊन पुन्हां दोरी विहिरींत सोडीन मग आपण वर यावें." मी त्याच्या बोलण्यावर विश्वास केला आणि विहिरींत उतरलों. मी सोनें चांदी भरगच्च भरून पोत्याच्या तोंडाला दोरी बांधली. माझ्या शिष्यानें पोतें वर ओढून घेतलें. त्यानें पोतें सोडून घेतलें. पण दोरी मात्र पुन्हां सोडली नाहीं. मी विहिरींत ओरडत होतों कीं दोरी सोड. पण तो हंसून म्हणाला—"गुरुवर, आपण मला सर्व विद्या अवगत करून दिल्यांत. परंतु दोरी-शिवाय चढून वर कसें यावयाचें हें शिकविलें नाहींत. हें आपण आज शिकवावें. विहिरींत उरलेलें सोनें सर्व आपलें. मी त्याच्यावर अधिकार सांगणार नाहीं." असें सांगून तो निघून गेला. आतां काय करावें मला सुचेना. आतां राक्षस येणार व उसासारखा आपणांस खाणार. मी अगदीं घाबरून



गेलों. तेवढ्यांत मला एक युक्ति सुचली. विहिरीत एका बाजूला कांहीं मढीं पडलीं होतीं. राक्षस येण्याची चाहूल लागतांच मी त्या मढ्यांत मढ्यासारखाच पडून राहालों.

काळोख पडल्यावर राक्षस आणखी कांहीं मढीं घेऊन आला व त्यानें इतर मढ्यांवर तीं मढीं पण टाकलीं. त्याचें माझ्याकडे लक्ष गेलें नाहीं. त्यानें त्यानंतर सैंपाक करण्यासाठीं चूल पेटवली. ती चूल म्हणजे एक मोठी भट्टीच समजा. एक मोठी कढई चुलीवर ठेवली व त्यांत दोन मडकीं तेल ओतलें. कढई खालीं मोठा जाळ केला. नंतर तो एक टोपलें घेऊन आला व त्यांत मढीं घेऊन त्या कढईत टाकूं लागला. एका खेपेस त्यानें मला सुद्धां इतर मढ्यांबरोबर टोपल्यांत टाकलें. पण मी सावध होतों व मी टोपल्याच्या कडेला घट्ट धरून उभा राहालों. राक्षसानें टोपलें बाजूला फेंकून दिलें आणि सैंपाक तयार झाल्यावर खाऊन पिऊन स्वस्थ घोरत पडला.

राक्षसाचें घोरणें माझ्या कानावर पडल्या नंतर मी टोपल्याच्या बाहेर आलों. राक्षसानें विहिरींत उतरण्यासाठीं एका शिडीचा उपयोग केला होता. मी त्याच शिडीवर चढून बाहेर

सांगून विचारलें—" महाराज ! आतां आपणच सांगा कीं राजकुमाराचें मरण माझ्यावर आलेल्या मरणापेक्षां जास्त जवळ येऊन ठेपलें होतें का ?"

राजा म्हणाला—" नाहीं ! मी या राजकुमारालाहि माफ करतों. आतां हे तिघे राजकुमार मोकळे आहेत. त्यांना वाटेल तिकडे जायला माझी परवानगी आहे. पण मी आतां तुलाच कढईत टाकायला सांगणार आहें. मरण इतकें जवळ येऊन ठेपलेलें तुला आठवत नसेल.

" का ? मला आठवतें. मी मृत्यूच्या अगदीं मुखांत पडून सुद्धां जिवंत सुटलों आहे." काळा चोर म्हणाला.

" केव्हां, कोठें ? शक्यच नाहीं." राजानें म्हटल्यावर काळ्या चोरानें गोष्ट सांगावयास सुरवात केली.

* * *

एकदां मी कोठें तरी चोरी करायला म्हणून जात होतों. एका घरांत एक बाई तान्ह्या मुलाला मांडीवर घेऊन बसली होती व रडत होती. तिच्या हातांत एक सुरी होती. तें मूल रडत होतें. ती बाई सुरी वर करून
















त्याला मारणार इतक्यांत तें मूल कसें कोणास ठाऊक हंसूं लागलें. त्याचें तें विचित्र हंसणें पाहून त्या बाईनें सुरी बाजूला टाकली व त्या मुलाकडे कौतुकानें पहात बसली.

मला हें सर्व पाहून फार आश्चर्य वाटलें. मी तिला विचारलें—"बाई, तुम्ही कोण? आणि हा मुलगा कोणाचा? या मुलाला मारायला सुरी उगारलीत काय आणि ती दूर टाकून त्याला कुरवाळूं लागलांत काय?"

"बाबा रे, मी एक दुर्दैवी बाई आहे. मी आपल्या वडिलांबरोबर एका जत्रेला गेलें होतें. तेथून मला एका राक्षसानें पळवून आणलें आणि येथें आणून टाकलें. थोड्या-वेळानें आणखी दोन राक्षस आले. तेव्हां मला कळलें की येथें तीन राक्षस राहतात. त्यांनीं त्यांच्याशीं लग्न करून घेण्यासाठीं मला फार आग्रह केला. पण मी ऐकलें नाहीं म्हणून ते मला एखाद्या मोलकरणी सारखी राबवून घेत आहेत. त्यांनीं या मुलाला सकाळीं कोठून तरी धरून आणलें आणि मला म्हणाले,—"याला शिजवून तयार ठेव. मी याला चिरून शिजवून ठेवलें नाहीं तर मला मरावेंच लागेल आज."

"तुला भिण्याचें कारण नाहीं. मी तुझ्या पाठीशीं उभा आहे. मी तिला धीर दिला आणि म्हणालो, या मुलाला मारूं नकोस. मी त्या राक्षसांचा अंत करून तुला आणि या मुलाला वांचवीन."

नंतर मी तिला एक डुक्कर आणून दिलें आणि तें त्या मुलाऐवजी शिजवून ठेवायला सांगितलें. त्या मुलाचेंच मांस शिजवलें आहे, यावर त्यांचा विश्वास बसावा म्हणून मी मुलाची करंगळी थोडी कापून कढ्यांत टाकायला तिला सांगितलें. मी सांगितल्या-प्रमाणें तिनें सर्व केल्यानंतर तिघे राक्षस आले. तिघांनी डुकराचें मांस मिटक्या मारून खालें. परंतु त्यांची भूक भागली नाहीं. एक राक्षस स्वैंपाक घरांत कांहीं खायला मिळालें तर पहावें म्हणून आला. त्यानें मला पाहिलें व खांद्यावर टाकून बाहेर निघाला. पण मी मोठ्या शिताफीनें त्याला सुरी भोसकून मारलें. तो तेथेंच गार झाला. तो बराच वेळ बाहेर न आलेला पाहून दुसरा राक्षस स्वैंपाक घरांत आला. त्यानें आपल्या एका साथ्याला मरून पडलेलें पाहिलें व मला धरून खांद्यावर टाकलें. मी त्याला सुद्धां सुरी भोसकून ठार केलें.

दोघे राक्षस परत न आलेले पाहून तिसरा राक्षस आपली गदा घेऊन स्वैंपाक घरांत आला. त्यानें मला पाहिलें. पण मला धरण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यानें आपल्या गदेचा प्रहार माझ्यावर केला. पण मी उडी मारून दूर पळून गेलों आणि त्याचा वार चुकविला. त्याची गदा जमिनीवर आदळली आणि जमिनींत जाऊन रुतून बसली. त्यानें गदा बाहेर काढण्यासाठीं दोन्ही हातांचा जोर लावला. मी ती संधि साधून त्याच्या छातींत सुरी भोसकली व त्याचा शेवट करून टाकला. तिघ राक्षसांचा अशा प्रकारें शेवट झाल्यावर माझा जीव तर




वचलाच ती बाई व मूल पण वांचलें. एवढी गोष्ट सांगून काळा चोर म्हणाला—"महाराज आतां आपणच सांगा कीं त्या दिवशीं माझा मृत्यू जास्त जवळ येऊन ठेपला होता कीं आज?"

राजा म्हणाला—"त्या दिवशींच. त्या दिवशीं तूं ज्या मुलाला वांचविलेंस तोच मी. ही पहा माझी करंगळी अर्धी कापलेली आहे." इतकें सांगून ऋतुपर्ण राजा उठला आणि काळ्या चोराला छातीशीं धरून म्हणाला—"माझ्या हातून केवढें मोठें पाप घडत होतें. मी आपल्या











प्राणदात्याचाच वध करणार होतें. देवानें वांचविलें म्हणूनच हें पाप माझ्या हातून घडलें नाहीं. माझ्या वडिलांनीं तुझा शोध काढण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण तूं कोठें सांपडला नाहींस. देव तारी त्याला कोण मारी हेंच खरें! नाहीं तर माझा जीव कसा वांचला असता आणि तुझा जीव तरी कसा वांचला असता. बरें तर, आतां माझें हें अर्धें राज्य आज पासून तुझें झालें. तूं चोरीचा धंदा सोडून दे. या राजकुमारांना मदत करण्यासाठीं तूं स्वतःचा जीव धोक्यांत घातलास. या बद्दल बक्षीस म्हणून मी आपले तीन घोडे त्यांना भेट करतो." असें सांगून ऋतुपर्ण राजानें सर्वांना निरोप दिला.

तिथे मुलगे ऋतुपर्ण राजाचे घोडे घेऊन आलेले पाहून सावत्र आईला आश्चर्य वाटलें. तिला प्रथम खरेंच वाटलें नाहीं. परंतु तिनें विचार केला, माझ्या मुलाला राज्य मिळालें नाहीं तरी हरकत नाहीं. पण त्याला हे सुंदर घोडे तर मिळाले. असा विचार करून तिनें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें.

"माई! तुझ्या सांगण्याप्रमाणें घोडे आणून दाखविले आहेत. हे बघ घोडे. आतां हें राज्य आमचें झालें." असें राजकुमारांनीं म्हटल्यावर राणीनें राज्य देण्याचें कबूल केलें. राजकुमारांनीं घोड्यांचे लगाम काढून घेतल्याबरोबर घोडे पळून गेले.

"तुम्ही मला घोडे दिले नाहीत. ही फसवणूक चालावयाची नाहीं!" राणी ओरडली.

"घोडे आणण्याची अट होती. द्यायची अट नव्हती. तूं कधीं तें आम्हांला सांगितलें नव्हतेंस." राजकुमार म्हणाले.

राणी निरुत्तर झाली. तिच्या दासीनें तिची समजूत घालण्याचा पुष्कळ यत्न केला. पण समजूत काय पटणार!





# पंचकल्याणी

कुशीनर देशांत देवव्रत नांवाचा एक क्षत्रिय वीर राहात होता. तो व धनुर्विद्येंत फार हुशार होता. त्याच्या जवळ त्याची शस्त्रें आणि पंचकल्याणी नांवाचा घोडा याशिवाय कांहींहि नव्हतें. तो गांवाच्या बाहेर जंगलांत एका किल्ल्यांत राहात असे.

मोठ्या कष्टानें तो दिवस कंठीत असे. त्यानें आपल्या खर्चासाठीं म्हणून एक एक करून सर्व हत्यारें सुद्धां मोडलीन. एक घोडा तेवढा राहिला. तो त्याला जिवापाड जपत असे. साऱ्या कुशीनर नगरांत त्याच्या सारखा चांगला घोडा नव्हता.

जवळच एका राजाला मालावती नांवाची एक मुलगी होती. फार सुरेख होती ती. तिच्याशीं लग्न करण्यासाठीं बरेच युवक येऊन गेले. पण राजानें त्यांपैकीं कोणा-लाच पसंत केलें नाहीं. त्याच्या मनांतून आपली मुलगी एकाद्या धनाढ्याला द्यावी, असें होतें.

योगायोग असा कीं मालावतीची आणि देवव्रताची गांठ पडून ओळख झाली होती. हळू हळू त्यांचा परिचय वाढत गेला व त्याचें प्रेमांत रूपांतर झालें होतें

रात्रीं साधारण अंधार पडल्यावर देवव्रत मालावतीला भेटण्यासाठीं ठरावीक पाऊल वाटेनें येत असे व त्याच वाटेनें परत जात असे. त्यामुळें ती वाट त्याच्या घोड्याच्या सुद्धां ओळखीची झाली होती.

असेंच कांहीं दिवस गेल्यावर देवव्रतानें विचार केला कीं विनाकारण असे हे दिवस घालविणें बरें नाहीं. म्हणून एक दिवस तो निर्धार करून राजा सुप्रतिष्ठाकडे गेला. म्हणाला—"माझें तुझ्या मुलीवर प्रेम बसलें आहे. म्हणून मी तुझ्याजवळ तिला मागणी



पाळण्यासाठीं आलों आहें. माझी विनंती मान्य करून मालावतीचें माझ्याशीं लग्न लावून दे."

सुप्रतिष्ठ मंत्र्यानें हंसून म्हणाला– "कुठला भिकारी आला आहे, म्हणे मालवतीवर माझें प्रेम आहे. आहे काय तुझ्याजवळ एक त्या गोष्टी शिवाय !"

देवव्रत निराश होऊन निघून गेला. सुप्रतिष्ठाचें म्हणणें कांहीं खोटें नव्हतें.

कांहीं दिवस गेले. धनगुप्त नांवाचा एक गृहस्थ मालावतीला मागणी घालण्यासाठीं आला. फार श्रीमंत होता. म्हणाला– "महाराज, माझ्याजवळ अलोट संपत्ति आहे. जर तुमची आणि माझी दोघांची संपत्ति एकत्र झाली तर आपण जणूं कुबेराचेच अवतार होऊं. पण यासाठीं मालावतीचें माझ्याशी लग्न लावून द्या." धन लोभी राजा त्याला कबूल झाला. त्यानें धनगुप्ताच्या वयाचा विचार सुद्धां केला नाहीं.

सुप्रतिष्ठानें धनगुप्ताला जांवई करण्याचें ठरविलें. मालावतीला कळलें तेव्हां तिला फार वाईट वाटलें. पण काय करते बिचारी? वेळेची वाट पाहात स्वस्थ बसली.

राजा च्या निश्चयावर सर्व लोक हंसूं लागले. तरी पण राजानें आपला निश्चय बदलला नाहीं.

लग्नाचा मुहूर्त ठरला. लग्नाची वेळ आली. नवरदेवांची मिरवणूक घोड्यावरून काढावयाची असें ठरलें. त्या करतां सुंदर घोडा पाहिजे. तेव्हां त्याची दृष्टि देवव्रताच्या घोड्यावर गेली. त्यानें आपल्या नोकरांना आज्ञा दिली की जंगलांत जाऊन देवव्रताकडून त्याचा घोडा मागून आणा.

राजाचे नोकर जंगलांत गेले आणि देवव्रताजवळ घोडा मागितला. तेव्हां त्याला मालावतीच्या लग्नाची गोष्ट कळली. त्याला फार वाईट वाटलें. पण तरी सुद्धां त्यानें घोडा देण्याचें ठरविलें व आपला आवडता घोडा आपल्या प्रेयसीच्या लग्नासाठीं पाठवून दिला.

लग्नाच्या अदल्या दिवशीची रात्र होती. पौर्णिमेचें दुधासारखें स्वच्छ चांदणें पडलें होते. अशा रमणीय वेळीं धनगुप्ताला मालावती बरोबर फिरावयास जाण्याची उत्कट इच्छा झाली. त्यानें राजाला त्याप्रमाणें कळविलें. राजानें मालावतीच्या बरोबर आपल्या एका मंत्र्याला पाठवून त्यांना फिरावयास जाण्याची परवानगी दिली. मालावतीची इच्छा नसून सुद्धां तिला धनगुप्ताबरोबर जावें लागलें.

तिघे बाहेर आले. राजद्वाराजवळ तीन घोडे तयार होते. त्यांत एक घोडा देवव्रताचा होता. मालावतीनें पंचकल्याणी घोड्यास ओळखलें. ती चटकन त्या घोड्याजवळ जाऊन उभी राहिली. त्यानंतर मंत्री व धनगुप्त दुसऱ्या दोन घोड्यांवर बसले. अशा तऱ्हेनें तिघे जण फिरावयास निघाले.

राजपृष्ठावरून तिन्ही घोडे चालले होते. तेव्हां धनगुप्ताला आपलें कौशल्य दाखविण्याची दांडगी इच्छा झाली. त्यानें आपला घोडा भरधांव सोडला. मंत्री दिवसभराच्या कामानें थकला होता. म्हणून



तो झुलक्या देतच घोड्यावरून चालला होता. मंत्र्याचा घोडा हळू हळू राजपथावरून चालला होता. पण पंचकल्याणी मात्र ओळखीची पाऊल वाट लागतांच त्या वाटेनें जाऊं लागला व सरळ तो आपल्या मालकाच्या घरा समोर येऊन उभा राहिला. घोडा थांबताच मालावती भानावर आली. ती थोडी गोंधळली.

आपल्याच घोड्यावर बसून आलेल्या मालावतीला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें जवळ येऊन मालावतीला विचारलें कीं इतक्या अपरात्री ती येथें कशी आली ?

देवव्रताला पाहून तिला फार आनंद झाला. ती म्हणाली–“मी मंत्र्याला बरोबर घेऊन धनगुप्ता बरोबर चांदण्यांत फिरावयाला निघाले होतें. वाटेंत त्या दोघांचे घोडे कोठें गेले मला समजलें नाहीं. मी कोठें जात आहें हें सुद्धां मला समजलें नाहीं. पण

आला. आतां मी येथून परत जाणार नाहीं.”

अनायास चालून आलेली संधि देवव्रतानें फुकट घालविली नाहीं. त्यानें तेव्हांच पुरोहिताला बोलावून मालावतीशीं आपलें लग्न लावून घेतलें.

इकडे धनगुप्त परतला. मंत्री परतला. पण मालावतीचा पत्ता नाहीं. राजानें सर्व शहरांत तिचा शोध केला. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं घोड्याच्या पावलांच्या अनुरोधानें राजानें देवव्रताकडे दूत पाठविले. तेथें मालावती होती. परंतु तो पर्यंत देवव्रताशीं तिचें लग्न झालें होतें. देवव्रत गरीब म्हणून आपणच त्याला हंसलों होतों. आतां आपल्याला तोच दरिद्री जांवई मिळाला म्हणून लोक नांवें ठेवणार. म्हणून राजानें आपलें अर्धें राज्य त्याला देऊन मोठ्या मानमरातबानें आपल्या घरीं बोलावून घेतलें.







# चांदोबाचें आत्मचरित्र

मी कोणाचा कोण, केव्हां माझा जन्म झाला, हें सर्व मला कांहीं माहीत नाहीं.

मला समजूं लागलें तेव्हांपासून मी एकटाच आकाशांत भटकत आहें. मी आहें त्या जागीं आकाश अगदीं निरभ्र आहे. त्याचा रंग निळा नसून काळा आहे. तारे सदा चमकत असतात. येथें सूर्य हळू हळू चालत असल्या-सारखा भासतो. त्याच्या अंगांतून येणाऱ्या ज्वाला आणि वादळें मला दिसतात.

आकाशांत सूर्य, इतर ग्रह व तारे फिरत असलेले मला दिसतात. एक पृथ्वी काय ती एका जागीं स्थिर उभी असलेली दिसते. सूर्य आला कीं पृथ्वीचें दर्शन मला घडत नाहीं; नसला म्हणजे पृथ्वीचाच उजेड चहूंकडे पसरत असल्यासारखा भासतो.

सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत माझी रात्रच असते ही गोष्ट तुम्हांला माहीत आहे का ? ठीक मध्यरात्रीच्या सुमारास गोल पृथ्वी चमकूं लागते. सूर्योदय होऊं लागला म्हणजे पृथ्वीचा अर्धा भाग काळोखांत अदृश्य होऊं लागतो. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत माझा दिवस असतो. मला ठीक दुपारीं पृथ्वी दिसत नाहीं. क्वचित कधीं कधीं दुपारीं सुद्धां मला पृथ्वी दिसते. कारण सूर्य पृथ्वीच्या आड निघून जातो.

आणि मध्य रात्रीच्या वेळीं समोर प्रकाशणारी भूमि अंधुक होऊं लागली कीं मला भीति वाटूं लागते. मी स्वतःच पृथ्वी आणि सूर्य यांच्या मध्यें आडवा येतों आणि माझीच सांवली पृथ्वीवर पडते. पण मी बाजूला सरकून चालूं लागलों म्हणजे पुन्हां पृथ्वी चमकूं लागते.

* * *

एकदां कांहीं ऋषी व मुनींशीं माझी गांठ पडली. मी त्यांना नमस्कार केला आणि विचारलें–“मुनिश्रेष्ठ ! मी कोण, कोणाचा

माझा जन्म केव्हां व कसा झाला, सांगाल तर फार कृपा होईल. तेव्हां त्यांनी माझा जन्मवृत्तांत असा सांगितला :–

"एकदां देव व दानव दोघांनीं मिळून अमृतासाठी क्षीरसागराचें मंथन केलें. समुद्राचें मंथन म्हणून त्यांनी मंदर पर्वताची रवी आणि वासुकीची दोरी केली. दुर्दैवानें अमृतापूर्वी हलाहल विषच निघालें. पण नीळकंठ शंकरानें सर्व हलाहल पिऊन टाकलें व जगाला वांचविलें.



"समुद्रमंथनाच्या वेळीं लक्ष्मी, कौस्तुभ, वगैरेंबरोबर मी, हलाहल आणि शेवटीं अमृत निघालें. चंद्रा, तूं अमृताचा भाऊ व पृथ्वीच्या पोटीं जन्माला आलेला. म्हणून भूमीवरच्या रहिवाश्यांचा फार आवडता झालास."

क्षीरसागरांतून अमृत निघाल्याबरोबर देव आणि दानव त्याकरितां आपसांत भांडूं लागले. म्हणून देवांचा मित्र विष्णु हा मोहिनीचें रूप घेऊन तेथें आला. त्यानें दोघांना सांगितलें. अरे, भांडतां कशाला? बसा बघूं ओळीनें. एका बाजूला देव बसले व एका बाजूला दानव बसले. मोहिनीनें प्रथम देवांना अमृत पाजयला सुरवात केली. आपली पाळी येई पर्यंत कदाचित अमृत संपून गेलें तर, असा विचार करून राक्षसांच्या पंक्तींत बसलेला राहू उठला व हळूच देवांच्या पंक्तींत जाऊन बसला. मी शेजारीच होतों. मी खुणेनें विष्णूला सांगितलें. त्यानें तावडतोब राहूला ओळखलें. त्याला राग आला व त्यानें सुदर्शन चक्रानें राहूचा शिरच्छेद केला. राहू मेला परंतु अमृत तोंडांत पडल्यामुळें त्याचें डोकें जिवंत राहिलें. माझ्यामुळेंच तो प्रसंग ओढवला याची आठवण करून सुडाच्या भावनेनें तो मला आजपर्यंत वेळीं वेळीं ग्रसतो. परंतु मी त्याला कधीं पाडिलेलें



नाहीं. म्हणे राहू मला ग्रसतो तेव्हां मी आपल्या पृथ्वी मातेला दिसत नाहीं. माझ्या भाच्यांना, म्हणजे तुम्हांला जेव्हां वाटतें कीं राहूनें मला ग्रसलें आहे तेव्हां मला सुद्धां ऐन दुपारीं सूर्याचें दर्शन होत नाहीं. असो.

पण ऋषी व मुनींनीं माझा जो जन्म वृत्तांत सांगितला तो मी खोटा कसा म्हणूं? पृथ्वीच माझी आई असावी नाहीं तर मी तिच्या भोंवती फिरत कां बसलों असतों? मला पाहाल्याबरोबर तिचें हृदय उचंबळून येतें व ती समुद्राच्या लाटांच्या रूपानें आपले हात पुढें करते.

माझ्या आयुष्यांतली एक गमतीदार गोष्ट ऐका, एकदां गणनायक गजानन अगदीं ओ येई पर्यंत मोदक खाऊन आपल्या वडिलांकडे निघाला. पोटाच्या भारानें त्याचे पाय लटलटत होते. मी तें पाहिलें व आवरलें नाहीं म्हणून हंसलों. गणपतीला त्याचा फार राग आला. त्यानें आईकडे जाऊन माझ्या विरुद्ध तक्रार सांगितली त्या पार्वती माउलीचें हृदय कळवळून आलें. तिनें रागाच्या भरांत मला शाप दिला कीं माझें तोंड पाहणारांवर चोरीचा आळ येईल.

तें ऐकून देव घाबरले. जाऊन पार्वतीच्या पायां पडले आणि म्हणाले–"जगदंबे! असा कोप करून कसें चालेल? चूक झाली, माफ कर!" तेव्हां पार्वती म्हणाली–"माझा शाप मी परत घेऊं शकत नाहीं. पण एवढा बदल करतें कीं गणेश चतुर्थीला जो



कोणी चंद्राचें तोंड पाहील त्याच्यावर चोरीचा आळ येईल.

पुढें कृष्णानें गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्रोदयानंतर चंद्राचें तोंड पाहिलें. म्हणून स्यमंतक मणी चोरी केल्याचा आळ त्याच्यावर आला. ती गोष्ट अशी :

एकदां सत्रजिताला सूर्याकडून स्यमंतक-मणी मिळाला. त्या मण्याचें असें वैशिष्ट्य



होतें कीं तो रोज दहा ओंजळी सोनें देत असे. कृष्णानें त्याच्याकडे तो मणी मागितला. पण त्यानें तो दिला नाहीं. पुढें सत्रजिताचा धाकटा भाऊ प्रसेन तो मणी घेऊन रानांत पळून गेला. रानांत त्याचें एका सिंहाशीं युद्ध झालें. त्यांत तो मारला गेला आणि सिंह तो मणी घेऊन पळून गेला. पुढें जांबुवानानें त्याचा वध करून तो मणी आपली मुलगी जांबवती हिला दिला.



परंतु चोरीचा आळ आला कृष्णावर. कृष्ण निर्दोषी होता. पण आळ आला. तो दूर व्हावा म्हणून खरा चोर कोण आहे याचा पत्ता लावणें त्याला भाग होतें. तो रानांत गेला. तेथें प्रसेन मरून पडला होता. तेथून सिंहाचीं पावलें जात असलेलीं त्याला दिसलीं. त्याच्या अनुरोधानें तो गेला. तेव्हां त्याला एक जखमी सिंह मरून पडलेला दिसला. तेथून त्याला जांबुवानाचीं पावलें दिसलीं. त्यांच्या अनु-



रोधानें तो जांबुवानाच्या गुहेंत पोंचला. तेथें दोघांचें युद्ध झालें. त्यांत जांबुवानाचा पराभव झाला. जांबुवानानें कृष्णाला स्यमंतक मणी दिला आणि आपली मुलगी जांबुवती हिच्याशीं त्याचें लग्न लावून त्याच्याशीं सख्य करून घेतलें. स्यमंतक मणी कृष्णानें सत्रजिताला आणून दिला. खोटा आरोप केला. याचें प्रायश्चित्त म्हणून सत्रजितानें आपली मुलगी सत्यभामा हिच्याशीं कृष्णाचें लग्न करून दिलें. ऐकूण कृष्णावर आलेला हा आळ त्याच्या फायद्याचाच झाला.

* * *

माझें रूप पाहून तुला कुतूहल वाटतें, नाहीं का? तुमचे ते कवि! त्यांनीं मनाला वाटेल तसें माझें वर्णन केलें आहे. तशी माझी स्तुतीच केली आहे, म्हणा! क्वचित निंदा पण केली आहे. पण या निंदेमुळें माझी प्रशंसाच झाली आहे.

कित्येकांनीं आपल्या सुंदर बायकांच्या व प्रेयसीच्या मुखाला माझी उपमा दिली





आहे. कित्येकांनीं आपल्या लाडक्या मुलांना माझें नांव ठेवलें आहे. कित्येक राजवंश मलाच आपला मूळपुरुष मानतात.

माझ्या रंगा रूपावरून लोकांनीं अनेक कपोलकल्पित गोष्टी रचल्या आहेत. माझ्या तोंडावर जो काळा डाग आहे त्याच्यावरून देखील अनेक गोष्टी रचल्या गेल्या आहेत. त्यांत ससा लपून बसल्याची एक गोष्ट आहे. म्हणून मला शशांक असेंहि नांव पडलें.

परंतु मला ओळखण्याचा खरा प्रयत्न वैज्ञानिकांनींच केला आहे. ज्योतिष्यांनीं माझा मार्ग व वेग ओळखून गणितशास्त्राच्या आधारें बारा महिने, तिथि व वार निश्चित करून टाकले आहेत. एका वाराला माझें नांव पण दिलें आहे—सोमवार!

इतर ग्रह माझे मामा होत. कारण मी पृथ्वीचा मुलगा आणि पृथ्वी ही ग्रहांची बहीण. पण ज्योतिषी मला देखील एक ग्रह मानतात. तुमच्या जन्माच्या वेळीं मी ज्या नक्षत्राजवळ असतों तेंच नक्षत्र जन्मनक्षत्र होऊन जातें.

कित्येक वर्षें अभ्यास करून वैज्ञानिकांनीं पुष्कळ खरी माहिती मिळविली आहे. उदाहरणार्थ माझा व्यास २,१३६ मैल आहे व घेर ६७९५ मैल. तुमच्या पासून मी २ लाख मैलांहून जास्त अंतरावर आहें—वगैरे.

त्यांनीं कांहीं चुका केल्या आहेत व ते हळू हळू त्या सुधारत पण आहेत. त्यांना वाटत होतें कीं माझ्या अंगावर जे काळे डाग आहेत ते डोंगर असावेत व पांढरा रंग म्हणजे समुद्र असावा. त्यांनीं या डोंगरां समुद्रांना नांवें सुद्धां देऊन टाकली आहेत.

मोठमोठ्या दुर्बिणींच्या सहाय्यांनीं त्यांनीं मला पाहण्याचा प्रयत्न केला तेव्हां त्यांना कळून आलें कीं माझ्यावर एक थेंब देखील पाणी नाहीं. पुढें त्यांनीं माझे फोटो काढले. तुम्ही माझे फोटो पाहिले असतीलच?

वैज्ञानिकांना माझ्या खऱ्या रूपाविषयीं माहिती मिळवायला फार त्रास झाला. मी आपल्या आईकडे कधीं पाठ फिरविली नाहीं. म्हणून मी पाठीकडून कसा दिसतों हें त्यांना कळलें नाहीं.

या अवधींत आणखी कित्येक गोष्टी सुरू झाल्या.

याविषयीं पुष्कळ बोलण्यासारखें आहे!

पुराण काळापासून मनुष्य प्रयत्न करीत आला आहे कीं त्याला सदेह स्वर्ग किंवा कैलास लोक पहावयास मिळावा. त्याला त्या प्रयत्नांत यश मिळालें कीं नाहीं, मला माहीत नाहीं. पण जी वस्तु सहजीं मिळत नाहीं तीच किती मोहक वाटते. कवींनीं माझ्या विषयीं म्हणूनच कित्येक काल्पनिक गोष्टी रचल्या आहेत. म्हणे त्यांचा कथानायक किंवा नायिका किंवा दोघं चंद्रलोकांत जाऊन आलीं आणि या गोष्टी वाचून लोक खूष होत आले आहेत.

पण या वैज्ञानिक युगानें क्रांति घडवून आणली. वैज्ञानिकांनीं १९५७ सालीं कृत्रिम ग्रह बनविला. तो पृथ्वीला प्रदक्षिणा घालूं लागला. तेव्हांपासून मला वाटूं लागलें आहे कीं माझे भाचे व भाच्या यांना मामाच्या घरीं जायला खास संधी मिळणार.

वैज्ञानिक चमत्कारांचें एक नवें पीकच जणूंकांहीं आतां सुरू झालें आहे. माझा एक भाऊ माझ्या आईकडून एक मदत



आणून मला देऊन गेला आहे. हा माझ्या भाच्यांकडून मला मिळालेला पहिला उपहार होय.

मी या आनंदांत निमग्न झालो होतों की माझा आणखी एक भाऊ रडत आला आणि मला एक प्रदक्षिणा घालून माझ्या पाठीचे फोटो काढून माझ्या आईकडे परत गेला. मला हें ऐकून आनंद झाला कीं ते फोटो तुमच्यापर्यंत पोंचले आहेत.

वैज्ञानिकांना ह्या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटत आहे कीं माझ्या मुखावर जें आहे तें पाठीवर नाहीं. पण तुम्हीच विचार करा, त्यांच्या हा खुळेपणा होता किंवा नाहीं. मुख आणि पाठ दोन्हीं एक असूं शकतील काय?

* * *

इकडच्या तिकडच्या गप्पा सोडून, मी आतां खरी मुद्द्याची गोष्ट सांगणार आहे. ठीक तेरा वर्षांपूर्वी माझ्या नांवानें "चन्दामामा" म्हणून एक मुलांचें मासिक काढण्यांत आलें. (आठ वर्षांपूर्वी "चांदोबा" मराठींत सुरू झाला.) या मासिकामुळें मी आतां तुमच्या किती जवळ आलों आहें. आपल्या या चांदोबाच्या वाढदिवसाच्या वेळीं मी आपलें हें आत्मचरित्र सांगण्याचें ठरविलें व तें आतां सांगितलेंच आहे.

मला या गोष्टीची पूर्ण जाणीव आहे कीं रॉकेटच्या मदतीनें तुमच्यापैकीं अनेक माझ्या जवळ येण्याचीं स्वप्नें पहात असणार. पण घाई करूं नका. तो दिवसहि उजाडेल, तुम्ही मामाच्या घरीं खुशाल येऊं जाऊं शकाल. तो दिवस जवळ यावा म्हणून वैज्ञानिक अहोरात्र प्रयत्न करीत आहेत. तोपर्यंत हें "चन्दामामा" म्हणजे 'चांदोबा' मासिक तुमचें मनोरंजन करीत राहील.



# बबीची बाहुली



"आईग, मला बाहुली पाहिजे. मी भातुकली खेळणार आहें." बबीनें लडिवाळपणानें आपल्या आईच्या कंबरेला विळखा घालीत म्हटलें.

"बाळे, ह्या आपल्या खेडेगांवांत कुठल्या आल्या आहेत बाहुल्या. दिवाळीला तुझी आका येईल ना? तेव्हां सांगूं आपण तिला बाहुली आणायला." आईनें सांगितलें.

"दिवाळीला अजून किती दिवस आहेत?" बबीनें विचारलें.

"अजून पांच महिने आहेत." आई म्हणाली.

"पांच महिने. आणि तो पर्यंत खेळायला खेळणींच मिळणार नाहींत." बबीला फार



वाईट वाटलें. ती हिरमुसल्यासारखी एका बाजूला जाऊन बसली. तिनें शेजारच्या शामाला बाहुलाबाहुली घेऊन खेळतांना पाहिलें होतें.

शामाचे वडील सावकार होते. ते जेव्हां शहर गांवीं गेले तेव्हां येतांना आपल्या मुलीसाठीं एक मोठा बाहुला घेऊन आले. त्याचें किती कौतुक! पहिल्या दिवशीं तर शामानें तो कोणाला दाखविलाच नाहीं. दुसऱ्या दिवशीं मात्र तिनें आपल्या मैत्रिणींना बोलावून तो दाखविला. आणि तेव्हां पासून ती तो घेऊन सर्वकडे मिरवीत फिरत राहिली.

बबीनें तो कालच पाहिला. शामानें त्याला सर्व कपडे घालून, बूटमोजे घालून छान सजवला होता. त्याचा चेहेरा हंसरा होता. हंसतांना पांढरे शुभ्र बारीक बारीक दांत दिसत होते. त्याचा रंग गोरा होता आणि गाल आणि ओंठ गुलाबाच्या फुला

# पालटणारें चित्र

विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचें शव काढून खांद्यावर टाकलें आणि स्मशानाकडे निघाला. तेव्हां वेताळ संवयीप्रमाणें बोलूं लागला. म्हणाला—"राजा, या जगांत कोणाच्या मनांत काय असतें कोणी सांगूं शकेल काय? पण नागध्वजानें आपल्या बायकोचें सौंदर्य कमी कमी होत जावें असा हट्ट कां धरावा हें मला कळत नाहीं. तुझा थकवा दूर व्हावा म्हणून मी तुला त्याची गोष्ट सांगणार आहें. ऐक," वेताळानें गोष्ट सांगावयास सुरवात केली—

एकदां उज्जयनीच्या राजाकडे नागध्वज नांवाचा खजीनदार होता. तो स्वभावानें फार सज्जन व उदार मनाचा होता. म्हणून गांवांत सर्व लोक त्याला फार मान देत असत. परंतु त्यास गृहसुख नव्हतें. कारण त्याची बायको फार अशक्त व रोगी होती. घरांतलें काम पाहणें तर दूरच, नवऱ्याशीं चार घटका हंसत खेळत बोलण्याची शक्ति देखील तिच्या अंगांत नव्हती. पुढें कांहीं दिवसांनीं ती वारली.

पहिल्या लग्नामुळें संसारसुख लाभलें नाहीं, तर दुसऱ्या लग्नानें कोठें लाभणार असा विचार करून तो विरक्त मनानें राहूं लागला.

एकदां तो दरबारच्या कामानेंच परगांवीं गेला होता. एका सरदाराच्या घरीं तो उतरला होता. त्या सरदाराच्या बहिणीनें त्याचें सर्व प्रकारें आदरातिथ्य केलें. तिचें नांव चंद्रसेना होतें. चंद्रसेनेची ती सेवा वृत्ति पाहून नागध्वजाच्या मनांत लग्नाविषयीं विचार पुन्हां डोकावूं लागले. बोलणें काढल्या बरोबर चंद्रसेनेच्या भावानें व चंद्रसेनेनें होकार दिला. सुमुहूर्तावर दोघांचें लग्न झालें आणि नागध्वज चंद्रसेनेसह राजधानींत परतला.

नागध्वजाचें लग्न झालेलें ऐकून त्याच्या मित्रमंडळीस आनंद झाला. त्यांनीं त्याचें अभिनंदन केलें. कारण चंद्रसेना पहिल्या बायकोहून रूपानें फारच सुंदर आणि सुशील



होती. संसार सुखाला पारखलेल्या मनांत पुन्हां आराम वाटला. नागध्वजाचें मन संगीत, चित्रकला वगैरे ललितकलांकडे वळलें. चित्रकार, गवई, कवि वगैरे त्याच्या घरीं नित्य येऊं लागले. हा पालट होण्यास मुख्य कारण चंद्रसेना होती.

नागध्वजाच्या चित्रकार मित्रमंडळींत शिवानंद नांवाचा एक चित्रकार होता. तो फार प्रसिद्ध चित्रकार होता. त्यानें नागध्वजाची परवानगी घेऊन चंद्रसेनेचें एक सुंदर चित्र तयार केलें. पाहणारांस तें चित्र वाटत नसून चंद्रसेनाच समोर बसली आहे



असें वाटे. शिवानंदनें तें चित्र नागध्वजाला उपहार म्हणून दिलें. आपल्या प्रिय पत्नीचें तें सुंदर चित्र पाहून नागध्वज फारच खूष झाला. तो चित्राजवळ उभा राहिला म्हणजे त्याला वाटे चंद्रसेनाच जवळ बसली आहे.

नागध्वजाला संसार सुख स्वर्गीक सुखाहून जास्त मिळूं लागलें होतें. दहा वर्षें आनंदानें लोटलीं. त्यानें राज्याची इमानें इतबारें सेवा केली म्हणून खूष होऊन राजानें त्याला पंत प्रधान नेमलें. चंद्रसेनेच्या पायगुणानेंच आपल्याला हें सुख मिळालें असें नागध्वजाला वाटत असे.

परंतु हें सुख देवाला फार दिवस पाहवलें नाहीं. चंद्रसेना एकाएकीं आजारी पडली व या जगाचा कायमचा निरोप घेऊन निघून गेली. डोक्यावर वीज पडल्यासारखें झालें नागध्वजाला. त्याच्या मित्र मंडळींनीं त्याला तीर्थयात्रा करून येण्याचा सला दिला. कांहीं दिवस मन रमेल व मनःशांति लाभेल असा विचार करून नागध्वज तीर्थयात्रेला निघाला. तीन वर्षें पायीं प्रवास करून काशी रामेश्वराची यात्रा केली.

घरीं आल्यावर त्यानें चंद्रसेनेचें चित्र पाहिलें. त्या चित्रांत कांहीं पालट न झालेला पाहून त्याला आश्चर्य वाटलें. या तीन वर्षांत त्याच्या पत्नीचें रूप कसें बदललें नाहीं याचें त्याला आश्चर्य वाटलें. त्याच्या मनांत त्याच्या पत्नीचें एक निराळेंच रूप त्याला दिसत होतें.

त्यानें शिवानंदला बोलावून विचारलें— "मित्रा ! या चित्रांत गेल्या तीन वर्षांत फरक कसा नाहीं झाला बुवा ? अरे, माझ्या बरोबर चंद्रसेनेनें तीर्थयात्रा केली. तिच्यांत जो फरक झाला आहे तो माझ्या मनाला माहीत आहे. तूं काय वाटेल तें कर आणि या तीन वर्षांत घडून आलेला पालट चित्रित कर."



शिवानंदला फार आश्चर्य वाटलें. चंद्रसेनेचें इतकें सुंदर चित्र बिघडवून टाकण्यांत नागध्वजाचा काय हेतु आहे हें त्याला कळेना. म्हणून तो नागध्वजाला म्हणाला— "मित्रा ! चित्राचा वयाशीं काय संबंध ? तुझी बायको जिवंत असती तर तिच्यांत पालट अवश्य झाला असता. पण हें तर तिचें चित्र आहे."

"चंद्रसेना या जगांत नाहीं हें मला कळतें. पण ती एक क्षणभर देखील माझ्यापासून निराळी राहालेली नाहीं. ती नित्य माझ्या मनांत वसत आहे. तिनें माझ्याबरोबर तीर्थयात्रा केली व तीर्थयात्रेचा परिणाम माझ्याबरोबर तिच्यावर देखील झालेला मी पाहिला आहे. हें चित्र म्हणजे तिचें जुनें रूप आहे. तुझें माझ्यावर खरोखरच प्रेम असेल तर तूं तेवढा फरक मात्र दाखविण्याचा प्रयत्न कर." नागध्वज म्हणाला.

नागध्वजाचा हा हट्ट शिवानंदला बिलकुल आवडला नाहीं. परंतु आपल्या मित्राचें मन राखण्यासाठीं चंद्रसेनेच्या चेहऱ्यांत त्यानें थोडा फरक दाखविला. तिच्या चेहऱ्यांत आतां सौंदर्याबरोबर एक तऱ्हेचें



पावित्र्य झळकूं लागलें. नागध्वजाला तें चित्र फार आवडलें.

पुढें कांहीं दिवसांनीं नागध्वजाला राज्यकार्यासाठीं परदेशीं जावें लागलें. परदेशाहून परत यायला त्याला पांच वर्षें लागलीं. घरीं परत आल्यावर त्यानें सर्वांत प्रथम आपल्या बायकोचें चित्र पाहिलें. त्यांत त्याला कांहींच फरक झालेला दिसला नाहीं. तें पाहून त्याला फार फार वाईट वाटलें. हा त्याचा निव्वळ भ्रम होता. पांच वर्षांत आपली बायको फारच बदललेली असणार. कल्पनेनें त्यानें आपल्या बायकोचें एक चित्र

डोळ्यापुढें उभें केलें होतें. तें चित्र या चित्रांत दिसेपर्यंत त्याला चैन पडेना.

त्यानें पुन्हां शिवानंदला बोलाविलें व आपल्या कल्पनेप्रमाणें चित्रांत फरक करण्यास सांगितला. शिवानंदनें आपल्या वेड्या मित्राला समजावून सांगणें व्यर्थ आहे असें समजून चित्रांत फरक करून द्यायला सुरवात केली. त्याच्या मताप्रमाणें चित्र बिघडून गेलें होतें. पण नागध्वजाला तेंच चित्र आवडलें. कांहीं दिवसांनीं तो आपल्या बायकोच्या सहवासांत राहण्याची आशा ठेवून स्वर्गलोकीं गेला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा, मला हें कळत नाहीं कीं नागध्वजानें आपल्या बायकोच्या चित्रांत दोन वेळीं पालट करून आपल्या वेडेपणाचें प्रदर्शन कशाला करावें. तिच्यावर त्याचें प्रेम होतें का? होतें तर चित्रांतलें सौंदर्य कमी करण्यांत त्याचा काय हेतु होता. उत्तर माहीत असून तूं दिलें नाहींस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर आदळतील."

विक्रमार्क म्हणाला—"नागध्वजाचें चंद्र-सेनेवर अप्रतीम प्रेम होतें यांत यत्किंचितहि शंका नाहीं. त्याचें तिच्या गोड स्वभावावर प्रेम होतें तिच्या रूपावर नव्हतें. तिच्या स्वभावांत जितका फरक झाला त्याहि पेक्षां जास्त फरक तिच्या रूपांत झाला होता. वयाबरोबर रूप सौंदर्य कमी होत जातें पण सौंदर्य वाढत जातें. स्वभाव म्हणूनच त्यानें त्या चित्रांत तसा पालट करून दाखविण्याचा हट्ट धरला. तो पालट चित्रांत दिसून आल्यावर त्याच्या मनाचें समाधान झालें."

राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवाबरोबर नाहींसा झाला व झाडावर जाऊन लटकूं लागला.







# जें होतें तें बऱ्यासाठीं

सूचौ नगरापासून दहा मैलावर एक मोठें सरोवर होतें. त्यांत अनेक बेटें होतीं. पूर्वे कडील बेटाला पूर्वी तुंगतिंग व पश्चिमे-कडील बेटाला पश्चिमी तुंगतिंग अशीं नांवें होतीं. दोन्हीं बेटें सरोवराच्या मध्य भागीं होतीं.

पश्चिमेकडील बेटांत काबोंत्सान नांवाचा एक धनी जमीनदार राहात असे. त्याला एक मुलगा व एक मुलगी होती. मुलीचें नांव चियुफान्ग असें होतें. त्यानें आपल्या दोघां मुलांना शिक्षण देण्यासाठीं एक शिक्षक नेमला होता. चियुफान्ग विद्याभ्यासांत फार हुशार निघाली. तिनें शिवण काम, कशीदा काढणें, संगीत, नृत्य वगैरे विद्या सुद्धां अवगत करून घेतल्या.

मोठी झाल्यावर तिच्या लग्नाची काळजी तिच्या बापाला वाटूं लागली. आपल्या लाडक्या मुली जोगता वर मिळावा म्हणून बापानें खूप खटपट सुरू केली. तो लग्ना-साठीं पाण्यासारखा पैसा खर्च करण्यास तयार होता. पण मुली जोगताच रूपवान शीलवान व विद्वान वर मिळावा म्हणून त्यानें जागोजागीं दूत पाठविले.

चियुन्फांगचें रूप व बुद्धिमता ऐकून दूर दूरचे लोक तिच्या बापाकडे येऊं लागले. काबोनें मध्यस्थी करणाऱ्या लोकांना सांगितलें कीं तुम्ही वराचें किती वर्णन केलेंत तरी वराला प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्या शिवाय मी आपल्या मुलीचा हात त्याच्या हातांत द्यायला तयार होणार नाहीं. काबोनें कित्येक लोकांना असें सडेतोड उत्तर देऊन परत पाठविलें.

सूचौ एका जवळच्या गांवीं चियेनचिंग नांवाचा एक तरुण रहात असे. तो फार गरीब होता. परंतु रूपानें फार सुंदर आणि



हुशार होता. त्याचे वाडवडील पण प्रख्यात विद्वान होते. आईवडील लहानपणींच वारल्यामुळें त्याला अत्यंत कष्टानें आपला विद्याभ्यास पुरा करावा लागला. गरिबीमुळें त्याचें लग्न होऊं शकलें नाहीं. नशिबानें येन चुन नामक त्याच्या एका नातेवाइकानें त्याला आपल्या घरीं आश्रय दिला आणि त्याला विद्याभ्यासाला जी मदत हवी होती ती दिली होती.

येन चुन व चियेन चिंग दोघे समवयस्क होते. येन वयानें थोडा मोठा होता म्हणून त्याला चियेन चिंग 'अण्णा' म्हणत असे. येनचें सुद्धां लग्न झालें नव्हतें. त्याच्याजवळ अलोट पैसा होता. पण त्याला विद्येचा गंध नेताचाच होता व रूप देखील बेताचेंच होतें. मग कोण मुलगी देणार? सुंदर सुंदर कपडे घालून तो आरशा समोर उभा राही व विचार करी माझ्या रूपावर भाळणार नाहीं अशी रूपावती या जगांत कोण असणार!

येन व चियेन दोघे स्वभावानें अगदीं निराळे होते. पण त्यांचें परस्परांवर फार प्रेम होतें. चियेन आपल्या अन्नदात्याच्या शब्दाला मान देत असे. चियेन हुशार होता व विद्वान होता म्हणून येन त्याच्या सल्ल्यानें सर्व कामें करी.

येनचा यू नांवाचा नातेवाईक पश्चिमी बेटावर व्यापारासाठीं गेला होता. त्यानें चियुफांगच्या सौन्दर्याचें वर्णन ऐकलें पूर्वी द्वीपावर आल्यावर त्यानें येनच्या समोर तिखट मीठ लावून चियुफांगच्या रूपाचें वर्णन केलें. येननें तें वर्णन ऐकून तिच्याशींच लग्न करण्याचें मनाशीं ठरविलें व यूला म्हणाला–

"तुम्ही पश्चिमी बेटावर जाऊन चियु-फांगच्या वडिलांना भेटून हें लग्न ठरवून या. काय वाटेल तो खर्च झाला तरी चालेल. तुम्हांला मी आजपर्यंत जें कर्ज दिलें आहे तें फेडण्याची सुद्धां गरज नाहीं. उलट मी तुम्ही मागाल तें बक्षीस तुम्हांला देईन."

"तुम्हांला वाटतें तेवढें हें सोपें काम नाहीं. कावो कोणाच्या शब्दांवर विश्वास करीत नाहीं. मुलाला पाहिल्याशिवाय मुलगी देणार नाहीं असें सांगून त्यानें कित्येकांना परत पाठविलें आहे." यू म्हणाला.

"तर चला, मी येतों तुमच्याबरोबर दोघे जाऊं!" येन म्हणाला.

यू मनांत म्हणाला–"तुझ्यासारख्याला आपली मुलगी देण्यापेक्षां मुलीचा गळा दाबून मारणें पसंत पडेल कावोला!" पण उघड एवढेंच म्हणाला–"चांगल्या रूपवान मुलांना त्यानें नकार दिला आहे!"

"तर मग तुम्हीच माझ्या वतीनें जाऊन लग्न ठरवून या. तुमच्या चातुर्याची ही परीक्षा आहे असें समजा. प्रयत्न करून पहा. तुम्हांला खात्रीनें यश येईल." येन म्हणाला.

येनच्या उपकाराखालीं दबलेला यू पश्चिमी बेटाकडे निघाला. त्याच्याबरोबर




येननें आपल्या दोघां विश्वासू नोकरांना पाठविलें.

कावोनें येनचें तोंडी वर्णन ऐकून म्हटलें–"तूं म्हणतोस तसा तो मुलगा विद्वान व हुशार असेल तर आपली मुलगी द्यायला मला कांहींच हरकत नाहीं. परंतु रीतीप्रमाणें मुलाला एकदां पाहिल्याशिवाय मी शब्द कसा देऊं? म्हणून त्याला एकदां घेऊन ये."

"पण मी सांगूं का हा मुलगा म्हणजे पुस्तकांचा किडा आहे. पुस्तकें सोडून कोठें जाईल तर शपथ. या शिवाय तो फार अभिमानी आहे. मुलीच्या बापाकडे का

मी जाणार ? त्यांनीं पाहिजेतर यावें पाहायला, असें म्हणतो तो." यूनें थाप दिली.

"असें असेल तर मीच येतों पाहायला. इतक्या विद्वान माणसाला पाहण्यासाठीं बोलावणें बरोबर होणार नाहीं. माझ्या मुलीला विद्वान व रूपवान मुलगा मिळाल्यावर आणखी काय पाहिजे ? मी तावडतोड लग्न ठरवून टाकीन. जांवयाला पाहिजे तितका पैसा देण्याची शक्ति माझ्यांत आहे." काबो म्हणाला.

यू घाबरला. काबोनें स्वत: येऊन येनला पाहिलें तर काम बिघडणार. म्हणून तो म्हणाला—"पण तुम्हांला एवढी तसदी घेण्याची काय गरज ? जांवई किती मोठा असला तरी लग्नापूर्वी त्यानें सासऱ्याला मान दिलाच पाहिजे. मी त्याला बोलावून घेऊन येतों." असें सांगून यूनें तेथून पाय काढला.

यूनें येऊन सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकून येनचे पाय गारठले. त्यानें आपल्या विश्वासू नोकरांना बोलावून विचारलें. ते म्हणाले—"यू म्हणतो तें सर्व खरें आहे." नंतर त्यानें विचार करून एके दिवशीं यूला बोलाविलें आणि म्हणाला—



"मी म्हणतों, माझा एक भाऊ आहे. तो सुंदर आहे, सुशिक्षित व विद्वान आहे. माझें नांव सांगून तुम्ही त्याला घेऊन गेलात तर कांहीं हरकत आहे का ? मुहूर्त वगैरे ठरवून मला निरोप पाठवा. ऐन वेळीं मी येऊन बोहल्यावर उभा राहीन. लग्न लागल्यावर त्यांना कळलें तरी हरकत नाहीं. कोण काय करूं शकेल ?" येननें सुचविलें.

"पण तुमचा भाऊ या गोष्टीला कबूल आहे का ? विचारून पहा !" यू नें शंका केली.

"कां नाहीं ? इतके दिवस मी त्याला पोसलें तें उगीचच का ? तो माझ्या शब्दा बाहेर जाणार नाहीं." येन म्हणाला.

त्यानंतर त्यानें चियेनला बोलावून त्याला जी कामगिरी करावयाची होती ती नीट समजावून सांगितली व म्हणाला—"माझ्या उपकाराची फेड तूं या रूपानें करूं शकशील अशी माझी खात्री आहे."

चियेन म्हणाला—"तुझ्या आज्ञेप्रमाणें वागायला मी तयार आहे. प्रश्न एवढाच आहे कीं जें काम साधण्यासाठीं आपण हा प्रयत्न करणार तेंच बिघडलें तर !"






“तुला मुलीचा बाप ओळखत नाहीं. तसा तो मला देखील ओळखत नाहीं. जर बिंग बाहेर आलें तर मध्यस्थी करणारा यू तोंडघशी पडेल.” येन म्हणाला.

चियेनला त्यानें उत्तमोत्तम रेशमी वस्त्रें दिलीं. चियेन जास्तच सुंदर होता. तीं वस्त्रें घातल्यावर त्याचें सौंदर्य जास्तच खुलून दिसूं लागलें. यू त्याला घेऊन नावेंत बसून पश्चिमी बेटावर गेला आणि कावोच्या घरीं पोंचला. चियेनचें रूप लावण्य पाहून कावो फार खूष झाला. म्हणाला—“ अगदीं अनुरूप असाच वर मुलीला मिळाला आहे. मी अगदीं निराश झालों होतों. पण देवानेंच जणुं कांहीं याला पाठवून दिलें आहे.”

कावोनें मुलाच्या विद्वत्तेची परीक्षा घेण्यासाठीं आपल्या मुलीच्या गुरूला बोलाविलें. चियेननें निरनिराळ्या पुस्तकांतील उतारे ऐकवून त्याला अगदीं गुंगवून सोडलें. तेव्हां त्यानें मालकाला सांगितलें कीं दांडगा पंडित दिसतो आहे मुलगा.

कावोला तें ऐकून डोक्यावरचें ओझें कमी झालें असें वाटलें. मुलीनें स्वतःच्या डोळ्यांनीं आपल्या होणाऱ्या पतीचें रूप पाहिलें व आपल्या भाग्याचे आभार मानले.

कावो यूला म्हणाला—“ खरोखरच मुलगा फार चांगला आहे. आतां ठरवा मुहूर्त वगैरे आणि पुढच्या तयारीला लागा.”

काम झाल्यावर यू चियेनला घेऊन परत पूर्वी बेटावर आला. येनच्या आनंदाला पारावार नव्हता. त्यानें लग्नाचा मुहूर्त ठरवून मुलीकरितां साखरपुडा म्हणून उंची वस्त्रें व दागिने पाठविले.

त्या काळीं चीन देशाच्या त्या भागांत अशी रीत होती कीं मुलीची आई मुलाच्या घरीं आपल्या मुलीला घेऊन जाई तेथें तिचें लग्न लावून देई. परंतु कावोची इच्छा होती कीं लग्न त्याच्या घरीं व्हावें. लोकांनीं येऊन त्याचें वैभव पहावें. त्याची स्तुति करावी. असा विचार करून त्यानें निरोप पाठविला कीं लग्न पश्चिमी बेटावरच व्हावें. खर्चाची सर्व जबाबदारी वधूपक्षावरच राहील.

निरोप आल्यावर येन म्हणाला—“ आतां कांहीं सुटका दिसत नाहीं. इच्छा असो किंवा नसो, जावें हें लागणारच.

यू म्हणाला—“ प्रसंग मोठा कठीण आहे. चियेनला सर्व लोकांनीं पाहिलेलें आहे. त्याच्या जागीं दुसरें कोणी उभें राहिल्यावर खास ओरडा होणार. मारामारी पर्यंत पाळी आली नाहीं तर आश्चर्य. माझें डोकेंच उडेल. तुमच्यावर जो प्रसंग ओढवेल तो देवच जाणे. लग्न देखील मोडेल.”

“ हें सर्व तुझ्या मूर्खपणानें झालें आहे. चियेनच्या ऐवजीं मी गेलों असतों तर काय बिघडलें असतें ? मी आपल्या सर्व लोकांना तयार रहावयास सांगतों. सलोख्यानें झालें तर ठीकच, नाहींतर बळजबरीनें जो कोणी डोकेंवर काढील त्याचें डोकें उडालेंच समज.” येन म्हणाला.

तुमच्या दहा वीस लोकांना का तो भीक घालणार आहे. सर्व बेट त्याच्या




बाजूनें उभें राहिल्यावर तूं व तुझे लोक काय करूं शकणार ? बळजबरीनें हें काम होणार नाहीं.” यूनें सल्ला दिला.

येनला पुन्हां चियेनच्या मदतीची अपेक्षा करावी लागली. त्यानें बोलावून म्हटलें—“ पुढच्या आठवड्यांत माझें लग्न आहे. पण तूं पूर्वी गेला होतास म्हणून तुला याहि खेपेस जावें लागणार आहे.”

“ मागच्या खेपेस फक्त मुला मुलीला पाहण्याचेंच काम होतें. पण आतां प्रत्यक्ष लग्नाची गोष्ट आहे. तुझ्या ऐवजीं मी गेलों तर तें कसें बरें चालेल ?” चियेन म्हणाला.

"तें सर्व खरें आहे. पण हें पहा, त्यांनीं तुला पाहिलें होतें. आतां जर मी तुझ्या ऐवजीं गेलों तर गैर समज होण्याचा संभव आहे. पण लग्न कार्य संपल्यावर तिला आपण सांगूं तसें वागावेंच लागेल." येन म्हणाला.

चियेनला या खेपेस सुद्धां जावेंच लागलें. त्यानें नवरदेवाचा पोशाख केला आणि वऱ्हाडाबरोबर पश्चिमी बेटाकडे निघाला.

मुलीच्या घरीं त्या दिवशीं नवऱ्या मुला करितां मोठ्या मेजवानीची तयारी केली गेली होती. ठरल्या मुहूर्तावर लग्न समारंभ संपला. मुलाबरोबर मुलीला पाठवून देण्याची वेळ आली. यूनें मुलीकडेच्या मानकऱ्यांना वस्त्रें दिलीं नोकरांचाकरांना इनाम व बक्षिसें वांटली.

निघण्याची सर्व तयारी झाली. तितक्यांत नावाडी धांवत येऊन म्हणाले—"आज निघणें अशक्य आहे. मोठें वादळ सुटलें आहे. या वादळांत प्रवास करणें बरोबर नाहीं." सर्वांना निराशा वाटली. परंतु गत्यंतरच नव्हतें. कावोनें सर्व वऱ्हाडी मंडळींना परत बोलाविलें आणि म्हणाला— "आज येथेंच रहा उद्यां वादळ संपल्यावर पाहिजे तर निघा."




दुसऱ्या दिवशीं तुफान कमी व्हायच्या ऐवजीं वाढूं लागलें. त्यांत बरफ पडूं लागलें. मुहूर्तावर निघणें शक्य झालें नाहीं म्हणून मुलाची राहण्याची व्यवस्था करावी लागली.

एका वृद्ध गृहस्थानें येऊन सूचना केली कीं जें होतें तें बऱ्यासाठींच होतें असें समजून पुढची तयारी करा. वऱ्हाडी मंडळी देखील या गोष्टीस कबूल झाली. पण चियेन व यू किंकर्तव्यविमूढ स्थितींत परस्परांचीं तोंडें पहात उभे राहिले. चियेननें विचार केला—"आपण या जाळ्यांत स्वतःला व्यर्थ ओढवून घेतलें. आतां पाय मागें घेणें देखील कठीण आहे. स्वतःचें असें कोणी जवळ नव्हतें सल्ला घ्यायला. आतां पर्यंत तो तोतया वर बनला होता. पण आतां प्रत्यक्ष वर होणें प्राप्त झालें होतें. त्याचें मन कचरूं लागलें. त्यानें यूला विचारावयाचें ठरविलें. पण तो तर खूप झिंगून पडला होता.

शेवटीं त्यानें स्वतः मुलीच्या वडिलांना येऊन निवेदन केलें—"घाई करण्याचें कारण नाहीं. हा मुहूर्त साधला नाहीं तर दुसरा मुहूर्त साधेल."

कावोनें चकित होऊन विचारलें—"कां बरें! हा मुहूर्त टळला नाहीं. मग पुढें ढकलण्याचें



काय कारण ?" चियेनला उत्तर सुचलें नाहीं. जेवणें खाणें आटोपल्यावर एका सुंदर शयन गृहांत वरवाधूच्या झोपण्याची व्यवस्था करण्यांत आली. चियेननें वधूकडे पाहिलें नाहीं कीं तिच्याशीं चार शब्द बोलला देखील नाहीं. तो पलंगावर एका बाजूला पडून राहिला.

तीन दिवस वादळ थांबलें नाहीं. चवथ्या दिवशीं वरवधूंना निरोप देण्यांत आला.

चियेन पळत पळत येनकडे गेला व घडलेलें सर्व वृत्त निवेदन केलें. वृत्त ऐकून येनला राग आला व त्यानें अविचारानें चियेनला बेदम बडविलें.

इतक्यांत कावोनें पुढें येऊन विचारलें—"आमच्या जांवयाला मारणारा तूं कोण उपटसुंभ्या ?" येननें वस्तुस्थिति मूर्खपणानें सांगून टाकली. त्यानें यूला धरून या फसवणूकीबद्दल खूप बडविलें. त्यानंतर येनच्या बाजूच्या लोकांचें कावोच्या बाजूच्या लोकांशीं युद्धच सुरू झालें. सुदैवानें त्याच वेळीं गांवचा न्यायाधीश पालखींत बसून तिकडून जात होता. त्यालें पालखी थांबवून भांडणाचें कारण विचारलें. त्यानें दोघांचें भांडण ऐकून न्यायनिवाडा दिला. येननें फसवून कावोच्या मुलीशीं लग्न करण्याचा घाट घातला होता म्हणून त्याला चवाठ्यावर कोरडे मारण्याची शिक्षा देण्यांत आली.

त्यानें चियेनला देखील दोषी ठरविलें. परंतु येनच्या हातचा मार मिळाल्यामुळें त्याला शिक्षा मिळाल्याचें सांगून न्यायाधिशानें त्याला निराळी शिक्षा सांगितली नाहीं.

नंतर न्यायाधिशानें कावोच्या मुलीचें चियेनशीं झालेलें लग्नच कायदेशीर आहे असा निवाडा दिला. कावोला आनंद झाला. तो आपल्या जांवयाला घेऊन पश्चिमी बेटावर गेला व त्याला घर जांवई करून घेतलें. चियेन व चियुफांगचा संसार सुखाचा झाला.





[ २ ]

इराण फार मोठा देश आहे. त्यांत त्या वेळीं कास्विन, खुर्दिस्तान, लुरिस्तान, चलिस्तान, इस्फहान, शिराज, शबनकारा व तूनकैसल नांवाचीं आठ निरनिराळीं राज्यें होतीं.

ह्या देशांतील उत्तम जातीचे घोडे भारतांत सुद्धां पाठविले जात असत. ह्या देशांत गाढवांचा वापर फार मोठ्या प्रमाणावर केला जात असे. कारण त्यांचा खाण्याचा खर्च कमी पडत असे. येथील एकंदर रहिवासी दुष्ट व निर्दयच. म्हणून व्यापाऱ्यांना ह्यांच्या पासून त्रास होऊं नये म्हणून तारतरी राजांनीं अनेक नियम अणि सोई केल्या होत्या.

इराणमधील मुख्य शहरांत याज्द नांवाचें एक सुंदर शहर होतें. तेथें व्यापारहि फार मोठ्या प्रमाणावर चालत असे. कर्मान राज्य इराणच्या अगदीं सीमेवर होतें. याज्दहून येथें येण्यास सात दिवसांचा प्रवास करावा लागतो. येथील डोंगरांत हिऱ्याचे दगड खूप मिळत असत. त्यामुळें येथील कारागीर सुद्धां हुषार होते. ते हिरे काढण्यासाठीं सोईचीं अशीं तऱ्हेतऱ्हेचीं लोखंडी हत्यारें तयार करीत असत.

कर्मान राज्यांतील लोक शांत व परोपकारी आणि सरळ स्वभावाचे म्हणून प्रख्यांत होते. त्या राज्या विषयीं एक विचित्र गोष्ट

## मार्कोपोलोच्या साहसपूर्ण सफरी



सांगतात. एकदां कर्मानच्या राजानें आपल्या राज्यांतील अनुभवी आणि वृद्ध लोकांना एकत्र बोलाविलें आणि म्हणाला—" आपल्या राज्याच्या आसपास असलेल्या पारस देशांतील लोक दुष्ट, कपटी व निर्दयी आहेत. पण आपल्या देशांतील लोक साधे, सरळ सज्जन कसे? ह्याचें काय कारण असावें?"

"हें काय विचारतां? ह्या मातींतच तो गुण आहे." वृद्धांनीं निवेदन केलें.

राजाच तो. त्याला पुरलें तेवढें. त्यानें लागलीच इस्फहान राज्यांत माणसें पाठविलीं आणि तेथून सात जहाजें भरून तिकडील माती मागविली. कांहीं खोल्यांतून ती पसरून दिली. त्यावर छान चांगलीं तरटें अंथरलीं. तो त्या खोल्यांतूनच आपल्या लोकांना मेजवान्या देऊं लागला आणि गम्मत अशी कीं जेवणें आटोपतां आटोपतांच लोक हमरातुमरीवर येत. एवंच गांवांतील वयोवृद्धांचें म्हणणें खरें ठरलें.

कर्मान शहरांपासून नऊ दिवसांच्या अंतरावर रुव्दर म्हणून एक देश होता. तेथें करौना जातीच्या डाकूंच्या टोळ्या राहात असत. ही जात तारतरी आणि भारतीय लोकांपासून उत्पन्न झालेली मिश्र जात होती.

अशा काळांत निग्रादार नांवाचा एक तारतरी दहा हजार फौज बरोबर घेऊन आर्मेनियाहून बदख्शान, पाशाय, काश्मीर मार्गानें दिल्वार राज्यांत त्यानें तेथील असिदीन नांवाच्या सुलतानाचा पराभव केला व स्वतः गादीवर बसला. त्यांच्याबरोबर ज्या भारतीय स्त्रिया होत्या त्यांच्यापासून जीं मुलें झालीं तींच करौना होत. असें म्हणतात कीं हे लोक मलबारांतून मंत्रविद्या शिकून आले होते आणि मंत्रबळानें दिवसा ढवळ्या अंधार करून व्यापाऱ्यांना लुटत असत आणि अटकाव करणाऱ्यांना ठार करीत असत व लहानांना व दुबळ्यांना पकडून गुलाम म्हणून विकून टाकीत असत.

रुव्दार देश सुपीक होता. तेथें आपल्या उंटांना व खेचरांना चरण्यास सोडून तेथून हे लोक होर्मूज बंदरांत हिंदुस्तानी लोक येण्याची वाट पाहात बसत असत. कोणी प्रवासी ह्यांच्या तावडींतून सुटणें फार कठीण असे. मार्कोपोलो कसा तरी सुटला. परंतु त्याच्या बरोबर असलेल्या लोकांपैकीं कांहीं पकडले गेले आणि कांहीं मारले गेले.

होर्मूज बंदरांत फार मोठा व्यापार चालत असे. पण येथें उष्मा इतका होत असे कीं येथील लोक ढेकणाप्रमाणें तडफडून मरत असत.

कर्मानच्या उत्तरेकडील प्रवास फारच त्रासाचा असे. वाटेंत तीन तीन दिवस पाणी मिळत नसे. तेथून पुढें एक गुस नदी आहे. तेथून पुढें पुन्हां चार दिवस पाण्याचें नांव नाहीं. एवढा प्रवास केल्यानंतर कूबनान शहर लागत असे. येथून पुन्हां आठ दिवस प्रवास केला म्हणजे तूनकैन राज्य लागत असे. हें राज्य इराण देशाच्या उत्तर सरहद्दीवर होतें. येथें एक मोठें मैदान होतें. त्या




मैदानांत एकच एक मोठा वृक्ष होता. त्याच्या तिन्ही बाजूस जवळ जवळ शंभर मैल आणि एका बाजूस सुमारें दहा मैल एवढ्या अंतरावर दुसरें कसलेंहि झाडच नव्हतें. म्हणून ह्या वृक्षाचें नांव 'एकांती वृक्ष' असें पडलें होतें.

ह्याच्या जवळ तुन्हत नांवाचा देश लागत असे. एके काळीं येथें अलाउद्दीन नांवाचा एक डोंगरी जातीचा राजा राज्य करीत असे. त्यानें एका खोऱ्यांत एक सुंदर गांव वसवलें होतें. तेथें सुंदर बगीचे केले आणि शोभिवंत इमारती मध्यें त्यानें सुस्वरूप स्त्रियांना आणून वसविलें होतें जणुं स्वर्गच

आहे असें भासत असे. येथें दूध आणि दारू यांचे पाट वाहात असत.

येथील राजा आपल्या शत्रूला आपल्या किल्ल्यांत बोलावून आणीत असे त्यांच्यावर निशा चढूं लागला कीं बागेंतील सुंदर स्त्रियांकडे पाठवून देत असे. त्यांचा निशा उतरला म्हणजे त्यांना वाटे आपण अगदीं स्वर्गांत आलों आहोंत.

जेव्हां त्यांच्या कडून मारेकऱ्याचें काम करून घ्यावयाचें असें त्या वेळीं पुन्हां त्यांना दारू पाजून झिंगल्यावर किल्ल्यांत आणीत. येथें आल्यावर नशा उतरला म्हणजे त्यांना वाटे "अरेरेरे! आपण स्वर्गांतून दूर लोटलों गेलों."- अशा मनः स्थितींत राजा येऊन त्यांना सांगत असे,—"तुला पुन्हां तें स्वर्गसुख पाहिजे असेल तर अमुक राजाला मारून ये." कोणाकडून कोणतें काम करून घ्यावयाचें हें तो डोंगरी राजा चांगलें ओळखत असे. त्यांच्या पाठीवर गुप्त हेर ठेवीत असे. ज्या लोकांनीं एकदां स्वर्गसुख अनुभवलेलें असे ते प्राणपणानें नेमून दिलेलें काम करीत. मग परतल्यावर त्यांना मोठमोठ्या मेजवान्या दिल्या जात.

'छोट्या खानां'च्या मध्यें हुलाग नांवाचा एक माणूस होता. ह्या डोंगरी राजाची बातमी त्यानें एकदां ऐकली. त्याला मारून टाकण्यासाठीं त्यानें सन १२६२ मध्यें एक मोठी सेना पाठविली. त्या सेनेनें तीन वर्षें पर्यंत किल्ल्याला वेढा दिला. डोंगरी राजाचा कोंडमारा झाला. सर्व अन्न सामुग्री संपल्यामुळें तो हुलागच्या स्वाधीन झाला. हुलागनें त्याची व त्यानें पोसलेल्या मारेकऱ्यांची कत्तल केली. अशा तऱ्हेनें त्या तारतार राजानें तेथील लोकांचा त्रास कमी केला. [पुढें चालू]



## गलिवरच्या सफरी



शिजवलेलें मांस गाडींतून व दूध पिंपांत भरून घेऊन आले.



गाडीभर मांस म्हणजे माझा एक घास सुद्धां होत नव्हता. अशा किती तरी गाड्या भरून मांस मीं खाल्लें.



काठोकाठ भरलेल्या पिंपानें माझा घसा साधारण ओला झाला तरी तें पेय प्याल्यावर मला निशा चढल्यासारखें झालें व झोप येऊं लागली.



नंतर त्या लोकांनीं माझ्या हातांत जे बाण घुसले होते ते काढून जखमेवर तेल चोळलें. माझी बेडी पण तोडून टाकली.



इंजीनियरांनीं सुतार लोहारांच्या मदतीनें एक ८४ इंच लांब व ४८ इंच रुंद अशी २४ चाकांची एक गाडी तयार केली. त्यांनीं मोठ्या प्रयासानें माझें शरीर त्यांत लोटलें.



चार साडेचार इंच लांबीचे १५०० घोडे त्याला जुंपले. त्यांना तेथून एकंदर २६४० फूट अंतर चालत जावयाचें होतें.



वाटेंत एका मुक्कामांत मोठी मजा झाली. तीन खट्याळ माणसें माझ्या तोंडावर चढून माझ्या नाकांत भाला खुपसूं लागली.



मी जागा झालों मला शिंक आली. त्या बरोबर ते तिघेहि धडामदिशी खालीं पडले.





शहराच्या बाहेर एका मैदानांत गाडी थांबली. तेथें त्या राज्यांतील सर्वांत मोठी इमारत होती. म्हणजे त्याची उंची आठ फूट होती. मी अंगडाई देऊन उठलों तर माझें अवाढव्य शरीर पाहून सर्व छोटी माणसें भिऊन बाजूला पळून गेली. मी चारी बाजूला पाहिलें तर मला जिकडे तिकडे खेळांतल्या प्रमाणें लहान लहान घरकुलें दिसलीं.



त्यांनीं माझ्या डाव्या पायाला लहान लहान साखळदंड जखडून बांधले होते. मला हिंडा-फिरायला फक्त सहा फूट जागा ठेवली होती.



तों पर्यंत मला पाहण्यासाठीं लाखों लोक जमले होते. 'झू' मधला जणुं एक प्राणीच. तेव्हां प्रत्यक्ष राजा सुद्धां तेथें आला होता.



मी राजाला लवून विनयपूर्वक नमस्कार केला. त्या मुळें राजा फार खूष झाला. त्यानें लगेच आज्ञा दिली-"जो कोणी ह्याला त्रास देईल त्याला जबरदस्त शिक्षा दिली जाईल." त्या नंतर माझ्या खाण्या पिण्याची व्यवस्था करून आणि मला लिलिपुट भाषा शिकवावयास एक शिक्षक ठेऊन तो निघून गेला.



कांहीं दिवसांनीं राजाच्या दोन प्रतिनिधींनीं येऊन माझे खिसे तपासण्याची परवानगी मागितली.



अर्थातच मी त्याला मान वांकविली. नंतर त्यांना आपल्या हातांत घेऊन मी मोठ्या सावध



"पर्वतकायाच्या कोटाच्या उजव्या खिशांत एक एकर क्षेत्रफळाचें एक खरखरीत कापड आहे."



उजव्या खिशांत एक मोठा चांदीचा पेटारा मिळाला. तो उघडण्यास फारच प्रयास पडले.




त्या पेटाऱ्यांत एका तऱ्हेची माती सारखी पूड होती. तिचा दर्प नाकांत जातांच आम्हांला सारख्या शिंका येऊं लागल्या.



त्याच्या छातीवरच्या खिशांत एक लाकडी आणि एक लोखंडी अशीं दोन यंत्रें होती. त्यांचा तो काय उपयोग करतो देव जाणे.



छातीवरील खिशांतून टिक् टिक् असा सारखा आवाज येत होता. त्यामुळें कानठळ्या बसत होत्या. ती वस्तु त्यानें स्वतःच काढून दाखविली.



त्या महायंत्रांत दोन मोठाल्या लोखंडी तुळ्या फिरत होत्या. त्या यंत्राला पाहिल्या शिवाय तो कांहीं एक काम करीत नाहीं.



# गंगावतरण

(चतुर्थ अध्याय)

यज्ञ उर्वशीनें केले पण
निष्फळ झाले ते सारे।
व्यर्थ समजुनी तीच परतली
उतरलें तिचें तें वारें ॥

भगीरथाचें यशस्वि झालें
खडतर तप पण वर्षाचें।
ब्रह्मदेव तरि करिल कधीं का
प्रयत्न निष्फळ वर्षाचे ॥

प्रसन्न झाला भगीरथाला
"ऊठ भगीरथ" अन् वदला।
डोळे उघडुन भगीरथानें
प्रणाम केला; मग वदला—

"जगतपिता तूं, दयानिधी तूं
अंतर्यामी, तूं भगवान।
करुनि अनुग्रह द्यावें मजला
मागुं एक का मी वरदान ॥

नको राज्य मज भुवनाचें कीं
वैभव स्वर्गीचें मोठें;
इच्छा यावी गंगाधारा
कशीतरी भूवर कोठें ॥

"तथास्तु!" वदला ब्रह्मदेव अन्
दिव्य कमंडल तें हललें;
खवळुनि उठली गंगा; वदली—
"काय पाप प्रभु मी केलें?

"मृत्युलोकिं मज ढकलुनि माझा
करिसी देवा कां अपमान?
भगिनी ना मी तुझी राख मग
बरोबरीनें माझा मान ॥

पापी पृथ्वी पतितांची ती
सोडणार मज तिजवर का?
सोडुनि सुख हें कष्टी होउनि
तिजवर राहूं शकेन का?"

श्री. मालचंद्र आपटे, हैदराबाद

हरहर शंभो, पार्वतीपते !
चंद्रशेखरा, सदाशिवा !
धारण कर तूं गंगाधारा
जगतां करण्या सुखी शिवा !

शंकर वदला प्रसन्न वदनें
"उतरण्यास तिज सत्वर सांग !
शिरिंत माझ्या करीन धारण
सुखें येउंदे, तिजला सांग !"

शिखा सोडुनी तयार शंकर
झाला, पाहुनि भ्यालें जग।
नभाकडे पाहुनिया थरथर
कापुं लागलें सारें जग ॥

भगीरथानें केलि प्रार्थना–
"उतर शिवाच्या शिरिंत तूं।
पावन धारेनें हे शुभ गे
पवित्र कर या जगतां तूं ॥"

वरुन पाहिलें गंगेनें पण
तयार दिसला तिज शंकर।
मुद्रा त्याची परंतु होती
तेव्हां अतिशय प्रलयंकर ॥

धज न पुढती पडण्या पाउल,
कापुं लागलें थरथर अंग।
कापुं लागलें विश्व चराचर
होतें नभ कीं जग हें भंग ॥

पळूं लागले दिग्गज, दिग्पति
डोलुं लागली अन् धरती।
वांकु लागला शेषनाग पण
धरा होति डोक्यावरती ॥

'त्राहि त्राहि'चा घोष चतुर्दिक
होउं लागला त्या वेळीं।
जवळीं येउनि प्रलय ठेपला
जगा वाटलें, त्या वेळीं ॥





# ✻ विष्णुसेन ✻

कुन्तिभोज वैरन्त्य नगराचा राजा होता. त्याला दोन बहिणी होत्या. एकीचें नांव सुदर्शना होतें. ती काशी राजाची राणी होती. दुसरी सुचेतजा. तिला सौवीर राजाला दिलें होतें.

सुदर्शनाला वाटलें कीं आपल्याला एक फार तेजस्वी पुत्र व्हावा. म्हणून तिनें कुन्ती प्रमाणेंच मंत्रोच्चारानें अग्निदेवाचा साक्षात्कार करून घेतला. त्याच्या कृपेनें तिला पुत्र प्राप्त झाला. पण तिला भीति वाटूं लागली कीं जर हें काशीराजाला समजलें तर तो क्षमा करणार नाहीं. म्हणून तिनें आपल्या मुलाला सुचेतनाकडे पाठवून दिलें. कारण ह्याच सुमारास तिलाहि एक मुलगा झाला होता; पण तो लगेच मरून गेला होता. तिनें आपल्या बहिणीच्या मुलाला ठेवून घेतलें. सौवीर राजाला संतानप्राप्तीची कल्पना होती. परंतु पुत्र मरण पावल्याची बातमी नव्हती. त्यामुळें त्याला हें सर्व कळलें नाहीं. सुचेतनानेंहि त्या मुलाचें पालन पोषण अगदीं स्वतःच्या मुलाप्रमाणेंच केलें. त्याचें नांव तिनें विष्णुसेन असें ठेविलें.

विष्णुसेन अग्नितेजानें वाढूं लागला. ल्हान पणापासून त्याचे दैवी गुण दृष्टीस पडूं लागले. तो सहा वर्षांचा असेल, एक राक्षस लांडग्याच्या रूपानें येऊन मुलांना फार त्रास देऊं लागला. विष्णुसेनानें त्याला ओळखलें आणि त्यानें त्याचा संहार केला. तेव्हांपासून सर्व त्याला अविमारक म्हणूं लागले. (त्याचा अर्थ लांडग्याला मारणारा.)

एकदां सौवीर राजा जंगलांत शिकार खेळावयास गेला. तेथें वाटेंत चंडमारक मुनीचा आश्रम होता. राजाला तो मुनी म्हणाला–"माझ्या शिष्यांना व्याघ्रसिंहाचा



त्रास होत आहे. जंगली प्राण्यांपासून आश्रम-वासियांचें रक्षण करणें राजाचें काम आहे. मग तूं आपलें कर्तव्य पालन नीटपणें कां नाहीं करीत ?"

मुनीचें हें उद्धटपणाचें बोलणें राजाला आवडलें नाहीं. त्याला राग आला. तो म्हणाला—"तूं मुनीचा वेश करून बसलेला कोणी चांडाळ माणूस दिसतो आहेस."

मुनीनें क्षणाचाहि विलंब न लावतां शाप दिला. "तूं आपल्या बायको मुलासह चांडाल होशील." हें ऐकतांच राजा गयावया करूं लागला. त्यानें मुनीचे पाय पकडून क्षमा मागितली. मुनीनें शांत होऊन सांगितलें कीं त्याच्या शापाचा प्रभाव फक्त एक वर्षभर राहील.

सौवीर राजा आपल्या गांवीं गेला. आपलें राज्य मंत्र्यांच्या स्वाधीन करून आपल्या बायको व मुलाला घेऊन तो अज्ञातवासासाठीं निघाला. जातां जातां तो वैरन्त्य नगरीं जाऊन पोहोंचला. अविमारक त्यावेळीं सुमारें अठरा वर्षांचा असेल.

वैरन्त्य राजाला एक मुलगी होती. तिचें नांव कुरंगी. ती उपवर झाल्यामुळें राजा कुन्तिभोज वरशोधनाच्या मार्गे लागला होता.

एक दिवस कुरंगी एका मंत्र्याबरोबर राजोद्यानांत हवा खाण्यासाठीं गेली. कांहीं वेळ हिंडल्याफिरल्यावर ती परत येऊं लागली. इतक्यांत अंजनवारी हत्ती मस्त होऊन गांवांत पळत सुटला असलेला तिनें पाहिला. त्यानें आपल्या माहुतालाहि खालीं पाडून टाकला होता. रस्त्यांत सर्वकडे पळापळ सुरू झाली. कुरंगी आपल्या गाडींत बसून घरीं जाण्यास निघाली होती. पण मस्त हत्ती तिच्या रथाकडेच धांवून येत होता. तिनें चटदिशीं रथांतून उडी मारली व पळत सुटली.





मस्त हत्तीची वार्ता ऐकून अविमारक त्याला पकडण्यासाठीं तेथें आला. त्यानें हत्तीला डंवचून त्याचें चित्त आपल्याकडे वेधून घेतलें. ही संधि साधून मंत्र्यानें कुरंगीला रथांत बसवून राजवाड्याकडे पाठवून दिलें. परंतु एवढ्या अवधींत राजकुमारीनें अविमारकाला पाहिलें आणि त्याचीहि दृष्टी तिच्यावर पडली. दोघांची दृष्टादृष्ट होतांच मनेंही चंचल झालीं. चौकशी अंतीं राजकुमारीला समजलें कीं अविमारक चांडाळ आहे.

कुंतिभोजाच्या मनांतून कुरंगीचें लग्न सौवीर राजाच्या मुलाशीं करून द्यावयाचें होतें. आणि कांहीं वर्षांपूर्वी सौवीर राजानें तशी मागणी घातलीहि होती. परंतु तेव्हां कुरंगी लहान असल्याचें कुन्तिभोजानें कळविलें होतें. आतां तो सौवीरकडून निरोप येण्याची वाट पाहात होता. परंतु त्याचा कांहींच निरोप आला नाहीं. सुदर्शनाला दुसरा मुलगा झाला. त्याचें नांव जयवर्मा होतें. त्याच्यासाठीं सुदर्शनानें कुरंगीला मागणी घातली. परंतु कुंतिभोज अविमारकालाच जांवई करूं इच्छित होता. ह्याचें दुसरें कारण असें कीं सौवीर कुरंगीचा मामा होता.



कुन्तिभोजानें सौवीर राजाकडे आपले दूत पाठविले. परंतु तेथील मंत्र्यांनीं सांगितलें कीं राजा आपल्या बायकोला व मुलाला घेऊन कोठें तरी गेला आहे. कोठें गेला आहे ह्याचा आम्हांलाहि पत्ता नाहीं.

कुरंगीनें आपल्या दासींना पाठवून त्या युवकाविषयीं चौकशी करून येण्यास सांगितलें.

दासींनीं अविमारकाचा शोध लावला व त्याला रात्रीं येऊन कुरंगीला भेटून जाण्यास सांगितलें.

अविमारकाचें मनसुद्धां चंचल झालेंच होतें. परंतु जावें किंवा नाहीं ह्या विचारांत

तो होता. इतक्यांत त्याचा एक ब्राह्मण मित्र तेथें आला. त्यानें त्याला दुजोरा देऊन जाण्यास सांगितलें.

त्या दिवशीं रात्रीं तो तलवार आणि दोरखंड घेऊन राजवाड्यांत गेला. कुरंगीच्या दासी त्याची वाट पाहातच होत्या. त्यांच्या मदतीनें तो कुरंगीच्या महालांत जाऊन पोहोंचला. तेव्हांच त्या दोघांनीं आपला गांधर्व-विवाह करून घेतला.

तेव्हांपासून तो मधूनमधून येऊन कुरंगीला भेटत असे. एकदां असाच तो कुरंगीकडे गेला असतां राजाला समजलें कीं कोणी तरी कुरंगीकडे आला आहे. त्यानें चौकशी केली. अविमारक कस तरी तेथून निसटला. परंतु तेव्हां पासून राजानें तिच्यावर कडक पाहारा ठेविला.

कुरंगीला फार दुःख झालें. पण उपाय नव्हता. इकडे अविमारकानें सुद्धां कुरंगीकडे येण्याचें सोडून दिलें. परंतु त्याला तिचा विरह सहन होईना. शेवटीं त्यानें अग्निप्रवेश करून आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला. पण अग्नीच त्याचा पिता असल्यामुळें त्याला त्यापासून कांहीं इजा झाली नाहीं. मग तो कड्यावरून उडी मारून जीव देण्यासाठीं



सिद्ध झाला. परंतु त्याच वेळीं कोणी विद्याधर नांवाचा ब्राह्मण आपल्या बायकोसह तेथें आला होता. त्यानें त्याला अडविलें. विद्याधरानें त्याची सर्व हकीगत ऐकून घेतली आणि त्याला म्हणाला—"ही जादूची अंगठी तूं आपल्या जवळ ठेव. उजव्या हाताच्या बोटांत घातलीस तर अदृश्य होशील आणि डाव्या हाताच्या बोटांत घालशील तर दिसशील. हिच्या मदतीनें तूं आपल्या बायकोची भेट घे.

आतां अविमारक दिवसाच कुरंगीच्या भेटीला निघाला. उजव्या हाताच्या बोटांत अंगठी घालून तो कुरंगीच्या महालांत गेला. तेथील दृश्य पाहून तो फार घाबरला. कुरंगीलाहि विरह वेदना असह्य झाल्यामुळें गळफास लावून घेऊन ती आत्महत्येचा प्रयत्न करीत होती. अविमारकानें प्रकट होऊन तिला वांचविलें. त्याला समोर पाहतांच तिला आनंद झाला. अविमारकानें घडलेलें वृत्त वर्णन करून तिला सांगितलें. तेव्हां पासून तो नेहमीं अदृश्य रूपानें येऊन तिला भेटूं लागला.

इकडे जयवर्मा कुरंगीशीं लग्न करण्या-साठीं आपल्या आजोळीं आला. परंतु



कुरंगीच्या आईनें सांगितलें कीं जोंपर्यंत आपल्या भावाचा मुलगा विष्णुसेन ह्याचा पत्ता लागणार नाहीं तोंपर्यंत कुरंगीचें लग्न करणार नाहीं.

सौवीर शापमुक्त होतांच कुन्तिभोजाकडे आला. त्याला उदास पाहून कुन्तिभोजानें त्याचें कारण विचारलें. तो म्हणाला—"कांहीं दिवसांपासून माझा मुलगा कुठें दिसत नाहीं. कोठें असेल कोण जाणें."

नारायण, नारायण, करीत तेथें नारद आला. कुन्तिभोजराजानें त्याचें स्वागत केलें. नंतर त्याला विचारलें कीं सौवीर राजा पुत्र विरहानें फार दुःखी झाला आहे. त्याचा मुलगा जिवंत तरी आहे का? तो केव्हां परत येईल?"

"जिवंतच काय, तो तर आपल्या लग्नाच्या गडबडींत आहे." नारद म्हणाला.

"काय म्हणतां? कोणाच्या मुलीशीं त्यानें लग्न केलें आहे?" कुन्तिभोजानें आश्चर्यानें विचारलें.

"वैरन्त्य नगराच्या कुन्तिभोज राजाच्या कुरंगी नांवाच्या कन्येशीं त्यानें लग्न केलें आहे." नारदानें सांगितलें.

नंतर सविस्तर बातमी कळल्यावर त्यानें त्या दोघांचें शास्त्रोक्त विधीनें लग्न लावण्याचें ठरविलें.

नारदानें सुदर्शनाची समजूत घातली. म्हणाला—"तुझा जयवर्मा लहान आहे. म्हणून त्याचें लग्न कुरंगीच्या धाकट्या बहिणीशीं लावलेलें बरें."

सुदर्शनाला तें पटलें. कारण तिला माहीत होतें कीं विष्णुसेनसुद्धां तिचाच मुलगा होता.

ठरल्याप्रमाणें राजा कुन्तिभोजा यानें विष्णुसेन व कुरंगीचें लग्न लावून दिलें.





# वेरूळचीं लेणीं

आपल्या देशांतील वेरूळचीं लेणीं जगप्रसिद्ध आहेत. हीं लेणीं महाराष्ट्र प्रांतांत असून औरंगाबादहून १३ मैलावर आहेत. येथील सर्व खोदकाम एकाच दगडामधून केलेलें आहे. ह्यांत सुंदर सुंदर मूर्ती कोरल्या आहेत.

ह्या गुहांमधील पहिल्या १२ गुहा बौद्धांच्या आहेत. ह्या सुमारें सन् ३५०-७५० च्या दरम्यान बनविल्या गेल्या आहेत असें म्हणतात. पुढील १७ गुहा हिंदूंच्या आहेत. ह्यांत शिवपार्वती वगैरे देवांच्या मूर्ती आहेत. ह्यांत कैलास मंदिर विशेष सुंदर आहे. सन ७३५-७५५ ह्याचा निर्माणकाल समजला जातो. ह्या मंदिराची लांबी २७६ फूट आहे. रुंदी १५ फूट ते १०८ च्या दरम्यान आहे. एवढें मोठें देऊळ एका सबंद दगडांत कोरलेलें आहे. (ह्या मंदिरांतील एका स्तंभाचें चित्र बाजूला दिलें आहे.)

ह्या शिवाय ५ गुहा ई. सनाच्या ८ ते १३ शतकांत जैनांनीं बनविल्या आहेत. पंधराव्या शतकांत आलेल्या एका अरब यात्रेकरूच्या म्हणण्याप्रमाणें ह्या भागांत तेव्हां लोकांची जा ये बरीच होती. बरेच यात्रेकरू येथें जात येत असत.



# विचित्र उपदेश

❋

"बैरागी"

एका गांवीं कनकनदत्त नामें एक सावकार रहात असे. त्यानें आपल्या धंद्यांत पुष्कळ नांव मिळविलें. त्याला धनदत्त नांवाचा एकुलता एक मुलगा होता. श्रीमंतींत वाढलेला. अक्षरशून्य व बेजबाबदार निघाला. गूण पाघळूं लागले. तारुण्य आलें. सारासार गोष्टींचा विचार कोठून येणार ? पाण्यासारखा पैसा खर्च होऊं लागला आणि धनदौलतीनें कायमचा सलाम ठोकला.

काळजीनें म्हातारा बाप आजारी पडला. त्याला मुलाची स्थिति पाहवेना. मुलाला जवळ बोलावून म्हणाला—"बाळ, धन म्हणजे लक्ष्मी. ती देवी आहे. जो तिला घराबाहेर काढतो त्याच्या हातीं करवंटी येते. त्या हीन स्थितींत दिवस कंठण्यापेक्षां मरण पत्करलें. तूं पण विचार कर. तशी वेळ आलीच तर आढ्याला दोरी बांधून फांस लावून घेऊन मोकळा हो. दुसऱ्याचें तळवे चाटीत बसण्यापेक्षां असे मरण आलेलें बरें नव्हे का ?" असा मुलाला शेवटचा उपदेश करून बापानें डोळे मिटले ते पुन्हां उघडले नाहींत. आतां मुलगा मन मोकळपणानें पैसे उधळूं लागला.

सर्व होतें नव्हतें तें घालवून बसला कर्जाचा बोजा डोक्यावर वाढला. तोंड दाखवायला जागा उरली नाहीं तेव्हां कोठें बापानें केलेल्या उपदेशांची आठवण झाली. आतां हें जिणें व्यर्थ आहे. बाबांनीं हेंच आढें दाखविलें होतें आपल्याला, असा विचार करून त्यानें त्याला दोरी बांधली आणि गळ्याला फांस लावून लोंबकळूं लागला. पण नशीब दांडगें होतें. आढेंच तुटलें आणि तो जमिनीवर आदळला. त्याबरोबर हिऱ्या मोत्यांचा जणुंकांहीं पाऊस पडला. बापानें लपवून ठेवलेला धनाचा सांठा सांपडला.

तेव्हां त्या विचित्र उपदेशाचें कारण त्याला कळलें. त्याचे डोळे उघडले. हात संभाळून राहूं लागला. उद्योगधंदा करण्याचें त्यानें ठरविलें. त्याला कृतकर्माची लाज वाटूं लागली.



# मोठ्यांची रीत

[सौ. मंदा बोडस]

★

एक चिमुकलें फूल उमलेलें एका दगडाआड
डोकावुनि तें पाहुं लागलें, हंसलें भारी गोड।

खूप उमललीं फुलें भोंवतीं तऱ्हेतऱ्हेचीं छान
गुलाब चंपक, जुई, मोगरा, केतकि बकुळी सान।

बडे बडे ते लोक पाहुनी फूल मनीं बावरलें,
तोंच म्हणाला, गुलाबदादा, कोण कुणाचा तूं रे।

कूळ कोणतें ? जात कोणती ? कोण तुझी रे माता
हलक्या कुळिचा दिससी मजला, काळें कर जा आतां।

सुगंध नाहीं स्वरूप नाहीं, श्रीमंतीची हांव
कशास करिसी क्षुद्र तूं रे, क्षुल्लक तूं रे 'जाव'।

शब्दांचा भडिमार ऐकुनी, कांपे थरथर फूल
कोमेजुनि तें जाई, मिटले नयन, होई मलूल।

सूर्यराज उगवला, उजळली पूर्वा आनंदानें
हळूंच उघडी नयन पाकळ्या, फूलहि इवलें चिमणें।

सुंदर जग हें आवडलें ना ? माझ्या चिमण्या राजा,
विहार करि रे आनंदानें वाऱ्याशीं कर मौजा ?

कुरवाळुनि मुख, चुंबन घेई, सूर्य निघाला पुढती,
मोठ्यांची ती रीत खरोखर, अशीच असते जगतीं।




दोन्ही सैन्यें लढत होतीं. आजच अकरावा दिवस. घनघोर युद्ध चाललें होतें. आज अभिमन्यूचा पराक्रम पाहण्यासारखा होता. इकडे भीम आणि शल्याचें युद्ध जुंपलें. पण त्यांत शल्य हारला आणि पळून गेला. द्रोण बाकी पांडवांशीं युद्ध करण्यांत गुंतला होता.

युधिष्ठिर त्यावेळीं पांचाल सेनेमध्यें होता. सिंहसेन आणि व्याघ्रदत्त त्याच्या जवळच होते. त्या दोघांना मारून टाकून द्रोणाचार्य युधिष्ठिराजवळ आला. त्याबरोबर सर्व सैन्यांत हाहाकार उडाला. त्यांना वाटलें, आतां युधिष्ठिर जिवंत पकडला जाणार. ही बातमी कळतांच अर्जुन धांवतच तेथें आला आणि कौरव सेनेवर बाणवृष्टि करून त्यांना 'दे माय धरणी ठाय' करून सोडलें. अशा तऱ्हेनें आजचें युद्ध संपलें.

द्रोणाला फार वाईट वाटलें. तो शिबिरांत गेल्यावर दुर्योधनाला म्हणाला—"आज मी युधिष्ठिराला पकडून तुझ्या स्वाधीन करण्याच्या विचारांत होतों. पण तेवढ्यांत तेथें अर्जुन आला. त्याला जर कोणी दुसरीकडे युद्धांत गुंतविलें तर एका घटकेंत माझें काम होऊन जाईल. पण अर्जुन जवळ असला तर मात्र कांहीं जमणार नाहीं. त्याला आपण जर का पकडूं शकलों तर युद्धाची ही कटकट थांबेल."

हें ऐकून त्रिगर्तांचा राजा सुशर्मा म्हणाला—"महाराज, आमचा फार पूर्वींपासून अर्जुनावर राग आहे. कधींहि त्याच्या वाटेस गेलों नसतां तो वेळोवेळीं विना कारण आमचा अपमान करीत असतो. तेव्हां त्याचा सूड उगवावयाला ही फार चांगली संधि मिळाली आहे. उद्यां आम्ही त्याच्याशीं युद्ध करूं. त्याला युक्तीनें युधिष्ठिरापासून दूर घेऊन जाऊं. तेथेंच त्याला कळेल की कोण जिवंत राहातो."

सुशर्मानें म्हटल्याप्रमाणें अर्जुनाशीं युद्ध करण्यासाठीं सेना तयार झाली. त्यांत सत्यरथ, सत्यवर्मा, सत्येष्ट, सत्यव्रत, सत्यकर्मा वगैरे सर्व भाऊ दहा हजार रथ घेऊन आले. मालव व तुंडिकेर तीस हजार रथ घेऊन आले. त्या शिवाय सुशर्मांचे व त्याच्या भावाचें मिळून दहा हजार रथ होतेच. हें सारें सैन्य युद्धक्षेत्रांत येऊन पोहोंचलें. तेथें त्या सर्वांनीं अग्नीला साक्ष ठेवून प्रतिज्ञा केली. म्हणाले—"जोंपर्यंत ह्या शरिरांत प्राण आहे तोंपर्यंत आम्ही अर्जुनाला रणक्षेत्रांतून जाऊं देणार नाहीं. आम्हीं युद्धभूमि सोडून जाणार नाहीं. जर समजा युद्धांतून पळून गेलों तर आम्हांला नरक यातना भोगाव्या लागतील." अशा तऱ्हेची प्रतिज्ञा करणाराला 'संसप्तक' म्हणतात. म्हणून ह्या सर्वांनाच 'संसप्तक' असें नांव पडलें.

सर्व संसप्तकांनीं अर्जुनाला युद्धाला आह्वान केलें. अर्जुनाची वास्तविक त्याच्याशीं युद्ध करण्याची इच्छा नव्हती. परंतु युद्धाचें आह्वान नाकारणें त्याला अपमानाचें वाटलें. म्हणून तो जाण्यास तयार झाला.



"मला पकडण्याची द्रोणाचार्यांची प्रतिज्ञा माहीत आहे ना?" त्याच वेळीं येऊन युधिष्ठिरानें विचारलें.

"होय. पण दादा मी येईपर्यंत सत्यजित, तुझ्या पाठीशीं राहील आणि समज तो मारला गेला तर तूं रणांगण सोडून पळून जा. मला वाटतें, तो प्रसंग वास्तविक येण्याचें कारण दिसत नाहीं. तोंपर्यंत मी येईनच." अर्जुन म्हणाला व कडकडून भेटून त्याचा निरोप घेतला. त्याला नमस्कार करून तो संसप्तकांनीं सांगितलेल्या युद्धभूमीकडे वळला. ती जागा युद्धभूमीच्या दक्षिणेकडे होती. चंद्राकार व्यूह



रचून अर्जुनाला तोंड देण्यासाठीं सज्ज होती. अर्जुन आपलें गांडीव धनुष्य घेऊन एकटाच त्या बाजूला पोहोंचला.

संसप्तकांच्या सैन्यांतील सुधर्मा नांवाच्या सेनापतीला बाण लागतांच त्याचें सैन्य सैरांवैरां पळूं लागलें. हें पाहतांच सुशर्मा ओरडला—"सेनापती पडला म्हणून काय झालें? पळूं नका, चला फिरा मागें. आपली प्रतिज्ञा आठवा. वचन न पाळतां पळून गेलांत तर दुर्योधनाला कोणतें तोंड दाखवणार?" सुशर्मानें दरडावल्यावर सर्व सैन्य पुन्हां युद्ध करूं लागलें. परंतु अर्जुनाजवळ जाण्याची कोणाचीहि हिम्मत होईना, तो मत्त हत्तीप्रमाणें संसप्तकांचा नाश करीत होता.

इकडे मुख्य युद्धभूमीवर कौरव पांडवांचें युद्ध चाललेंच होतें. आज महायुद्धाचा बारावा दिवस होता. अर्जुन संसप्तकांकडे गुंतला असल्यानें द्रोण युधिष्ठिराच्या जवळ येण्याचा प्रयत्न करीत होता. आपण आज त्याला पकडून दुर्योधनाच्या स्वाधीन करूं असा द्रोणाला विश्वास वाटत होता. म्हणून तो सारी शक्ति एकवटून लढत होता.

द्रोणाच्या बाणांना सत्यजितानें मोठ्या शौर्यानें तोंड दिलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं त्याला व त्याच्या सहायकाला वीरगति मिळाली. ते युद्धभूमीवर पडतांच अर्जुनानें सांगितल्याप्रमाणें युधिष्ठिरानें आपला रथ द्रोणापासून खूप दूर नेला. तो दूर निघून गेल्यानंतर पांडव सैन्यांतील वीर द्रोणाचार्यांशीं युद्ध करूं लागले. त्यांत पांचाल नांवाचा एक राजकुमार मारला गेला. तरी भीमानें त्याच्या सैन्याला धीर दिला. भीम सुद्धां त्यांच्या बरोबरच तेथें होता. त्यानें गजदलाकडे दृष्टि फिरविली व त्यांचा संहार करूं लागला. हें पाहतांच भगदत्त आपला प्रसिद्ध हत्ती घेऊन पांडवांच्या सैन्यांत घुसला आणि सर्व सैन्याला उधळून देऊं लागला. पांडव सैन्यांतील मोठमोठे वीर सुद्धां घाबरून पळूं लागले. भीमाचाहि त्याच्या समोर पाडाव लागला नाहीं. अर्थातच पांडव सैन्याची पीछेहाट होऊं लागली.

अर्जुनाला ही बातमी कळली. त्याबरोबर तो कृष्णास म्हणाला—"भगदत्त आपलें सैन्य उधळून देत आहे. चल लवकर रथ घेऊन त्या बाजूला. भगदत्ताचा समाचार मलाच घ्यायला हवा." अर्जुनाच्या आज्ञेप्रमाणें कृष्ण रथ वळविणार होता, तेवढ्यांत सुशर्माच्या सैन्यानें अर्जुनाला चारी बाजूंनी घेरलें. अर्जुनानेंहि त्या सर्वांना धैर्यानें तोंड दिलें. एकीकडे अर्जुनाचें युद्ध चाललें होतें. इकडे कृष्ण हळूं हळूं रथ कौरव सैन्याच्या रोखानें नेत होता. अर्जुनाच्या पराक्रमामुळें सुशर्मा मागें सरला. त्याचा भाऊ तर मारलाच गेला.

क्षणभरांत अर्जुनाचा रथ कौरव सैन्यांत घेऊन पोहोंचला आणि तो भगदत्ताशीं युद्ध करूं लागला. अर्जुनाच्या रोखानें





भगदत्तानें बाण सोडले. परंतु ते अर्जुनाला लागलेच नाहींत. बऱ्याच वेळानें एका बाणानें त्याचा मुगुट थोडा सरकला एवढेंच. तो सारखा करीत अर्जुन फक्त एवढेंच म्हणाला—"वाहवा रे नेम!"

हें वाक्य कानावर पडतांच भगदत्ताचा चेहरा लाल झाला. त्यानें लगेच वैष्णवास्त्र काढलें. मंत्र म्हटला व तें अर्जुनावर सोडलें. तें अस्त्र अचूक अर्जुनाकडे जात होतें. जवळ येतांच कृष्ण झटकन् उभा राहिला व त्याला आपल्या छातीवर घेतलें आणि असा चमत्कार झाला कीं त्या वैष्णवास्त्राची एक सुंदर पुष्पमाला झाली आणि कृष्णाच्या गळ्यांत वैजयंतिमाळेप्रमाणें शोभूं लागली.

आपलें रक्षण कृष्णानें केलें. ह्याचा अर्जुनाला फार राग आला. तो म्हणाला—"मी संकटांत असतां तूं माझें रक्षण केलेंस तर ठीक होईल. पण माझ्या हातांत गांडीव असतां तूं माझें रक्षण करणें बरें नाहीं. मला त्यांत अपमान वाटतो."

"तें सर्व खरें. पण अर्जुना! मी जें केलें त्याला कांहीं अर्थ आहे. भूदेवीनें आपल्या-मुलाच्या रक्षणाकरितां हें अस्त्र मिळविलें व लाडक्या मुलाला म्हणजे नरकासुराला तें दिलें. तें अस्त्र मिळाल्याबरोबर तो राक्षस मातला आणि तिन्ही लोकांना त्रास देऊं लागला. शेवटीं त्याला मारण्याची माझ्यावर पाळी आली. त्यानंतर त्याचें हें अस्त्र त्याचा मुलगा भगदत्त याला मिळालें. ह्या अस्त्रा-मुळेंच त्याला कोणी जिंकूं शकत नव्हतें. आतां त्याची शक्ति पार गेली. आतां तूं त्याला सहज जिंकूं शकशील. कृष्णाचा इशारा होतांच अर्जुनानें प्रथम एक बाण भगदत्ताच्या हत्तीच्या गंडस्थलावर मारला. त्या सरशीं तो खालीं पडला. त्यानंतर दुसरा बाण सोडून त्यानें भगदत्ताला वीरगतीस पोहोंचविलें.





त्या दिवशीं अर्जुनानें अनेक वीरांना मुक्ति दिली. त्यांत शकुनीचे भाऊ वृषक व व अचल आणि कर्णाच्या भावांना तर त्यानें कर्ण व दुर्योधनाच्या समोरच मारलें.

आजचा दिवस पांडवांना चांगला अनुकूल होता. अर्जुनानें आज कौरव सैन्याला त्रस्त करून सोडलें होतें. द्रोणाची प्रतिज्ञा आजहि पूर्ण झाली नाहीं. युधिष्ठिर त्याच्या हातीं सांपडला नाहीं.

त्या दिवसाचें युद्ध संपलें. कशीबशी रात्र देखील संपली. दुसरा दिवस उजाडतांच दुर्योधन द्रोणाचार्यांकडे गेला. म्हणाला—"तुमचें सुद्धां आम्हीं शत्रूच आहोंत. म्हणूनच तुम्ही युधिष्ठिराच्या अगदीं जवळ जाऊन सुद्धां त्याला पकडलें नाहींत. वचन पूर्ण होण्याच्या बेतांत आल्याबरोबर आपला विचार बदललात हीं काय मोठेपणाचीं लक्षणें म्हणायचीं? मग मृगजळाप्रमाणें आम्हांला ही आशा कशाला दाखवितां?"

दुर्योधनाचें हें बोलणें ऐकून द्रोणाचार्यांला लाज वाटली आणि दुःखहि झालें. तो म्हणाला—"दुर्योधना! राजा झालास म्हणून काय झालें. मी इतकें सारें बळ एकवटून सर्व तऱ्हेनें प्रयत्न करीत असतां तुला असें बोलणें शोभतें कां? तुला माहीत आहे ना त्या लढाईंत पांडवांच्या बाजूनें कोण लढत होतें तें? अरे, ज्या सैन्यांत अर्जुन आहे त्या सैन्याला कोण जिंकू शकेल? आज मी एक व्यूह रचून ठेवतो. तो भंग करणें देवांना सुद्धां असाध्य असाच आहे. त्या व्यूहांत पांडवांच्या पैकीं कोणी न कोणी तरी निश्चित सांपडेल. पण आज सुद्धां अर्जुनाला एका बाजूला नेलें पाहिजे."

संसप्तक आज सुद्धां अर्जुनाला एका बाजूला घेऊन गेले. द्रोणानें कौरव सेनेला चक्रव्यूहांत रचून उभे केलें. हा व्यूह

तोडणारे वीर फक्त चारच होते. ते म्हणजे कृष्ण, प्रद्युम्न, अर्जुन आणि बाल अभिमन्यु.

ह्यांच्यापैकीं फक्त अभिमन्यूच त्या दिवशीं युद्धभूमीवर होता. म्हणून युधिष्ठिरानें त्याला बोलावून म्हटलें—"बाळ! आज द्रोणाचार्यांनीं चक्रव्यूह रचला आहे. त्याचा भेद करणारे तुझे मामा आणि वडील तर संसप्तकांशीं युद्धांत गुंतले आहेत. म्हणून हें काम तुझ्यावरच येऊन पडलें आहे. तूं आज आमचा आघाडीचा वीर. तूं पुढें हो, तुझ्या पाठोपाठ आपले वीर सैन्य घेऊन आंत घुसतील आणि व्यूह भंग करतील."

अभिमन्यूनें आपल्या चुलत्यांची आज्ञा शिरसावंद्य मान्य केली. चिलखत शिरस्त्राण घालून युद्धास तयार झाला. आपल्या रथांत बसून सुमित्र सारथ्याला म्हणाला—"माझा रथ चक्रव्यूहाच्या द्वारा जवळ घेऊन चल. तेथें द्रोणाचार्य आहेत. त्यांच्याशीं युद्ध करून त्यांना जिंकून मी व्यूहांत प्रवेश करणार आहें."

सारथ्याला हें आवडलें नाहीं. कारण तो व्यूह कांहीं साधासुधा नव्हता. तो तोडण्याचें काम एवढ्याश्या मुलावर सोंपविणें त्याला बरें वाटलें नाहीं. म्हणून तो नम्रपणें व खालच्या आवाजांत म्हणाला—"मालक, आपण वीर आहांत. पण आजपर्यंत फार लाडांत वाढला आहांत."

"अरे, म्हणून काय झालें. माझे मामा कृष्ण आहेत. माझे वडील अर्जुन आहेत. मला कसली भीति. देवांच्या सैन्यासह इंद्र जरी लढायला आला तरी मी भिणार नाहीं. चल माझा रथ घेऊन व्यूहाच्या दारांत. द्रोण त्याचें रक्षण करीत आहेत. मी त्यांच्याशीं लढणार आहें." अभिमन्यु हंसून म्हणाला.






[१६]

[ कांचाच्या किल्ल्यापर्यंत जाण्यासाठीं रुद्रपुरच्या शिवसिंहानें चंद्रवर्माला मदत दिली. तो राजाचे चार सरदार आणि कांहीं सैनिकांना घेऊन पश्चिम दिशेच्या बाजूनें जाऊं लागला. वाटेंत त्यांना एक नष्टप्राय झालेलें नगर लागलें. तेथें एका शिलालेखावरून समजलें कीं त्या गांवाचें नांव करवीरपूर आहे. पुढें— ]

करवीरपूर पार करून थोडें अंतर चालून गेल्यावर त्यांना वाटेंत मोठमोठे उंच पर्वत लागले. आतां त्यांना पंचाईत पडली. कीं हे पर्वत ओलांडून कसें जायचें? कारण ते सर्व डोंगर खडकाळ असल्यामुळें खेचरांना सुद्धां त्यांच्यावर चढणें फार कठीण होतें. खांचाखळग्यांतूनच वाट पुढें गेलेली होती.

चंद्रवर्मानें सांगितलें कीं आपल्या बरोबर जेवढी सामग्री नेणें शक्य होईल तेवढी पाठीशीं बांधून घेऊं व खेचरांना येथेंच मैदानांत सोडून जाऊं.

शिवसिंहाच्या नोकरांना ही कल्पना आवडली नाहीं. ते म्हणाले—"कोण जाणे, पलीकडे काय आहे. समजा तेथें अन्नसामग्री मिळाली नाहीं तर? एवढी सर्व सामग्री येथें सोडून जाणार आणि आपण तेथें उपाशी मरणार. हें कांहीं बरें नाहीं. आम्हांला नाहीं पसंत."




“माणसांनाच चढणें जेथें कठिण काम आहे, तेथें खेचरें कशी येऊं शकतील. येथें वर चढण्यासाठीं पाऊलवाट सुद्धां नाहीं. आपल्यालाच दोरखंडाच्या मदतीनें जावें लागणार आहे. मग काय खेचरांना दोरी बांधून वर ओढणार? म्हणून मला वाटतें, आपल्याला थोडें सामान आणि ही खेचरें येथेंच सोडून जावें लागणार आहे.” चंद्रवर्मा म्हणाला.

कांहींना चंद्रवर्माचें म्हणणें मान्य झालें. त्यांनीं खेचरांवरून सामान उतरविलें व त्यांतील त्यांना पाहिजे असलेलें सामान पाहून जेवढें बरोबर नेतां येईल तेवढें घेतलें व चंद्रवर्मा बरोबर वाट चालूं लागले. पाहाटे पाहाटे त्यांनीं चढण्यास आरंभ केला. रस्ता फार कठिण असल्यानें डोंगर चढतांना ते परस्परांची मदत घेत होते. चंद्रवर्मा व देव सर्वांत पुढें होते. ऊन डोक्यावर येईपर्यंत ते चढत राहिले. तेथें वाटेंत त्यांना एके ठिकाणीं थोडी विश्रांती करण्यासारखी जागा मिळाली. म्हणून त्यांनीं तेथेंच मुक्काम केला. स्वयंपाक केला, जेवले, थोडी विश्रांति घेतली आणि पुन्हां मार्ग चालूं लागले.

दरड उभट रस्तांतून वाट काढीत ते पुढें चालले होते. सुर्यास्ताच्या सुमारास ते डोंगराच्या शिखरावर येऊन पोहोंचले. संध्याकाळच्या संधिप्रकाशांत त्यांना तेथील दृश्य फार रमणीय व आह्लादकारक वाटलें. ते सर्व अगदीं थकलेले असल्यानें विसाव्यासाठीं तेथेंच बसले. तेथून त्यांनीं चारीं बाजूंना दृष्टि वळवली. त्यांना आश्चर्यच वाटलें. डोंगराच्या पलीकडे पायथ्याशीं त्यांना एक सुंदर गांव दिसलें. त्यांत मोठमोठीं घरें होतीं, मोठमोठ्या बागा होत्या, मधून मधून शेतें होती आणि फळांच्या बागा सुद्धां पुष्कळ होत्या. डोंगरापासून तों त्या गांवापर्यंत सर्वकडे हिरवळ पसरली होती. तें गांव पाहून सर्वांना हायसें वाटलें.

त्या गांवाचें नांव काय असेल? तें कोणाचें असेल? तेथील राजा कोण असेल ह्याची चंद्रवर्माला कांहींच कल्पना नव्हती. एवढ्यांत शिवसिंहाचा माणूस एक आश्चर्यानें म्हणाला—“अरे! हें शिवपूर दिसत आहे. होय. शिवपूरच”

“तुला रे काय माहीत हें शिवपूर म्हणून? कधीं आला होतास काय येथें?” चंद्रवर्मानें विचारलें.

“कांहीं दिवसांपूर्वी मी येथें एक महीना-भर होतों. हें रुद्रपुर राज्याच्या पश्चिम सीमेवरील नगर आहे. येथें जो राज-प्रतिनिधि आहे त्याला मी चांगला ओळखतों. ह्या नगराच्या पलीकडे रेताड वाळवंट आहे.” तो म्हणाला.

“म्हणजे तुला शिवपूरची वाट माहीत आहे तर! मग तूं कधीं कांहीं बोलला नाहींस?” चंद्रवर्मानें विचारलें.

ह्या प्रश्न ऐकून तो जरा कावराबावरा झाला. पण आपल्याला सांवरून तो म्हणाला—




“रुद्रपुर राजधानीहून शिवपुरला येणारा दुसरा एक रस्ता आहे. मी त्यानें गेलों होतों. पण तो रस्ता मला आतां चांगला आठवत नाहीं.”

ह्याप्रमाणें त्यांचें बोलणें चाललें असतां त्या गांवांतून विंशुल वाजल्याचा आवाज ऐकूं आला. त्याबरोबर त्याचा प्रतिसाद म्हणून सर्व बुरुजांवर जोरजोरानें नगारे वाजूं लागले आणि कांहीं सशस्त्र सैनिक निरीक्षणा-साठीं बुरुजावर आलेले दिसले.

आपल्याला शत्रू समजून ते सावध अस-ल्याची सूचना देत आहेत ही गोष्ट चंद्रवर्मानें

ओळखली. त्यांच्याकडून बाणवर्षा होण्यापूर्वीच आपण त्यांचे मित्र असल्याची सूचना देणें बरें; नाहींतर मागाहून फार घोटाळा होईल. म्हणून त्यानें एक शुभ्र पांढरें कापड घेतलें व आपल्या तलवारीच्या टोंकाला लावून वर हात करून फडकावलें.

बुरुजावरील सैनिक पाहात क्षणभर निश्चळ उभे राहिले. तेवढ्यांत चंद्रवर्मानें पाहिलें कीं एक हृष्टपुष्ट मनुष्य कांहीं सैनिकांना घेऊन ते बसले होते त्या बाजूकडे धांवत आला. त्यानें तेवढ्यांत एक बाण धनुष्यावर चढवून सोडला. तो चंद्रवर्माच्या पायापाशीं चार पावलांच्या अंतरावर येऊन पडला. त्या बाणाच्या टोंकाशीं एक कागद बांधलेला होता.

चंद्रवर्मानें तो कागद उलगडला आणि वाचून पाहिला. आपण कोण? नांव काय? येथें येण्याचें कारण काय? वगैरे गोष्टी शिवपुरच्या किल्लेदाराला पाहिजे आहेत. जर त्या आपण कळविल्या नाहींत तर शत्रू समजून आपल्यावर हल्ला करण्यांत येईल. असें त्यांत लिहिलें होतें.

चंद्रवर्मानें रुद्रपुरच्या राजानें दिलेलें आज्ञापत्र त्या बाणाला बांधून तो बाण उलट पाठवून दिला. थोड्याच वेळांत किल्ल्याच्या बुरुजावर गडबड सुरू झाल्यासारखें दिसलें आणि त्यांच्या स्वागतासाठीं जयजयकार होऊं लागल्यासारखें भासलें.

त्या नगराकडे जाण्यासाठीं डोंगरापासून किल्ल्यापर्यंत पायऱ्या केलेल्या होत्या. त्या वाटेनें चंद्रवर्मा आणि त्याचे साथीदार किल्ल्याच्या खंदकापर्यंत गेले. तोंपर्यंत कांहीं सैनिक तेथपर्यंत येऊन पोहोंचले होते. त्यांना पाहून त्याला आश्चर्य व फार आनंद झाला. कारण त्यांचा म्होरक्या चंद्रवर्माचा जुना मित्र सुबाहु होता. सुबाहूला पाहून व ओळखून चंद्रवर्मा तर थक्कच झाला. अगदीं अनपेक्षित पणें व अगदीं अनपेक्षित अशा जागीं एक जुना मित्र भेटल्यानें जो आनंद होता तोच चंद्रवर्माला झाला. परंतु काळवेळ ओळखून वागण्याचें त्यानें ठरविलें. ओळख दाखविल्यास दोघांचा जीव धोक्यांत पडण्याचा संभव होता. म्हणून क्षणार्धांत आपण तुला ओळखलें आहे, अशी डोळ्यानें खूण करून चंद्रवर्मा गप्प राहिला.

सुबाहूनें देखील आपल्या मालकाला-युवराज चंद्रवर्माला ओळखलें. पण लगेच त्यानें देखील हातानें खूण केली कीं आपली







ओळख कोणाला कळतां उपयोगी नाहीं. हा इशारा चंद्रवर्मानें ओळखला. तो अनोळखी माणसाप्रमाणेंच पुढें गेला आणि त्याला मोठ्या आदरानें नमस्कार केला.

"आपण शिवपुरचे सेनापति आहांत काय? मला येथील राजप्रतिनिधि वीरमलाची भेट घ्यावयाची आहे आणि कांहीं विशेष मुद्यांवर बोलणीं करावयाचीं आहेत." चंद्रवर्मा म्हणाला.

"ठीक आहे. पण प्रथम आपल्या आणि आपल्या मित्रांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था होऊं दे. आपण थोडी विश्रांति घ्या. मग त्यांची भेट करवितों." असें सांगून सुबाहूनें आपल्या सैनिकांच्या बरोबर चंद्रवर्माच्या लोकांना पाठवून दिलें.

ते सर्वजण किल्ल्यांत गेल्यावर सुबाहूनें भक्तिपूर्वक चंद्रवर्माला नमस्कार केला. त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रू उभे राहिले. तो म्हणाला—"महाराज, माझें दैव मोठें म्हणूनच मला पुन्हां आपलें दर्शन घडलें. आज खरोखर सुदिन आहे. चला घरीं. तेथें सावकाशीनें गप्पागोष्टी करूं."

सुबाहूच्या घरीं गेल्यावर सुबाहूनें आपली सर्व हकीगत चंद्रवर्माला सांगितली. तो म्हणाला—"त्या दिवशीं आपण शत्रूंना चुकवण्यासाठीं नदींत उडी घेतली. आठवतें ना? पण थोड्या वेळानें मी पाण्यावर डोकें काढून पाहिलें तर आपण मला दिसलां नाहींत आणि मी पण नदीच्या प्रवाहांत वाहात वाहात एका खाडींत गेलों. जेथें वर आलों त्या ठिकाणीं मी एकटाच असल्यानें माझे बरेच हाल झाले. एके दिवशीं अचानक एका डोंगरांवर मला धीरमल्ल भेटला. तो बरेच दिवस सर्पकेतूशीं लढला पण त्याचा निभाव न लागल्यानें आपल्या सैनिकांसह तो जंगलांत पळून गेला. कांहीं दिवसांनीं



आम्हीं सर्वजणच रुद्रपुरच्या शिवसिंहाकडे नोकरीसाठीं म्हणून गेलों. शिवसिंहानेंच आम्हांला येथें पाठविलें. सर्पकेतूला कळूं नये म्हणून जेव्हां आम्हीं नोकरीला गेलों तेव्हां धीरमल्लनें आपलें नांव वीरमल्ल केलें."

त्या नंतर चंद्रवर्मानें आपली सर्व हकीगत सांगितली आणि म्हणाला—"मी कांश्याच्या किल्ल्याकडे जाण्यासाठीं निघालों आहे."

कांश्याच्या किल्ल्याचें नांव ऐकतांच सुबाहूचें डोकें ठणकलें. तो म्हणाला—"आतां आपले सुदिन जवळ आले. ह्यावेळीं धीरमल्ल किल्ल्यांत नाहीं. तो गुप्तपणें कांहीं सैनिकांना घेऊन कांशाच्या किल्ल्याकडेच गेला आहे. कारण सर्पकेतु कांहीं सेना बरोबर घेऊन तिकडेच गेला आहे. म्हणून त्याच्या सैन्याच्या शक्तीचा पत्ता लावण्यासाठीं तो गेला आहे. शक्य झाल्यास तो सर्पकेतूचें पारिपत्य करूनच परत येणार आहे. त्याला जाऊन दोनच दिवस झाले आहेत. तरी पण आम्ही ही बातमी अगदीं गुप्त ठेविली आहे."

सर्पकेतूचें नांव ऐकल्यावर चंद्रवर्मा संतापला. ते पाहून सुबाहू म्हणाला—



"सर्पकेतु फक्त वीरपुरचाच राजा नाहीं, त्यानें सर्व माहिष्मती राज्य काबीज केलें आहे. यशोवर्धन महाराज परलोकीं गेले. त्यांचा वडील मुलगा तपोवर्धन वैरागी होऊन जंगलांतून हिंडत आहे. नंतर सर्पकेतूनें धाकटा मुलगा गुणवर्धन ह्याला आपल्या विश्वासांत घेतलें आणि त्याची मदत करण्याचें आश्वासन दिलें. त्याच्या कडून आपलें काम साधून घेतलें. शेवटीं त्याला मारून टाकलें आणि स्वत: गादीवर बसला."

"अस्सं. तर मग तो इतका मोठा धनवान झाला आहे. तरीसुद्धां धनलोभ सुटला नाहीं.

धनासाठीं तो कांशाच्या किल्याकडे चालला आहे." चंद्रवर्मा म्हणाला.

"नुसता धनलोभीच नव्हें, तो राज्य-लोभी सुद्धां आहे. त्यानें शिवपुरवर अचानक हल्ला केला नाहीं हीच मोठी गोष्ट आहे. तो कांशाच्या किल्ल्याकडे कोणच्या वाटेनें जात आहे हें आमच्या हेरांनीं आम्हांला कळविलें आहे. आमचे हेर सतत त्याच्या पाठीवर आहेत." सुबाहूनें सांगितलें.

सुबाहू व चंद्रवर्माच्या गोष्टी चालल्याच होत्या कीं एका दूतानें येऊन सुबाहूच्या हातांत एक पत्र दिलें. सुबाहूनें तें पत्र ध्यान पूर्वक वाचलें व वाचणें झाल्यावर तें पत्र सुबाहूनें चंद्रवर्माला वाचावयास दिलें.

चंद्रवर्मानें तें वाचलें. तें धीरमल्लानें सुबाहूला लिहिलें होतें. त्यांत असें लिहिलें होतें कीं धीरमल्लानें शिवपुरच्या उत्तरेकडील वाळवटांत सर्पकेतूला गांठलें. पण त्याची प्रचंड सेना पाहून तो शिवपुरच्या बाजूला परत फिरला. सर्पकेतूला हें समजलें आणि कांहीं सैनिकांना घेऊन त्यानें धीरमल्लचा पाठलाग केला. म्हणून आतां किल्ल्याच्या संरक्षणासाठीं थोडें सैन्य ठेवून बाकी सर्व सैन्यासह सुबाहूनें धीरमल्लाच्या मदतीस यावें.

"भयंकरच अरिष्ट आलें आहे म्हणाव-याचें. शिवपुरला पोहोंचण्यापूर्वीच जर सर्पकेतूनें धीरमल्लाला गांठलें तर फारच पंचाईत आहे. तसें झालें तर धीरमल्लाचा पराजय तर होईलच, आणि वर सर्पकेतु तसाच पुढें येऊन शिवपुरचा देखील नाश करून टाकील. म्हणून शक्य तेवढ्या लवकर त्याच्या मदतीला गेलें पाहिजे." सुबाहू म्हणाला.

(पुढें चालू)



# अकलेचा कांदा !

एकदां एका शेतकऱ्यानें आपल्या शेजाऱ्याकडून लोणी कढवण्यासाठीं मडकें मागून आणलें. तें एका बाजूला ठेवून तो चूल पेटवूं लागला तोंच मांजराच्या धक्क्यानें तें गडगडलें आणि त्याचे दोन तुकडे झाले. शेतकऱ्यानें तें डिंकानें चिकटवून लगेच परत केलें.

"हें रे काय? ह्याला तर भेग पडली आहे! अन ती कशी काय?" मालकानें विचारलें.

"मला नाहीं माहीत." असें सांगून तो घरीं निघून गेला.

शेजारी पक्का होता. त्यानें कोर्टांत फिर्याद केली. अर्थातच शेतकऱ्याला वकिलाची मदत घ्यावी लागली. त्याला एक रुपया देऊन बोलावून आणलें व घडलेली सर्व हकीगत सांगितली.

वकील म्हणाला—"तूं जी हकीगत सांगितली आहेस त्याला कांहीं साक्षी पुरावा आहे काय? नाहीं ना? मग दोन तऱ्हेंनीं तुझें म्हणणें मांडतां येईल. एक म्हणजे तुला सांगतां येईल कीं मी आणलें तेव्हांच मडकें तडकलेलें होतें. नाहींतर सांगतां येईल कीं मी तें आणून दिल्यावर तडकलें असलें पाहिजे. आणखी असेंहि तुला सांगतां येईल कीं मीं मडकें नेलेंच नव्हतें.

त्या चार आण्याच्या मडक्यासाठीं कोर्टांत फिर्याद गेली. शेतकरी आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा राहून म्हणाला—"महाराज मी जेव्हां घेतलें तेव्हांच मडकें फुटलेलें होतें. नाहींतर समजा कीं मी मडकें आणून दिल्यावरच तें फुटलें आणि नाहींतर असेंच का म्हणानांत कीं मी मडकें नेलेंच नव्हतें म्हणून!"

आपण वकिलाच्या सांगण्याप्रमाणें तंतोतंत वागलों असतां सुद्धां आपल्याला दोन रुपये दंड कां झाला हें त्याला समजलें नाहीं. बिचारा शेतकरी वकिलावर तोंड सोडीत निघून गेला.





# बाळकृष्ण

मध्यरात्रीची वेळ. घनदाट अंधकार पडला होता. विजा चमकत होत्या. ढग गडगडत होते. पावसाची झडी लागली होती. थंडी-मुळें सर्व जग अंगाची मुटकुळी करून गाढ झोपी गेलें होतें. अशा वेळीं कैदेंतच देवकी प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. देवांनीं त्याच्यावर पुष्पवृष्टी केली. कळीच्या नारदानें येऊन त्याला प्रदक्षिणा केली. देवकीला शुभ लक्षणें भासूं लागलीं. पण आपल्या भावाचा हट्ट आणि अत्याचार यांचा विचार मनांत येतांच तिच्या अंगाचा थरकांप उडाला. चेहेऱ्यावर निराशा पसरली.

वसुदेवाचें हृदय भरून आलें. म्हणाला— "दे त्या तान्ह्याला माझ्याकडे. कोठें तरी पोहोंचवून येतों."

"डोळे भरून पाहूं दे तरी थोडा वेळ." देवकी म्हणाली.

"आणि तेवढ्यांत कंसाच्या रूपानें त्याचा कर्दनकाळ येईल." वसुदेव म्हणाला.

देवकीनें नीट गुंडाळून एका टोपलींत घालून एका दुपट्यांत त्याच्या स्वाधीन केलें. वसुदेव कांहीं विचार न करतां तडक निघाला आणि जससजा तो जाऊं लागला तसतसे एकेक दरवाजा उघडत गेला. पाहारे-कऱ्यांना गाढ झोप लागलेली होती. तो मथुरा नगरीच्या बाहेर निसटून जाण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होता. पण अंधार म्हणजे मी म्हणत होता. वाटेचा अंदाज येत नव्हता. तरी तो मन घट्ट करून चालला होता. तेवढ्यांत त्याला प्रकाशाचा झोत दिसला. वाटलें बहुतेक कंसानें आपल्या शोधासाठीं मशाली घेऊन लोकांना पाठविलें आहे. त्यानें तलवारीच्या मुठीवर हात ठेवून मागें वळून पाहिलें. पण आजूबाजूला कोणीच नव्हतें. प्रकाशाचीं किरणें सुद्धां कोठूनहि येत नव्हती. ती येत होती त्याच्या डोक्या-वरील टोपल्यातून.

यमुना नदी दुथडी भरून वाहात होती. पाण्याच्या आवाजानें कांठनळ्या बसत होत्या. प्रवाहांत मगर, सांप वगैरे जीव-जंतु बरेच होते. पाण्यांत पाऊल टाकावयाची वसुदेवाला हिंमत होत नव्हती. पण दुसरा मार्ग नसल्या-मुळें तो तसाच पाण्यांत शिरला. पाण्याला पाऊल लागतांच नदी दुभंग झाली आणि तिनें त्याला वाट करून दिली.



वसुदेव नदी पार करून पैलतिरीं गेला. त्याला आठवलें तेथून जवळच नंद नांवाच्या त्याच्या मित्राचें घर होतें. त्या मित्राला वसुदेवानें कंसाच्या आज्ञेवरून मारलें होतें व साखळदंडानें जखडलें होतें. त्याच मित्रानें आपल्या बाळाला संभाळलें तर किती बरें होईल, त्याच्या मनांत आलें. पण तें कसें जमणार ? असा विचार करीत तो वाट चालत होता. योगायोग असा कीं त्याच वेळीं नंदहि आपल्या मृत नवजात कन्येच्या अंत्य-क्रियेसाठीं आला होता.

बाळंतपणाच्या वेळीं यशोदा बेशुद्ध पडल्यामुळें तिला कांहींच कळलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं गांवांत इंद्र यज्ञाचा महोत्सव व्हावयाचा होता. पण ह्या मृतकन्येची वार्ता गांवांत पसरली तर यज्ञांत बाधा होईल म्हणून तो मुकाट्यानें तिला उचलून घेऊन आला होता.

चाहूल ऐकून वसुदेव म्हणाला—"कोण ? नंदच कीं काय ? बरें झालें."

"कोण वसुदेव ?" तो म्हणाला. त्याच्या मनांत आलें, ह्याच वसुदेवानें मला मरमर मारलें आणि माझ्या हातां पायांत साखळ-दंड घातला आणि तोच........! पण छे ! मी उगाच कशाला त्याला बोल लावूं. कंस

सौ. गंगादेवी आपटे



महाराजाची आज्ञा मोडण्याची त्याची प्राज्ञा नव्हती. त्यानें किती तरी वेळां मला मदत नाहीं का केली? पण हा ह्या वेळीं येथें कसा येऊं शकला? आणि कशासाठीं आला असावा. असा विचार करीत करीत तो वसुदेवाजवळ येऊन पोहोंचला. दोघांनीं एकदेकांना ओळखलें.

"रात्रीच्या अशा तूं भयानक वेळीं येथें कसा? सर्व कांहीं ठीक आहे ना नंदा?" वसुदेवानें प्रेमळ स्वरांत विचारलें.

नंदानें येण्याचें सविस्तर कारण सांगितलें आणि म्हणाला "ह्या मृत कन्येला फेकून देण्यासाठीं आलों आहें." थोडा वेळ थांबून त्यानें वसुदेवाला विचारलें—"अन् तूं कसा?"

"माझी कर्मकथा काय सांगूं? तुला सर्व कांहीं माहीतच आहे. पहिले सहा पुत्र कंसानें मारले. म्हणून सातव्याला घेऊन आलों आहे. तूंच ह्याचें पालन कर." वसुदेव म्हणाला.

"अरे पण कंसाला हें कळलें तर तो मला जिवंत ठेवील तरी का?" असें म्हणत त्याच्या पोटची मुलगी मेलेली होती. वसुदेवाने कंसाच्या आज्ञेनें त्याला खुप मारलें होते. तरी त्याचें हृदय कळवळलें. एका अर्भकाला दुष्ट कंसाच्या हातीं देण्यास त्याचें मन तयार होईना. म्हणून तो त्याला घेण्यास कबूल झाला. "पण थांब मी अगोदर स्वच्छ स्नान करतों आणि मग घेतों त्याला." नंद म्हणाला.

इतक्यांत पाताळ गंगेनें त्याला स्नान घातलें. त्यानें बाळाला घेण्यासाठीं हात पुढें केले. "कोण कोणाला सांगायला जातो आहे? आपल्या दोघांतच हें" असें म्हणत त्यानें शिशूला नंदाच्या स्वाधीन केलें.

"माती चांगलीच जड दिसते आहे?" नंद म्हणाला. तोंच विष्णु सेवक गरुड, शंख, चक्र, शार्ङ्ग कौमोदकी वगैरेंनीं येऊन त्या बालकाला नमस्कार केला. हें पाहून नंदानेंहि मस्तक वाकविलें. आश्चर्य! त्याच क्षणीं त्याची बेडी निखळून पडली व तो मोकळा झाला.

दोघांना बालकाच्या खुणा समजल्या.

"नन्दा बाळाला नीट संभाळ."

"कांहीं काळजी करूं नकोस. पोटचा पोरच समज माझा. ह्या गांवचा राजाच होणार माझा बाळ. गांवांत जेथें जाईल तेथें दूध, दही, लोणी मिळेल बाळा." नंदानें सांगितलें व दोघे जड पावलांनीं आपापल्या मार्गाला लागले.

वसुदेवाच्या कानावर लहान बाळाच्या रडण्याचा आवाज आला. पाहिलें तर नंदाची मुलगी रडत असलेली दिसली. वसुदेवानें विचार केला, मुलास मूल. हेंच देवकीच्या पुढ्यांत ठेवावें. लगेच तो तिला उचलून घेऊन गेला आणि आपल्या बंदिगृहांत जाऊन देवकीच्या पुढें ठेवलें.

त्या दिवशीं रात्रीं कंसाला भयंकर स्वप्नें पडत होतीं. त्याला दिसलें कीं समुद्रांत धक्के खाणाऱ्या नावेप्रमाणें राजवाडा हालत आहे. धरणीकंपामुळें सारी मथुरा हेलकावे खात आहे. काळ्या कुरूप मातंग कन्या त्याच्या





भोंवती गोळा झाल्या असून त्याला मद्याचे प्याले भरभरून देऊन अंगलट करीत आहेत आणि कंस त्या किळसवाण्या स्त्रियांना दूर लोटत आहे. इतक्यांत त्याला दिसलें कीं एक अक्राळविक्राळ राक्षस आपल्याकडे येत आहे आणि म्हणत आहे कीं मी मधूक मुनीश्वराचा शाप आहे. आतां तुझे दिवस भरलेच समज. हा मी तुझ्यांत प्रवेश करतों. अरे ए कंसाच्या भाच्या, तूं आतां येथून जा. संपलें तुझें काम.

कंस एकदम खडबडून जागा झाला व पलंगावर उठून बसला आणि आपल्या यशोघरा नांवाच्या दासीला बोलावून विचारलें कीं येथें मातंग स्त्रिया आल्या होत्या का? तिनें 'नाहीं' म्हणून सांगतांच त्यानें बालाकी नांवाच्या सेवकास पुरोहिताकडे पाठवून विचारविलें कीं धरणीकंप, उल्कापात, वादळ वगैरेंचें काय कारण आहे?

त्यानें परत येऊन सांगितलें कीं ते म्हणत आहेत कीं आज आदिपुरुष भूतलावर अवतरले आहेत. कंसाचें काळीज चरकलें. तरी सुद्धां त्यानें अवसान आणून त्याला पुरोहिताकडे पाठविलें. म्हणाला—"कोणाच्या घरीं त्यानें जन्म घेतला आहे? आणि त्याला आत्तां अवतार घेण्याचें काय कारण?"

बालाकी बाहेर गेला आणि मागें फिरून बातमी आणली कीं वसुदेवाला मुलगी झाली आहे.

कंसाला त्यावर विश्वास झाला नाहीं म्हणून त्यानें वसुदेवाला विचारलें. तो म्हणाला "देवकीच्या कुशींत कन्याच आहे."

त्या मुलीला न मारण्यासाठीं सर्वांनीं कंसाला सांगितलें. परंतु त्यानें कोणाचें ऐकलें नाहीं. "मुलगा असूं दे कीं मुलगी वसुदेवाचें संतान माझा काळ आहे. त्याला नष्ट केलेंच पाहिजे." म्हणून तावातावानें तो गेला.





वसुदेवाचें हृदय धडकलें. त्याच्या मनांत आलें कीं आपण ह्या मुलीला येथें आणल्या मुळेंच ती मरणार. आपल्याला पाप लागणार. का आपण आपल्या मुलाला ह्याच्या स्वाधीन करावें?....पण कां? नको. ही मुल्गी तर मेलीच होती. म्हणून तिचा बाप तिला टाकून गेला होता. म्हणून आपल्याला पाप लागणार नाहीं. त्यानें आपलें मन शांत केलें.

कंसानें देवकीच्या हातांतून त्या मुलीला ओढून घेतलें. त्या सुलक्षणी मुलीला मारण्याची त्याला इच्छा होईना. परंतु देवकीचें सातवें संतान होतें तें. त्याला मारलेंच पाहिजे. म्हणून त्यानें जोरानें तिला दगडावर आपटलें.

"कंसा, तुझ्या नाशासाठींच मी वसुदेवाच्या कुळीं जन्मलें आहे." असें म्हणत त्या कन्येनें क्षणभर कात्यायिनीचें रूप धारण केलें व अदृश्य होऊन गेली.

पाहाट होऊं लागली. अशुभ टाळण्यासाठीं तो अधीर होत चालला होता.

कृष्णाच्या आगमनापासून सर्व गोकुळ आनंदसागरांत बुडून गेलें होतें. गाई, गवळी कृष्णलीलेंत मस्त झाले होते.

कृष्ण दहा दिवसांचाच होता. पूतनानें दूध पाजण्यासाठीं त्याला घेतलें. पण ती दुष्ट राक्षसीण तत्काळ मरून गेली. एका महिन्याचा असतांनाच त्यानें शकटासुराला मारून टाकलें. पुढें कृष्णाच्या विरुद्ध दही लोण्याच्या चोरीच्या फार तक्रारी आल्यानें यशोदा मातेनें त्याला उखळाशीं बांधलें. तें उखळ ओढत ओढत बाळकृष्ण दोन अर्जुन झाडांच्या मधें घेऊन गेला आणि तीं दोन्हीं झाडें पाडून टाकिलीं. त्या झाडांत यमल अर्जुन नांवाचे दोन राक्षस होते. ते मरून गेले.

एकदां एक प्रलम्ब नांवाचा राक्षस नंदाचें रूप घेऊन आला व तो बलरामाला घेऊन जाऊं लागला. तें कपट बलरामाच्या

ध्यानांत येतांच त्यानें एक असा ठोसा त्याच्या नाकावर मारला कीं तो तिरिमिरी येऊन खालीं पडला तो उठलाच नाहीं. असाच आणखी एके दिवशीं धेनुक नांवाचा राक्षस गाढवाच्या रूपानें ताडाच्या वनांत आला. त्यालाहि कृष्णानें पाय पकडून दगडावर आपटून मारलें.

केशी राक्षस घोड्याच्या रूपानें आला होता. त्याला कृष्णानें मारतांच त्याचे दोन भाग झाले व तो मरून गेला.

एक दिवस कृष्ण गोपगोपींच्या बरोबर रासक्रीडा खेळत होता. त्यावेळीं अरिष्टवृषभ आला. त्यामुळें सर्वजण घाबरून सैरवैरां पळूं लागले. परंतु कृष्णानें त्याला मारून टाकून सर्वांचें संकट दूर केलें. ह्याच वेळीं कांहीं गोपाळांनी येऊन सांगितलें कीं बलराम कालियाशीं झुंज करीत आहे. हें ऐकून कृष्ण कसा स्वस्थ बसेल? तो धांवला कालियाच्या घराकडे. त्याचा गर्व भंग करण्यासाठीं त्यानें यमुनेंत उडी मारली. गोपगोपींनीं तिरावर असलेल्या लोकांनीं कृष्णाला पाण्यांत न उतरण्याविषयीं सांगितलें. एक वृद्ध गृहस्थ म्हणाला—"अरे, हिंस्र पशु सुद्धां त्या ठिकाणीं पाणी पिण्यास गेले तरी परत येत नाहींत. मग तूं कशाला आपले प्राण धोक्यांत घालतोस?" पण कृष्णानें कोणाचें ऐकलें नाहीं.

कृष्ण कालियाच्या फणांवर उभा राहिला आणि त्याला पायाखालीं असें दाबलें कीं त्याला कायमची आठवण राहील. कालिया त्याला शरण गेला व तेथून निघून जाण्याचें त्यानें कबूल केलें. पण म्हणाला—"मला गरुत्मन्ताची भीति वाटते" कृष्ण म्हणाला—"तुझ्या डोक्यावर माझ्या पायाचें चिन्ह उमटल्यामुळें तुला कोणी त्रास देणार नाहीं." त्यानंतर तो कालिया समुद्रांत निघून गेला.

तेव्हांच एका शिपायानें येऊन सांगितलें कीं बलराम व कृष्णाला कंसानें 'धनुर्मह' उत्सव पाहाण्यासाठीं बोलाविलें आहे.

इकडे कंस त्यांची वाट पाहात होता. ते दोघे फार पराक्रमी आहेत असें त्यानें ऐकलें होतें. ते दोघें मथुरेंत येतांच मंच्यांकडून त्यांच्यावर दोन मस्त हत्ती सोडले. कृष्णानें त्यांचें दांत उपटून त्या दातांनींच त्यांना भोसकून मारलें. राजवाड्यांत जातांना वाटेंत त्यांना मदनिका नांवाची कुबडी दासी भेटली. तिच्या जवळून त्यांनीं अर्गजा घेतला व आपल्या शरिराला फासला. कृष्णानें





तिच्या कुबडावर थप्पड मारली त्याबरोबर तिचें कुबड जाऊन ती चांगली झाली. तिच्या तबकांतील फुलांच्या माळा घेऊन त्यांनीं गळ्यांत घातल्या व पुढें निघून गेले. शस्त्रागाराजवळ तेथील रक्षक सिंहबलयानें त्यांना अडविलें. त्याला मारून त्याच्या बाणाचे तुकडे करून टाकून ते दोघे स्यामवनांत गेले. दोघां भावांनीं माजविलेला गोंधळ कंसाच्या कानावर गेला. त्यानें त्या दोघांना मारून टाकण्यासाठीं चाणूर व मुष्टिक नांवाच्या दोन मल्लांना तयार राहण्यास सांगितलें.

दरबारांत प्रवेश करतांच शिपायांनीं त्यांना कंसाकडे इशारा करून सांगितलें कीं तें कंस महाराज आहेत त्यांना प्रणाम करा. परंतु त्यांनीं दुर्लक्ष करून ते टाळलें. कंस त्या दोघांकडे निरखून पाहात होता. कृष्णाचें तें पिळदार शरीर पाहून त्याला वाटलें हाच तर आपला काळ नसेल? त्याचे हृदय धडकलें. त्यानें आपल्या मल्लांना इशारा केला. दोघे मल्ल दोघांच्यावर धावून गेले. पण त्यांनीं त्या मल्लांच्या मानगुट्या पकडल्या आणि क्षणार्धांत त्यांना यमपुरीस पाठविलें.

क्षणाचाहि विलंब न करतां कृष्ण सिंहासनाकडे धांवला. कंसाच्या झिंज्या ओढून त्याला खालीं पाडलें आणि "जा यमलोकांत त्या मल्लांच्या भेटीला" म्हणून त्याच्या छातीवर बसून त्याला मारून टाकलें.

कंसाचे नोकर दोघांवर धांवून गेले. पण वसुदेवानें सांगितलें कीं हे दोघे माझे पुत्र आहेत. एक रोहिणीचा व एक देवकीचा ह्यांना कोणीहि कांहीं करूं शकणार नाहीं.

नंतर कृष्णाच्या आज्ञेवरून लोकांनीं वसुदेव देवकींना कैदेंतून सोडविलें. उग्रसेनालाहि बंधमुक्त केलें आणि त्याला पुन्हां गादीवर बसवून राज्याभिषेक केला.





# भाग्य

केफिना गांवांत एक चिन नांवाचा व्यापारी राहात असे. पैसे मिळविणें हा एकच त्याचा धंदा होता. पैसे सुरक्षित ठेवण्यासाठीं त्यानें एक उपाय केला. चांदीचीं नाणीं गाळून त्यांची चांदी पंधरा शेराची एक लड अशा लडी करून ठेवल्या. अशा एकंदर आठ लडी झाल्या त्यानंतर मात्र त्यानें कांहींहि शिल्लक टाकलें नाहीं.

त्यानें त्या सर्व लडी लाल फितीनें बांधून आपल्या उशाशीं उशीच्या जवळ ठेवल्या होत्या. रोज रात्रीं निजतांना तो हातानें एकदां चांचपडून पाहात असे आणि त्यांच्या स्पर्शानें तो खूष होत असे.

चिनला चार मुलगे होते. त्यांनीं आपल्या वडिलांचा सत्तरावा वाढदिवस मोठ्या थाटानें साजरा केला. सर्व कार्यक्रम संपल्यावर त्यानें आपल्या चौघां मुलांना बोलाविलें. त्यांच्या पाठीवर प्रेमानें हात फिरवून तो म्हणाला—"मुलांनो, मी सर्व आयुष्यभर पैसे मिळवून जमविण्याचेंच काम केलें. माझ्याजवळ जेवढें धन आहे त्या सर्वांचा लडी बनवून घेतल्या आहेत. आणि त्या लडींच्या चार थैल्या बांधून मी माझ्या उशाशी ठेवल्या आहेत. त्या सर्व लाल फितींनीं बांधल्या आहेत. एकदां चांगला दिवस पाहून मी त्या तुमच्या स्वाधीन करणार आहें. तुम्ही त्या नीट संभाळून ठेवा. कधीं त्यांच्या उपयोग होईल."

त्या दिवशीं रात्रीं झोपतांना चिननें आपल्या संवयीप्रमाणें चांचपडून पाहिलें. मनांतल्या मनांत हंसला आणि झोपी गेला.

त्याचा डोळा लागतो न लागतो तोंच त्याला आपल्या खोलींत कोणीतरी माणूस असल्याचा भास झाला. तो पलंगावर उठून



बसला. खोलींत दिवा जळत होता. त्याच्या उजेडांत त्यानें पाहिलें. त्याला आठ उंच हृष्टपुष्ट अशीं माणसें दिसलीं. त्या सर्वांच्या अंगावर पांढरे कपडे होते आणि कमरेंत लाल पट्टे होते.

त्यांना चिननें पाहतांच ते त्याच्या जवळ आले. लवून नमस्कार केला आणि म्हणाले—"सरकार, आम्ही सर्व भावंडें आहोंत. परमेश्वरानें आम्हांला तुमच्याकडे पाठविलें होतें. आजपर्यंत आम्ही आपल्या-पाशीं राहिलों, परंतु आपण आमच्याकडून कांहींच सेवा करून घेतली नाहींत. उलट मोठ्या काळजीपूर्वक सतत आपल्याजवळच ठेविलेंत. आतां आपले दिवस भरत आले आहेत. आम्हांला वाटत होतें कीं शेवटच्या क्षणापर्यंत तुम्हीं आम्हांलाजवळ ठेवाल. परंतु आम्हांला असें कळलें कीं तुम्हीं आम्हांला आपल्या मुलांच्या स्वाधीन करणार आहांत. पण आम्हीं त्यांची सेवा करूं शकणार नाहीं. म्हणून आम्हीं तुमचा निरोप घ्यावयास आलों आहोंत. आम्हीं ह्या जवळच्याच खेड्यांत वांगच्या घरीं जात आहोंत. भेटूंया पुन्हां कधीं तरी. असें म्हणत ते मागें फिरले आणि झटपट खोलीच्या बाहेर पडले.

चिन आश्चर्यानें पलंगावरून खालीं उतरला. त्या आठ जणांना गाठण्यासाठीं घाईघाईनें तो त्यांच्या मागें निघाला. त्या गडबडींत त्याला ठेंच लागली आणि तो खालीं पडला. त्यानें डोळे उघडून पाहिलें तर तो पलंगावरच होता. तेव्हां त्याला वाटलें कीं आपल्याला स्वप्न पडलें असावें.

तरी सुद्धां एकदां नीट पाहिलेलें बरें, म्हणून तो पलंगावरून उठला. दिवा मोठा केला आणि चोहोंकडे पाहिलें. तेथें कोणी नव्हतें. मग त्यानें उशी जवळ चाचपडून



पाहिले. आणि खरोखरच स्वप्न खरें झालेलें त्याला समजलें. त्याला धस्स झालें. वांग कोठें राहातो हें त्याला माहीत असल्यानें ह्या गोष्टीचा पडताळा पाहण्याचें त्यानें ठरविलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच उठून तो त्या गांवीं गेला. वांगचें घर शोधून काढलें. तेथें गेला. त्या दिवशीं त्यांच्या घरीं कांहीं तरी विशेष होतें. चिन त्याच्या घरीं गेल्यावर वांगनें त्याचें स्वागत केलें.

"आज आपल्या घरीं काय आहे?" चिननें विचारलें.

"तसें कांहीं नाहीं. माझी बायको बरेच दिवसांपासून आजारी होती. काल ज्योतिष्यानें सांगितलें कीं जोंपर्यंत तिचा पलंग हलवणार नाहीं तोंपर्यंत तिला उतार पडणार नाहीं आणि योगायोग काल रात्रींच तिला एक स्वप्न पडलें. तिला आठ तरुण दिसले आणि म्हणाले कीं आम्हीं आजपर्यंत चिनच्या घरीं नोकरी करीत होतों व आतां आम्हीं येथें आलों आहोंत आणि ते तिच्या पलंगा खालीं घुसले. स्वप्न संपलें. माझ्या बायकोला दर दरून घाम सुटला आणि सर्वच आश्चर्य. तिचा आजार हळूं हळूं कमी होऊं लागला म्हणून आम्हीं



आज लागलीच तिचा पलंग हलविला. तेव्हां आम्हांला तिच्या पलंगाखालीं तांबड्या फितींनीं बांधलेल्या आठ चांदीच्या लडी मिळाल्या. देवाच्या कृपेनें आम्हांला तें धन मिळालें आहे म्हणून आम्ही त्याची पूजा करीत आहोंत." वांग म्हणाला.

चिननें सुद्धां आपली सविस्तर हकीगत त्याला सांगितली आणि म्हणाला—"देवाची मर्जी. पण मला एकदां त्या लड्या पाहा-व्याशा वाटत आहेत."

वांगनें आपल्या नोकरांच्या करवीं मागवून त्या लड्या त्यानें चिनला दाखविल्या. त्या पाहतांच त्याच्या डोळ्यांत पाणी आलें. वांगला त्याची दया आली. त्यानें त्यांतील थोडी चांदी त्याला देण्याचा विचार केला.

"हे घ्या." म्हणून वांगनें त्यांतील दहा तोळे चांदी काढून चिनला दिली.

इतकी सर्व चांदी गमावल्यावर एवढीशीच घेऊन काय करायचें ? म्हणून त्यानें ती नाकारली. "नको मला. नुसतें एकदां पाहावेंसें वाटलें. एवढेंच." चिन म्हणाला.

तो नको नको म्हणत असतां वांगनें बळजबरीनें त्याच्या बाहींत ती टाकली. चिननें परत देण्यासाठीं हात झटकला. परंतु त्याला ती कोठें दिसली नाहीं.

शेवटीं चिन वांगचा निरोप घेऊन घरीं निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं वांगचे नोकर जेव्हां घर झाडूं लागले तेव्हां त्यांना ती उंबरठ्याशीं पडलेली दिसली. चांदीचा तो दहा तोळ्याचा तुकडा पाहतांच वांगच्या डोक्यासमोर चिन आला. अचानक त्याच्या तोंडून हे शब्द निघाले—"चिनचे भाग्य."





# जिह्वाग्रे सरस्वती

राजा भोज महा पंडित होता. तो पंडितांचा, व विद्वानांचा आदर करीत असे. कवींना प्रोत्साहन देत असे. म्हणून मोठ मोठे कवि राजा भोजाच्या दरबारीं येत असत. प्रत्येक कवि आपली आपली कविता ऐकवीत असे आणि राजाकडून मान व बक्षिसें मिळवून व त्याला आशीर्वाद देऊन त्याचा निरोप घेऊन जात असत.

असें सांगत कीं भोज राजाच्या वेळीं सर्वांच्या जिभेवर सरस्वतीचा वास होता. त्यांतल्या त्यांत धारा नगरींत सर्वसाधारण मनुष्य सुद्धां कविता करीत असे. पण हें राजाला मात्र माहीत नव्हतें.

एकदां भोज राजा शिकारीहून परत येत होता. येतां येतां तो थकला आणि धारा नगरीच्या वेशीवर एका झाडाखालीं विसा-व्याला थांबला. त्याच वेळीं एका गवळ्याची मुलगी डोक्यावर हंडा घेऊन धारा नगरीकडे चालली होती. राजाला वाटलें ह्या हंड्यांत कांही तरी तहान भागविण्यासारखें असेल म्हणून त्यानें विचारलें कीं ह्यांत काय आहे ?

त्या मुलीनें राजाला ओळखलें आणि राजानें कशासाठीं विचारलें आहे हेंहि तिला समजलें. म्हणून तिनें उत्तर दिलें—

"हिम कुन्द शशिप्रभ शंखनिभं
परिपक्व कपित्थ सुगन्धरसं
युवती करपल्लव निर्मथितं
पिब हे नृपराज, रुजापहरं।"

[हिम, चमेली, चांदणें, शंख ह्याप्रमाणें कपित्थाच्या फळाप्रमाणें सुगंधित आणि युवतीच्या हातांनीं मथलें गेलेलें श्रमपरिहार करणारें पेय आहे. हे राजा ! तें पिऊन तूं आपली तहान भागव.]

श्री बा. मा. वागळे

गवळणीच्या बुद्धिमत्तेचें राजाला कौतुक वाटलें. राजानें तिच्या जवळून ताक घेऊन आपली तहान भागवली आणि तिला योग्य इनाम दिलें.

एकदां राजा राजोद्यानांत चालला होता. तेव्हां वाटेंत एक भिल्ल कन्या भेटली. तिच्या हातांत थोडेंसें मांस होतें आणि ती ओढल्यासारखी दिसत होती. राजानें तिला विचारलें—

भोज: कात्वं पुत्री ? (तूं कोणाची मुलगी आहेस ?)

भिल्लकन्या: नरेन्द्र, लुब्धकवधू। (राजा, भिल्लकन्या आहे.)

भोज: हस्ते किमेतत् ? (हातांत हें काय आहे ?)

भिल्लकन्या: पलं। (मांस)

भोज: क्षामं किं ? (इतकेंच का ?)

भिल्लकन्या: सहजं ब्रवीमि, नृपते !

यद्यादरा च्छ्रूयते.

गायन्ति त्वदरि प्रियाश्रुतटिनी
तीरेषु सिद्धांगना
गीतान्धानतृणं चरन्ति हरिणाः
तेनामिषं दुर्लभं !

[ राजा आपण वाईट वाटून घेणार नसाल तर खरें खरें सांगतें.

आपल्या शत्रूच्या स्त्रियांच्या अश्रूंनीं झालेल्या नदीच्या किनाऱ्यावर सिद्धांच्या रमणीचें संगीत ऐकत असतांना हरिणांना गवत खाण्याची सुद्धां शुद्ध नाहीं. मग मांस कोठून मिळणार ? ]

खायला न मिळणाऱ्या भिल्ल कन्येच्या तोंडून इतकी सुंदर कविता ऐकून राजा खुष झाला. त्यानें तिला बक्षीस म्हणून आपले सर्व अलंकार उतरून दिले. एवढेंच नव्हें तर तिच्या कवितेच्या शब्दांगणिक तिला हजार मोहोरा दिल्या.






[ ३ ]

'पहाडी डाकू' किल्ला फार समृद्ध प्रांतांत होता. तो पार करून जाण्यास सहा दिवस लागले. त्याच्यानंतर ओसाड वाळवंटें लागलीं. त्यांतील कांहीं वाळवंटें पन्नास साठ मैल दूरवर पसरलेलीं होतीं. त्या भागांत कोठेंहि पाण्याचा एक थेंबहि नव्हता.

पुढें बाल्क नांवाचें एक शहर लागलें. एके काळीं तें फार प्रसिद्ध शहर होतें. तेथें असलेल्या संगमरवरी इमारतीचे अवशेष मात्र अद्यापीहि तेथें आढळून येत होते. असें म्हणतात कीं इराणच्या डेरियस राजाच्या मुलीशीं शिकंदरानें ह्याच नगरांत लग्न केलें होतें. येथून इशान्येकडे तालीखान नांवाचें शहर लागतें. ह्या शहराच्या दक्षिणेला डोंगरांत मिठाच्या मोठमोठ्या खाणी आहेत. ह्या खाणींतून इतकें मीठ निघतें कीं तें सर्व जगाला सुद्धां पुरूं शकेल.

डेरियस राजाच्या मुलीचे वंशज बदखशान नांवाच्या प्रदेशांत राहात होते. तेथें एका डोंगरांत माणकाच्या खाणी होत्या. एका डोंगरांत नीलमण्यांच्या खाणी होत्या. म्हणून हा देश भरभराटीस आलेला होता. त्या प्रदेशांत थंडी मात्र फार कडाक्याची पडत असे. तेथील डोंगरावरची हवा फार चांगली असल्यानें सर्व रोग नुसत्या तेथील हवा



पाण्यानें बरे होत असत. शिवाय येथील दोनतीन डोंगरांत गंधक खूप असल्या कारणानें पाण्यापासून कांहीं आजार उद्भवण्याची भीति नव्हती. ह्या हवापाण्याचा मार्कोपोलोनें प्रत्यक्ष अनुभव घेतला होता. येथील रस्ते डोंगरी दुर्गम होते म्हणून शत्रू सहजीं येणें अशक्य होतें.

पामीरचें पठार जगांत सर्वांत उंच पठार आहे. येथून तेथपर्यंत पोहोंचण्यास अठरा दिवस लागतात. हें एवढें मोठें पठार पण त्यावर एक थेंब सुद्धां प्राणी आढळावयाचा नाहीं. हें पठार पार करण्यास बारा दिवस लागतात. त्या पुढें चाळीस दिवस चालल्यावर काष्टर, समरकन्द, यार्कन्द हे प्रदेश लागतात.

खोटान नगर, खोटान देशाची राजधानी होतें. हा देश 'बडे खानां' च्या साम्राज्यांत मोडत असे. ह्या देशांत मोठमोठीं अशी अनेक बरीच शहरें आहेत. येथें कापूस मोठ्या प्रमाणांत पिकतो आणि द्राक्षें व इतर फळांच्या बागा जागोजागीं दृष्टीस पडतात. काष्टार पासून येथपर्यंतचा प्रदेश 'तुर्कस्तान' म्हणून ओळखला जातो.

काष्टारच्या पुढें पुन्हां रेताड प्रदेश येतो आणि त्याच्या पुढें लोम शहराच्या नंतर खरें वाळवंट सुरू होतें. प्रवासी ह्या ठिकाणीं येऊन वस्ती करतात. ते येथून आपल्याला आणि आपल्या जवळ असलेल्या प्राण्यांना पुरेल एवढी रसद बरोबर घेऊन पुढील प्रवास करतात. कारण पुढील प्रवास एक महीन्याचा आहे. ज्या ठिकाणीं वाळवंटाची रुंदी कमी आहे त्या ठिकाणाहून पार करण्यास एक महीना लागतो आणि इतर वाटेनें पार केलें तर एक वर्ष लागतें. हें वाळवंट ओलांडून जाणें फार धोक्याचें आहे. जर का एखादा प्रवासी चुकून मागें राहिला तर तो मेलाच म्हणून समजावें. एकटा असला कीं त्याला कोठून तरी आवाज आल्याचा कोणीतरी बोलावीत असल्याचा भास होतो. कोणी प्रवासी दिसल्यासारखें वाटतें आणि त्या अनुसंधानानें जातांना वाट चुकतो. मग तो मुक्कामावर काय पोहोंचणार? आणि म्हणूनच वाळवंटाचे प्रवासी नेहमीं टोळ्या करून जातात.

ह्या वाळवंटापलीकडे काबुल देश येतो. त्यानंतर एक लहान वाळवंट ओलांडलें कीं टान्गुट देश लागतो. ह्याच देशांत सूचौ, कानचौ वगैरे मोठीं शहरें आहेत. ह्याच्या पलीकडे काराकोरम नगर लागतें. हें शहर तीन मैल लांब पसरलें आहे. तारतरी लोकांनीं आपलें गांव सोडून ह्या ठिकाणींच येऊन वस्ती केली होती. हे लोक प्रथम मंचूरियांतील चोर्चा भागांत बैकल सरोवराच्या आसपास राहात असत. तेथें मोठमोठीं मैदानें होती. पाणी भरपूर होतें पण त्यांना कोणी चांगला पुढारी मिळाला नव्हता. हे लोक 'उन्ग खाना' च्या आधीन राहात असत. त्या खानाचें नांव प्रेस्टर जोन असेंहि होतें.

जेव्हां तारतरी लोकांची संख्या वाढूं लागली तेव्हां प्रेस्टर जोननें त्यांना टोळ्या करून निरनिराळ्या प्रांतांत पाठवून देण्याचें



ठरविलें. ही बातमी कानावर येतांच ते गुपचुप एका वाळवंटांत पळून गेले व जोनला कर देण्याचें बंद केलें. कांहीं दिवसांनीं ह्या तारतरी लोकांनी चंगेज खानाला आपला सरदार बनविलें. जागोजागीं पसरलेल्या सर्व तारतऱ्यांनीं चंगेज खानाला आपला सरदार मानलें. त्यामुळें चंगेज खानाची महत्वाकांक्षा वाढली. एक मोठें सैन्य उभें करून तो दिग्विजयाला निघाला. तो फार न्यायी आणि सद्गुणी असल्यानें हारलेले लोक सुद्धां मोठ्या आदरानें त्याच्या सैन्यांत येत. त्याचा उत्साह द्विगुणित होत

गेला. त्यानें प्रेस्टर जोनकडे निरोप पाठविला कीं मी तुझ्या मुलीशीं लग्न करण्यासाठीं येत आहें. प्रेस्टर जोन हें ऐकताच खूप संतापला. म्हणाला—" हा मनुष्य माझा गुलाम आहे. मला याचा समाचार घेतलाच पाहिजे."

प्रेस्टरचे हे उद्गार चंगेजखानाच्या कानांवर गेले. तो एक मोठी सेना घेऊन प्रेस्टर जोन वर चालून आला. प्रेस्टर जोन कांहीं कच्चा दिलाचा नव्हता. त्यानें देखील आपल्या सैन्याची जुळवाजुळव केली. चंगेजखानानें आपली सेना टेन्डुक मैदानांत आणून ठेवली. तेथें त्यानें ज्योतिष्याला विचारलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं तुमचा नक्की जय होणार. त्यामुळें चंगेजखानाचा उत्साह अधिक वाढला.

दोन दिवसांनीं प्रेस्टर जोनचें सैन्य सुद्धां तेथें येऊन पोहोंचलें. युद्ध सुरू झालें. शेंकडो लोक हताहत झाले. प्रेस्टर जोनहि युद्धांत मारला गेला आणि शेवटीं चंगेज-खानाचा जय झाला आणि असें सांगतात कीं चंगेजखानानें प्रेस्टरच्या मुलीशीं लग्न केलें.

ह्या युद्धानंतर सहा वर्षें त्यानें राज्य केलें. नवीन नवीन देश जिंकून आपल्या राज्यास जोडले आणि आपलें राज्य वाढविलें. असाच एकदां तो होचो शहरावर चालून गेला. तेथील युद्धांत त्याच्या गुडघ्यांला एक बाण लागला आणि त्यामुळें तो मृत्यू पावला. चंगेजखानानंतर कुयुकखान, बाटूखान वगैरे 'बडे खान' च्या पदावर आले. मार्कोपोलो ज्या वेळीं तेथें गेला तेव्हां कुबलायखान नांवाचा खान राज्य करीत होता. त्याचें साम्राज्य 'बडे खान' राज्यापेक्षां फार मोठें होतें.

( पुढें चालू )





# गंगावतरण

( पंचम अध्याय )

सुरू जाहला गडगडाट पण,
विजा लागल्या अन् चमकूं।
प्रलयकाल जणुं सुरासुरांची
छाती लागलि कीं धडकूं ॥

धरा कांपली, उसळुनि उठला
सागर गिळण्या जगताला।
डोलुं लागलीं पर्वतशिखरें
पुसे कोण मग कोणाला ?

दुथडि नद्या पण वाहुं लागल्या
पाडित झाडें नी झुडपें।
दृश्य भयंकर बघवेना तें
डोळे मिटुनी जग कांपे ॥

भिउनि बिलगली शिवास तत्क्षण
पर्वततनया जगदंबा।
शंकर तिजला पाहुनि हंसला,
जरा लाजली जगदंबा ॥

भगीरथाचा खचूं लागला
धीर पाहुनी तें दृश्य।
तत्समयीं आकाशामध्यें
दिसलें अति अद्‌भुत दृश्य ॥

उतरत होती अति वेगानें
निर्मल धारा गंगेची।
धारण करण्या होती तिजला
शिखा समर्थ शंकराची ॥

आकाशांतुनि येतां खालीं
जटेंत शिरली ती वेगें।
चकित भगीरथ-गौरी,–कोठें
गेलि अचानक ही वेगें ?

गर्वाचें घर होतें खालीं
कळलें गंगेला हें छान !
सव्वाशेर सदा शेराला
नव्हतें तिजला ह्याचें भान ॥



# विचारी सेवक

एका देशांत एक राजकुमार राज्य करीत असे. लहानपणींच त्याचे आईवडील वारले असल्यानें त्याच्यावरच राज्याचा सारा भार होता. रोज तो भिकाऱ्यांना अन्नदान करीत असे. सर्व लोक राजाला आशीर्वाद देत. राजकुमार स्मित करून त्यांचे आशीर्वाद ग्रहण करीत असे. त्याचें लग्न झालेलें नसल्यामुळें त्याला मागें पुढें कांहीं व्याप नव्हता. त्यामुळें कसलीच चिंता नव्हती. प्रजेलाच आपलें कुटुंब समजून तो राहात असे.

एकदां एक तरुण मनुष्य राजकुमाराकडे आला. म्हणाला—"महाराज, आपण फार दानी आहांत अशी ख्याती ऐकली. म्हणून मी आपणांकडे थोडी मदत मागण्यासाठीं आलों आहे. मी एक हतभागी मनुष्य आहें. माझे आईवडील लहानपणींच मला सोडून स्वर्गी निघून गेले. पुढें मी फार कष्टांत दिवस काढले. तशांतच थोड्या दिवसांपूर्वी मी लग्न केलें. पण माझी साडेसाती कांहीं संपली नाहीं. अजून लग्नाला दोन महीने देखील झाले नाहींत तोंच माझी बायको वारली. तिच्या क्रियाकर्मासाठीं सुद्धां माझ्या जवळ पैसे नाहींत. त्यासाठीं मी आपल्याजवळ दहा मोहरा मागण्यास आलों आहें. कृपा करून तेवढी मदत करा. मी आपला आजन्म सेवक राहीन. त्यासाठीं मी मोबदला देखील मागणार नाहीं.

"एवढेंचना. मी तुला शंभर मोहोरा देतों. जा, आपल्या बायकोचें क्रियाकर्म उरक आणि गरीबांना दान धर्म देखील कर. तूं परत आल्यावर मी तुला नोकर म्हणून काम देईन आणि पगार पण देईन." राजकुमार म्हणाला.

दोन दिवस झाल्यावर तो मनुष्य आला व राजाकडे नोकरीला राहिला. कांहीं दिवस



गेल्यावर राजकुमार त्याला पगार देऊं लागला. तो म्हणाला,—महाराज ! आपल्याकडे मला कशाची उणीव आहे ? कधीं जरूर पडली तर मागेन आपणाजवळ." त्यानें पगार घेतला नाहीं.

राजकुमारानें त्याला पगार घेण्यासाठीं विशेष कांहीं आग्रह केला नाहीं. दिवसामागून दिवस चालले होते. होतां होतां सर्व भार राजकुमारानें त्या नोकरावरच टाकला.

त्या नोकराच्या कारकिर्दीतहि कांहीं दिवस गेले. एक दिवस तो नोकर राजकुमाराकडे आला व म्हणाला—" महाराज ! आपण विनाकारण पाण्यासारखा पैसा खर्च करीत आहां. खर्च थोडा कमी केल्यास बरें पडेल. असा खर्च केल्यास किती दिवस पुरेल ? नंतर आपला खर्च कसा भागणार ?"

"त्याची कशाला काळजी. मला नाहीं बायको, नाहीं मुलं, नाहीं कसला व्याप आणि समज, झाला सर्व खजीना रिकामा तर काय माझी प्रजा मला मदत करणार नाहीं ? अरे, भिक्षुक रोज दान घेतल्यावर मला आशीर्वाद् देऊन जातात. त्यांच्या त्या आशीर्वादाचें मोल कांहींच नाहीं का. माझ्यावर प्रसंग आलाच तर ते धांवून येणार नाहींत का ? आज मी त्यांना जेऊं घातलें तर उद्यां ते मला घालतील."

"असल्या आशीर्वादांवर विश्वास ठेवून कांहीं होतें का ?" नोकर म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं भटांभिक्षुकांचीं जेवणें चालली असतां राजानें विषय काढला. म्हणाला—" आपण दररोज माझ्या विषयीं आदर दाखवून माझ्यासाठीं वेळ पडल्यास माझ्यासाठीं वाटेल तो त्याग करण्यास तयार असल्याचें सांगतां, यावर आमचा हा नोकर मुळींच विश्वास करीत नाहीं. मी त्याला पुष्कळ सांगून पाहिलें. मग बोला, हें सर्व खरें कीं खोटें ?"

"त्याच्या बोलण्यासांगण्यावर आपण काय चालतां. तो नंबर एकचा चोर आहे. तो आपल्याकडे राजरोज चोरी करतो. त्याच्यावर चांगली नजर ठेवा." सर्व लोकांनीं सांगितलें.

राजकुमारानें आपल्या नोकराला बोलावून चोरीबद्दल विचारलें. तो म्हणाला— "होय महाराज, त्या लोकांचें म्हणणें अगदीं खरें आहे. मी आपल्या खजिन्यांतील बरेंच धन चोरलें आहे."

"पगार न घेण्याचें सोंग दाखवून पाठीमागें हें पाप कृत्य केलेंस काय ? जा, तुझें काळें तोंड मला ह्यापुढें दाखवूं नकोस." राजकुमाराची आज्ञा होतांच नोकर राजवाड्यांतून बाहेर पडला. तो थेट नदी पार करून गेला. तेथें त्यानें चोरीच्या द्रव्यानें एक मोठा वाडा बांधला.

राजकुमाराचा दान-धर्म पूर्ववत् चालत होता. नोकर गेल्यावर सुमारें एक वर्ष गेलें असेल. पुढें राजकुमाराचा सारा खजीना रिकामा झाला. आतां त्याच्या जवळ फुटकी कवडी देखील शिल्लक राहिली नाहीं. त्यानें विचार केला, ज्या लोकांना आजपर्यंत आपण खायला घातलें ते लोक काय आपल्याला पोसणार नाहींत ?



दुसऱ्या दिवशीं मंडळी जेवत असतां तो म्हणाला—"मित्र हो ! हें माझ्याकडील शेवटचें जेवण. आतां माझ्या जवळ एक पैसाहि शिल्लक नाहीं. आतांपर्यंत तुम्हीं मला आशीर्वाद दिलेत व वचनें दिलींत आणि खरोखरच उद्यांपासून माझा सर्व भार आपणांवर येऊन पडला आहे. तुम्हीं आपलें वचन पाळाल ह्याची मला पूर्ण खात्री आहे." हें ऐकतांच सर्व मित्र परस्परांच्या तोंडाकडे पाहूं लागले आणि शेवटीं म्हणाले—" महाराज, आपण दान-धर्मांतच विना कारण जास्त द्रव्य खर्च केलें आहे. तेव्हां तें दानाचें पुण्यच आपल्या

जास्त उपयोगी पडेल. ते भिकारीच आपली जास्त सहायता करूं शकतील." असें म्हणत जेवण करून ढेकरा देत सर्व मित्र निघून गेले. राजकुमाराकडे त्यांनीं वळून सुद्धां पाहिलें नाहीं.

नंतर त्यानें दान घेणाऱ्या भिकाऱ्यांना विचारलें. म्हणाला–"तुम्हीं माझ्यासाठीं काय वाटेल तें करण्यास तयार आहांत ना? माझ्या जवळ आतां कांहीं नाहीं. म्हणून तुम्ही माझा भार आपल्यावर घ्या."

"भटाभिक्षुकांना बोलावून जेवणें दिलीं तर संपणारच धन. आम्ही बोलून चालून भिकारी. आमच्या जवळ काय असणार? तें काम मोठे लोक करतील. त्यांच्या जवळ धन असणारच आणि समजा ते जर तुम्हांला पोसूं शकले नाहींत तर या आमच्याबरोबर भीक मागायला." भिकारी म्हणाले.

राजकुमार निराश झाला. त्याला वाटलें होतें, हे मित्र मदत करतील पण सर्वांनीं उलट त्यालाच पैसे उधळल्याबद्दल दोष दिला. आतां त्याला त्या नोकराची आठवण झाली. त्यानें तेव्हांच सूचना दिली होती आणि आपण ह्या लोकांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून त्याला हांकलून दिलें. इतक्यांत जवळच त्याला घोड्याच्या टापांचा आवाज ऐकूं आला आणि समोर पाहिलें तों तोच नोकर त्याच्या समोर उभा.

"महाराज मी तेव्हां जें म्हटलें होतें तसेंच झालें ना? कोण आलें आतां आपल्या मदतीला? मला हें भविष्य दिसत होतें आणि म्हणूनच मी आपलें पुष्कळसें धन चोरून नेलें. आपण काळजी करूं नका त्या धनानेंच मी आपल्यासाठीं एक वाडा नदी पलीकडे बांधला आहे. तेथें आपण सुखानें आणि आनंदानें राहा." असें सांगून तो नोकर राजाला नव्या महालांत घेऊन गेला व तेथें दोघे सुखानें राहूं लागले.





# जमिनीवर चालणारी नाव

फार फार पूर्वी एका देशांत एक राजा राज्य करीत होता. त्याला एक फार सुरेख मुलगी होती. ती फार लाडकी होती त्याची. तिच्यासाठीं त्यानें तऱ्हेतऱ्हेच्या वस्तू जमविल्या होत्या. तसल्या गोष्टींची त्याला फार आवड होती. सर्व तऱ्हेनें सुखी होता तो राजा. पण राजा म्हटला कीं त्याला कांहीं तरी चिंता असावीच लागते. ह्या राजाला कांहीं नाहीं तर जमिनीवर चालणाऱ्या एका विचित्र नावेचीच चिंता होती. त्यासाठीं त्यानें ठिकठिकाणचे सुतार बोलावून आणले. शास्त्रज्ञांची मदत घेतली. परंतु तें कांहीं शक्य झालें नाहीं. शेवटीं राजानें जाहीर केलें कीं जो मला जमिनीवर चालणारी नाव आणून देईल त्याला मी बक्षीस देईनच आणि शिवाय माझी मुलगी देऊन अर्धे राज्यहि पण देईन.

त्या गांवाच्या बाहेर एक जंगल होतें. त्यांत एक लाकुडतोड्या राहात असे. त्याला तीन मुलगे होते. त्यांतील मोठ्या मुलाला राजकुमारी बरोबर लग्न करण्याची इच्छा झाली. म्हणून एक दिवस तो खांद्यावर कुऱ्हाड टाकून बरोबर शिदोरी घेऊन जंगलांत गेला. तेथें एक मोठेंसें झाड पाहून त्यानें तें तोडण्यास आरंभ केला.

दुपारपर्यंत झाड तोडून तो न्याहारी करण्यासाठीं बसला. त्यानें आणलेलें गाठोडें सोडलें. एवढ्यांत तेथें एक चिमणी आली. ती त्याच्या समोर येऊन बसली व म्हणाली– "मला पण थोडी भाकरी दे रे!"

"जा, जा, तुला कोण देतो." तो म्हणाला.

"बरं तें जाऊं दे. ह्या झाडाचें काय करणार आहेस?" चिमणीनें विचारलें.

"करीन वाटेल तें. तुला काय त्याचें? वाटलं तर पलंगाचे पायच करीन." लाकूड-तोड्या म्हणाला.

त्याबरोबर चिमणी 'पलंगाचे पाय' म्हणत उडून गेली.

न्याहारी केल्यावर लाकुडतोड्या पुन्हां आपल्या कामाला लागला. कापून ठेवलेल्या खोडावर त्यानें कुऱ्हाड मारली. त्याबरोबर त्यांतून पलंगाचा पाय निघाला. त्याला आश्चर्य वाटलें. पुन्हां त्यानें दुसरा घाव मारला. पुन्हां जो तुकडा निघाला तोहि पलंगाचाच पाय. एकेक घावाबरोबर एकेक पलंगाचा पाय खालीं पडूं लागला. शेवटीं त्याला राग आला. पण करणार काय संध्याकाळ पर्यंत त्या सर्व खोडांतून निघालेले पलंगाचे पाय घेऊन तो घरीं गेला.

"कोठ पर्यंत आली नाव?" घरीं गेल्याबरोबर भावंडांनीं विचारलें. "आऊ देरे कोण करतो त्या मुलीशीं लग्न?" तो म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं दुसरा मुलगा कुऱ्हाड घेऊन निघाला. बरोबर शिदोरी बांधून घेतली. आणि जंगलांत गेला. एक चांगलें जाडजूड झाड पाहून तो तें तोडूं लागला.



दुपारपर्यंत खोड तोडून आडवें पाडलें व नंतर न्याहारीला बसला. त्यानें शिदोरी सोडली असेल नसेल तोंच त्याच्या कानांवर शब्द आले. "मलाहि दे थोडीशी भाकरी." त्यानें वर पाहिलें तर त्याला एक चिमणी दिसली.

"चल, चल, तुला नाहीं मिळत. मोठी आली आहे मागणारी." तो म्हाणाला.

"बरं तें राहूं दे. तूं या एवढ्या मोठ्या झाडाचें काय करणार आहेस." चिमणीनें विचारलें.

"करीन काय पाहिजे तें. तुला काय करावयाचें आहे? मी रवी करणार आहे. काय म्हणणें आहे तुझें?" तो शेतकरी म्हणाला.

तें ऐकतांच चिमणी. "रवी रवी" म्हणत भुर्रकन उडून गेली.

खाणें झाल्यावर थोडा वेळ विश्रांति घेऊन लाकूडतोड्या कामाला उठला. कुऱ्हाड हातांत घेऊन लाकडावर घाव घातला. त्याबरोबर जो लाकडाचा तुकडा उडाला तो रवी होऊन पडला. त्याला तें पाहून आश्चर्य वाटलें. ही काय गम्मत आहे म्हणून त्यानें आणखी एक लाकडाचें छकल उडविलें. तेंहि रवी होऊन पडलें. तो लाकूड तोडत






गेला आणि इकडे रव्यांना ढीग वाढत गेला. त्याला नाव बनवावयाची होती, पण एक सुद्धां तुकडा मनासारखा निघत नव्हता. जो निघे तो रवी होऊन पडे. तो कंटाळला. शेवटीं संध्याकाळपर्यंत झाल्या तेवढ्या रव्या घेऊन घरीं गेला.

“काय झाली का नाव ?” भावांनीं विचारलें.

“जाऊं दे रे, कोण पडतो त्या भानगडींत.” तो म्हणाला.

तिसऱ्या दिवशीं तिसरा मुलगा जंगलांत निघाला. शिदोरी बांधून घेतली. कुऱ्हाड खांद्यावर टाकली आणि पोहोंचला जाऊन रानांत. त्यांत एक मोठें जाडजूड झाड पाहून तें तोडूं लागला.

दुपारपर्यंत खोड तोडून खालीं पाडलें आणि तो न्याहारीसाठीं बसला. सावलींत बसून गाठोडें सोडलें. त्याच वेळीं त्याला चिमणीचा आवाज ऐकूं आला. ती म्हणाली— “मला थोडी भाकर दे.” “ह्यांत तुझासुद्धां वाटा आहे घे.” असें म्हणत त्यानें खुशीनें चार तुकडे विखरून टाकले. चिमणीनें ते सर्व टिपले. मग पंख फडफडवीत त्या तोडलेल्या खोडावर बसून म्हणाली,—“ होय, पण ह्या खोडाचें तूं काय करणार आहेस ?”

“जमिनीवर चालणारी नाव करणार आहे. पण ती कशी करावी हें लक्षांत येत नाहीं.” तो म्हणाला.

“जमिनीवर चालणारी नाव” असें ओरडत चिमणी उडून गेली.

खाणें झाल्यावर विश्रांति घेऊन लाकूडतोड्या कामाला लागला. लाकडावर पहिला घाव घालतांच त्याचें एक ढकल निघालें आणि नावेचा एक भाग होऊन पडलें. दुसरा घाव घातला, दुसरा भाग होऊन पडला. असें होतां होतां संध्याकाळ होईपर्यंत नाव तयार झाली. खरोखरच ही नाव चालेल का ? हें पाहाण्यासाठीं तो नावेंत बसला. वल्हें हातांत घेऊन “नाव चालली माझी पुढती !” म्हणून वल्हवूं लागला. तर झाडांच्या मधून वाट काढीत ती भराभर जाऊं लागली.

थोडें दूर गेल्यावर त्याला एक माणूस दिसला. तो हाडांचा ढिग समोर घेऊन बसला होता आणि तीं चघळत होता. “काय रे हाडें कां चघळतोस ?” नाववाल्यानें विचारलें.

“काय करूं रे ? किती खालें तरी पोटच भरत नाहीं. जवळचा सर्व पैसा खाण्यापिण्यांतच खर्च झाला.” तो मनुष्य म्हणाला.

“तर मग चल माझ्याबरोबर मी राजवाड्यांत जात आहें. तेथें तुला वाटेल तेवढें खायला मिळेल.” नाववाला म्हणाला. तो मनुष्य नावेंत बसला. नाव पुढें चालूं लागली.

थोडें दूर गेल्यावर दुसरा एक मनुष्य भेटला. तो कालव्याला तोंड लावून पाणी पीत होता. कालव्याचें पाणी कमी होत होतें.

“कोण रे बाबा तूं ? असें काय पाणी पीत आहेस ?” त्यानें विचारलें.

“तहानच भागत नाहीं त्याला काय करणार. शक्य होतें तोंपर्यंत दारू प्यालों.



आतां पाणी पिण्याची वेळ आली, पाणी पितों आहें." तो म्हणाला.

"चल माझ्याबरोबर राजवाड्यांत" म्हणून लाकूडतोड्यानें त्याला नावेंत घेतलें. पुढें गेल्यावर त्याला एक मनुष्य दिसला. तो मोठमोठ्या झाडांची भली मोठी मोळी बांधून खांद्यावर घेऊन चालला होता.

"हें रे काय हें? हें सारें जंगलच घेऊन कोठें चालला आहेस?" नाववाल्या लाकूडतोड्यानें विचारलें.

"कितीहि लाकडें तोडून आणलीं तरी माझ्या सावत्र आईला पुरतच नाहींत. मला फार राग आला माझ्या सावत्र आईचा. म्हणून आज मी हीं एवढीं लाकडें घेऊन जात आहें." तो म्हणाला.

"चल माझ्याबरोबर. तुला जरा सुद्धां मेहनत करावी लागणार नाहीं. मी राजाकडे जातो आहें." लाकूडतोड्या म्हणाला.

त्या माणसानें एक झाड काठीसारखें बरोबर घेतलें आणि नावेंत बसला. नाव पुढें चालं लागली. थोड्या वेळानें त्याला आणखी एक माणूस भेटला. तो आकाशाकडे तोंड करून जोरानें फुंकर घालीत होता. "हें काय?" त्याला नाववाल्यानें विचारलें.



"मालकाच्या शेतांत अजून धान्य तसेंच पडलें आहे आणि आकाश तर भरून आलें आहे. म्हणून ढगांना मी फुंकर घालीत आहें. जिवापाड कष्ट केले तरी मालकाचें काळीज कांहीं विरघळत नाहीं. एक दाणाहि जास्त उचलं देत नाहीं." तो म्हणाला.

"मग कशाला करतोस अशी नोकरी. चल माझ्याबरोबर राजाकडे. मी तिकडे जात आहें." असें म्हणून लाकूडतोड्यानें त्याला नावेंत घेतलें व पुढें निघाला.

लाकूडतोड्या आपल्या ह्या चार मित्रांना घेऊन राजाकडे गेला. म्हणाला—"मी जमिनीवर चालणारी नाव घेऊन आलों आहें. ती पहा तिथें आहे." राजानें ती नाव जमिनीवर आणि पाण्यांत चालवून पाहिली. त्याला पाहिजे होती तशीच अगदीं ती नाव होती. "वा! छान आहे. मला जशी पाहिजे होती तशीच आहे ती. ह्याची योग्य किंमत तुला देववितों. काळजी करूं नकोस." राजा म्हणाला.

"योग्य किंमत म्हणजे काय? आपण तर म्हणाला होतां आपली मुलगी आणि अर्धें राज्य देईन. तें द्या." लाकूडतोड्या म्हणाला.

राजाला तें आवडलें नाहीं. राजकुमारांना सोडून लाकूडतोड्याच्या गळ्यांत बांधणार



का मी आपली मुलगी ? असा विचार करून तो म्हणाला—"आम्हीं म्हटलें होतें खरें तसें, पण आतां तो बेत बदलला आहे. अजून सुद्धां माझ्या कोठारांत खूपसें जुनें धान्य पडलें आहे. तें संपल्यावर नवें धान्य आल्यावर मुलीचा विवाह् करण्याचें ठरविलें आहे."

"त्यांत काय ! मी करतो तें संपविण्याचें काम." त्यानें त्या खादाड माणसाला राजाच्या कोठारांत पाठविलें. क्षणार्धांत त्यानें तें रिकामें केलें.

"हं ! मागवा धान्य आणि करा लग्नाची तयारी. संपलें तुमचें जुनें धान्य." तो म्हणाला.

"धान्य संपविणें काय मोठेंसें ? जा रे, त्या पिपांतील दारू पिऊन टाक." राजा म्हणाला. नावचाल्यानें ताहानेल्याला आज्ञा दिली. तो तीं सर्व संपवून हंसत आला. म्हणाला—"आज आत्मा शांत झाला."

राजाला त्या लाकूडतोड्याचा फार राग आला. त्यानें आपल्या सैन्याला बोलावून त्या सर्वांना हांकलून देण्यास सांगितलें. सैन्याला पाहून लाकूडतोड्यानें आपल्या जंगली मित्राला इशारा केला. बरोबर आणलेलें झाड लाठीसारखें फिरवीत त्यानें सैन्याला उधळून लावलें.

राजाचा राग मस्तकांत जाऊन पोहोंचला. त्यानें आपल्या घोडदलाला बोलावून त्या पांचांचें पारिपत्य करण्यास सांगितलें. ते येतांच फुंकर घालणाऱ्या मित्राला पुढें जाण्यास सांगितलें. त्यानें सर्व सैन्याचा समाचार घेतला. आपण सुद्धां ह्यांत उडून जाऊं कीं काय असें वाटून राजानें घाबरून आपल्या मुलीचें लग्न लाकूडतोड्याशीं लावून दिलें आणि म्हटल्याप्रमाणें अर्धें राज्य पण दिलें.

लाकूडतोड्यानें आपल्या मित्रांना मंत्र्यांच्या जागा देऊन आनंदानें राज्य केलें.





त्या महायंत्राजवळ उभें राहणें त्यांना अशक्य झालें. त्या पर्वतकायाच्या कोटाच्या खिशांत आणखीहि कांहीं वस्तू होत्या.



त्या म्हणजे एक चाकू, गाडीच्या चाका एवढ्या गोल सोन्याच्या मोहोरा, काळे गोळे. (त्या पिस्तुलांतील गोळ्या होत्या.)



रिपोर्ट ऐकल्या बरोबर राजा तेथें आला. त्यानें त्यांतील लोखंडाचें मोठें यंत्र दाखविण्यास सांगितलें.



तें यंत्र म्हणजे माझें पिस्तूल. मी हवेत पिस्तूल उडवून दाखविलें. पण त्याचा आवाज ऐकून राजा व सरदार सर्व दूर पळून गेले.



नंतर राजातेवरून सैनिक माझें पिस्तूल, घड्याळ व चाकू गाडींत घालून घेऊन गेले. हें सर्व काय चाललें आहे ह्याचा मला पत्ताच लागेना.



सुदैवानें माझा चष्मा माझ्या जवळच राहिला. तो त्यांच्या नजरेस पडला नाहीं. आतां मी तो लपवून ठेवला आहे.



एका राजदूतानें येऊन सांगितलें कीं राजानें बेड्या काढून टाकण्यास सांगितलें आहे, पण त्यासाठीं कांहीं अटी आहेत.




माझ्या बेड्या निघणार म्हणून मला आनंद झाला. पण कोणाच्याहि राज्याचें नुकसान करण्याची माझी इच्छा नव्हती.




राजाज्ञेची अवज्ञा करण्याची माझी काय बिशाद! माझी इच्छा अनिच्छा कसली? मी गुपचुप शपथ घेऊन टाकी.



माझ्या हाताएवढ्या वृक्षांना पार करून मी ब्लेफुस्कूची राजधानी मिल्टेन्डो पाहण्यास निघालों.



मी येण्यापूर्वी सुमारें दोन तास अगोदर गांवांत घोषणा झाली असल्यामुळें सर्व गल्ल्या रस्ते अगदीं रिकामे होते. लोक दरवाज्यांतून, खिडक्यांतून फटींतून पाहात होते. मी पांच फूट रुंदीच्या राजपथावरून काळजीपूर्वक पावलें टाकीत राजवाड्याकडे चाललों होतों.



नगराच्या मध्यभागीं सुंदर राजोद्यान व राजवाडा होता. सभोंवार पांचसात फूट उंचीचे संगमरवरी महाल फारच सुंदर दिसत होते. राजवाड्यांत चाळीस चौरस फुटांचें पटांगण होतें.



राजवाड्याच्या किल्ल्याचा तट दोन फूट उंच होता. तो मोडूंबिडूं नये म्हणून काळजीपूर्वक ओलांडून मी आंत गेलों.



वाड्यांतील पटांगणांत बसून मी भीतभीतच वाड्याच्या बंद दरवाज्यांच्या आणि खिडक्यांच्या फटींतून डोकावून पाहिलें.



आंत राजसभेमध्यें कितीतरी चकचकीत आसनें होतीं. सिंहासन फार सुंदर होतें. दरबार भरला होता. राजाराणी सिंहासनावर बसले होते.




मंत्री खिडकीजवळ येऊन म्हणाला कीं लिलीपुटचे शत्रू ब्लेफुस्कू यांच्या आक्रमणाला तोंड देण्यास जा.





लिलीपुटच्या समुद्रकिनाऱ्यावरून ब्लेफुस्कूचा तट दिसत होता. त्यांचीं जहाजें, व नावा लाकडाच्या तुकड्यांप्रमाणें दिसत होती.

दोन्हीं राज्यांतील समुद्र अगदीं उथळ होता. म्हणून मी तो अर्ध्या तासांतच सहज आणि पायींच पार केला.



लपत छपत वांकून शत्रूंची नजर चुकवीत पुढें जाऊन मी बंदरापर्यंत येऊन पोहोंचलों.



अगदी जवळ जाऊन मी उठलों आणि एकदम ओरडलों. माझें ओरडणें त्यांना विजेच्या कडकडाटाप्रमाणें वाटलें. माझें अवाढव्य शरीर पाहून ते लोक घाबरले. सर्वत्र गोंधळ उडून गेला. नौदलांतील सैनिकांनी भराभर पाण्यांत उड्या टाकल्या व जीव वांचविण्यासाठीं चोहोंबाजूस विखुरले गेले.

# युद्धांत पराजय

निश्चयी विक्रमार्क शव आणण्यासाठीं पुन्हां वडाच्या झाडाकडे गेला. शव खांद्यावर घेतलें, आणि स्मशानाकडे चालूं लागला. चार पावलें जातो तोंच शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, मनुष्य कोणासाठीं काय करील कांहीं सांगवत नाहीं. एखाद्यासाठीं तो व्यर्थ आपलें सुख, वैभव सुद्धां सोडून देतो. आतां तुझेंच पाहा ना! तुझ्या ह्या अनाठाई कष्टावरून मला मुकुन्दाची गोष्ट आठवते. खरें पाहतां युद्ध जिंकण्याची त्याच्यांत क्षमता होती. तरी सुद्धां त्याचा पराभव झाला आणि अपयशाचें खापर त्याच्या डोक्यावर फोडलें गेलें. ऐक सांगतों. तुला सारी गोष्ट." असें म्हणून त्यानें गोष्ट सांगण्यास सुरवात केली. "महानंद कोशल देशाचा एक प्रजावत्सल

वेताळाच्या गोष्टी




राजा होता. त्याचे सरदार श्रद्धेनें त्याची मदत करीत असत. पण कोणाचें चांगलें देवालाहि पाहावत नाहीं. त्याच्या सरदारांत रुद्रगिरीचा रुद्रवर्मा एक सरदार होता. त्याला राजाच्या छत्रछायेंत राहणें आवडलें नाहीं.

वास्तविक महानंद शांतिप्रिय राजा होता. परंतु रुद्रवर्माचें बंड त्याला मुळींच आवडलें नाहीं. त्याला चांगलें प्रायश्चित्त द्यावें, म्हणून थोडेंसें सैन्य घेऊन कांहीं सरदारांबरोबर त्यानें रुद्रगिरीला वेढा दिला.

रुद्रगिरीचा किल्ला बळकट होता. रुद्रवर्माच्या जवळ पराक्रमी वीर होते. त्यामुळें महानंदाच्या सैन्याचे कित्येक हल्ले त्यानें परतवले. महानंदाचें सैन्य सुद्धां कांहीं कमी निपुण नव्हतें. म्हणून कित्येक दिवस युद्ध चालू राहिलें. महानंदानें वेढा कायम ठेवला.

दोन्हीं बाजूंचे शिपाई कंटाळले. महानंदाला वाटलें कीं झालें तेवढें पुरें, झालें. वेढा उठवून परत जावें. परंतु तसें परतण्यांत त्याला अपमान वाटत होता. रुद्रवर्माचा सुद्धां कोंडमारा होत होता. त्याला वाटलें मुकाट्यानें राजाला शरण जावें. पण युद्धावांचून हार मानणें त्याला रुचेना.

महानंदाच्या सैन्यांत मुकुंद नांवाचा त्याचा फार पराक्रमी वीर भाचा होता. तो तरुण होता. आपलें युद्ध कौशल दाखविण्याची त्याला फार खुमखुमी होती.

मुकुंदाला व्यर्थ दिवस घालविणें फार कठिण झालें. त्याचें रक्त सळसळत होतें. म्हणून तो रोज जवळच्या जंगलांत शिकारीला जात असे. कधीं कधीं आपल्या मित्रांना एकत्र जमवून खेळ खेळत असे. प्रतिस्पर्धा ठेवत असे, आणि तींत स्वतःसुद्धां भाग घेऊन सर्वांना हारवून टाकीत असे.

रुद्रवर्माच्या धाकट्या भावाचा एक मुलगा मुकुंदासारखाच होता. त्याचें नांव मित्रवर्मा.




तो पाहात असे कीं मुकुंद आपल्या मित्रांना जमवून चढाओढीचे खेळ खेळत असतो. एकदां त्याला वाटलें आपण सुद्धां जावें खेळायला. पण जाणार कसा? म्हणून त्यानें युक्ति केली. कपडे बदलून सर्वांचा डोळा चुकवून तो हळूच किल्ल्याबाहेर निसटला. सरळ खेळाच्या ठिकाणीं गेला. त्याला कोणी ओळखलें नाहीं. तो शत्रुपक्षाचा असेल असें कोणासहि वाटलें नाहीं.

मुकुंदानें त्याला खेळांत घेतलें. पाहिजे असलेलीं शस्त्रास्त्रें आणि घोडा त्याला दिला. त्यानें सर्व खेळांत आपलें नैपुण्य दाखविलें. आजपर्यंत इतका हुशार कोणीहि खेळाडू तेथें आढळला नव्हता. त्याची हुशारी पाहून त्या सर्वांच्या मनांत एक संशय उत्पन्न झाला. हा आपल्या सैन्यांतला असता तर आतांपर्यंत आपल्या नजरेस आला असता. म्हणून हा कोणी तरी बाहेरचा—शत्रूपक्षाचा असण्याचा सुद्धां संभव आहे. त्यांनीं त्याला विचारलें. म्हणाले—"तूं कांहीं आमच्यांतील दिसत नाहींस."

मित्रवर्मानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें लोकांचा संशय अधिक वाढला. त्याला धरण्यासाठीं लोक त्याच्यावर धांवून गेले. तर तो घोड्यावर होता तसाच किल्ल्याकडे वळला आणि घोडा भरधांव फेंकला. ह्या कारणानें तो शत्रूकडील माणूसच आहे याविषयीं सर्वांची खात्री झाली.

मित्रवर्माला पळून जातांना पाहून मुकुंदाला राग आला. "पळून जातो आहे काय? पकडा त्याला. सोडूं नका." असें म्हणून तो आपल्या घोड्यावर बसून त्याच्या पाठीमागें धांवला. त्याचा घोडा उत्तम जातीचा होता, व तोहि तरबेज होता. त्यामुळें त्यानें थोड्याच वेळांत त्याला गांठलें. तोंपर्यंत मित्रवर्मा किल्ल्याच्या दाराशीं पोहोंचला होता. त्याच्या

मागोमाग जाऊन मुकुंद त्याला तलवारीनें मारणार तोंच किल्ल्यावरून किंचाळी आली. एका स्त्रीचा आवाज होता तो. ती ओरडून म्हणाली–"माझ्या भावाला मारूं नका."

मुकुंदाचा हात एकदम खालीं आला. घोड्याचा वेग कमी झाला. त्यानें वर पाहिलें तर एक तरुणी काकुळतीनें त्याच्याकडे पाहात असलेली त्याला दिसली. तिच्या सुंदर चेहेऱ्यावर भयाची छटा पसरली होती. संधी साधून मित्रवर्मा किल्ल्याच्या दारांतुन आंत शिरून कोठें दिसत नाहींसा झाला. मुकुंदानें घोडा फिरविला व कांहीं तरी विचार करीत खिन्न मनानें आपल्या छावणीकडे निघाला. त्या प्रतापी पण शत्रूकडील युवकाच्या बहिणीची त्याला वारंवार आठवण होत होती. त्यामुळें त्या युवकावरील त्याचा राग हळू हळू शांत झाला. शेवटीं त्याला तो शत्रु मित्रवत् वाटूं लागला.

मित्रवर्मा मुकुंदाच्या पराक्रमावर व युद्ध कौशल्यावर मुग्ध होता. त्यानें त्याच्या पराक्रमाचें कौतुक केलें. "तो आपला शत्रु असल्या कारणानें मारण्यासाठीं धांवला. पण तोच जर आपला मित्र असता तर किती बरें झालें असतें." त्याच्या मनांत आलें.

तेव्हां पासून तो आपल्या चुलत्याला सांगूं लागला कीं आपण संधिपत्र पाठवावें. म्हणाला–"काका, मला वाटतें, खरें पाहिलें तर ह्या युद्धांत आपलीच चूक आहे. विनाकारण आपण त्याच्या विरुद्ध बंड केलें. म्हणून आपल्याकडूनच प्रथम नमतें घेतलें गेलें पाहिजे."

"ठीक आहे. मग तूंच हें काम कर. जर ते मुकाट्यानें वेढा काढून निघून गेले तर मी पूर्वीप्रमाणेंच त्याच्या आधीन होऊन राहीन. पण कांहीं कमीपणाची अट ठेवली तर मात्र मला तें पटणार नाहीं. मी कांहीं पराभूत झालों नाहीं." रुद्रवर्मा म्हणाला.

मित्रवर्मानें आपल्या चुलत्याचा निरोप महानंदाला कळविला. महानंदाला जय पदरीं पडल्याशिवाय जाणें पटलें नाहीं.

"रुद्रवर्मा विद्रोही आहे. त्या अपराधाचें त्याला योग्य प्रायश्चित मिळालेंच पाहिजे, त्यानें पराजय स्वीकार करून मला शरण आलें पाहिजे. तेव्हां मी जाईन." महानंदानें उलट निरोप पाठविला.

"महाराज, क्षमा असावी. आमचे राजे साहेब ही अट मानण्यास तयार होणार








नाहींत. माझ्या प्रयत्नाला यश आलें नाहीं त्याबद्दल मला वाईट वाटतें.

तो बाहेर पडतांच मुकुंद त्याला भेटला. अगदीं कडकडून भेटला, जसे दोन मित्र भेटावेत तसे. मुकुंद मित्रवर्माला जरा पुढेंपर्यंत पोहोंचविण्यासहि गेला.

"आपल्या दोघां राजांच्या मनांत भेद असला तरी आपली मैत्री कायमच राहील. तुझ्यासारखा पराक्रमी योद्धा माझा मित्र आहे ह्यांतच मला अभिमान वाटतो." मित्रवर्मा म्हणाला. "मलाहि ह्या मैत्रीचा अभिमान आहे. मित्र असावा तर असाच आणि बरोबरच आहे. सारख्या गुणवाल्यांची मैत्री फार काळ टिकते." थोडा विचार करून मुकुंद पुन्हां म्हणाला—"मित्रा, कांहीं तरी करून हें युद्ध थांबविलेंच पाहिजे. मला वाटतें तूं आपल्या राजाच्या वतीनें आणि मी आमच्या राजाच्या वतीनें परस्परांशीं द्वंद्व-युद्ध खेळूं आणि त्यांत जो जिंकेल त्याचा पक्ष विजयी झाला असें समजूं. आपण दोघे मित्र असल्याकारणानें दुष्टबुद्धीनें कांहीं आपण युद्ध करणार नाहीं. असें केल्यानें युद्ध थांबेल आणि प्राणहानि सुद्धां होणार नाहीं. काय वाटतें तुला ?"

"ठीक आहे. तसाहि प्रयत्न करून पाहूं या. तू तुझ्या राजाला सांग. मी माझ्या राजाला समजावतों." असा निर्णय घेऊन दोघे आपाआपल्या वाटेला लागले.

दोन्हीं पक्षांतर्फे द्वंद्व युद्ध करायचें ठरलें. महानंद राजानें द्वंद्व-युद्धाची उत्तम तयारी ठेवण्याचें काम घेतलें. द्वंद्वाच्या प्रारंभीं पुन्हां अटी उच्चारल्या गेल्या. महानंद राजा रुद्रवर्म्याला म्हणाला—"जर ह्या द्वंद्वांत आमचा प्रतिनिधि मुकुंद हारला तर आम्ही वेढा उठवून परत जाऊं. एवढेंच नव्हें तर तुला स्वतंत्र राजा म्हणून मान्य करूं आणि जर तुमचा प्रतिनिधि मित्रवर्मा हारला तर मात्र तुला किल्ला सोडून जावें लागेल. मित्रवर्मावर पूर्ण भरंवसा असल्या कारणानें रुद्रवर्मानें त्या अटीला होकार दिला.

रुद्रगिरीच्या किल्ल्याच्या जवळून एक नदी वाहात होती. ह्या नदीच्या आणि किल्ल्याच्या मधल्या मैदानांत द्वंद्व-युद्धाची जागा तयार करण्यांत आली. महाराज महानंदाचे लोक नदीच्या किनाऱ्यावर जमून बसले व रुद्रवर्माचे लोक किल्ल्याच्या तटावर चढून बसले. सकाळीं सूर्योदयाला युद्धाला आरंभ झाला. दुपारी सूर्य डोक्यावर येईपर्यंत दोघांची बाजू सारखीच राहिली. त्यामुळें कोणाची सरशी होते ह्याची कल्पना कोणालाच येईना. सर्वजण मात्र डोळ्यांत तेल घालून पाहात बसले होते.

"मित्रा ! उन्हें फार वाढलीं, नाहीं ? चल आपण थोडी विश्रांति घेऊं." मुकुंद म्हणाला. "होय बोवा. मी फार दमलों आहें. शाबास आहे हं तुझी. तुझ्याशीं द्वंद्व करणें कांहीं सोपें नाहीं." मित्रवर्मा कौतुकानें म्हणाला व दोघेहि एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून विश्रांतीसाठीं झाडाखालीं बसले. दोघांच्यासाठीं जेवण आलें. दोघे बसून गप्पा





मारीत जेवले. नंतर थोडावेळ गवतावर आडवे झाले. उन्हें थोडीं उतरल्यावर पुन्हां दोघे युद्धाला उठले. लढतां लढतां मित्रवर्माची तलवार तुटून खालीं पडली. किल्ल्यावरील लोकांतून नैराश्याचे प्रलाप आले आणि नदीकडील लोकांतून आनंद गर्जना उसळल्या. परंतु मुकुंदानें आपली तलवार फेंकून दिली. म्हणाला—"युद्ध समानतेंत व्हावें. निःशस्त्राच्यावर शस्त्र उगारणें अन्याय आहे." असें सांगून तो कुस्तीला सिद्ध झाला.

मित्रवर्माला मुकुंदाच्या मोठ्या मनाचें कौतुक वाटलें. संध्याकाळपर्यंत कुस्ती चालू होती. कोणीहि हारण्याचें लक्षण दिसेना. दोन्ही बाजूचे लोक मोठ्या उत्सुकतेनें कुस्ती पाहात होते. ते जणूं एकाद्या तारेवर चालत असल्यासारखे दिसत होते. कोठें श्वास जातो त्यांचे त्यांनाच समजत नव्हतें. सूर्यास्ताची वेळ आली. आतां कुस्ती पुरे म्हणून सांगावें असें महानंदाच्या मनांत येऊं लागलें. इतक्यांत मुकुंद चीत झालेला दिसला. तो खालीं पडला असून मित्रवर्मा त्याच्या छातीवर बसला होता. महानंद राजाच्या तोंडचें पाणी पळालें. तो उठून शिबिराकडे निघून गेला. किल्ल्यांतील लोक आनंदानें मित्रवर्माला खांद्यावर घेऊन किल्ल्यांत निघून गेले.

महानंदानें आपलें वचन पूर्ण केलें. त्यानें रुद्रवर्माला स्वतंत्र राजा मानून आपला वेढा उठविला व आपल्या गांवीं निघून गेला.

मुकुंदाची आणि मित्रवर्माची दोस्ती दिवसेंदिवस वाढत होती. त्यांतच मित्रवर्मानें आपल्या बहिणीचें मुकुंदाशीं लग्न लावून दिलें. म्हणजे दुधांत साखरच पडली.

इतकी गोष्ट सांगितल्यावर वेताळ थांबला आणि राजाला म्हणाला—"मुकुंदानें आपण हारलों असें कां भासविलें? त्याला मित्रवर्म्याच्या बहिणीशीं लग्न करावयाचें होतें म्हणून?








का आपण तिच्या भावाचा पराक्रम सावीत केला कीं ती आपल्यावर अधिक प्रेम करील म्हणून? कां मित्रवर्माला खुश करण्यासाठीं त्यानें हार मानली? काय कारण असेल? माहीत असून सुद्धां जर तूं उत्तर दिलें नाहींस तर परिणाम तुला माहीतच आहे;"

विक्रमार्क म्हणाला—"हीं सारी कांहीं खरीं कारणें नव्हेत. मित्रवर्माचें मन मुकुंदाच्या मना इतकेंच साफ होतें. त्यामुळें मुकुंद जिंकला असता तरी दोघांची मैत्री कायमच राहिली असती आणि मित्रवर्माच्या बहिणीशीं लग्न होण्याची गोष्ट दैवानेंच सांगितल्याप्रमाणें होती. त्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्या द्वंद्वाच्या अटी. जर मुकुंद जिंकला असता तर रुद्रवर्माला राज्यांतून बाहेर निघून जाण्याची पाळी येणार होती. ह्या दोघांचें द्वंद्व-युद्ध करण्याचें कारण म्हणजे युद्ध टळून शांतता व्हावी, एवढेंच होतें. त्यांत रुद्रवर्माला राज्यांतून घालविण्याचा हेतू नव्हता. खरें म्हणजे राजा महानंद रुद्रवर्माच्या सामर्थ्या पुढें हात टेकून परत जाण्यास निघाला होता. मग रुद्रवर्मासारख्या पराक्रमी माणसाची किंमत इतकी कमी करावी, हें मुकुंदाला आवडलें नाहीं. म्हणून त्याला स्वतंत्र करण्यांतच न्याय आहे असें समजून त्यानें आपला पराजय मानला. नाहींतर जेव्हां मित्रवर्माची तलवार तुटली तेव्हांच त्यानें विजय घोषणा केली असती. त्याला आपल्या विजयाचा विश्वास होता. पण त्याला ह्या वेळीं विजय नको होता, म्हणूनच त्यानें आपला पराजय भासविला."

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवाला घेऊन अदृश्य झाला व झाडाला लटकूं लागला. (कल्पित)




# अजिंठ्याची लेणीं

आपल्या देशांतील चित्रकलेचें प्रतीक अजिंठ्याच्या लेण्यांत स्पष्ट दिसून येतें.

विंध्य पर्वताच्या प्रवेशद्वाराप्रमाणें असलेल्या एका २५० फूट उंचीच्या टेकडींत इ. सनाच्या पहिल्या शतकांत बौद्धांनीं आपल्या राहण्यासाठीं तेथें गुहा खोदल्या. त्याचप्रमाणें जैनांनींहि गुहा बनविल्या. ह्या गुहांत मूर्ती खोदल्या आणि भिंतीवर संपूर्ण बुद्ध शरीर कोरून काढलें आहे. असें म्हणतात कीं ह्या गुहा खोदण्याचें काम व चित्रकारीचें काम सात, आठ शताब्दीपर्यंत सतकाळ होतें. तेथें दिसण्यास येणारी चित्रकला व शिल्पकारी अखिल भारतांत दुसऱ्या कोठेंहि पहावयास मिळत नाहीं. अजिंठ्याच्या लेण्यांत २५ विहार व ५ चैत्यें (बौद्ध मंदिरें) आहेत. येथील चित्रकारी व शिल्पकला पाहाण्यासाठीं सर्व जगाच्या कानाकोपऱ्यांतून लोक येत असतात.

पण आश्चर्य असें कीं ही शिल्पकारी व चित्रकारी बौद्धधर्माच्याबरोबरच ल्याला गेली इ. स. १८१९ मध्यें कांहीं युरोपीयन सैनिकांनीं ह्याचा शोध लावला आणि ही अज्ञात कृति पुन्हां जगाच्या समोर आली.








# किल्ला चाकण

[ सौ. जयश्री नारायण पाटणकर, पुणें ]

पुणें-नाशिक रोडवर पुण्यापासून १८ मैलांवर असलेलें चाकण हें गांव सुमारें ३०० वर्षांपूर्वी एक महत्वाचें ठाणें होतें. चाकण येथें छत्रपती शिवाजी महाराजांचा एक भुईकोट किल्ला होता. शाहिस्तेखान ज्यावेळीं पुण्यावर चाल करून येण्यास निघाला त्यावेळीं चाकणचा किल्लेदार फिरंगोजी नरसाळा हा होता. शाहिस्ते-खानानें फिरंगोजीस बिनशर्त शरण येण्याकरितां निरोप पाठविला. पण बिनशर्त शरण जायला तो काय कच्च्या गुरूचा चेला होता ? शाहिस्तेखानाच्या मोठ्या फौजेपुढें व अजस्र तोफांपुढें किल्ला लढविणें कांहीं सोपी गोष्ट नव्हती. तरी सुद्धां जिवास जीव देणाऱ्या मूठभर, पोलादी मनगटाच्या मावळ्यांच्या जोरावर त्यानें टक्कर देण्याचा निर्धार केला. अनेक दिवस खानानें किल्ल्याला वेढा दिला. परंतु फिरंगोजी शरण येण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं तटावर खानाच्या तोफा आग ओकूं लागल्या. तटाला खिंडार पडलें तरी सुद्धां फिरंगोजीनें किल्ला लढविण्याची शर्थ केली व लढतां लढतां शत्रुच्या अनेक सैनिकांना कंठस्नान घातलें.

अखेर खानानें किल्ला जिंकला पण फिरंगोजीच्या पराक्रमानें मात्र तो दिपून गेला. शिवाजीच्या शूर, स्वामिभक्त सरदारांच्या पराक्रमाची चुणूक त्याला पहावयास मिळाली. धन्य ते मराठे आणि धन्य तो फिरंगोजी ! आजहि त्या ठिकाणीं किल्ल्याचे कांहीं तट तेव्हांपासून तसेच उभे आहेत आणि तिथें जाणाऱ्या प्रत्येक माणसाला फिरंगोजीचा तो पराक्रम ओरडून सांगत आहेत.

आजहि चाकणला व्यापारी लोकांची वर्दळ आहे. परंतु ती फिरंगोजीच्या स्मृतीला आदरांजली वाहण्याकरतां नव्हे तर तेथील कांदे व बटाटे खरीदण्याकरतां. चाकणचा आठवड्याचा बाजार साऱ्या महाराष्ट्रभर प्रसिद्ध आहे.

असें हें एक पुण्याच्या परिसरांत असलेलें ऐतिहासिक महत्वाचें ठिकाण आहे.













धर्मराजाच्या आज्ञेवरून अभिमन्यूनें चक्रव्यूहांत प्रवेश केला. कौरवांना वाटलें, आतां अभिमन्यु आपल्या तावडींत सांपडला. म्हणून ते आनंदानें टाळ्या वाजवूं लागले. परंतु त्यांचा हा उत्साह फार वेळ टिकला नाहीं. अभिमन्यु आपल्या नव्या दमानें कौरवांवर तुटून पडला. त्याला तोंड देतां देतां कौरव सेना अगदीं जिकीरीस येऊन सैरावैरा पळूं लागली.

अभिमन्यूचा आवेश पाहून दुर्योधन त्याच्यावर धावून गेला. पाठोपाठ दुर्योधनाच्या मदतीसाठीं त्याच्या सैन्यांतील योद्धे गेले. पण अभिमन्यू पुढे कोणीच टिकूं शकला नाहीं. अभिमन्यूनें कर्णावर एक बाण सोडला तो त्याच्या शरीरांत जाऊन घुसला. नंतर एका बाणानें शल्याला मूर्छित केलें. सुषेण, दीर्घलोचन कुण्डभेदी वगैरे योद्ध्यांना मारून टाकले. शल्याच्या भावाचें डोकें उडवलें. अशा तऱ्हेनें त्यानें सर्वांची खबर घेतली कृष्णार्जुनाप्रमाणेंच त्याला सुद्धां सर्व शस्त्रास्त्रांची माहिती होती आणि तो त्यांच्याप्रमाणेंच त्यांचा उपयोगहि करीत होता. द्रोण हें सर्व पाहात होता आणि त्याचें मनांतल्या मनांत कौतुक करीत होता. शेवटीं त्यानें एकदां दुर्योधनाजवळ म्हटलें देखील कीं हा मुलगा कसा अगदीं आपल्या बापाप्रमाणेंच लढत आहे. अर्जुनांत व अभिमन्यूंत कांहीं फरक नाहीं, याला तोंड देणें वास्तविक पाहातां आमच्या कौरव सेनेला मारण्याचें सामर्थ्य असून कां यानें तसें केलें नाहीं कोण जाणें !

द्रोणाच्या या बोलण्यावर दुर्योधन व्यंग करून कर्ण, दुश्शासन, शल्य, बाल्हिक वगैरे वीरांना म्हणाला—"अर्जुनाच्या मुलाला मारण्याचा या ब्राह्मणाचा बेत दिसत नाहीं. तेव्हां आपल्यालाच केलें पाहिजें हें कार्य.

"दादा ! कां एवढी चिंता करतोस ? बघ मी क्षणार्धांत त्या पोराला मारून टाकतों. त्या नंतर पाहा काय होते गति पांडवांची ती. ते सर्व शोकानें आत्महत्या करून घेतील आणि आपलें काम आपोआप होऊन जाईल." असें म्हणत दुश्शासन अभिमन्यूच्या समाचाराला गेला. त्याला येतांना अभिमन्यूनें एक बाण सोडला तो दुश्शासनाच्या छातीला लागला. त्या बरोबर त्याला मूर्छा आली व तो बेशुद्ध होऊन पडला. सारथ्यानें मुकाट्यानें रथ शिबिराकडे वळविला.

पांडव सेनेंतून जयजयकाराचा शब्द कर्णाच्या कानांवर पडताच तो अभिमन्यूशीं लढण्यासाठीं निघाला. अभिमन्यूनें एकाच बाणानें त्याची ध्वजा आणि भात्यांतून निघणारा बाण उडवून टाकून त्याला हतबल केलें. त्याच्या मदतीसाठीं त्याच्या भावाला आलेला पाहून अभिमन्यूनें त्याचें शीरच धडापासून वेगळें केलें. कर्ण भावाजवळ दुःख करीत बसला तेवढ्यांत अभिमन्यूनें त्याच्या सेनेची दाणादाण उडवून दिली.



अभिमन्यूचा आजचा पराक्रम पाहून कौरवांचा धीर सुटला.

पांडव आज दुप्पट उत्साहानें अभिमन्यू बरोबर चालले होते. परंतु युधिष्ठिर, भीम, सात्यकी, नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद वगैरेंना त्यांच्या सैन्यासह सैन्धवानें अडवून धरलें. तो एकटा एवढ्या वीरांना कसा अडवूं शकला त्याला सुद्धां एक कारण होते.

सैन्धव म्हणजे जयद्रथ हा धृतराष्ट्राचा जावई. वनवासांत असतां एकदां त्यानें द्रौपदीला पळवून नेण्याचा प्रयत्न केला.



पण भीमानें त्याचा पराभव करून त्याला पळवून लावलें. ह्याचा त्याला अपमान वाटून त्यानें तपस्या केली. भोळा शंकर फार लवकर प्रसन्न होतो. त्यानें त्याला स्वप्नांत येऊन वर दिला कीं अर्जुनाला सोडून बाकी सर्व पांडवांना तूं युद्धांत आडवूं शकशील. तुझ्या पुढें त्यांचा पराक्रम फिका पडेल.

केवळ ह्या वरामुळेंच तो पांडवांना थोपवूं शकला. इतकेंच नव्हे तर त्यांच्या सैन्याचा सुद्धां नाश करूं लागला.

इकडे अभिमन्यूचें काम चाललेंच होतें. त्यानें वृषसेनाच्या सारथ्याला मारल्यामुळें तो प्राण घेऊन पळत सुटला. पोलादाचें कवच धारण केलें असून सुद्धां त्यानें वसातीयाला मारून टाकलें. आणखी ही कित्येक वीरांचा त्यानें नाश केला. जो कोणी त्याच्या समोर येई त्याला मारण्याचा त्यानें सपाटा चालविला होता. त्यांत शल्याचा मुलगा रुक्मरथ होता.

मित्र मारला गेला म्हणून रुक्मरथाचे सर्व साथी एकदम अभिमन्यूवर तुटून पडले. त्या सर्वांचा हल्ला चुकविण्यासाठीं त्यानें गांधर्व अस्त्र सोडून सर्वांत भ्रांति उत्पन्न करून त्यांना हतबल करून सोडलें. नंतर एकेकाला मारत गेला. अशा तऱ्हेनें त्यानें शेंकडों वीरांना मारून टाकलें. अभिमन्यूच्या ह्या शौर्यामुळें दुर्योधनाचा पारा चढला व तो त्याच्यावर धांवून गेला. परंतु त्या बालवीरासमोर तो टिकूं शकला नाहीं. उलट्या पावली परत आला.

एकट्यानें त्या पोराला आवरणें शक्य नाहीं असा विचार करून द्रोण, अश्वत्थामा, बृहद्बल, कृप, कृतवर्मा, कर्ण वगैरे वीरांनीं एकदम त्याला घेरलें. लक्ष्मण पुढें होऊन प्रथम युद्ध करूं लागला. आपल्या मुलाच्या मदतीला म्हणून दुर्योधन पुढें सरसावला.

लक्ष्मण आणि अभिमन्यूचें थोडा वेळ युद्ध झालें आणि थोड्याच वेळांत लक्ष्मण खालीं पडला. जवळच असलेल्या दुर्योधनाला फार वाईट वाटलें. तो ईर्षेनें ओरडला— "टाका त्याला मारून."

दुर्योधनाची आज्ञा होतांच दुसरे वीर आपापल्या तलवारी घेऊन अभिमन्यूकडे वळ. त्यांत जयद्रथाचे सैनिक सुद्धां होते. पुन्हां एकदां सर्वांनीं मिळून अभिमन्यूवर हल्ला चढविला. त्या गडबडींतहि त्यानें क्राथपुत्राला मारलेंच. आणि हल्ला हटविण्याचा प्रयत्न केला. सर्व वीर मागें सरले. परंतु द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, बृहद्बल व कृतवर्मा ह्या सर्वांनीं मिळून त्याला चारी बाजूंनीं घेरून टाकलें. त्या सर्वांच्यावर अभिमन्यूनें एकएक बाण सोडला. त्यांत दुर्योधनाचा एक भाऊ वृन्दारक मारला गेला.

प्रथम अभिमन्यूसमोर बृहद्बल आला. त्यानें रथाचे घोडे व सारथ्याला पहिल्यानें मारलें. नंतर त्याच्या रथाची ध्वजा तोडून धनुष्यहि मोडून टाकलें आणि शेवटीं जेव्हां तो ढाल तलवार घेऊन अभिमन्यूवर धांवून आला तेव्हां त्यानें एक बाण त्याच्या छातीवर सोडला तो आरपार निघून गेला.





त्यानंतर त्यानें कर्णाच्या साही मंत्र्यांना मारलें आणि सहस्रावधि सैनिकांना मारून टाकलें.

अभिमन्यूचा पराक्रम पुन्हां पुन्हां द्रोणाच्या डोळ्यांत भरत होता. तो म्हणाला—"ह्याचे बाण अचूक आहेत आणि हा ह्या शस्त्रास्त्र विद्येंत फार निपुण आहे. अगदीं अर्जुना प्रमाणेंच ह्याचा पराक्रम आहे. जो पर्यंत ह्याच्या हातांत धनुष्य आहे तोपर्यंत कोणीही ह्याला जिंकूं शकणार नाहीं. जर आपण ह्याचे धनुष्य भंग करून रथाखालीं उतरविलें तरच ह्याचा पराभव होण्याची शक्यता आहे."

द्रोणाचा शब्दसंकेत होतांच सर्वांनी मिळून अभिमन्यूला मारण्याचा निश्चय केला. कर्णानें अभिमन्यूचें धनुष्य तोडलें. भोजानें त्याचे घोडे मारले. कृपानें सारथ्याला मारलें. बाकीच्यांनीं त्याच्यावर सतत बाण वृष्टि केली. तरी सुद्धां तो ढाल तलवार घेऊन पुढें सरसावला. सर्वांना भीति वाटली कीं हा आतां कोणावर धांवून येत आहे कोण जाणें. म्हणून द्रोणानें त्याची तलवार उडविली आणि कर्णानें ढालीचे तुकडे केले.

ततके झाल्यावर सहाजीकच अभिमन्यू चिडला. रथाचें चाक घेऊन तो द्रोणावर धांवला. त्याचीं सुद्धां छकलें छकलें उडवून दिलीं गेलीं. आतां अभिमन्यूनें गदा हातांत घेतली. मध्यम तो अश्वत्थाम्यावर धांवून गेला. पण तो चार पावलें मागें सरकल्यानें त्याचा सारथी व घोडेच त्याला बळी पडले. त्या झपाट्यांत त्यानें शकुनीच्या कांहीं सैनिकांना व सात कैकेयांना मारलें आणि दुःशासनाच्या मुलाच्या रथावर हल्ला केला.

तोहि खवळला आणि गदा घेऊन अभिमन्यूवर धावून गेला. दोघांचे गदायुद्ध झालें आणि शेवटीं दोघेहि एकमेकाच्या प्रहारानें खालीं पडले. अभिमन्यू थकलेला होता. त्याला शुद्धीवर येण्यास वेळ लागला. दुःशासनाचा मुलगा नव्या दमाचा होता. तो लवकर शुद्धीवर आला. चटकन उठून त्यानें अचेत पडलेल्या अभिमन्यूवर प्रहार केला आणि त्याला मारून टाकलें.

कौरव सेनेंतून जयघोषाचे ध्वनि येऊं लागले. पांडवांना त्याचें कारण कळतांच त्यांच्या सैन्यांत पळापळ सुरू झाली.

एका थकलेल्या बाल वीरावर एकाच वेळीं सहा महारथ्यांनी हल्ला करून त्याला मारलें ह्या बद्दल पांडवांना फार विषाद वाटला. त्या सर्वांनीं आपापलीं शस्त्रास्त्रें फेंकून दिलीं आणि युधिष्ठिराभोंवती गोळा झाले. तो खालीं मान घालून शोक करीत होता.

"हाय माझ्या मुळेंच अभिमन्यू मारला गेला. मीच त्याला चक्रव्यूहामध्यें पाठविला. किती पापी आहे मी. आतां मी अर्जुनाला काय सांगू! कृष्णा समोर कसा जाऊं! कुलदीपक अभिमन्यूनाहीं मग काय करावयाचें आहे राज्य! कशाला पाहिजे तो विजय!"

व्यास महामुनि युधिष्ठिरास समजावण्याचा प्रयत्न करूं लागले. म्हणाले—"अरे



असें दुःख करीत बसलास तर कसें होईल! जो जन्माला आला तो मरणारच. असे कित्येक शूर योद्धा धारातीर्थी पडले आहेत. त्या सर्वांच्यासाठीं जर प्रत्येक जण दुःख करीत बसला तर क होणार!" असें कांहीं सांगून व्यास मुनींनीं त्याला समजाविण्याचा प्रयत्न केला व ते निघून गेले.

सूर्यास्ताची वेळ होती ती. सूर्यास्त होतांच सर्व सैनिक शिबिराच्या बाजूला वळले. अर्जुन संसप्तकांशीं युद्ध संपवून परत-येत असतां त्याला वाटेंत पदोपदीं अपशकून होऊं लागले. त्या बरोबर त्याच्या मनांत

प्रथम युधिष्ठिराविषयी शंका उभी राहिली. तो शिबिराच्या अगदीं जवळ आला. सर्वकडे शांतता पसरलेली त्याला दिसली. त्याच्या हृदयांत धस्स झालें. त्यानें पाहिलें की प्रत्येक जण त्याच्याकडे पाहिल्या बरोबर मान खालीं घालून अश्रू पुशीत पुढें जात आहे. तो वास्तव अधीर झाला.

कृष्ण व अर्जुन होघे शिबिरांत शिरले. आणि सरळ सर्व पांडव बसले होते तेथें पोहोंचले. तेथें त्यांना अभिमन्यूच्या मृत्यूची सविस्तर वार्ता कळली. अर्जुनाला फार वाईट वाटलें. त्याला वाटलें आपण स्वतःच स्वर्गांत जाऊन भेटलें पाहिजे आपल्या मुलाला. अभिमन्यूच्या मृत्यूच्या विचारानें अर्जुनाचें डोकें तावूं लागले. हळूं हळूं त्या दुःखाचे पर्यवसान रागांत झालें. तो म्हणाला—"तुमच्या सर्वांच्या हातांत तलवारी असतां माझ्या मुलावर कां अशी पाळी आली !"

तेव्हां युधिष्ठिरानें त्याला सर्व वृत्तांत सांगितला आणि जयद्रथाची करणी पण सांगितली. त्यानें कसें सर्वांना थोपवून धरलें आणि त्याचें कारण वगैरे सविस्तर सांगितलें. त्यावर अर्जुनानें प्रतिज्ञा केली. म्हणाला—"ज्याच्या मुळें माझा बाळ मारला गेला त्या जयद्रथाला उद्या संध्याकाळ पर्यंत मी जर मारला नाहीं तर स्वतः चिता रचून त्यांत जीव देईन. हीच माझी प्रतिज्ञा. आणि जर मी ती पूर्ण करूं शकलों नाहीं तर पापी ठरून मला रौरव नरक प्राप्त होईल." असें म्हणत अर्जुनानें आपल्या धनुष्याची प्रत्यंचा ओढली. कृष्णानें पांचजन्य शंख वाजविला. आणि अर्जुनानें आपला देवदत्त नांवाचा शंख फुंकला.





# काशाचा किल्ला

[ १७ ]

[चंद्रवर्मांला शिवपुर नगरांत सुबाहू भेटला. त्यानें धीरमल्लाची माहिती सांगितली. त्याच वेळीं एका दूतानें येऊन सांगितलें कीं सर्वकेतू एका मोठ्या सैन्यानिशीं धीरमल्लाचा पाठलाग करीत आहे. सुबाहूला वाटलें आपण त्याच्या मदतीला गेलें पाहिजे. नंतर—]

सुबाहूप्रमाणें चंद्रवर्मालाहि वाटलें कीं धीरमल्लाच्या मदतीला गेलें पाहिजे. इतक्यांत इशारे झाले आणि सर्व सेना एका मैदानांत जमली आणि लगेच किल्ल्याच्या बाहेर पडून उत्तरेकडे निघाली. चंद्रवर्मानें अश्वसेनेचे आधिपत्य आपल्याकडे घेतलें.

रात्रभर सारें सैन्य कूच करीत राहिलें. आणि पहाटेच्या सुमाराला डोंगराच्या एका वळणाजवळ येऊन पोहोंचलें. तेथें त्यांना घोड्यांच्या टापां आवाज ऐकूं आला. पण तें सैन्य शत्रुचें आहे कीं मित्राचें हें कळण्यास कांहीं मार्ग नव्हता. म्हणून तें पाहाण्यासाठीं चंद्रवर्मा व सुबाहू निवडक दहा घोडेस्वारांना घेऊन वायुवेगानें पुढें निघून गेले.

अगदीं वळणाजवळ त्यांना चार घोडेस्वार दिसले. सुबाहूला पाहिल्या बरोबर त्यांनीं आपले घोडे थांबविले. आणि म्हणाले—"सेनापति ! आम्हांला राजप्रतिनिधीनें पाठविलें आहे. आम्ही इकडे येत असतां



सर्पकेतू नांवाच्या राजाच्या सैन्यानें जवळच्या पाऊलवाटेनें येऊन अडविलें. तेथें आमची चकमक उडाली. आमच्या सैन्यांतील बरेचसे शिपाई मारले गेले. राजप्रतिनिधी आपल्या थोड्याशा घुडदलासह त्यांचा सामना करीत आहे. परंतु ते हळू हळू मागें हटत आहेत."

ते सैनिक पुढें बोलतच होते. तेवढ्यांत कांहीं घोडेस्वार पळत त्यांच्या रोखानेच येत असलेले त्यांना दिसले. त्यांत स्वतः धीरमल्लहि होता. जवळ येतांच तो म्हणाला—

"आपल्याला अगोदर आपल्या नगराच्या रक्षणासाठीं धांवले पाहिजे. सर्पकेतू...." असें कांहीं तरी तो सांगत होता. तोंच त्याची नजर चंद्रवर्मावर पडली. त्याला आश्चर्य वाटलें. तो लगबगीनें पुढे आला. आणि "महाराज" म्हणून चंद्रवर्माला नमस्कार केला.

"धीरमल्ल!" चंद्रवर्मानें कुतूहल प्रगट केलें. "मला वाटलें नव्हतें कीं पुन्हां आपली कधीं भेट होईल म्हणून. बरें पण आत्तां आपल्याला बोलत बसावयास वेळ नाहीं. चल आपण नगराच्या रक्षणाची व्यवस्था करूं." चंद्रवर्मा म्हणाला.

धीरमल्लानें मागून पाठलाग करीत येणाऱ्या सैन्याकडे पाहिलें. आणि म्हणाला—"महाराज, आपण आल्यामुळें परिस्थिति एकदम बदलणार. सर्पकेतूशीं आतां हें शेवटचेंच युद्ध म्हणावयाचें. अफाट सेना घेऊन तो येत आहे. घोडदल तो इकडे घेऊन येत आहे. आणि पायदळाला त्यानें डोंगराच्या पलीकडे ठेविलें आहे. नगराच्या ऐवजीं आपल्याला येथेंच त्याला तोंड द्यावें लागणार आहे. आपल्याला सैन्य रचना केली पाहिजे." असे म्हणून तो सुबाहूकडे



... म्हणाला, "सुबाहू, आपल्या सैन्याला त्या घाटींत घेऊन ये. घाटीतून लढण्यास सैन्य थोडें कमी असलें तरी चालेल. पण निवडक लोकांना तेथें पाहाऱ्यावर ठेव." असें सांगून तो चंद्रवर्माला घेऊन घाटीच्या तोंडाशीं गेला.

वाटेंत वीरपूर सोडल्यापासून काय काय झालें, ते चंद्रवर्मानें धीरमल्लला थोडक्यांत सांगितलें.

धीरमल्लानें लक्ष देऊन तें सारें ऐकलें आणि मोठ्या अदबीनें म्हणाला—"महाराज, सुबाहूनें आपल्याला सर्व हकीगत सांगितलीच आहे. आम्हांला खरोखरच तऱ्हेतऱ्हेच्या संकटांना तोंड द्यावें लागलें. मोठ्या पराकाष्ठेनें एक एक संकट पार पडलें. नंतर आम्हीं राजा शिवसिंहाकडे नोकरी धरली. त्यानें मला येथील राजप्रतिनिधि केलें आणि आम्हांला येथें पाठवून दिलें. त्यांत आज अचानकपणेंच सर्पकेतूशीं मुठभेड होत आहे. तेंहि एका प्रकारें बरेंच म्हणावयाचें. कारण केव्हां ना केव्हां तरी आपल्याला त्या दुष्ट सर्पकेतूशीं युद्ध हें करावें लागणारच. मग तें आजच केलें म्हणून काय झालें? एकदां काय तो सोक्ष मोक्ष होऊन जाऊं



दे. विजय मिळाला तर वाहवा आहेच. आणि जर नच मिळाला तर वीरगति तरी मिळेल! ह्या शिवाय दुसरा मार्गच नाहीं.

"तुझें म्हणणें बरोबर आहे. आपण आपला देश आपला गांव सोडून किती तरी दिवस झाले. आणि अशाच तऱ्हेनें अजून उगाच किती दिवस भटकणार? तेव्हां होऊनच जाऊं दे एकदाचा काय तो निकाल. येऊंदे तुझी सारी सेना." चंद्रवर्मानें सम्मति दिली.

ह्या दोघांचें बोलणें चाललेंच होतें इतक्यांत खिडीच्या तोंडाजवळ कोलाहल ऐकूं आलें. तिकडे नजर फेंकतांच त्यांनीं








पाहिलें की ह्यांचे शिपाई शत्रुवर बाण रोखून आहेत. आणि घोडेस्वार आपापले भाले घेऊन शत्रूवर तुटून पडत आहेत.

"महाराज ! सर्पकेतु आपल्या सैन्यासह खिंडीत घुसण्याचा प्रयत्न करीत आहे. मला वाटतें ह्या अरुंद खिंडींत आपण जर त्याच्या-वर दोन्हीं तिन्हीं बाजूंनीं हल्ला चढाविला तर त्याचा जास्त उपयोग होईल. चला आपण दोघे दोन्हीं बाजूंनीं जाऊं." म्हणत धीरमल्लाचें आपल्या घोड्यावर उडी मारली. त्याच्या पाठोपाठ चंद्रवर्मानें देखील आपल्या घोड्यावर टांग मारली.

धीरमल्लानें आपलें सैन्य दोन ठिकाणीं वांटून खिंडींत दुतर्फा उभें केलें. सुबाहु तर तोंडाशीं शत्रूची वाट पाहात तयार होताच. अगदीं डोळ्यांत तेल घालून. त्याची दृष्टि चौफेर फिरत होती.

इकडे सर्पकेतु खिंडीत घुसण्याचा प्रयत्न करीत होता. त्या प्रयत्नांत त्याचे सैनिक शत्रूंच्या माऱ्याला बळी पडत होते. त्यांच्या हातून सुटून जर कोणी आंत घुसला तर तो चंद्र-वर्माच्या बाणाचा बळी होई आणि त्यांतून सुटल्यांस धीरमल्लहि दुसऱ्या बाजूनें होताच. अशा तऱ्हेनें फार भयंकर युद्ध सुरू झालें होतें.

चंद्रवर्माचे सैनिकहि ह्या झटापटींत पडूं लागल्यामुळें त्याला काळजी वाटूं लागली. कारण शत्रु जवळ अफाट सैन्य होतें आणि ह्याच्याजवळ जें थोडेंसें होतें तेंहि कमी होत चाललें होतें. जर सर्पकेतूनें आपली मोठी तुकडी आंत पाठविली असती तर चंद्रवर्माच्या सैन्याची धडगत नव्हती.

ते दोघे विचारमग्न होते. इतक्यांत सर्प-केतूनें उच्चारलेले हे शब्द त्यांच्या कानावर पडले. "जो कोणी धीरमल्ल आणि चंद्रवर्मा यांचें डोकें तोडून आणील त्याला एक लाख मोहोरा बक्षीस देईन. ह्या प्रांताचा संपूर्ण अधिकार त्याला देईन. चला उत्साहानें पुढें चला. करा युद्ध." अशा तऱ्हेनें तो आपल्या सैनिकांना प्रोत्साहन देत होता.

बस. क्षणार्धांत सर्व सैनिक खिंडीच्या तोंडाशीं येऊन निकरानें लढूं लागले. प्रत्येक सैनिक आपल्याला इनाम मिळावें म्हणून आपपल्या परीनें प्रयत्न करीत होता. एकमेकांना धक्केबुक्के देत पुढें घुसण्याचा त्यांचा प्रयत्न चालू होता.

चंद्रवर्मानें सुबाहूच्या मदतीला कांहीं सैन्य पाठवून दिलें परंतु तेवढ्याशा सैन्यानें काय होणार होतें. सर्पकेतूचें







अफाट सैन्य पुढें गेलेल्या सैनिकांना तुडवून पुढें चाललें होते. चंद्रवर्मा आणि धीरमल्ल दोघेहि विचा रांत पडले. त्यांच्या पुढें फार बिकट परिस्थिति उत्पन्न झालेली होती.

चंद्रवर्माच्या मनांत एक विचार आला. त्यानें घोड्यावर टांग मारली आणि धीर-मल्लाजवळ आला. म्हणाला—"आपण डोंगरा-वर चढून जाऊन सर्पकेतूच्या सैन्यावर पाठीमागून हल्ला करूं या आणि समजा खालीं उतरणें शक्य झालें नाहीं तर वरूनच दग-डांच्या आडून त्याच्यावर बाण सोडूं. अर्थातच सर्पकेतूच्या कांहीं सैन्याला मागें फिरावें लागेल."

"आपल्याला कांहीं तरी करणें फार जरूरी आहे. कारण जर का सर्पकेतूचें सैन्य खिंडीत शिरलें तर आपल्याला पळणें सुद्धां शक्य होणार नाहीं. मग फारच पंचाइत पडेल." धीरमल्ल म्हणाला.

चंद्रवर्मा कांहीं तीरंदाजांना घेऊन सरपटत सरपटत मोठमोठ्या दगडांमधून वाट काढीत काढीत हळूं हळूं डोंगरावर चढला. तेथून त्यानें पलीकडच्या बाजूस आपली नजर फेकली. त्याची छातीच दडपून गेली समोर पाहिल्यावर. त्याचा चेहेरा एकदम फिका पडला. एवढ्या अफाट सैन्याबरोबर आपला काय निभाव लागणार म्हणून तो मटकन खालींच बसला. प्रथम त्याचा धीर खचला.

तो मनांत म्हणाला एवढ्या सैन्यांतून पळ काढण्याशिवाय आता गत्यंतर नाहीं. जातां जातां धीरमल्ल, सुबाहु आणि देव (त्या म्हाताऱ्या मांत्रिकाचा मुलगा) त्यांना बरोबर घेऊन जाऊन जंगलांत लपून राहणें एवढेंच करणें शक्य आहे. त्या पुढील प्रश्न पुढें. असल्या विचारांनी त्याचे मन खट्टू होऊं लागलें. निराशा पूर्ण दृष्टीनें त्यानें समोर असलेल्या सर्पकेतूच्या सैन्याकडे पाहिलें. त्याला पूर्वीची आठवण झाली आणि एका-एक त्याच्या मनांत कांहीं तरी विचार आला.

क्षणभरांत तो उठून उभा राहिला. मनांतील सर्व धैर्य एकवटून जवळच असलेल्या एका उंच दगडावर उभा राहिला. अर्थातच खालील सैन्याची दृष्टि त्याच्याकडे वळली. ते आपसांत कुजबुजूं लागले. इतक्यांत चंद्रवर्मा त्यांना उद्देश्यून म्हणाला.

"सैनिकों, मी वीरपुरच्या राजा सूर्य-वर्माचा मुलगा चंद्रवर्मा आहें. तुम्हांला माहीतच आहे कीं सर्पकेतूनें कशा निर्दय पणानें आमच्या वंशाचा नाश केला आणि गादीवर बसला. आतां मला वाटतें आहे कीं माहिष्मती राजाच्या गादीवर यशोवर्धन राजाच्या मुलांपैकीं जगल्या-वाचलेल्या तपोवर्धनाला बसवावे. जर त्यानें हें मान्य केलें नाहीं तर तुम्हीं ज्याचें नांव सुचवाल त्याला बसवूं. पण ह्या कामीं मला तुम्हा सर्वांची मदत पाहिजे. आपल्याला सर्वांत अगोदर त्या कपटी, दुष्ट व क्रूर सर्प-केतूला संपविलें पाहिजे. आणि हें काम मी मुख्यत्वें करून त्यांच्यावर सोपवितो जे वीरपुरचे अभिमानी आणि सच्चे हितैषी



असतील. त्यांनी पुढें यावें आणि आपलें काम करावें.

सैन्यांतील बऱ्याच लोकांनीं चंद्रवर्माचा आवाज ओळखला. ते चकित होऊन त्याच्या-कडे पाहूं लागलें. ओळख पटतांच सैन्यांतून जयजयकार ध्वनि उमटला. ते गर्जना करूं लागले—"वीरपुरच्या महाराजांचा जयजय-कार असो."

तावडतोब युद्धाचा नूर पालटला सैन्यांत धक्काबुक्की आणि पळापळ सुरूं झाली. आणि पाहतां पाहतां बरेंच सैन्य चंद्रवर्माला येऊन मिळालें.

तितक्यांत चंद्रवर्माच्या जय जय कागाचे शब्द त्या सैनिकांच्या कानावर आले. ते तेथूनच उलट्या पावलीं परतले आणि त्यांच्यावर धांवून गेले.

ही संधि पाहून चंद्रवर्मा धीरमल्लाला म्हणाला—"मित्रा, ही वेळ गमावूं नकोस. आत्तांच्या आत्तां तूं आपल्या सैन्यानिशीं खिंडीच्या द्वारांतून हल्ला चढवीत मैदानांत जा. सर्पकेतूच्या सैन्यापैकीं अर्धे अधिक सैन्य आपल्या बाजूनें लढत आहे. या वेळींच सर्पकेतू आपल्या तावडींत सांपडूं शकेल. नाहीं तर निदान त्याला मारून तरी टाकतां येईल.

सर्पकेतूला हें सर्व कळण्यास वेळ लागला नाहीं. धीरमल्लाचें सैन्य येण्या पूर्वींच त्यानें आपल्या सैन्याला घाटीच्या प्रवेशद्वारा पाशीं बोलाविलें आणि आपण त्यांतील कांहीं विश्वासू सैनिकांना बरोबर घेऊन तेथून पळ काढला. त्याचें सर्व सैन्य त्याच्या मागोमाग पळूं लागलें. चंद्रवर्माचें सैन्य पाठलाग करीत निघालें. सर्पकेतूचें सैन्य वाट फुटेल तिकडे जंगलांत घुसलें. त्यांतील कांहीं सैनिक चंद्रवर्माच्या हातीं लागले त्यांना त्यानें कैद केलें. पण सर्पकेतू मात्र त्याच्या हातीं सांपडला नाहीं. तो आपल्या सैन्यासह जंगलांत नाहींसा झाला.

सर्व सैनिक थकलेले होते. म्हणून चंद्रवर्मानें धीरमल्ल आणि सुबाहू यांच्या सल्ल्यानें युद्ध थांबविलें. आणि त्यांच्याच विचारानें सर्पकेतूच्या शोधार्थ उत्तम अशा दहा सैनिकांना पाठविलें. याला म्हणतात नशिबाचा फेर सर्पकेतू यशाच्या शिखरावर घेऊन कोसळला आणि चंद्रवर्माला यशाच्या शिखरावर चढावयास तीच संधि लागली. [पुढे चालू]





# सक्तीचें लग्न

विक्रमार्क पुन्हां वडाच्या झाडाजवळ गेला आणि शव खांद्यावर घेऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हां त्यांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, तूं अगदीं हट्टवादी दिसतो आहेस. अग्निमित्रानें सुद्धां आपला हट्ट सोडून कुंतीशीं लग्न केलें. परंतु तूं आपला हट्ट सोडशील असें दिसत नाहीं. ऐक तुला त्याची गोष्ट सांगतों म्हणजे तुला थकवा वाटणार नाहीं." असें म्हणून त्यानें गोष्ट सांगण्यास सुरवात केली.

एकदां कपित्थ नांवाच्या देशांत कालीवर्मा नांवाचा एक क्षत्रिय योद्धा राहात असे. तो सेवा निवृत्त होऊन आपला काळ कंठीत असे. त्याचें वय सुमारें ऐंशी वर्षांचें असेल.

हें नगर एका डोंगरावर वसलेलें होतें. त्या डोंगराच्या दक्षिण टोकास कालीवर्माचा किल्ला होता. त्याच्या पलीकडे आणखी दक्षिणेला एक मोठा खंदक होता.



कालीवर्मांच्या कुटुंबांत त्याच्या एका नातीशिवाय कोणी नव्हतें. म्हणून इतक्या मोठ्या किल्ल्यांत दोघं आपल्या नोकर चाकरांसह राहात असत त्याच्या नातीचें नांव कुंती. ती लहान असतांनाच तिचे आई-वडील वारले आजीहि देवलोकीं निघून गेली होती. म्हणून कालीवर्मावरच तिच्या पालन पोषणाचा भार येऊन पडला होता.

तिच्या बरोबरीचें घरांत कोणीच नव्हतें. तिच्या सुख-दुःखांत भाग घ्यावयाला कोणीच नसल्यानें ती अगदीं उदास असे. तिच्या या उदासीनतेकडे सुद्धां तिच्या आजोबांचें कधीं लक्ष गेलें नाहीं. एक दिवस त्या गांवांत देवीचा उत्सव होता. कुंती त्या दिवशीं देवीचें दर्शन करून परत येत होती. मंदिराच्या पायऱ्या उतरून ती घराकडे निघाली होती. तेव्हां एक क्षत्रिय तरुण युवक तिला म्हणाला- "मला तुझ्याशीं कांहीं तरी बोलावयाचें आहे. मी रात्रीं येईन."

तो युवक कुंतीच्या ओळखीचा नसल्या-मुळें तिला थोडें आश्चर्य वाटलें. शिवाय त्याला तिच्याशीं काय बोलावयाचें असेल याचाहि ती कांहीं अंदाज करूं शकली नाहीं. आपल्या विषयीं कधीं कोणी एवढी चौकशी केली नाहीं. मग एवढी आपुलकी दाखवि-णारा हा कोण हें जाणण्याची तिला थोडी उत्सुकता वाटली आणि म्हणूनच तिनें त्याच्या विषयीं आपल्या आजोबांजवळ कांहींहि सांगितलें नाहीं.

तो म्हातारा मोठा कडक होता. त्याची नात कुंती कोठेंहि गेली कीं तिच्या नकळत तिच्या मागें पुढें दोघां तिघां माणसांना तो पाठवीत असे.

त्या दिवशीं सुद्धां त्यानें दोघांतिघांना पाठविलें होतें. त्यांतील एका जणानें ही गोष्ट म्हाताऱ्याला येऊन सांगितली.

कुंती दर्शन घेऊन घरीं आल्यावर आजत्रानें तिला सहज प्रश्न केला—"कोणी ओळखीचें भेटलें होतें काय ?"

"नाहीं बाबा ! मी दर्शन करून सरळ घरींच येत आहे," कुंती म्हणाली.

"मग देवळाजवळ कोणाशीं बोलत उभी राहिली होतीस !" कालीवर्मानें विचारलें.

कुंती किंचित गोंधळली. तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यावरून म्हाताऱ्याला राग आला. तो म्हणाला—"तुला मी लहानाची मोठी केली. आपल्या वंशाची कुलमर्यादा अजून कशी नाहीं तुझ्या लक्षांत आली. आपलें घराणें चांगलें कुलशीलवान म्हणून प्रसिद्ध आहे आणि तूं मला कळविल्या शिवाय वाटेल त्या तरुणाशीं बोलावयास आणि ज्याच्याशीं तूं बोललीस त्याच्याशीं जर तुझें लग्न झालें नाहींतर ती मोठीच चूक. जर तो तुझ्या योग्य असेल तर ठीकच नाहीं, तर तुला पश्चात्ताप करीत बसावें लागेल. कोण होता तो ? कोठें राहातो ? काय आहे नांव ?"

आजोबांचा राग पाहून कुंतीची बोबडीच वळली. अगदीं घाबरून गेली तरी स्वतःला सावरून म्हणाली—"मला त्याच्याविषयीं कांहीं एक माहीत नाहीं आणि मी त्याच्याशीं कांहीं वार्तालाप केला नाहीं."



"पण कांहीं झालें तरी आतां त्याच्याशींच गांठ आहे. लक्षांत ठेव. त्याच्याशींच तुला लग्न करावें लागणार आहे. तूं जरी बोलली नाहींस तरी तो तरी बोलला ना ? काय म्हणाला तो ?" आज्यानें विचारलें.

"तो म्हणाला त्याला कांहींतरी बोलायचें आहे. म्हणून रात्रीं थोडावेळ दरवाजा उघडा ठेवायला सांगितला आहे" कुंती म्हणाली.

"अस्सं ! मी बघतो आतां पुढें काय करायचें तें." कालीवर्मा गरजला.



त्या माणसाशीं लग्न करणें म्हणजे आपल्याला मोठीच शिक्षा आहे, असें कुंतीला वाटलें नाहीं. ज्यानें आस्थेनें एवढी विचारणा केली आणि तिच्याकडे ज्याचें लक्ष गेलें त्याच्याशीं लग्न करण्यास तिची कांहींच हरकत नव्हती. उलट तिला एक प्रकारची सुटकाच वाटत होती.

त्या दिवशीं संध्याकाळीं कालीवर्मानें शेजारच्या कांहीं बायकांना बोलावून आणून तिला लग्नासाठीं नवऱ्यामुलीप्रमाणें सजवून तयार ठेवण्यास सांगितलें. त्यानें लग्न लावण्यासाठीं एका पुरोहिताला बोलावून ठेविलें होतें. कुंतीच्या लग्नासाठीं सर्व आवश्यक व्यवस्था करून ठेविली होती.

याच वेळीं कपिथ नगरांत आणखी एक गोष्ट घडली. अग्निमित्र नांवाचा दुसरा एक क्षत्रिय कुमार राजाकडे नोकरीला म्हणून आला होता. तो त्या गांवांत नवीनच होता. आणि एका अनोळखी माणसाकडेच राहिला होता. तो कामावरून आल्यावर रोज गांव पाहावयाला म्हणून निघत असे आणि रात्रीं अंधार पडल्यावरच घरीं येत असे.

त्या दिवशीं राज्यांत बंडखोरी माजली असल्या कारणानें तेथें कोणी शस्त्र धारण केलेला माणूस दिसला तर सरकारी शिपाई त्याच्यावर हल्ला करून त्याला कैद करीत असत.

ज्या दिवशीं कुंतीचें लग्न व्हावयाचें होतें त्याच दिवशीं नित्याप्रमाणें अग्निमित्र गांवांत फिरावयास गेला. पण शस्त्रबंदीची त्याला आठवण नव्हती. काळोखी रात्र होती. आकाशांत ढग आलेले होते. त्या काळोखांत समोरचें कोणाला कांहीं दिसत नव्हतें.

अग्निमित्र त्या अंधारांत रस्ता चुकला. त्याला त्याचें घर सांपडलेंच नाहीं. तो भटकत भटकत कालीवर्माच्या घराच्या बाजूला आला. तशांतच त्याला गस्त घालणारे पोलीस मशाली घेऊन येत असलेले दिसले. त्याच्या जवळ शस्त्रें असल्यानें त्यांचा डोळा चुकवून जाण्याचा अग्निमित्रानें प्रयत्न केला. शिपाई जवळ येत आहेत असें वाटल्यावरून तो एका घराच्या दाराला टेकून उभा राहिला. दाराला टेकल्याबरोबर तें आंत ढकललें गेलें. बरें झालें आपण आंत लपावें म्हणून तो हळूंच आंत येऊन दारामागें लपला.

तेथें असलेल्या नोकरांनीं त्याला पकडून आपल्या धन्यासमोर नेऊन उभें केलें. माडीवर एका मोठ्या दिवाणखान्यांत एक वृद्ध गृहस्थ एका खुर्चीवर बसला होता. त्या क्षत्रिय कुमाराला पाहून म्हातारा खूष झाला. तो कालीवर्माच होता. "ये, मी तुझीच वाट पाहात होतों. क्षात्रतेज तुझ्या तोंडावरून टपकत आहे."

"क्षमा करा. मी आपल्याला कधीं पाहिलेलें नाहीं. ओळखलें नाहीं मी आपल्याला. आपण चुकीनें मला कोणी दुसरा माणूस समजत असाल. माझें नांव अग्निमित्र आहे." अग्निमित्रानें आपली ओळख दिली.



"होय. तू मला पाहिलें नसशील पण माझ्या नातीला तूं चांगलें ओळखतोस ना! तुझी इच्छा असो अथवा नसो. मी तिच्याशीं तुझें लग्न लावून देणार आहे. भटजींना सुद्धां मी बोलावून ठेवलें आहे." कालीवर्मा म्हणाला. नंतर त्यानें कुंतीला बोलावून आणण्यास सांगितलें.

कुंती नटूनथटून आली. पण काय अग्निमित्राला पाहतांक्षणींच तिच्या चेहेऱ्यावरचा आनंद एकदम मावळला. ती एकदम म्हणाली—"हा नव्हे तो माणूस. हा कोणीतरी भामटा आहे आजोबा."



“ किती खोटें बोलशील ! तुमच्या बोलण्यावर माझा विश्वास कसा बसावा ! ” कालीवर्मानें कुंतीकडे डोळे वटारून पाहिलें.

“ मी यांना कधीं पाहिलें नाहीं. यांच्याशीं नाहीं मी बोललें सकाळीं.” कुंतीनें सांगितलें.

“ तो कोणीहि असूं दे. मला त्याच्याशीं कांहीं करावयाचें नाहीं. मी याच्याशीं तुझें लग्न लावून माझ्यावरची जबाबदारी दूर करणार आणि या सर्वाला कारण तूंच. मुहूर्ताच्या वेळेपर्यंत ठरवा तुम्हीं काय ते आणि लग्नाला तयार व्हा. उद्या सकाळीं मुहूर्त आहे. तोंपर्यंत तुम्हाला वेळ आहे विचार करावयास.”

अग्निमित्रा ! तुला सांगतो आहे. तूं जर पळून जाण्याचा प्रयत्न केलास तर तुझी धडगत नाहीं, एवढें लक्षांत ठेव. या दक्षिणेकडील खिडकींतून उडी मारण्याचा प्रयत्न केलास तर शंभर फूट खोल खड्यांत पडशील. या दरवाज्यांतून जाण्याचा प्रयत्न केलास तर शंभर तलवारी तुझ्या डोक्यावर पडतील.” एवढें सांगून त्या दोघांना तेथेंच विचार करण्यास सोडून कालीवर्मा निघून गेला.

“ काय चाललें आहे हें माझ्या कांहीं सुद्धां लक्षांत आलें नाहीं. मला थोडें-तरी समजावून सांग.” अग्निवर्मा कुंतीला म्हणाला.

कुंतीनें सविस्तर सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून अग्निवर्माला फार वाईट वाटलें.

“ फारच पेचांत पडली आहेस तूं. एकाशीं लग्न करण्याची इच्छा असतां तुला भलत्याशींच लग्न करावें लागत आहे. तुझ्यावरील हें संकट टाळण्यासाठीं कांहींहि करावयास मी तयार आहें. वेळ पडल्यास प्राण देण्यास सुद्धां तयार आहे.” अग्निमित्र म्हणाला.

ते ऐकून कुंतीला फार वाईट वाटलें. या बिचाऱ्याला उगीचच मध्यें त्रास. पण विचार करण्याचा कांहींच उपयोग नव्हता.

“ माझ्यासाठीं तुम्ही आपले प्राण कां देतां ? माझी सर्व हकीगत मी सांगितली आहे. माझ्याशीं लग्न करण्यांत तुम्हाला कांहीं हरकत नसेल तर तुम्ही माझ्याशीं लग्न केलेलेंच बरें,” कुंती म्हणाली.

“ जबरदस्तीनेंच जर तुला माझ्याशीं लग्न करावें लागणार असेल तर मी प्राणत्याग केलेलाच बरा आणि माझ्या बाबतीत म्हणशील तर तुझ्या सारखी सुंदर मुलगी मला मिळूं शकेल ही कल्पना मला स्वप्नांत देखील नव्हती.” अग्निमित्र म्हणाला.

“ मग तुम्ही लग्नाला तयार झालेलेंच बरें. जर तुम्हीं प्राण दिलांत तर मला जन्मभर रडत बसावें लागेल.” कुंती म्हणाली.

“ माझे प्राण वांचविण्यासाठीं तूं माझ्याशीं लग्न करण्यास तयार होत आहेस. पण मी क्षत्रिय वीर आहे. मला मरणाची भीति वाटत नाहीं. पण मी मरणार आहे तो तुझ्याच हितासाठीं. मी जिवंत असे पर्यंत तुला तुझ्या प्रियकराशीं लग्न करतां येणार नाहीं.” अग्निमित्रानें सांगितलें.



“ तुमचा निश्चय पक्का होण्यापूर्वी मी तुम्हांला माझी हकीगत पुन्हां सांगतें. नीट ऐका. मी अजून पर्यंत कोणावरहि प्रेम केलेलें नाहीं किंवा त्या विषयीं मी अजून विचारच केला नाहीं आणि आतां विचार करावयाचा म्हणजे तुमच्या पासूनच मला सुरवात करावयाची आहे. तुमच्या बद्दल माझ्या मनांत प्रीति वाटूं लागली आहे. अर्थातच पुढें ती प्रेमांत बदलणार. म्हणजे मी तुमच्यावर प्रेम करूं लागलें आहे. जर तुम्ही माझ्याशीं लग्न केलें नाहींत तर मी जन्मभर अशीच राहणार आहें.” कुंती म्हणाली.

एवढें होईतों पाहाट झाली. मुहूर्ताच्या-पूर्वी थोडावेळ कालीवर्मा आला. "" काय केलात दोघांनीं विचार? झालांत लग्नाला तयार!"

अग्निमित्रानें 'होय' म्हणतांच कुंतीनें सुद्धां आपली अनुमति दर्शविली.

दोघांचें लग्न झालें. अग्निमित्र आपल्या बायकोला घेऊन गेला.

गोष्ट संपविल्यावर वेताळानें विचारलें—"अगोदर नाहीं म्हणून नंतर अग्निमित्र लग्नास कां तयार झाला? कालीवर्माच्या भयानें? त्या दोघांत कोणी कोणाला फंसविलें होतें? तुला उत्तर दिलेंच पाहिजे. नाहींतर परिणाम तुला माहीतच आहे. टाळाटाळ करून चालावयाचें नाहीं."

विक्रमार्क म्हणाला—"कोणी कोणाला भीत नव्हतें. अग्निमित्र क्षत्रिय वीर असल्यानें कोणाला हार जाणारा नव्हता. जबरदस्तीनें लग्न करून घेण्यापेक्षां त्याला मरण जास्त पसंत होतें. कुंतीलाहि आपल्या आजोबांची भीति वाटत नव्हती. दोघांनीं परिस्थितीचा चांगला विचार केला होता. अग्निमित्राच्या त्यागभावनेमुळें कुंतीला खरोखरीच त्याच्या विषयीं ओढा वाटूं लागला होता. ती नुसती बोलण्याची इच्छा दर्शविणारावर सुद्धां जर प्रेम करूं लागली होती तर मग प्रत्यक्ष बोलणारावर ती कां नाहीं प्रेम करणार? अग्निमित्राविषयीं तिला खरोखरच प्रेम वाटूं लागलें होतें. म्हणून ती लग्नास तयार झाली. एवंच हें लग्न जबरदस्तीचें काहीं झालें नाहीं." अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह नाहींसा झाला आणि वडाच्या झाडावर पूर्ववत् लटकूं लागला. (कल्पित)






# जोड आरसा

बाराव्या शतका मध्यें चीनच्या उत्तर भागांत तारतरी लोकांनीं हल्ला केला. लटमार केली. सर्वनाश केला. त्या उलट त्यावेळीं दक्षिण चीन फार समृद्ध होता. त्यांतल्या त्यांत त्याचा पूर्व भाग फारच चांगला होता.

फेन्ग सुंगिय उत्तर चीन कडील राहाणारा होता. त्याची पूर्चो नगरांत मामलेदार म्हणून नेमणूक झाली. तेथें आपल्याला सुखानें राहातां येईल म्हणून त्यानें तो हुद्दा घेतला व लगेच त्या गांवीं जाण्यास निघाला. तो चियेन्चो पर्यंत येऊन पोहोंचला होता.

त्याच वेळीं तेथें युद्धहि चालू असल्यानें सरकारनें लोकांच्यावर भरमसाट कर बसविले होते. लोक गांव सोडून रानावनांत पळून गेले. तेथून ते बंड करूं लागले.

फान जुंगे त्यांचा नायक होता. त्याच्या अनुयायांची संख्या वाढत वाढत लाखावर होऊन गेली. हे लोक रात्रीच्या वेळीं श्रीमंतांच्या घरावर छापे घालीत असत. आणि जें कांहीं मिळत असे तें आपसांत वांटून घेत असत.

सरकारी सैन्याची आणि ह्या विद्रोह्यांची आपसांत नेहमीं चकमक उडत असे आणि त्यांत सरकारी सैन्यालाच बहुतेक हार खावी लागत असे.

कांहीं दिवसांनीं फानची शक्ति इतकी वाढली कीं त्यानें चियेन्चोवर हल्ला करून तो इलाखा आपल्या ताब्यांत घेतला व आपण त्याचें सरदार म्हणवूं लागला. आतां लोक त्याला सरदार फान म्हणून म्हणत असत. त्यानें आपलें सैन्य शिस्तबद्ध केलें.

ह्या फान वंशांत 'फान शिचौ' नांवाचा एक तरुण होता. तो केवळ तेवीस वर्षांचा होता. पण तो फार उत्तम पोहोत असे.



कधीं कधीं तो तर पांच पांच सात सात दिवस पाण्यांत पोहोत राहात असे. म्हणून लोक त्याला 'पाण्यांतील साप.' असें म्हणत.

फान जुवेनें फर्मान काढलें कीं १८ वर्षे वयावरील सर्व मुलांनीं सैन्यांत भरती झालेंच पाहिजे. नाहीं तर त्याचें डोकें उडविलें जाईल.

फान शिचौला हें सगळें आवडत नसे. त्याला त्या टोळींत सामील होण्याची इच्छा नव्हती. पण निरुपायानेंच तो त्यांच्यांत सामील झाला होता. तेथें तो दीनदुबळ्यांची मनापासून मदत करीत असे. पण लूट-मारीला मात्र जात नसे. त्यामुळें लोकांना वाटे तो भितरा आहे. म्हणून त्याला ते सर्व 'पाण्यांतील आंधळा सांप' म्हणून म्हणत असत. मामलेदार फेन्ग आपल्या बायको व मुलीसह 'यूचो' ला चालला होता. त्याला एकच मुलगी होती. तिचें नांव 'यूमे' असें होतें. ही मंडळी आपल्या मुक्कामाला जात असतां वाटेंत विद्रोह्यांनीं त्यांच्यावर हल्ला केला. त्यांना लुटलें आणि विद्रोही पळून गेले. ह्या गडबडींत 'यूमे' कोठें नाहींशी झाली. तिच्या आईवडिलांनीं बराच शोध केला. पण तिचा पत्ता लागला नाहीं. शेवटीं निरुपाय होऊन त्यांनीं दुःखानें आपल्या गांवचा रस्ता धरला.

यूमे बंडखोरांच्या हातीं सांपडली. ते तिला तिचे डोळे बांधून घेऊन गेले. तिची ती दुःखद स्थिति पाहून फान शिचौला दया आली. त्यानें चौकशी केली तेव्हां त्याला समजलें कीं ती एका अधिकाऱ्याची मुलगी आहे. तो तिला आपल्याघरीं घेऊन गेला. तिचे डोळे सोडले व तिला म्हणाला—"मी फान असलों तरी विद्रोही नाहीं. फक्त फान जुवेच्या दबावामुळें मला येथें येणें भाग पडलें. सरकारी कारकीर्द सुरू झाली म्हणजे मी पुन्हा एक साधारण नागरिक म्हणूनच राहाणार आहें. त्या विद्रोह्यांच्या ताब्यांत राहाण्यापेक्षां मला वाटतें तूं माझ्याशीं लग्न करून राहावें.

'यूमे 'ला फानशीं लग्न करण्याची मुळींच इच्छा नव्हती. परंतु दुसरा मार्ग नसल्यानें तिनें तें कबूल केलें. फान शिचौनें लग्नाची गोष्ट सरदाराला सांगितली. तो खुश झाला आणि त्यानें त्या दोघांना भेट म्हणून बरेच सामान देऊन आशीर्वाद दिला. ह्या भेटीच्या सामानांत एक जोड आरसा होता. त्यांतील एकावर नर बदकाचें चित्र होते आणि दुसऱ्यावर मादी बदकाचें चित्रा-खालीं नर व मादी असें स्पष्टलिहिलें होतें. फार सुंदर होा तो आरसा. त्यांचा संसार सुखानें सुरूं झाला.

थोड्याच दिवसांत सरकारी सैन्यानें ह्या बंडखोर तारतऱ्यांचा पराभव केला आणि देशांत शांतता स्थापन केली. त्यानंतर विद्रोह्यांचे दमन करण्यासाठीं स्वतः राज-कुमार हान चुंग आला. एक लाख सैन्य बरोबर घेऊन चियेन्चो नगराला त्यानें वेढा दिला.



हानला मामलेदार फेनाची चांगली माहिती होती. फांग यूचो मध्यें राहात असल्या कारणानें त्याला त्या प्रांताची चांगली माहिती होती. हाननें त्याला बोलावून आपल्या सैन्यांत एक अधिकाराची जागा दिली.

ह्या सर्वांनीं फान लोकांवर निकराचा हल्ला केला. फान दिसला कीं त्याला कापून काढला. फान जुवे पळून जाऊं लागला. परंतु त्याचा येत फसला.

यूमे आपल्या पतीला म्हणाली—"तुम्हीं विद्रोह्यांत सामील आहांत. तेव्हां सरकारी सैन्याच्या हातीं सापडलांत तर सुटका होणार नाहीं. आणि ते माझ्या समोर तुम्हांला फांशी देतील. मला ते बघवणार









नाहीं. म्हणून मी आत्तांच आत्महत्या करून घेतें. नाही तरी ज्या दिवशीं विद्रोह्यांनीं मला पकडलें त्याच दिवशीं मी आत्महत्या करणार होतें. पण तुम्ही माझी सुटका केलीत म्हणून मी आजपर्यंत जगलें" असें सांगून ती आत्महत्येस तयार झाली.

फाननें तिच्या हातातून तलवार ओढून घेतली. म्हणाला—"मी कांहीं खुशीनें विद्रोह्यांत गेलों नाहीं हें जरी खरें असलें तरी मला मरावेंच लागणार. पण तूं कां विनाकारण जीव देतेस? तुझे वडील मोठे अधिकारी आहेत. राजकुमार आणि त्यांचे सैनिक तुझ्या प्रदेशांतून आले आहेत. ते तुझी बातमी तुझ्या वडिलांपर्यंत पोहोंचवतील आणि तुझे वडील तुला पुन्हां भेटतील."

"जरी मला मरण आलें नाहीं तरी मी पुन्हां लग्न करणार नाहीं हें खचीत. त्या पेक्षां मला मरण पतकरेल."

"देवाच्या कृपेनें समजा मी देखील जिवंत राहालों तर काय मी पुन्हां लग्न करीन असें वाटतें तुला."

थोड्यावेळानें यूमे म्हणाली—"आपल्याजवळ ते जोड आरसे आहेत ना! त्यांतील एक एक आपण आपल्या जवळ ठेऊं. जर ते आरसे एकत्र आले तर पुन्हां आपली भेट होईल असें समजूं."

एके दिवशीं हानच्या सरकारी सैन्यानें चिंचौ मध्यें प्रवेश केला. सरदार फाननें आपल्या कचेरीला आग लावून दिली आणि आपण त्यांतच जळून गेला. नेता नाहीसा झाल्यावर बाकी विद्रोही राजाला शरण गेले. राजानें फक्त फानवाल्यांना फांशीची शिक्षा दिली व बाकीच्यांना सोडून दिलें. त्या विद्रोह्यांत फान शिरोमण होता. यूमेला वाटलें आतां आपल्या पतीची व आपली पुन्हां भेट होणें शक्य नाहीं. म्हणून ती एका जुन्या घरांत गेली. तेथें आढ्याला दोरी बांधून आपल्या गळ्याला फांस लावून घेतला.

तिचा बाप त्याच बाजूनें जात होता. कोणी स्त्री गळ्याला फास लावून घेत आहे हें पाहून तो आंत शिरला. त्यानें गळ्याचा फास सोडला. ती स्त्री बेशुद्ध झाली होती. बापानें आपल्या मुलीला ओळखलें. शुद्धीवर आल्यावर यूमेनेंहि आपल्या वडिलांना ओळखलें. तिला आश्चर्य वाटले आणि आनंदहि झाला.

नंतर तिनें आपली सर्व हकीगत आपल्या वडिलांना सांगितली.







विद्रोह्यांचें पारिपत्य झाल्यावर राजकुमार हान आपल्या सरदार व सैन्यासह राजधानीस परत आला.

कांहीं दिवस गेल्यावर यूमेचे आईवडील तिला समजावूं लागले कीं तूं अजून लहान आहेस तर पुन्हां लग्न कर पण ती त्यास तयार झाली नाहीं. ते म्हणाले—“ केवळ परिस्थिती मुळें तुला त्याच्याशीं लग्न करावें लागलें आणि तो आतां मरूनहि गेला असेल. मग तूं कशाला उगीच त्याच्या नांवानें रडत बसतेस. लग्न करून सुखी हो.”

यूमेचा निश्चय पक्का होता. ती म्हणाली— “ निरुपायानेंच माझे पति विद्रोह्यांच्यांत गेले होते. त्यांनीं तेथें सुद्धां शक्य तेवढी गरीबांची मदतच केली. म्हणून मला लग्नाचा आग्रह करूं नका.

पुढें कांहीं दिवसांनी फेन्गला फेंगचो नगरांत सैनिकांचा उपसेनापति करून पाठविण्यांत आलें. तेथें एके दिवशीं कान्गचो नगराहून हू-चेंग्शिन नांवाचा मनुष्य तेथील उपनायक म्हणून फेन्गला भेंटावयास आला. दोघे जण सैन्यासंबंधीं बराच वेळ बोलत होते.

यूमे पडद्याआड होती. तिला हू-चेंग्शिन चा आवाज ऐकूं आला. तो निघून गेल्यावर यूमेनें त्याच्या विषयीं विचारलें आणि म्हणाली—“ त्याचें बोलणें आवाज अगदीं फान शिचौ सारखाच आहे.”

“ असेल, माणसा माणसांत असतें असें साम्य. ह्याचें नांव ‘ हू ’ आहे. हा सरकारी नोकर आहे. मला वाटतें तुझा अंदाज ठीक नाहीं. कारण जेव्हां चिंयेचो जिंकलें तेव्हांच सर्व फान वंशाची कत्तल केली गेली. तुझ्या मनांत आलेली गोष्ट नोकर चाकरांजवळ मात्र बोलंबिलूं नकोस हो ! ” तिच्या वडिलांनीं बजावलें. यूमे विचारी गप्प बसली.

सहा महीन्यांनीं पुन्हां एकदां हू चेंग्शिन कांहीं सरकारी कामा साठीं फेंगकडे आला. ह्या वेळीं सुद्धां यूमेनें आपल्या पतीला ओळखलें. ती फार बेचैन झाली. हू गेल्यावर तिनें पुन्हां बापाला सांगितलें. म्हणाली—“ बाबा तुम्हीं कांहीं म्हणा, पण हा गृहस्थ मला माझा पतीच आहे असें वाटतें आहे. माझी खात्री करून देण्यासाठीं तरी तुम्ही त्याला आपल्या घरीं जेवावयास बोलवा. माझ्या नवऱ्याला ‘ पाण्यांतील साप ’ म्हणून चिडवत असत. त्या शिवाय आमच्या जवळ अगदीं सारखे आरसे आहेत. त्यावर बदकांची चित्रें आहेत एकावर नर आणि एकावर मादी. त्या आरशावरून सुद्धां त्यांना ओळखतां येईल.”

बापानें यूमेचें म्हणणें मान्य केलें. ‘ हू ’ला दुसऱ्या दिवशीं जेवावयास बोलाविलें.

दोघे जेवावयाला बसले. तेथें तिसरें कोणी नव्हतें. अशा वेळीं बापाने चौकशी केली. आणि म्हणाला—“ आपल्याला ‘ पाण्यांतील साप ’ म्हणतात नाहीं ? तुमच्याविषयीं मला सर्व कांहीं माहीत आहे. तेव्हां माझ्या पासून कांहींहि दडवून ठेवण्याची इच्छा करूं नका.



हू थोडासा घाबरला. पण त्यानें पटकन आपल्या सासऱ्याचे पाय धरले आणि क्षमा याचना केली. आणि आपली सर्व हकीगत सविस्तर सांगिली. म्हणाला—"ज्यावेळीं सर्व फान वंशवाल्यांना फांसावर चढविलें त्या वेळीं कोणी तरी माझी 'फार चांगला माणूस' म्हणून शिफारस केली आणि मला सोडून दिलें. त्या नंतर नांव बदलून राहाणें बरें असें वाटून मी आपलें नांव बदललें. मग मी सैन्यांत नोकरी धरली आणि स्वतःच्या कर्तबगारीनें या उपमंत्र्याच्या जागेपर्यंत येऊन पोहोंचलों आहें."

तुमच्या बायकोचें काय नांव? बाकी तुमच्या किती बायका आहेत कोण जाणें. बाप म्हणाला.

"म्हणणारानें काय वाटेल तें म्हणावें आणि आपण सुद्धां खरें वाटल्यास विश्वास ठेवा. मी जेव्हां विद्रोह्यांत होतों तेव्हां एका मोठ्या अधिकाऱ्याच्या मुलीला विद्रोह्यांच्या हातून वांचवून मी तिच्याशीं लग्न केलें होतें. पुढें एका वर्षानें जेव्हां त्या शहरावर हल्ला झाला तेव्हां आम्हीं एकमेकांपासून दूर झालों. दोघांनींहि पुन्हां लग्न न करण्याची प्रतिज्ञा केली आहे आणि मी खरोखरीच पुन्हां लग्न केलें नाहीं. त्यावेळीं आमच्याजवळ दोन सुंदर जोड आरसे होते. त्यावर बदकांचीं चित्रें होतीं. एकावर नराचें आणि एकावर मादीचें. हा पहा माझा आरसा. हा मी सतत माझ्या जवळ ठेवितों." असें सांगून हूनें आपला आरसा फेन्गाला दाखविला.

फेन्गानेंही आपल्या जवळील आरसा काढून त्याला जोडून पाहिला. दोन्ही आरसे मिळाले आणि यूमेनें वियोगाच्या वेळीं सांगितल्याप्रमाणें दोघांचें पुनर्मिलन झालें.

फानच्या वंशांत ते आरसे किती तरी पिढ्यांपर्यंत जपून ठेविले होते.






[४]

च्यंगेज खानाच्या वंशांत एक रिवाज होता. कोणीहि वंशज मेला म्हणजे त्याला अल्ताई पर्वताच्या पायथ्याशीं आणून पुरावयाचें. शंभर शंभर दिवसाच्या यात्रेच्या अंतरावर जरी ते असले तरीहि त्यांना तेथेंच आणण्यांत येत असे. दुसरी गंमत म्हणजे शव नेत असतां वाटेंत जो कोणी भेटत असे त्याला मारून टाकीत. त्यांच्या जवळ घोडे असले तरी त्यांना सुद्धां ते मारून टाकीत. एवढेंच नाहीं तर त्या मेलेल्या खानाजवळ जे उत्तमोत्तम घोडे असत त्यांनाहि त्यांच्या बरोबर परलोकांत पाठवीत. असेंच मोन्ग खान जेव्हां मेला तेव्हां त्याच्या शवयात्रे समोर वीस हजार लोक आले. त्या सर्वांची त्याच कारणास्तव कत्तल करण्यांत आली.

तारतरी लोक कधीं एका जागीं राहात नसत. थंडीच्या दिवसांत उष्ण देशांत आणि उन्हाळ्यांत थंड भागांत जाऊन राहात असत. त्यांचीं घरें फार हलकीं तट्ट्याचीं किंवा वांबूच्या कामट्यांचीं असत. त्यांचा आकार गोल व गाडीवर घालून प्रवास करण्यासारखा असे. प्रवासांत हे लोक गाडीवरच स्वयंपाक करून राहात असत. प्रवासांत कधीं पाऊस पडला तरी त्यांच्या घरांत पाणी येत नसे.



स्वयंपाकपाणी, बाजारहाट, घरची व्यवस्था वगैरे कामें तारतरी स्त्रिया पहात. पुरुषांचें काम म्हणजे शिकार करणें आणि युद्ध करणें. त्यांच्या एका कुटुंबांत वीस पंचवीस माणसें सुद्धां असत. मुलें सर्वांची समजली जात. तारतरी लोक जितक्या बायकांचें पालन पोषण करूं शकत असत तित-क्यांशीं लग्नें करीत त्या बाबतींत कसलाहि निर्बंध नसे.

तारतरी लोक सर्वेश्वराची उपासना करीत. सर्वेश्वर त्यांच्या शरीर व बुद्धीची वृद्धि करतो असा त्यांचा विश्वास असे. त्यांच्या घरांत देवांची पूजा करीत व जेवण्यापूर्वी नैवेद्यहि दाखवीत.

हे लोक फार साहसी आणि शूर खरेच. सर्व तन्हेचे कष्ट सहन करण्याची नेहमीं त्यांची तयारी असे. ते घोड्यावरून उतरल्या शिवाय खाण्यापिण्यावांचून सतत दोनतीन दिवस युद्ध करीत. युद्ध करतां करतां रणभूमीवरून पळून जाणें तें निंद्य मानीत नाहींत. कारण पळतां पळतां पाठीमागें वळून ते शत्रूला मारीत असत.

युद्धास निघाल्यावर ते आपल्याबरोबर कधीं रसद घेऊन जात नसत. ज्या ठिकाणीं जें मिळेल त्यावरच ते भागवीत आणि कोठें कांहींच मिळालें नाहीं तर आपल्या घोड्यांच्या धमण्या कापून त्यांतील रक्त पिऊन वेळ मारून नेत. घोडे, उंट, बैल, गायी, शेळ्या मेंढ्या यांनाच ते आपली मुख्य संपत्ति मानीत.

त्या लोकांतील कांहीं रीति फार विचित्र वाटतात. एक परंपरा अशी आहे कीं जर एका कुटुंबातील मुलगी आणि दुसऱ्या कुटुंबांतील मुलगा एका दिवशीं मरत असतील तर त्या दोघांच्या आत्म्याचा ते शास्त्रोक्त पद्धतीनें विवाह करीत असत. त्या निमित्त ते जेवणावळी वगैरे सुद्धां देत असत. दोघे व्याही मिळून त्या दोन्ही मृत देहावर समाधि बांधीत असत आणि त्यांचे हे संबंध किती तरी पिढ्यापर्यंत चालत असेत.

काल्याकडील मार्गांवर बड्या खानाचे ठिकठिकाणी पडाव आहेत. 'चगन नोर' या ठिकाणीं त्यांचा एक फार सुंदर असा राजवाडा आहे. या ठिकाणीं बऱ्याच नद्या असून जागोजागीं सुंदरशीं तळीं आहेत. त्या तळ्यांतून हंस व इतर तऱ्हेतऱ्हेचे पक्षी आहेत. फार रमणीय आहे हें ठिकाण.

'शान्ग तु' नगरांत असाच एक राज-वाडा आहे. तो कुबिलाय खानानें बनविला. हा संगमरवराचा असून त्यांत रंगारंगाचे किमती दगड बसविले आहेत. फार शोभिवंत आहे हा राजवाडा. याच्या पाठीमागच्या बाजूस एक मोठी बाग आहे. त्या बागेंत एक बांबूचें घर केलेलें आहे. त्याचें विशेष म्हणजे तें घर मोडून पुन्हां करतां येतें.

जून, जुलाई आणि ऑगस्ट या महिन्यांत त्या भागांत उन्हाळा असल्यामुळें बडा खान तेथेंच म्हणजे शान्ग तु नगरामध्यें येऊन राहातो.



ज्योतिष्यांनीं २४ ऑगस्ट हा दिवस खानाच्या प्रयाणासाठीं उत्तम आहे असें सांगितल्यावरून तो दरवर्षी त्याच दिवशीं तेथून प्रयाण करतो. तो निघण्यापूर्वी तेथील तें बांबूचें घर काढून ठेववितो.

अंगावर कोठेंहि डाग नसलेले पांढरे शुभ्र घोडे ते लोक पवित्र मानतात. असे स्वच्छ पांढरे घोडे बड्या खानाजवळ पुष्कळ होते. त्यांत दहा हजार तर घोड्याच होत्या.

कुबिलाय खानाच्या पदरीं तिबेट व काश्मिरांतील कांहीं मांत्रिक-तांत्रिक होते

आणि असें सांगतात कीं तांत्रिक लोक आपल्या तंत्रशक्तीनें खानाच्या अंगावर पावसाचा थेंबहि पडूं देत नसत. हे लोक आपल्या अंगावर भस्म लावीत आणि ज्यांना जबरदस्तीनें मारीत अशांचीं मढीं घेऊन जाऊन देवी देवतांची पूजा करीत असत.

त्याच्या पदरीं असलेल्या मांत्रिकांना "भिख्खु" म्हणत असत. हे मांत्रिक बडे खानाला चमत्कार करून दाखवीत असत. बडा खान एका उंच आसनावर जेवावयास बसत असे. त्याच्या चौरंगापासून थोड्या अंतरावर जमिनीवर दूध, मद्य व इतर पेयांचे पेले भरून ठेवले जात असत. हे 'भिख्खु' आपल्या मंत्रबलानें ते पेले कोणीहि उचलल्या शिवाय खानाच्या पानाशीं गेलेले दाखवीत असत. असले चमत्कार ते दहा हजार लोकांसमोर सुद्धां करून दाखवीत.

मार्कोपोलो म्हणतो कीं हें सर्व खरें असून त्यानें तें प्रत्यक्ष पाहिलें आहे.

'भिख्खु' लोक सणावारी खानाच्या मदतीनें फार मोठा उत्सव करीत. शिवाय आपापल्या योग्यतेप्रमाणें लग्नेंहि करीत.

कुबिलाय खानाकडे आणखी एक तऱ्हेचे संन्यासी असत. त्यांना 'सियेन-सिंग' म्हणत. हे लोक मुंडण करीत, निळ्या रंगाची वल्कल वस्त्रें धारण करीत. फक्त तांदुळाची कंजी पिऊन राहात. चटाईवर निजत आणि ब्रह्मचर्याचें कटाक्षानें पालन करीत असत. ह्यांच्या आराध्य देवतांचीं नांवें सर्व स्त्री देवतांचीच असत ह्यावरून असें वाटतें कीं हे शक्ति पूजक असले पाहिजेत. ह्या लोकांविषयीं मार्कोपोलोला नेहमीं कौतुक वाटे. तो म्हणे इतक्या कडक व्रतानें जीवन घालविणारे लोक पृथ्वीच्या पाठीवर विरळाच असतील. (पुढें चालू)





# समुद्रमंथन

ब्रह्मदेव हा कर्त्ता सगळ्या
पृथ्वीचा अन् विश्वाचा ।
आजोबांचा आजोबा तो
आहे आपुल्या सर्वांचा ॥

त्याचा मुलगा कश्यप होता,
तया बायका होत्या दोन ।
मोठि अदिति अन् दिती धाकटी
होत्या सख्ख्या बहिणी दोन ॥

नांव मिळालें देव म्हणोनी
मुलांस जगतीं मोठीच्या ।
दिती धाकटी, दैत्य म्हणोनी
नांव मिळालें मुलां तिच्या ॥

देव रुपानें होते सुंदर
परंतु होते दैत्य कुरूप ।
सरस्वतीची अन् लक्ष्मीची
कृपा सुरांवर होती खूप ॥

दैत्य बली, पण होते उर्मट
आततायि अन् धर्मेडखोर ।
करित वैर ते देवांशीं पण
देव मनाचे होते थोर ॥

भांडण भावंडांचें होई
होइ ताप पण आयांना—
दोष कुणाला द्यावा आतां
देवांना कीं असुरांना ॥

समजाउन पण त्यांनिं पाहिलें,
भांडुं नका रे बाळांनो !
हींच भांडणें कुळ नाशाला
कारण होतिल बाळांनो !

नाहिं ऐकिलें परंतु त्यांनीं
वैर वाढलें अधिकाधिक
करून घेतले वांटे, झालें
तें जें होतें नैसर्गिक ॥

श्री. भालचंद्र आपटे, हैदराबाद

गर्जन करुनी दैत्य म्हणाले–
"सांगतोस इंद्रा कोणा ?
तुझें काय रे आतां येथें ?
देणारा तूं कोण कुणा ?

"अमरावति ही आहे असुची
सानुयायि तूं बलिचा दास ।
आजपासुनी घालूं आम्ही
तोच गिळावा रे तूं घास ॥

सोड तुझा हा तोरा अन् तूं
चाकरि कर बलिराजाची ।
आज्ञेवांचुन त्याच्या कांहीं
करण्या प्राज्ञा कोणाची ॥"

करूं लागला इंद्र खुशामद–
"भावांभावांचें का वैर ?
माझी आई तुझी मावशी
म्हटलें मी का कांहीं गैर ?

"झालें गेलें होउनि गेलें
राहूं खेळी मेळीनें ।
कधीं इथें तर कधि पाताळीं
राहूं पाळी पाळीनें ॥"

गोड गोड बोलुनि इन्द्रानें
खूप फसविलें असुरांना ।
नाहीं कळलें, मनांत त्याच्या
खरें काय होतें त्यांना ॥

इंद्र निसटला हातावरती
तुरी देउनी असुरांच्या ।
देव निसटले धूळ फेंकुनी
डोळ्यामध्यें असुरांच्या ॥

कळा हरपली स्वर्गाची अन्
क्षणांत झालें तें ओसाड ।
चमत्कार तो नाहीं उरलें
नंदनवनांत एकहि झाड ॥

खचला सारा असुरांचा तें
दृश्य भयंकर पाहुनि धीर ।
स्वर्गाचीं सुखस्वप्नें सोडुनि
सर्व पळाले राक्षसवीर ॥





# राज्याभिषेक

वालीनें सुग्रीवाचें राज्य घेतलें आणि त्याची बायकोहि पळवून नेली. त्यामुळें सुग्रीव चिंतित झाला. तो मारुतीला बरोबर घेउन राम लक्ष्मण मदत करतील का म्हणून विचारण्यास त्यांच्याकडे गेला. किष्किंधा पर्वतावरच त्यांची भेट झाली. तेथें सुग्रीवानें पाहिलें कीं रामाचा बाण सात झाडांना पार करून जातो. तेव्हां त्याला विश्वास वाटला.

सुग्रीव रामलक्ष्मणांबरोबर किष्किंधा नगरींत आला. त्यानें वालीला युद्धाला बोलाविलें. सुग्रीवाची हांक ऐकतांच वाली युद्धास निघाला. पण तारानें त्याला अडविलें. म्हणाली– "हारल्यानंतर पुन्हां तो युद्धाला बोलावीत आहे तेव्हां त्यांत कांहीं तरी काळेंबेरें खास आहे. तुम्ही मंत्र्यांचा विचार घेतल्याशिवाय जाऊं नका." पण वाली का कोणाला दाद देणार ! तो तसाच युद्धाला गेला.

दोघांचें युद्ध सुरू झालें. बराच वेळ ते दोघे लढत राहिले. शेवटीं वालीनें एक असा बाण सुग्रीवावर सोडला कीं घायाळ होऊन तो खालीं पडला. हनुमाननें रामाला त्याच्या वचनाची आठवण करून दिली. रामानें वालीवर एक बाण सोडला. बाण लागल्यानें वालीला मूर्च्छा आली. पण थोड्याच वेळांत तो सावध झाला आणि त्यानें तो बाण उचलून पाहिला. त्यावर रामाची मुद्रा ओळखून तो रामाला म्हणाला–"रामा, अशा तऱ्हेनें मारण्यांत अधर्म नाहीं काय ?" त्यावर राम म्हणाला–"पशूवत प्राण्याला तसें मारण्यांत मुळींच अधर्म नाहीं आणि दुसऱ्याची बायको पळवून आणून तिला आपली बायको म्हणणें हें मनुष्यत्वाला साजेसें काम नव्हे."

एवढें होईतो वालीचा अंतकाळ जवळ येऊन ठेपला. त्यानें आपला मुलागा अंगद

सौ. गंगादेवी आपटे



याला बोलाविलें आणि त्याला सुग्रीवाच्या स्वाधीन केलें. आपली कंठी सुग्रिवाच्या गळ्यांत घातली. नंतर मारुतीनें त्याला पाणी आणून दिलें. तें पिऊन त्यानें प्राण सोडला.

वालीचें राज्य रामानें सुग्रिवाला दिलें. त्या नंतर रामाच्या मदतीसाठीं त्यानें आपली सारी वानरसेना दिली. सीतेच्या शोधा-साठीं त्यानें चारी दिशांस आपले वीर पाठविले. अंगद व मारुती दक्षिण दिशेला गेले.

तेथें त्यांना समजलें कीं सीता लंकेंत आहे. त्यांना एवढें कळतांच तिला तेथून शोधून काढण्यासाठीं हनुमानानें हवेंत उड्डाण केलें आणि समुद्र ओलांडून लंकेला गेला.

हनुमानानें सर्व लंकापुरी धुंडाळून पाहिली पण त्यांत त्याला सीता कोठेंच दिसली नाहीं. तो एका उंच झाडावर बसून विचार करीत होता कीं सीता कोठें दिसेल? तो मनांत म्हणाला—"काय मूर्ख आहे रावण! इतके सुंदर वाडे, शोभीवंत उद्यानें, उत्तमोत्तम फळा फुलांच्या बागा आणि हें वैभव रावण आपल्या हट्टीपणामुळें नष्ट करून टाकणार आहे. रामाच्या शक्तीची त्याला कल्पना नाहीं."

थोडा वेळ विश्रांति घेतल्यानंतर हनुमान पुन्हां उठला आणि सीतेला शोधूं लागला. त्यानें नदी घाट पाहिले. उद्यानांत फिरून पाहिलें. रावणाच्या बंदीशाळेंत डोकावून पाहिलें. पण त्याला कोठेंहि सीता दिसली नाहीं.

त्यानें येतांना सीतेला दाखविण्यासाठीं रामाची अंगठी आणली होती. ती पाहून त्याला फार वाईट वाटत होतें. शेवटीं आतां लंकेभोंवती पुन्हां एकदां चक्कर मारून जावें असा विचार करून निघाला. थोड्या वेळानें त्याला एक सुंदर बाग दिसली. ती पाहून त्याला रावणाच्या वैभवाचें आणि त्याच्या आवडी-हौशीचें कौतुक वाटलें. त्या बागेंत एका झाडाखालीं सीता बसली होती. तिच्या भोंवती बसून राक्षशिणी पाहारा देत होत्या.

रावणानें सीतेला अशोक वाटिकेंत ठेविलें होतें. तो रोज येई आणि आपल्याशीं विवाह करण्यासाठीं तिला विचारी. ही गोष्ट तिला इतकी असह्य झाली कीं जिवंत राहण्यापेक्षां मेलेलें बरें असेंच तिला वाटूं लागलें. परंतु राम केव्हांना केव्हां तरी येऊन आपली सुटका करतील ह्या आशेवर ती जगली होती.

हनुमान सीतेला खूण पटवून द्यावी ह्या विचारांत होता. इतक्यांत दोघां मशाल-चींच्या बरोबर रावण सीतेकडे येत असलेला त्याला दिसला. तो झाडावरच लपून बसला आणि रावणाच्या सर्व हालचाली बारकाइनें पाहूं लागला.

रावण सीतेला म्हणाला—"वेड्या मुली! किती दिवस अशी रडत बसशील. अग तो राम का आतां तुला सोडविण्यास येणार आहे? विसर त्याला. मी बघ तुला सर्व तऱ्हेचें सुख देतों. तूं माझ्याशीं लग्न कर आणि मग पाहा."

रावणाचें अशा तऱ्हेचें बोलणें ऐकून मारुतीला फार राग आला. त्यानें आपल्या मनाशीं निश्चय केला कीं ह्या घमेंडखोराची एकदां खोड मोडली पाहिजे.



रावणाचे ते अभद्र शब्द ऐकून सीता चिडली. म्हणाली—"माझा तुला शाप आहे." सीतेच्या पातिव्रत्यामुळें खरोखरच तिच्या वाणीनें सारें अंग गरम झालें आणि तो घाबरून निघून गेला.

नंतर हनुमान हळूंच खालीं उतरला आणि सीतेजवळ जाऊन त्यानें मी रामाचा दूत आहें असें सांगितलें आणि म्हणाला—"आपल्या विरहामुळें रामचंद्र अगदीं दुःखी कष्टी आहेत." सीतेला त्याच्या बोलण्यावर विश्वास बसला नाहीं. तेव्हां हनुमानानें रामाची अंगठी तिला दाखविली. आपलें











नांव सांगितलें. वाली सुग्रीवाच्या युद्धाची हकीगत सांगितली. सुग्रीव आणि रामाच्या मैत्रीचें वर्णन केलें आणि म्हणाला—“मी रामचंद्राच्या आज्ञेवरून येथें आलों आहें. लवकरच ते लंकापुरींत येतील आणि रावणाचा वध करून सुटका करतील.”

“माझी चेष्टा चालविली आहे रावणाच्या मायावी राक्षसांनीं ! कीं हें सारें स्वप्न आहे !” सीता आपल्याशींच म्हणाली.

“ह्यांत शंका करण्याचें कारण नाहीं. खरोखरच मी रामाचा दूत आहें. त्यांच्या कडूनच आलों आहें.” मारुतीनें विश्वास दिला.

“असें असेल तर त्यांना माझी हकीगत कळव. पण त्यांना माझ्यामुळें दुःख होणार नाहीं ना !”

सीतेचा निरोप घेऊन तो जाण्यास निघाला. जातांना आपल्या आगमनाची बातमी रावणाच्या कानावर घालावी असें त्याला वाटलें. त्याचा राग वाढत चालला होता. त्यानें आपला हा राग अशोक वाटिकेवर काढला. त्या बागेंतील एक फूल सुद्धां तोडण्याची मंदोदरीची इच्छा नव्हती त्या मनमोहक उद्यानाचा मारुतीनें अक्षरशः नाश केला.

शंकुकर्ण नांवाच्या वाटिका रक्षकानें रावणाला कळवितांच त्यानें मारुतीला पकडण्यासाठीं त्यानें आपल्या सैन्याची एक तुकडी पाठविली. मारुतीनें राक्षसांना मारलें. त्यानंतर अक्षाबरोबर पांच सेनापति आले. त्यांनाही त्यानें मारून टाकलें. थोडक्यानें ऐकणारें हें माकड नव्हे असें वाटून रावणानें युवराज इंद्रजित ह्याला पाठविलें. मारुतीनें त्याच्याशीं सुद्धां युद्ध केलें, पण थोड्या वेळानें आपल्याला पकडवून घेतलें, कारण त्याला रावणाला पाहावयाचें होतें.





रावणाला मारुतीची हिम्मत पाहून पूर्वीची आठवण झाली. रावणानें शंकराची भक्ति करून वर मागून घेतला होता. तें पार्वती आणि नंदीला न आवडून त्यांनीं शाप दिला होता. तोच शाप हा असावा असें त्याला वाटलें. त्यानें मारुतीला आपल्या समोर आणण्यास सांगितलें व बिभीषणालाहि बोलावणें पाठविलें.

रावणानें मारुतीला विचारलें कोण तूं ?

“मी हनुमान—वायुदेव आणि अंजनीचा पुत्र आणि रामाचा दूत आहे. ऐक त्यांचा निरोप.”

रामाचें नांव ऐकतांच रावण खवळला आणि म्हणाला—“मारून टाका ह्या माकडाला.”

“दादा, किती झालें तर तो दूत म्हणून आला आहे. त्याला शिक्षा करणें अन्यायाचें आहे. त्यानें आणलेला निरोप तरी ऐक ! मग काय करावयाचें तें कर.”

बिभीषणाचें म्हणणें मान्य करून रावणानें मारुतीला रामाचा निरोप सांगण्याची आज्ञा दिली.

“रामचंद्रांनीं सांगितलें आहे कीं त्रिभुवनांत कोठेंहि स्वरक्षणासाठीं धांवलास, प्रत्यक्ष शंकराची मदत मिळविलीस तरी माझे बाण तुला लवकरच यमलोकांत पाठविणार आहेत.” मारुतीनें निरोप सांगितला.

“असं ! माझ्या शस्त्राला समोर आजपर्यंत कोणी टिकूं शकलें नाहीं. सर्व त्रिभुवन माझ्या आधीन आहे. इतकेंच नव्हे तर मी कुबेराकडून त्याचें पुष्पक विमानसुद्धां आपल्या ताब्यांत घेतलें आहे. तो राम ? तो मर्त्य लोकांतील एक साधा माणूस ! तो काय मला मारतो ?” रावण कुत्सित हास्य करून म्हणाला.

“एवढा पराक्रमी आहेस मग सीतेला कपटानें पळवून कां आणलेंस ?” मारुतीनें विचारलें.



मारुतीचें उत्तर विभीषणाला आवडलें. पण रावणाला तें झोंबलें. त्याचा राग कोणा-वर तरी काढावयाचा म्हणून तो विभीषणाला म्हणाला—"फितुरी सुचते आहे वाटतें!"

"तसं नव्हे दादा. पण अन्यायानें व्यर्थ कुल नाश होईल. त्या पेक्षां बऱ्या बोलानें सीतेला परत पाठविलेलें बरें." विभीषण म्हणाला. पण उन्मत्त रावणाला का तें पटणार!

हनुमानाला त्याच्या त्या बढाया आणि रामाची निंदा ऐकवली नाहीं. तो म्हणाला—"तूं श्रीरामांचा अपमान करीत आहेस? साक्षात् विष्णू आहेत विष्णू. हीं सारीं तुझे दिवस भरल्याचींच लक्षणें आहेत."

क्रोधानें रावणाचें सर्व अंग थर थर कापूं लागलें—"त्याला खरें म्हणजे मारूनच टाकलें पाहिजे. पण केवळ हा दूत म्हणून आला आहे म्हणून त्याच्या शेपटीलाच आग लावून सोडून द्या." मारुतीच्या शेपटीला चिंध्या बांधून ती पेटवण्यांत आली.

"ए माकडा, जा आपल्या रामाला जाऊन सांग कीं मी तुझी बायको पळवून आणली आहे. तुझा अपमान आहे असें जर तुला वाटत असेल तर आणि जर तलवार हातांत धरतां येत असेल तर माझ्याशीं युद्ध करून ने आपल्या बायकोला सोडवून." रावण ऐटींत म्हणाला.

मारुती निघून गेल्यावर विभीषणानें त्याला समजावण्याचा प्रयत्न केला. त्यावर रावणानें उलट त्यालाच हद्दपारीची शिक्षा दिली.

मारुतीनें जातां जातां सारी लंकाच पेटवून दिली.

मारुती लंकेहून परत येईपर्यंत राम लक्ष्मण आणि सुग्रीव त्याच्या सर्व सैन्यासह समुद्र किनाऱ्याला येऊन बसला होता. मारुतीला पाहतांच त्यांना हर्ष झाला.



"माझ्या बाणांना शत्रुपर्यंत पोहोंचण्याला फक्त हा एवढा समुद्रच आड आहे. तोहि पार झाला की झालेंच समज आपलें काम."

मारुती किनाऱ्यावर येऊन पोहोंचतो न पोहोंचतो तोंच त्याला विभीषणहि येतांना दिसला. त्याला ओळखून तो रामाला म्हणाला—"हा रावणाचा भाऊ आहे. त्यानें त्याला आपल्या राज्यांतून हद्दपार केल्यामुळें इकडे येत आहे."

रामानें त्याच्या स्वागतासाठीं लक्ष्मणाला पाठविलें. पण सुग्रीवाला त्याच्याविषयीं संशय आला. त्याला राक्षसांच्या मायेचा अनुभव होता. परंतु मारुतीनें सांगितलें की तसें भिण्याचें कारण नाहीं. लंकेंतच तो आपल्या भावाला समजावून सांगत होता. त्याला आपल्या भावाचें काम मुळींच आवडलें नाहीं.

रामानें विभीषणाकडून लंकेची सारी माहिती काढून घेतली व समुद्रावर सेतु बांधण्यासाठीं आपल्या सैन्याला आज्ञा दिली. त्या सर्वांनीं सेतु बांधला आणि राम सर्व सैन्यासह लंकेंत जाऊन पोहोंचला.

थोड्याच वेळांत नल नील दोघां वानरांना घेऊन रामा समोर आला आणि म्हणाला हे





शरण आलेले आहेत. परंतु बिभीषणानें त्यांना ओळखलें व रामाला सांगितलें कीं ते दोघे रावणाचे विश्वासू सेवक शुक व सारण आहेत. ते हेरगिरी करण्यासाठीं आले आहेत. त्यांना शिक्षा झालेलीच बरी.

रामानें विचार केला आतां तर युद्ध व्हावयाचेंच आहे. मग आतांच ह्यांना मारण्याची काय जरुर! त्यानें त्यांना सर्व वानर सैन्यांत फिरविलें आणि त्यांच्याच करवीं रावणाला कळविलें कीं तू विनाकारण हें युद्ध ओढवून घेत आहेस.

लवकरच युद्ध सुरू झालें. राक्षस सैन्यांतील मोठमोठे वीर पडले. कुंभकर्ण पडला. तेव्हां रावणाच्या मंत्र्यांनीं त्याला पुन्हां सुचविलें कीं त्यानें बऱ्या बोलानें सीतेला परत करावें. परंतु रावणाचे डोळे अजून सुद्धां उघडले नव्हते.

रावणानें आपल्या विद्युजिह्वा नांवाच्या कारागिराला राम लक्ष्मणांचे मुखोटे करून आणण्यास सांगितलें आणि तो सीतेकडे गेला. म्हणाला—"अजून तरी आपला हट्ट सोड. राम लक्ष्मण युद्धांत मारले गेले आतां तुला सोडवायला कोण येणार?"

सीतेचा त्या बोलण्यावर विश्वास बसला नाहीं. पण तेवढ्यांतच त्या कारागिरानें राम लक्ष्मणाचे मुखोटे आणून रावणाला दाखविले. ते पाहून सीता मूर्छित झाली. थोड्या वेळानें शुद्धीवर आल्यावर ती दुःख करीत म्हणाली—"ज्या तलवारीनें रामाचे शिर उडालें ती तलवार माझ्या मानेवर पण पडूं दे." "बस ओरडत. इंद्रजितानें त्या दोघांना कधींच मारून टाकलें आहे." रावण हें सांगत असतांच एक राक्षस धांवत येऊन म्हणाला—"महाराज इंद्रजिताला लक्ष्मणानें मारून टाकलें."



"आं! हें काय वर्तमान तूं आणलें आहेस?" असें म्हणत रावण मूर्छित-सा झाला. तितक्यांतच आणखी एका दूतानें येऊन सांगितलें कीं रामाच्या सेनेनें आपल्या सैन्याचा नाश आरंभिला आहे.

रावणाचा क्रोध अनावर झाला. तो सीतेला मारण्यासाठीं धांवला पण अबलेवर शस्त्र उचलणें पाप आहे, पराक्रमाचा अपमान आहे. असें सांगून राक्षसांनीं त्याला अडविलें. शेवटीं तो चिडला आणि आतां जाऊन त्या दोघांना मारून टाकतो म्हणून रथांत बसून समरांगणीं गेला.



राम रावणांचें युद्ध सुरू झालें. दोघे परस्परांवर बाणांचा वर्षाव करीत होते. रावण रथांत होता आणि राम जमिनीवर. रावणाला तें बरें वाटलें नाहीं. म्हणून त्यानें आपल्या मातलीला सांगून एक रथ त्याच्यासाठीं पाठवून दिला. रामानें त्या रथांत बसून रावणावर ब्रह्मास्त्र सोडलें. तें सरळ रावणाला लागलें आणि परत आलें. रावण पडला आणि युद्ध संपलें.

रामानें बिभीषणाला लंकेचें राज्य दिलें. तो राज्याची निरवानिरव करीत होता. एवढ्यांत त्याला कोणी तरी सीता येत असल्याचें सांगितलें. रामानें बिभीषणाला सांगून सीतेला थांबवण्यासाठीं निरोप पाठविला. म्हणाला—"इतके दिवस रावणाकडे राहिल्यानंतर इकडे येणे म्हणजे कुळाला दूषण आहे."

सीतेनें रामाची वाणी ऐकली. तिला फार वाईट वाटलें. ती लक्ष्मणाला म्हणाली—"भाऊजी, चिता रचा आणि त्यांत प्रवेश करण्याची आज्ञा माझ्यासाठीं मागून आणा."

रामाची आज्ञा ऐकून लक्ष्मण अवाक् उभा राहिला. त्याचें मन जणुं बधिर झालें.

तो मारुतीला म्हणाला—"हनुमाना, तुला शक्य झालें तर तूंच कर तें काम."

"असें कां म्हणतां. हाच एक मार्ग आहे काय?" मारुतीनें विचारलें.

"आपली इच्छा वा विचार आपल्या पुरते. वडील भावाच्या आज्ञेचें पालन करणें माझें कर्तव्य आहे." लक्ष्मण म्हणाला.

चिता तयार झाली. अग्नि प्रज्वलित झाला. सीतेनें निर्विकार मनानें अग्नित प्रवेश केला.

केवढें धैर्य, ज्या प्रमाणें एकादा राजहंस सहज गतीनें सरोवरांत शिरतो त्या प्रमाणेंच, तितक्या सहज रीतीनें सीतेला अग्नींत प्रवेश करतांना पाहून रामाच्या मनाला किंचित धक्का बसला. तो आवेशानें तिला "थांब, थांब." म्हणून म्हणाला. सीता थांबली नाहीं. तो अग्नि प्रवेश पाहून प्रत्यक्ष रामाला सुद्धां आश्चर्य वाटलें. कारण अग्नि देवानें सीतेला वाचविलें होतें. अग्नींत जळून भस्म होण्याऐवजीं सीता जास्तच तेजस्वी दिसूं लागली. तिच्या तेजानें सारी लंकापुरी चमकली.

त्यानंतर अग्निदेव प्रकट झाला आणि रामाला म्हणाला—"ही अनिंद्य आणि निष्कलंक आहे. ही लक्ष्मी आहे. पवित्र आहे."

"त्याची मला खात्री होतीच. पण ह्याची साक्ष साऱ्या जगाला पटावी म्हणून मला कठोर होणें भाग पडलें." राम म्हणाला.

त्याच ठिकाणीं अग्निदेवानें राम व सीता ह्यांचा राज्याभिषेक केला. त्या वेळीं स्वर्गांतून इंद्रादि देवांनीं त्यांच्यावर पुष्पवृष्टि केली.





# खिद्रापूर येथील कोपेश्वराचें देवालय

[लेखकः—श्री. पुरुषोत्तम अनंत कुलकर्णी, खिद्रापूरकर]

**को**ल्हापूर जिल्ह्यांत कोल्हापूर शहरापासून ४० मैलावर कृष्णा नदीच्या कांठीं खिद्रापूर हें गांव आहे. या जिल्ह्यांतलें हें प्रसिद्ध तीर्थक्षेत्र आहे. या गांवीं दोन अतिप्राचीन व सुंदर देवालयें आहेत. त्यांतील मोठें देवालय कोपेश्वराचें [श्री शंकराचें] असून दुसरे छोटे देवालय म्हणजे जैनांची वस्ती आहे.

कोपेश्वराचें देवालय हे विमान पद्धतिच्या वास्तुशास्त्राचा सर्वोत्कृष्ट नमुना आहे. ओरिसा प्रांतांतील कौनार्क देऊळच या मंदिरासारखें आहे.

हें देऊळ १०४ फूट लांब, ६५ फूट रुंदव ५२ फूट उंच आहे. व त्याची रचना दक्षिण हिंदुस्थानांतील दगडी रथाप्रमाणें असून चारीबाजूंना चार एकसारखें दगडी प्रचंड दरवाजे आहेत. मंदिराची रचना काळ्या दगडाची असून मूळ गाभाऱ्यामध्यें कोपेश्वर व धोपेश्वर यांची दोन लिंगें आहेत. या गाभाऱ्यापुढें उंची खोदीव काम केलेले एकापुढें एक असे दोन चौक असलेले सभामंडप आहेत. आंतील चौकास १२ व बाहेरील चौकास २० असे नक्षीदार दगडी खांब आहेत. मंदिरापुढें पूर्वीचें आच्छादन नाहींसें झालेला वर्तुळाकार 'स्वर्ग मंडप' नांवाचा मंडप आहे. या मंडपाच्या मंदिराचा खालचा थर सुरेख खोदीव नक्षीकामाचा असून, दुसरा खोदीव १०० हत्तींचा आहे. हत्तींवर हिंदूंच्या देव-देवता खोदलेल्या आहेत. देवळाच्या मध्यभागीं रामायणांतील प्रसंग व स्वर्गीय अद्भुतरम्य पोषाख केलेल्या अप्सरा आणि भारतीय नृत्यपद्धति खोदलेल्या आहेत.

हें देऊळ यादव राजा दुसरा सिंघण यानें १२ व्या शतकांत बांधलें असावें. मंदिराजवळ तसा एक शिलालेख आहे. दुर्दैवानें मुसलमानी अमदानींत या देवालयाचा विध्वंस झालेला आहे. परंतु प्राचीन पद्धतीच्या भारतीय शिल्पकलेचा तो नमुना पाहून मति गुंग होते.

# मूर्ख

एका गांवांत एक शेतकरी राहात असे, त्याला सात मुलगे होते. वडील असेपर्यंत ते कधीं आपलें गांव सोडून गेले नाहींत. वडिलांच्या मागून ते सर्व स्वतंत्र झाले.त री सर्व मिळून राहात असत.

एकदां शेतावर कांहीं काम नसल्यामुळें ते सर्व फिरावयास निघाले. नवीन नवीन गांवें पाहून त्यांना फार मजा वाटली. शेवटीं रात्रीं अंधार पडल्यावर ते घरीं येण्यास निघाले. वाटेंत त्यांना एक विहीर लागली. तेथें ते कांहीं वेळ बसले आणि पुढें जाण्या-साठीं उठले.

एकाला शंका आली कीं आपण सर्वजण बरोबर आहों कीं नाहीं ? प्रत्येकानें आप-ल्याला सोडून सहाजणांना मोजलें. नंतर एकजण कमी होता म्हणून प्रत्येकानें विहि-रींत डोकावून पाहिलें. सर्वांना आपापली सावली दिसली आणि त्यांना वाटलें सातवा विहिरींत पडला असावा. त्याला घेतल्या-शिवाय पुढें जायचें नाहीं अला निश्चय करून ते त्याला काढण्याच्या प्रयत्नाला लागले.

मोठ्या भावानें विहिरीच्या कड्याला हात पकडला आणि लटकला. दुसऱ्यानें त्याच्या पायाला पकडलें आणि तो लोंबकळूं लागला. असे एक दुसऱ्याचे पाय धरून सर्व विहिरींत लटकूं लागले. पण वजन सहन न झाल्यानें मोठ्याचा हात सुटला आणि सर्व विहिरींत पडले. पण पडतांक्षणींच त्यांनीं परस्पराना पकडलें व ओरडले—" सांपडला रे सांपडला."

सुदैवानें विहिरीचें पाणी खोल नसल्यानें ते बुडले नाहींत. विहिरींत उतरतांना त्यांनीं आपल्या टोप्या काढून एके ठिकाणीं ठेवल्या होत्या. त्या सात होत्या. त्या मोजल्यावर त्यांना समजलें कीं आपल्यापैकीं कोणीहि कमी झालेला नव्हता.



## गलिवरच्या सफरी



ब्लेफुस्कूची दलाचे सैनिक सज्ज होण्यापूर्वींच मी बंदरांत शिरलों व सर्व नौकांचे नांगर कापून फेकून दिले.



तेवढ्यांत माझ्यावर बाणांची वृष्टि झाली. त्यांचे बाण लहान असले तरी ते सुई प्रमाणे बोचत होते.



त्यांच्या त्या अणकुचीदार बाणांनी डोळा बिळा फुटू नये म्हणून मी डोळ्यावर चष्मा चढविला.



ब्लेफुस्कूची दलातील पन्नास जहाजें घेऊन मी लिलिपुटकडे निघालों.



लिलिपुटच्या किनाऱ्यावर पोहोंचण्यापूर्वी मी चष्मा काढून खिशांत ठेविला. किनाऱ्यावर राजा, सैनिक आणि हजारों लोक माझी प्रतीक्षा करीत होते. मी किनाऱ्यावर पोहोंचताच ' लिलिपुटच्या राजाला जय



राजानें माझ्या सेवेचें कौतुक करून मला सर्वांत बहुमानाची 'नार्डाक' पदवी देऊन माझा सत्कार केला.



राजानें मला पुन्हां आज्ञा दिली कीं संधि मिळ-ल्यास ब्लेफुस्कूची बाकी काहीं जहाजें आण, राज्याची हाव अपरिमीत असते.



लिलिपुट राजा ब्लेफुस्कू राजाला आपला मांडलीक राजा करून घेऊं इच्छित होता. पण अज्ञात-हेनें कोणाला बंधनांत ठेवणें मला पसंत नव्हतें.



राजाच्या मंत्र्यांमध्यें पुष्कळांना मार्ते म्हणणें पटलें. इतकेंच नव्हे तर त्यांनीं राजालाहि समजा-वण्याचा प्रयत्न केला.



राजाला मंत्र्यांचा सल्ला पसंत पडला नाहीं. तो कोणाशीं कांहींहि न बोलता मुकाट्यानें उठून [illegible]



तीन आठवड्या नंतर ब्लेफुस्कूच्या राजानें आपल्या कांहीं दूतांना तहाची बोलणी करण्यासाठीं पाठविलें. कारण युद्ध चालू ठेविणें त्या लोकांना अगदीं अशक्य झालें होतें. ही संधि पाहून लिलिपुटच्या राजानें आपल्या मनाप्रमाणें अटी घालून त्यांची मैत्री संपादन केली.



नंतर ते सर्व लोक मला पाहावयास आले. आणि मला पाहून माझी व माझ्या अचाट शक्तीची त्यांनीं मुक्त कंठानें स्तुति केली.



"आमच्या राजानें आमच्या राज्यास एकदां भेट देण्याची आपल्याला विनंती केली आहे." त्यांनीं राजाच्या वतीनें निमंत्रण दिलें. मी तें मान्य केलें.



कांहीं दिवसांनीं मी लिलिपुटच्या राजाची भेट घेऊन ब्लेफुस्कूच्या निमंत्रणाविषयीं सांगितलें व तेथें जाण्या-साठीं परवानगी मागितली. राजाच्या भुंवया चढल्या. माझ्याबद्दल त्यांच्या मनांत थोडा अनादर उत्पन्न झाल्याचा भास झाला. तरी पण त्यांनीं मला जाण्यास परवानगी दिली.





एके दिवशीं अर्धरात्रीच्या सुमारास माझा एक मित्र लपतछपत माझ्याकडे एक गुप्त बातमी सांगण्यासाठी आला.



तो म्हणाला–"आपल्यावर फार मोठें संकट येणार आहे. राजेसाहेबांना आपल्यावर कोप झाला आहे. त्यांत आणि कांहीं दुष्ट लोकांनी त्यांचे कान भरले कीं प्रथम शत्रुपक्षातील लोकांची भेट घेणें हा एक अपराध आहे. आणि त्यांचें निमंत्रण स्वीकारणें तर राजद्रोहच आहे. म्हणून त्या सर्वांनी मिळून आपल्याला प्राण-दंड देण्याची शिक्षा सुचविली. परंतु राजानें आपण केलेल्या कामगिरींचे स्मरण करून नुसती अंधत्वाची शिक्षा पुरे असें सांगितलें आहे. ह्या सूचनेवरून केव्हांहि आपले डोळे फाडून टाकण्यांत येतील."



"मला शक्य होतें तेवढें मी केलें. ह्या पेक्षां जास्त मी कांहीं करूं शकत नाहीं." असें सांगून माझा मित्र निघून गेला.



पहाट होतांच मी आपले कपडे एका जहाजांत घातले आणि राजाकडे निरोप पाठविला कीं मी ब्लेफुस्कूला जात आहे आणि निघून गेलो.



# निरक्षर हव्यासी

**भोज** राजाच्या वेळीं कधीं कधीं कांहीं अक्षरशून्य ब्राह्मण कालिदासाकडे येत. त्यांच्या पायां पडत आणि राजाकडून आम्हांला कांहीं दक्षिणा मिळवून द्या म्हणून त्यांच्या पाठीस लागत.

एकदां केशव शर्मा नांवाचा एक ब्राह्मण कालिदासाच्या पाठीस लागला. म्हणाला–"माझ्या घरांत खायला अन्न नाहीं. मुलांचीं केविलवाणीं तोंडें बघवत नाहींत. कांहींतरी करून मला राजाकडून इनाम मिळवून द्या."

"काय विद्याअभ्यास झाला आहे तुझा?" कालिदासानें विचारलें. पण तो कांहींच शिकलेला नव्हता. तो मग काय उत्तर देणार कालिदासला!

"ठीक आहे. मग उद्यां दरबारांत या आणि आल्याबरोबर नक्षत्रांचीं नांवें घ्या भराभर. तेवढें केलेंत तरी कांहीं तरी मिळवून देण्याचा प्रयत्न करीन." कालिदास म्हणाला.

दुसऱ्या दिवशीं केशवशर्मा दरबारांत आला. तो आल्याबरोबर कालिदासानें उठून त्याचें स्वागत केलें.

"कोण हे?" राजानें पृच्छा केली.

"एक मोठे विद्वान आहेत. अल्पभाषी आहेत." कालिदास म्हणाला.

राजा भोज उठला. मोठ्या आदरानें केशवशर्माला नमस्कार केला आणि बसावयास आसन दिलें. केशवशर्मा 'अश्विनी, पुनर्वसु, रेवति, कृत्तिका' म्हणत राजाला आशीर्वाद देत आपल्या जागेवर बसला. राजाला अर्थबोध न झाल्यामुळें आश्चर्य वाटलें. इतक्यांत कालिदासानें "वाहवा! वाहवा!!" करून आशीर्वादाचें कौतुक केलें. त्याचा अर्थ न समजल्या कारणानें त्यानें प्रश्नार्थ

श्री बा. मा. बागळे



मुद्रेनें कालिदासाकडे पाहिलें. त्यावरोबर कालिदासानें एक श्लोक म्हणून दाखविला.

"अश्विनी भवतु तेतु मंदुरा
मन्दिरे वसतु ते पुनर्वसु
रेवती पति कनिष्ठ सेवया
कृत्तिका तनय विक्रमोभव"

[तुझ्या अश्वशाला घोड्यांनीं भरलेल्या असोत. तुझ्या घरांत सुवर्णाची वृद्धि होवो. रेवतीपतिचा भाऊ जो श्रीकृष्ण त्याच्या कृपेनें तुला कृत्तिकातनय कुमारस्वामीप्रमाणें पराक्रमी पुत्ररत्न लाभो.]

हा त्याचा अर्थ ऐकून राजाला आनंद झाला. त्यानें खुश होऊन केशवशर्माला बरेंच धन देऊन निरोप दिला.

मऊ पाहिलें कीं कसें कोपरांनीं खणायला सुरवात करतात त्याचें एक उदाहरण पहा.

धारा नगरींतील नागरिकांच्या तोंडून एकच गोष्ट ऐकूं येऊं लागली—"कालिदासाचा गुरु राजमार्गावर बसला आहे." ही गोष्ट भोजराजाच्या कानांवर गेली. त्यानें कालिदासाला बोलावून विचारलें. म्हणाला—"असें ऐकिलें आहे कीं आपले गुरु गांवांत आले आहेत. भेटून आलांतका त्यांना?"

कालिदास राजाचा प्रश्न ऐकून जरा विचारांत पडला. पण कांहीं तरी उत्तर तर दिलेंच पाहिजे होतें. म्हणाला—"मीहि ऐकिलें आहे. जाणार आहे त्यांच्या भेटीला."

कालिदासाला खरोखरच त्या माणसाच्या शोधार्थ जावें लागलें. त्याला गांठून कालिदासानें खूप झाडलें. म्हणाला—"तुम्ही म्हणे कालिदासाचे गुरु आहांत म्हणून सुटलांत. समजा ही गोष्ट, कालिदासाला समजली तर तो काय करील माहीत आहे?"

तो ढोंगी घाबरला. "माझा त्यांत कांहीं दोष नाहीं. मी एक निरुपद्रवी ब्राह्मण आहें. विष्णुशर्माच्या आश्रयाला असतों. उपजीविकेचें कांहीं साधन नसल्यामुळें फार संकटांत आहें मी. मला विष्णुशर्मानेंच हा उपदेश दिला. त्यानें सांगितलें असें केल्यानें तो कांहीं तरी इनाम देववील. मी मुद्दाम कांहीं केलें नाहीं." असें म्हणून त्यानें त्याचे पाय धरले.

विष्णुशर्मा कालिदासाचा द्वेष करीत असे. त्याचा अपमान करण्यासाठींच त्यानें ब्राह्मणाला तसें करण्यास सांगितलें होतें. कालिदासानें विचार केला, ठीक आहे. आपण तरी आपला अपमान कां करून घ्यावा? होऊं दे या ब्राह्मणाचा फायदा. असा विचार करून तो ब्राह्मणाला म्हणाला—"राजाला समजलें आहे कीं कालिदासाचा गुरु आला आहे. तो जरूर तुला बोलावणें पाठवील. त्या वेळीं जर तूं तोंड उघडलेंस तर चांगलीच फजीती होईल आणि राजा कदाचित फांसावर सुद्धां चढवील. जर तुला कांहीं विचारलें तर तूं माझ्याकडे बोट दाखव." कालिदास इतकें सांगून निघून गेला.

कालिदासानें राजाला सांगितलें कीं मी माझ्या गुरूला भेटून आलों. पण सध्यां



त्यांनीं मौन धारण केलें आहे. कालिदासचे गुरु म्हणजे ते किती विद्वान असले पाहिजेत! असा विचार करून राजानें त्याला दरबारांत आणण्यासाठीं पालखी पाठविली.

दरबारांत येतांच सर्व लोक मोठ्या उत्सुकतेनें त्याच्याकडे पाहूं लागले. विष्णुशर्मा मनांत म्हणत होता, 'आतां चांगली गम्मत होईल.' त्याला आंतून अगदीं हास्याच्या उकळ्या फुटत होत्या. भ्रमाचा भोपळा फुटण्याची तो अगदीं वाट पहात होता.

तो जेव्हां दरबारांत आला त्यावेळीं 'रावण' शब्दाच्या उत्पत्तीची चर्चा चालली

होती. कोणी म्हणालें कैलास पर्वताच्या खालीं दबून गेल्यामुळें तो रडला. म्हणून त्याचें नांव रावण झालें. कांहींचें म्हणणें कांहीं दुसरेंच होतें. कालिदासाच्या गुरूला पाहतांच राजानें गुरूकडे पश्नार्थ नजरेनें पाहिलें आणि विचारलें कीं तुमच्या मतें 'रावण' शब्दाची व्युत्पत्ति काय असावी?

आपल्याला गप्प बसावयाचें आहे हें तो ब्राह्मण विसरून गेला आणि एकदम 'राभण' असें म्हणाला.

चुकीचा उच्चार भोजराजाच्या कानाला खटकला. तो म्हणाला—"गुरुवर्य, आपण तो शब्द राभण कशासाठी म्हणालांत?"

पुढें ब्राह्मण कांहीं बोलण्याच्या आंत कालिदास म्हणाला—"महाराज, आपण इतका वेळ 'रावण' हा शब्द ठीक आहे असें समजून त्याच्यावर चर्चा करीत होतों. परंतु गुरुजींचें म्हणणें आहे कीं 'रावणा' ऐवजीं 'राभण' हा शब्द कां असूं नये? आणि त्याचा हा मतितार्थ त्यांच्या शिष्याशिवाय कोणालाहि कळणें शक्य नाहीं." कालिदासानें एक श्लोक म्हणून दाखविला.

"भकारः कुम्भकर्णेच,
भकारश्च बिभीषणे,
तयोर्ज्येष्ठ, कुलश्रेष्ठे
भकारः किं न विद्यते ?"

(कुंभकर्णाच्या नांवांत 'भ' आहे बिभीषणाच्या नांवांत 'भ' आहे. मग एकट्या रावणाच्या नांवांतच कां नसावा? तो तर त्यांचा कुलश्रेष्ठ मोठा भाऊ आहे.)

कालिदासाच्या ह्या स्पष्टीकरणावर आणि अर्थावर राजा भोज खुश झाला. त्यानें कालिदासाच्या गुरूला त्याच्या अगाध ज्ञानाबद्दल खूप दक्षिणा दिली आणि त्याला निरोप दिला.




आपल्या भारतांतील आश्चर्यें :

# चितोडचा विजय स्तम्भ

भारताच्या इतिहासांत चितोड हें इतिहास प्रसिद्ध शहर आहे. इ. स. ७२८ मध्यें प्रसिद्ध रजपूत राणा बाप्पा रावळनें ह्या नगराची स्थापना केली. रजपूत लोक शत्रुपुढें कधीं मस्तक वांकवीत नसत. मुसलमानांच्या पासून आपल्या देशाचें रक्षण करण्यासाठीं तेथील स्त्रीपुरुषांनीं फार कष्ट भोगले. परंतु अखेर हें नगर मोंगल बादशाहांनीं जिंकलें आणि नष्टहि करून टाकलें.

राजा भीमसिंह चितोडचाच राणा होता. त्याची राणी प्रसिद्ध पद्मिनी येथीलच. त्याच प्रमाणें प्रख्यात कृष्णभक्त मीराबाईचें सासर येथेंच होतें. तिनें बांधलेलें कृष्णालय आणि तिचा नवरा राणा कुंभ ह्यानें बांधविलेलें एक देऊळ येथेंच आहे.

ह्या राणानेंच बांधविलेला एक विजयस्तंभ ह्या गांवांत आहे. ह्या गांवांतील प्रेक्षणीय स्थळांपैकीं हें एक आहे. असें सांगतात कीं माळव्याचा सुल्तान महम्मद खिलजी यानें चितोडवर स्वारी केली. राजपुतांचा त्या लढाईत जय झाला. त्याचें स्मारक म्हणून हा स्तंभ इ. स. १४४० मध्यें बनविण्यांत आला. त्याची उंची १२२ फूट आहे.





# खरें लपत नाहीं !

एका गांवांत एक शेतकरी राहात असे. त्याला रघू नांवाचा एक मुलगा होता. बापाचें रघूवर मुळींच प्रेम नव्हतें. म्हणून तो त्याच्याकडून खूप कामें करून घेई. वास्तविक पाहतां रघू फार चांगला मुलगा होता. आपल्या कामांत तो तत्परता आणि कसब दाखवीत असे. पण त्याची कदर केली जात नसे. तो जेवढें काम करी त्याहून जास्त काम बाप त्याला सांगत असे.

त्याच गांवांत जानकी नांवाची एक मुलगी होती. ती सुद्धां रघूप्रमाणें हुशार आणि कामसू होती. त्या दोघांची ओळख झाली. त्यांनीं लग्न करण्याचें ठरविलें. जानकीच्या बापानें त्याला होकार दिला. रघूनें बरेच दिवस ही गोष्ट आपल्या बापाला सांगितलीच नाहीं. पण लग्न करण्याची वेळ जवळ येत चालली तेव्हां मात्र त्यानें आपल्या बापाला सांगितलें.

"तुलाच संभाळतां संभाळतां नाकी नऊ आली आहेत आणि म्हणे बायको आणतों. पैसे मिळवायची अक्कल तर येऊं दे! धमक नाहीं काडीची आणि लग्न करायला निघाला आहे. तें कांहीं नाहीं. ज्या दिवशीं तूं आपल्या स्वतःच्या पायावर उभा राहाशील त्या दिवशींच बायको आण." बाप गरजला.

वडिलांच्या हाताखालीं मी जेवढे काबाड-कष्ट करीत आहें तितके जर मी दुसरीकडे कोठें केले तर आमचें दोघांचें पोट भरण्या-एवढे पैसे खात्री पूर्वक मिळवीन. असे विचार रघूच्या मनांत घोळूं लागले आणि एके दिवशीं तो घरांतून खरोखरच नाहींसा झाला. ही गोष्ट त्यानें एकट्या जानकीलाच तेवढी सांगितली होती.

जातां जातां त्याला एक रान लागलें. तो तसाच त्यांतून मार्ग काढीत पुढें जाऊं लागला. वाटेंत त्याला एक म्हातारी दिसली. ती डोक्यावर लाकडांची मोळी घेऊन काठी टेंकीत टेंकीत चालली होती. रघू झटपट तिच्याजवळ गेला व म्हणाला—बाई फार जड असावी मोळी असें वाटतें. आणा मी पोहोंचवून देतों तुमच्या घरीं." आणि त्यानें ती मोळी तिच्या डोक्यावरून घेतली सुद्धां.

रघू म्हातारी बरोबर जाऊं लागला. म्हातारीनें त्याला कोण, कुठला, कुठें चालला वगैरे प्रश्न विचारून सर्व माहिती काढून घेतली. रघूनेंहि कांहीं एक न लपवितां सर्व सांगितली. म्हणाला—"मी आतां कामधंदा शोधून चार पैसे मिळवीन आणि मग लग्न करीन."

"अरे मग माझ्याकडेच रहा. काम कर मी तुझ्या पोटापुरती व्यवस्था करून देईन आणि वर्षा अखेरी मला वाटेल तसें कांहीं तरी देईन! बघ तुला कसें काय परवडतें तें."

"ठीक आहे. तुम्हांला तसं वाटत असेल तर राहतों इथेंच. म्हाताऱ्यांची सेवा करणें सुद्धां पुण्यच आहे." रघू म्हणाला आणि तेथें राहूं लागला.



रघू रोज गुराढोरांना दाणापाणी देई, दूध काढी. परसांत भाजीपाला लावून त्याला खत पाणी देई. जंगलांत जाऊन लाकडें तोडून आणी. कामें सर्व तो मोठ्या आनंदानें आणि मेहेनतीनें करी.

एक वर्ष झालें. तेव्हां म्हातारी रघूला म्हणाली—"रघू, तुला येथें काम करायला लागून एक वर्ष झालें. मी सांगितलेलें काम तूं मन लावून केलेंस. फार आवडलें मला तुझें काम. मी तुला सांगितलें होतें ना, एक वर्षभर काम केल्यावर तुला कांहीं तरी देईन! माझ्या जवळ एक गाढव आहे.

श्री. का. गो. देसाई



तें घेऊन तूं जा आणि आनंदानें रहा." रघूला वाईट वाटलें. मनांत म्हणाला— काय करायचें आहे हें गाढव घेऊन ! कोण करणार याचें चारा पाणी ! एकाद्या परटाला विकलें तर मिळतील दोन चार रुपये. पण काय करावयाचें ! तेवढ्यानें काय बायकोला आणतां येईल !" त्याचा उदास चेहेरा पाहून म्हातारीला हंसूं आलें.

"तुझ्याकडून इतकें काम करवून घेऊन सायें एक गाढव देऊन तुझी पाठवणी कशी करीन ! त्याचे दोन्हीं कान जरा जोरानें ओढ पाहूं !" म्हातारीनें सांगितलें.

म्हातारीनें सांगितल्या प्रमाणें रघूनें गाढवाला खुंटाशीं बांधलें आणि त्याचे दोन्ही कान धरून जोरानें ओढले. गाढव 'हीं आ ; हीं आ' करून ओरडूं लागलें. त्या बरोबर त्याच्या तोंडांतून हिरे मोती पडले. ते पाहून रघूला आनंद झाला. त्यानें म्हातारीला नमस्कार केला आणि गाढव घेऊन आपल्या घराकडे वळला.

संध्याकाळ होतां होतां तो एका गांवांत पोहोंचला. तेथें एका म्हातारीच्या घरीं जाऊन तो म्हणाला—"आजीबाई, आज रात्रीं पुरता मुक्काम करायला मला जागा द्या आणि पहा, जमलं तर भाजीभाकर दिलीत तर फार चांगलें होईल. उद्यां पहाटेंच मी निघून जाईन."

म्हातारीनें कबूल केलें. तिच्या मुलानें त्याच्या गाढवाला अंगणांत नारळाच्या झाडा खालीं बांधून ठेविलें.

रात्रीं जेवणखाण झाल्यावर रघू जेव्हां झोंपण्याची तयारी करूं लागला तेव्हां म्हातारी म्हणाली—"तूं पहाटेंच सकाळीं निघून जाणार तेव्हां जें काय द्यायचें आहे तें आत्तांच देऊन ठेव." "बरं बघतो." म्हणून रघू आपल्या गाढवाजवळ गेला.



त्याचे दोन्ही कान ओढले. त्या बरोबर हिरे मोती पडले. ते सर्व त्यानें गोळा केले, पुरचुंडी बांधून आपल्या सामानांत ठेविली आणि फक्त एक मोती काढून म्हातारीला नेऊन दिला.

हा सर्व प्रकार म्हातारीच्या मुलानें पाहिला. रघू झोंपल्यावर त्यानें रघूचें गाढव दुसऱ्या झाडाला बांधलें. त्याच्या जागीं दुसरेंच एक गाढव आणून बांधलें. नंतर रघूच्या सामानांतील हिऱ्यामोत्यांची पुरचुंडी काढून घेतली आणि झोंपीं गेला.



दुसऱ्यादिवशीं रघू उठला. आपलें सामान घेतलें, आपलें समजून दुसरें गाढव घेतलें त्यावर बसला व आपल्या गांवीं निघून गेला. घरीं गेल्यावर आपल्या बापाला गाढवाचें वैशिष्ट्य वर्णन करून म्हणाला— "ओढून तर पहा त्याचे दोन्ही कान !" बापानें कान ओढले. गाढव रेकलें. पण त्याच्या तोंडांतून कांहीं सुद्धां पडलें नाहीं. गाढवानें लाथ मारल्यामुळें बापाला मात्र खूप लागलें. तो रागावला आणि मुलाला म्हणाला—"मूर्ख कुठला. गाढव, कशाला आणलेंस तें गाढव. जा चालता हो. पुन्हां येऊं नकोस माझ्याकडे."

रघू पुन्हां नोकरीला निघाला. वाटेंत एक जंगल लागलें. त्यांत एक सुतार फळ्या तयार करून घरीं घेऊन चालला होता. त्याला पाहाल्यावर रघु म्हणाला—"बाबा, तुम्हीं कशाला हें ओझें उचलतां ? मी नेतों तुमच्या घरापर्यंत." असें म्हणून त्यानें तें ओझें आपल्या शिरावर घेऊन त्याच्याघरीं नेऊन पोहोंचविलें.

वाटेंत बोलतां बोलतां सुतारानें रघूची सर्व माहिती मिळविली. नंतर म्हणाला— "जर माझ्याकडे एक वर्ष काम केलेंस तर यथा शक्ति तुला कांहीं तरी देईन."

रघूनें तें मान्य केलें. एका वर्षानंतर सुतारानें त्याला एक कांशाचें भांडें दिलें. आणि म्हणाला—"हें भांडें अक्षय पात्र आहे. याला आज्ञा देतांच पाहिजे असलेले सर्व पदार्थ यांत वाढून येतात." तें घेऊन रघु आपल्या घरीं जाण्यास निघाला.

पहिल्यावेळीं ज्या म्हातारीकडे मुक्काम केला होता. त्या गांवींच त्यावेळींहि रात्र पडली. तो पुन्हां त्या म्हातारीकडेच उतरला. म्हातारीनें त्याला रात्रीच्या जेवणाचें विचारलें. तो म्हणाला—"नको माझ्याजवळ एक विचित्र भांडें आहे. तें मला देतें सर्व कांहीं."

असें सांगून त्यानें आपलें भांडें काढलें. आणि आपल्या पुढें ठेऊन म्हणाला—"पात्रा, मला अन्न दे." लगेच चार तऱ्हेचे पदार्थ त्यांत दिसूं लागले. त्या तिघांनीं यथेच्छ भोजन केलें. रघूनें ताट धासून पुसून उशाशीं ठेविलें आणि झोंपीं गेला.

म्हातारीच्या मुलानें भांड्याचा प्रताप पाहिला होता. रघूला झोंप लागतांच तो हळूच आला. त्याच्या सामानांतील भांडें काढून घेऊन त्या जागीं दुसरें भांडें ठेविलें.

दुसरे दिवशीं रघू पाहाटे उठला. सामान घेतलें आणि आपल्या गांवीं निघून गेला.



"मी पहा या वेळीं एक भांडें आणलें आहे. तें द्रौपदीच्या थाळी प्रमाणेंच आहे. पहा तुम्ही त्याची प्रचीति." रघू बापाला म्हणाला. बापानें ताटाजवळ बसून जेवण मागितलें पण त्यांतून कांहींहि आलें नाहीं. रघूला आश्चर्य वाटलें. बापाला राग आला.

रघू पुन्हां कामाच्या शोधार्थ निघाला. वाटेंत त्याला एक कालवा लागला. तो पार करण्याच्या विचारांत तो होता. एवढ्यांत त्यानें पाहिलें एक म्हातारा कुऱ्हाडीनें एक झाड तोडीत होता. "कशाला तोडतां एवढा मोठा वृक्ष?" रघूनें विचारलें.

"कालवा पार करण्यासाठीं" म्हातारा म्हणाला—"आणा, मी करतों तुम्हांला थोडी मदत." असें म्हणून रघूनें त्याच्या जवळून कुऱ्हाड घेतली आणि झाड तोडूं लागला. दहा बारा घावांत झाड कालव्यावर आडवें पडलें. म्हाताऱ्याला आनंद झाला. त्यानें एक काठी रघूला बक्षीस दिली. "ज्याला तूं मारायला सांगशील त्याला ही काठी मारत सुटेल. हिला साधी म्हणून फेंकून देऊं नकोस" त्यानें सांगितलें.

काठीची परीक्षा पाहण्यासाठीं रघु म्हणाला—"हवेंत प्रहार कर." त्या बरोबर



खरोखरच काठी त्याच्या हातांतून सुटली आणि हवेंत प्रहार करूं लागली. मग ती काठी घेऊन रघू आपल्या गांवीं निघाला.

त्याच्या मनांत विचार आला, कीं त्या म्हातारीच्या घरींच नाहीं का माझ्या पहिल्या दोन्ही वस्तू हरवल्या? आतां दाखवूं या त्यांना चांगला इंगा. म्हणून तो पुन्हां त्या गांवीं गेला. त्याच म्हातारीकडे गेला. "बरें आहे ना आजी बाई! ठीक चाललें आहे ना! सर्व कांहीं!" म्हणत तो आंत शिरला.

"कोण रे तूं? मला नाहीं बाबा कांहीं तुला पाहिल्या सारखें आठवत." म्हातारी म्हणाली.

"मलाहि ह्या मुलाला पाहिलेलें आठवत नाहीं." म्हातारीच्या मुलानें दुजोरा दिला.

"अहो माझें गाढव आणि भांडें तुम्हीच नाहीं का चोरलेंत?" रघूनें विचारलें.

"आम्हांला काय करायचें आहे गाढव? तुझें गाढव आम्ही कशासाठीं घेऊं?" म्हातारीचा मुलगा तोऱ्यांत म्हणाला.

"अस्सं, मार त्याला" रघूनें असें म्हटल्या बरोबर काठी दणादण त्या मुलाच्या पाठीवर पडूं लागली.

"मरेल कारटं, पुरे रे. नको आम्हांला तुझें सामान, घेऊन जा आपलें. पण माझ्या मुलाला मारूं नकोस." असें म्हणत म्हातारी गयावया करूं लागली. तिनें त्याचें गाढव आणि भांडें आणून दिलें. रघूनें ते हातांत घेतलें व मग आपल्या काठीला परत बोलाविलें.

त्या नंतर रघू आपलें सर्व सामान घेऊन घरीं गेला. बापाला सर्व दाखविलें. त्याचा बाप खुश झाला. पुढें रघूनें जानकीशीं लग्न केलें आणि सर्व सुखानें राहूं लागले.



# फोटो जोडनांवें चढाओढ

नवेंबर १९६० :: बक्षिस १० रुपये





**कृपा करून जोडनांवें पोस्ट-कार्डावरच पाठवावीत.**

वरील फोटोंची ओळख करून देणारीं जोडनांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठी पण परस्परांशीं थोडेंफार साम्य दर्शविणारी असावीत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ७ सप्टेंबर १९६० पूर्वी खालील पत्त्यावर पाठवावीत. पोस्ट-कार्डाशिवाय आलेलीं जोडनांवें स्वीकारण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ,**
**चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६.**

## सप्टेंबर महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालील जोडनांवें सर्वोत्तम ठरलीं आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होतांच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषिकाचे नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो : रघुपति राघव राजाराम, पतित पावन सीताराम!
दुसरा फोटो : ईश्वर अल्ला एकहि नाम, सबको सन्मति दे भगवान!!

प्रेषिका : कु. मीना मा. पाळंडे,
१४, यशवंतनगर, गणेशखिंड, पुणे-७,




अर्जुनानें जयद्रथाला मारण्याची प्रतिज्ञा केलेली ऐकून कौरव सैन्य भयभीत झालें. जयद्रथाची तर गाळणच उडाली. तो दुर्योधनाकडे येऊन म्हणाला—"मला वांचवा. पांडव सूड घेतल्याशिवाय राहणार नाहींत. उद्यांचा दिवस मी रणांगणांत येतच नाहीं."

"तूं वीर असून इतका भितोस ? अरे, आम्ही आहोंत ना सर्व जण तुझ्या पाठीशीं ?" दुर्योधनानें त्याला जरा धीर दिला.

"युद्धांत मरणाराला वीर गति मिळते. माहीत आहे ना ?" द्रोणानें धीर दिला. अशा तऱ्हेनें एकेक जण जयद्रथाला धीर देत होता.

इकडे पांडवांच्या शिबिरांत कृष्ण अर्जुनाला सांगत होता कीं तूं तुझ्या भावांना किंवा मला विचारून कां नाहीं प्रतिज्ञा केलीस ? उद्यां कर्ण, कृप, अश्वत्थामा, शल्य, भूरीश्रव व वृषसेन वगैरे मिळून जयद्रथाचें रक्षण करणार आहेत. ह्या सर्वांना हारवल्या नंतरच तुला जयद्रथाला मारतां येईल.

"कृष्णा, ह्या सर्वांची शक्ति एकवटली तरी ती माझ्या अर्ध्या एवढीहि होईल का ? मग एवढी चिंता कशाला ? द्रोणाचार्यांच्या समक्षच मी उद्यां जयद्रथाला मारतों." अर्जुन म्हणाला.

क्षणभर दोघेहि स्तब्ध राहिले. नंतर अर्जुनच म्हणाला—"तूं माझ्या शिबिरांत जाऊन सुभद्रा व उत्तरा ह्यांचें सांत्वन कर. त्यांना सांग कीं मी उद्यां त्या नीच जयद्रथाला यमसदनास पाठविणार आहें."

अर्जुनाच्या इच्छेवरून कृष्ण सुभद्रेकडे गेला. ती शोकसागरांत बुडून दुःख करीत बसली होती. तिला सांत्वना देण्यासाठीं आलेल्या स्त्रियाहि तिची दशा पाहून शोक करीत होत्या. कृष्णाच्याहि डोळ्यांत आसवें उभीं राहिलीं. पण स्वतःला संभाळून तो सुभद्रेला म्हणाला—"अग ताई, अशी रडत बसलीस तर कसें चालेल ? आपलें दुःख आवरून त्या उत्तरेला धीर दे. त्या बिचारीवर तर आकाशच कोसळलें आहे. तुझ्याशिवाय तिला कोण धीर देणार ? आम्हांला आपल्या कर्तव्याची जाणीव करून देऊन अभिमन्यु स्वर्गाला निघून गेला. त्याला मारणाऱ्या जयद्रथाला उद्यां सूर्यास्तापूर्वी यमसदनास पाठविण्याची अर्जुनानें प्रतिज्ञा केली आहे. तूं आपला शोक आवरून उत्तरेचें सांत्वन कर." असें सांगून कृष्ण आपल्या शिबिरांत निघून गेला.

त्या दिवशीं रात्रीं कृष्णाला झोंप आली नाहीं. अर्जुनाची प्रतिज्ञा पूर्ण कशी होईल, तो विचार सारखा करीत होता. शेवटीं कांहीं तरी विचार करून त्यानें सारथ्याला सांगितलें कीं उद्यां अर्जुनाच्या ऐवजीं मी युद्ध करणार आहें. माझें युद्धाचें सर्व सामान, सर्व शस्त्रास्त्रें, गदा, कौमोदकी, शक्ति, चक्र वगैरे सर्व रथांत ठेऊन दे. रथाचा गरुडध्वज व छत्र नीट करून ठेव



आणि कवच शिरस्त्राण घालून माझा रथ युद्धभूमीवर आण. मला घाई असेल तर मी पांचजन्य वाजवीन त्याचा इशारा होतांच क्षणाचाहि विलंब न लावतां रथ घेऊन माझ्याकडे ये.

अर्जुनानें प्रतिज्ञा तर केली. पण ती पूर्ण कशी होणार ? त्यामुळें तो सुद्धां बिछान्यावर नुसता पडून राहिला होता. मधेंच त्याचा डोळा लागला आणि त्याला असें स्वप्न पडलें—कोठून तरी कृष्ण अर्जुनाकडे गेला. अर्जुनानें मोठ्या आदरानें त्याचें स्वागत केलें आणि आपण जवळच हात












जोडून उभा राहिला. कृष्ण म्हणाला—"कशाला तूं उगीच चिंता करीत आहेस. मुळींच भिऊं नकोस. सर्व कांहीं ठीक होईल." त्यावर अर्जुन म्हणाला—"उद्यां तर जयद्रथाला मारावयाचें आहे. सर्व कौरव वीर त्याचें रक्षण करणार आहेत. त्यांच्या घेऱ्यांतून बाहेर निघेल तेव्हां त्याला मारावयाचें. कसें जमणार?"

"तुला शंकरानें पाशुपतास्त्र दिलें आहे ना? त्याचा उपयोग कर. शंकराचें स्मरण चिंतन कर. तो तुझ्यावर प्रसन्न होईल." असें कृष्णानें सुचविलें. तत्क्षणींच अर्जुन गुडघे टेकून खालीं बसला आणि शंकराचें ध्यान केलें.

अर्जुनाला स्वप्नांतच दिसलें कीं ते दोघे आकाश मार्गानें उत्तरेच्या बाजूनें उडून जात आहेत. तेथें त्यांना हिमालय पर्वत दिसला. गंगानदी व नाना तऱ्हेचे वृक्ष दिसले. हें सर्व पार करून ते दोघे कैलासाला जाऊन पोहोंचले. तेथें शिवपार्वती बसली होतीं. कृष्णार्जुनांनीं त्यांना नमस्कार केला व शंकराची स्तुति केली.

शंकरानेंहि कृष्णाचें व अर्जुनाचें स्वागत केलें आणि म्हणाला—"तुम्ही दोघे नर-नारायण येण्याचें कारण मला समजलें. पलीकडे त्या सरोवरांत मीं आपलीं शस्त्रास्त्रें ठेविलेलीं आहेत. तुम्ही जाऊन तीं घ्या. कृष्णार्जुन दोघेहि त्या सरोवराजवळ गेले व शस्त्रें घेण्यासाठीं म्हणून पाण्यांत उतरले. पण त्यांत दोन महा सर्प असलेले त्यांना दिसले. एक सूर्याप्रमाणें तळपत होता तर दुसरा अग्नीप्रमाणें ज्वाळा ओकीत होता. त्या दोघांनीं क्षणभर डोळे मिटून शंकराचें ध्यान केलें. कांहीं वेळ हात जोडून स्तब्ध उभे राहिले. नंतर डोळे उघडून पाहतात तो त्यांना तेथें सापांच्या ऐवजीं धनुष्यबाण दिसले. ते घेऊन ते दोघे पुन्हां शंकराकडे गेले.



शंकरानें तें धनुष्य घेतलें. एक मंत्र म्हटला. त्याबरोबर कांहीं तरी त्याच्या पाठीमागून येऊन त्या धनुष्यबाणांत शिरलें.

अर्जुनानें तें धनुष्य घेऊन त्याच्यावर बाण चढविण्याची रीति लक्षपूर्वक पाहिली. नंतर शंकरानें म्हटलेला मंत्र पाठ केला.

एवढें झाल्यावर कृष्णार्जुनांनीं धनुष्य बाण पुन्हां त्या सरोवरांत आणून ठेविलें. परत जाऊन शंकराला नमस्कार केला आणि त्याचा निरोप घेऊन परतले.

स्वप्न संपलें. अर्जुन जागा झाला आणि त्याला खरोखरच वाटूं लागलें कीं आपण कांहीं तरी महत्कार्य संपवून आलों आहोंत. त्याच्या चेहेऱ्यावर आनंद आणि देहांत उत्साह दिसूं लागला.

कृष्ण पहाटे उठला आणि युधिष्ठिराच्या शिबिरांत गेला. त्या वेळीं पांडवांच्या बाजूचे सर्व मोठमोठे राजे त्याला भेटण्यासाठीं आले होते. कृष्णाचें आगमन होतांच युधिष्ठिर त्याला म्हणाला—"अर्जुनाची प्रतिज्ञा पूर्ण करणें सर्वस्वी तुझ्यावरच अवलंबून आहे."



"तूं कांहीं चिंता करूं नकोस. अर्जुनाची प्रतिज्ञा कधीं मिथ्या ठरेल का?" असें सांगून कृष्णानें त्याला धीर दिला.

त्याच वेळीं अर्जुन तेथें आला आणि त्यानें त्याला रात्रीं पडलेलें स्वप्न सांगितलें. तें ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें आणि आनंदहि झाला.

त्यानंतर युद्धाची चर्चा झाली. त्यांत अर्जुन सात्यकीला म्हणाला—"सात्यकी, आजचें युद्ध फार महत्वाचें आहे. जयद्रथाचा वध करणें हें त्यांतील मुख्य काम आहे. पण माझें तुला असें सांगणें आहे कीं तूं



युधिष्ठिराबरोबर सतत राहून त्याचें रक्षण कर. जयद्रथाला मारण्याचें काम आम्ही बघूं."

इकडे रणांगणावर त्या दिवशीं द्रोणानें आपली सेना शकट व्यूहांत रचून सज्ज केली. जयद्रथाचें रक्षण करण्यासाठीं त्यानें भूरिश्रव, कर्ण, अश्वत्थामा, शल्य, वृषसेन, कृप वगैरेंना ताकीद दिली. ह्या सर्वांच्या रक्षणासाठीं त्यानें एक लाख अश्वसेना, साठ हजार रथ, चौदा हजार हत्ती आणि एकवीस हजार पायदळ एवढें सैन्य नियुक्त केलें. मग तो जयद्रथाकडे वळून म्हणाला—"तूं माझ्या पाठीमागें सुमारें अर्ध्याकोसावर रहा, तुला कशाची भीति राहाणार नाहीं. देव आला तरी तुला मारूं शकणार नाहीं."

पांडव सेनेची व्यवस्था नकुलपुत्र शतानीक व धृष्टद्युम्न ह्यांच्याकडे होती. युद्ध सुरू झालें. अर्जुनाला सुरवातीपासूनच आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्याचा उत्साह असल्यानें तो त्वेषानें लढूं लागला. तो झपाट्यानें शकट व्यूहापर्यंत गेला आणि आंत शिरणार तोंच दुर्योधनाचा भाऊ दुर्मर्षण एका मोठ्या गज-दलासह तेथें येऊन पोहोंचला. त्याचा धुव्वा उडवून तो पुढें जाणार एवढ्यांत दुश्शासन एक तुकडी घेऊन थडकला. अर्जुनापुढें का असल्या तुकड्यांचा निभाव लागणार? त्यानें त्या तुकडीबरोबर दुश्शासनाची अशी पाठ पुरवली कीं तो धूम ठोकून द्रोणाचार्यांच्या पाठीशीं जाऊन दडून बसला.

अर्जुन तेथपर्यंत गेला. तेथें द्रोणाला विनयानें नमस्कार करून म्हणाला—"गुरुदेव, मी आज जयद्रथाला मारण्याची प्रतिज्ञा केली आहे. ती पूर्ण होण्यासाठीं मी आपल्या कृपेचा अभिलाषी आहें."

"अरे पण माझा पराभव केल्या विना तूं कसा पुढें जाऊं शकशील?" द्रोणानें विचारलें.



गुरूचा इशारा होतांच त्या दोघांचें युद्ध सुरु झालें. द्रोणापुढें अर्जुनाची काय कथा? सारा दिवस युद्ध केलें तरी तसूंभर सुद्धां अर्जुन पुढें जाऊं शकला नसता. तेव्हां कृष्णानें त्याचा रथ दुसऱ्या बाजूनें वळवून पुढें नेला. म्हणाला—"येथेंच वेळ घाल-विण्यांत अर्थ नाहीं. आपलें लक्ष्य तिकडे पलीकडे आहे. तिकडे जावयाचें आहे."

द्रोणानें तसाच अर्जुनाचा पाठलाग केला. आणि म्हणाला—"अरे माझ्याशीं युद्ध करतां करतां मध्येंच कोठें पळून चाललास?"

"गुरुवर्य! आपला पराभव कोण करू शकणार? आपली सदा कृपा असावी. एवढीच अभिलाषा." असें सांगून श्रीकृष्णानें मागें बघितल्या शिवाय रथ पुढें काढून नेला.

अर्जुन गेला तो सरळ जयद्रथाच्या सैन्याकडे. त्याच्या बरोबर युधामन्यु आणि उत्तमौज हेहि होते. ह्या वीरांना तोंड देण्यासाठीं कृतवर्मा, जय, काम्भोज, श्रुतायु वगैरे आपापल्या सैन्यासह पुढें सरसावले. भयंकर मोठें युद्ध झालें. त्यांत कृष्ण व अर्जुन दोघेहि घायाळ झाले. तरीहि अर्जुनाचें युद्ध चालूच होतें. पण तेंहि



समाधान त्याला फार वेळ लाभलें नाहीं. युधामन्यु व उत्तमौजाला कृपानें असें अडवून धरलें कीं ते रत्तीभर सुद्धां पुढें जाऊं शकले नाहींत. त्यामुळें एकट्या अर्जुनाचाच रथ पुढें पुढें जात होता. एकटा अर्जुन पण त्याच्या अंगांत सहस्र वीरांचा पराक्रम. म्हणून त्यानें शत्रु सैन्याचा धुव्वा उडविण्याचा सपाटा चालविला. त्या दिवसाचा अर्जुनाचा पराक्रम वर्णन करणें कठिण आहे. काम्भोजाचा पुत्र सुदक्षिण, श्रुतायुध वगैरे बरेच वीर मारले गेले.

श्रुतायुध हा वरुण देवाचा पर्णाश नदी पासून झालेला मुलगा. वरुणानें त्याला एक गदा दिली होती. ती अजिंक्य असल्यामुळें तिच्या योगानें तो सर्वांना जिंकीत असे. प्रत्येक महाशक्तीला कांहीं तरी तोड पाहिजेच. तसा त्या गदेलाहि होता. वरुणानें त्याला सांगितलें होतें कीं जर तूं ही गदा युद्ध न करणाऱ्याला मारलीस तर ती उलट येऊन तुझेंच डोकें उडवील. अर्जुनाबरोबर युद्ध करतांना चढलेल्या आवेशांत श्रुतायुध ही गोष्ट पार विसरला आणि त्यानें आपली गदा कृष्णावर फेंकली. त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला. ती गदा कृष्णाला न लागतां उलट येऊन त्याच्याच डोक्यावर आदळली. अशा तऱ्हेनें बिचारा श्रुतायुध मरण पावला. कौरवांचा एक वीर स्वतःच्या हातींच बळी पडला.

त्या नंतर श्रुतायु, अच्युतायु, त्याचे मुलगे नियतायु आणि अम्बुष्ट वगैरे वीर एका मागून एक अर्जुनाच्या बाणानें मारले गेले.

जयद्रथाला मारण्यासाठीं त्या दिवशीं अर्जुनानें जें युद्ध केलें तें खरोखर वर्णनातीत आहे.






[१८]

[शिवपुराच्याजवळ चंद्रवर्मा आणि धीरमल्ल यांची गांठ पडली. दोघांनीं मिळून एका घाटांत सर्पकेतूशीं युद्ध केलें. फार मोठें युद्ध झालें. त्यांत सर्पकेतूचे कांहीं सैनिक चंद्रवर्माला येऊन मिळाले. उरलेल्या सैन्याला घेऊन सर्पकेतू पळून गेला. त्याचा पाठलाग करण्यासाठीं चंद्रवर्मानें कांहीं सैनिकांना पाठवून दिलें. पुढें......]

संध्याकाळची वेळ होती. सूर्य अस्तास जात होता. अशा सुमारास सर्पकेतूचा पाठलाग करणाऱ्या सैनिकांपैकीं दोघे जण चंद्रवर्माकडे आले आणि म्हणाले—"आम्हांला सर्पकेतूची सेना कोठेंच दिसली नाहीं. पण शत्रूच्या पावलांच्या खुणा मात्र स्पष्ट दिसत होत्या. त्यांवरून असें वाटतें कीं ते सर्वजण पश्चिमेच्या बाजूला पथ काढीत गेले असावेत.

हें ऐकतांच चंद्रवर्मा धीरमल्लाकडे वळून म्हणाला—"मला वाटतें, सर्पकेतू माहिष्मती नगराच्या बाजूला न जातां कांशाच्या किल्ल्याच्या बाजूला गेल्या सारखा वाटतो आहे."

"आम्हांलाहि तसेंच वाटतें आहे." धीरमल्ल व सुबाहु दोघेहि म्हणाले.

चंद्रवर्मा कोठें जावें ह्या विचारांत पडला, माहिष्मतीला कीं कांशाच्या किल्ल्याच्या



बाजूला? थोडा वेळ त्यानें विचार केला आणि शेवटीं निश्चय केला कीं कांशाच्या किल्ल्याच्या बाजूला जाऊन सर्पकेतूला ठार करून मग परतावें.

चंद्रवर्मानें तसें ठरवून सैन्यास कळविलें कीं सर्व सैन्यानें आगे कूच करण्यासाठीं सिद्ध होऊन यावें" थोड्याच वेळांत सर्व सैन्य जमलें आणि पुढील प्रवास सुरू झाला. चंद्रवर्माचें सैन्य सर्पकेतूच्या सैन्याचा सुगावा काढीत काढीत चाललें होतें.

सर्पकेतूचें सैन्य डोंगर, जंगल, रान सर्व पार करून एका मोठ्या नदी कांठापर्यंत गेलें होतें, हें पायाच्या खुणांवरून स्पष्ट दिसत होतें. परंतु पुढें तें कोठें गेलें असावें हें कळण्यास कांहीं मार्ग नव्हता.

चंद्रवर्मा पांवलांच्या खुणांच्या रोखानें नदीपर्यंत गेला. पुढें त्या सैन्यानें एवढी मोठी नदी कशी पार केली असेल? म्हणून आश्चर्य करूं लागला.

नदीच्या अफाट पात्राकडे पाहात चंद्र-वर्मा उभा होता. एकाएकीं त्याना जवळच सांपाचा फूत्कार ऐकूं आला. आवाजाच्या दिशेनें त्यानें वळून पाहिलें तोंच एक फार मोठा तीन तोंडाचा साप धडामकन् झाडावरून खालीं पडला. सर्वांची गाळण उडाली. चंद्रवर्मा देखील चार पावलें मागें सरला. पाहातां पाहातां त्या सांपाचा माणूस झाला व तो 'चंद्रवर्मा' अशा हांका मारीत त्याच्याकडे धांवत आला. चंद्रवर्मानें पुढें होऊन पाहिलें. तो कालकेतु होता. चंद्र-वर्मानें त्याला ओळखलें. "आं! कालकेतू!" असें म्हणत त्यानें कौतुकानें त्याचा हात धरून खांद्यावर थाप मारली.

"चंद्रवर्मा तूं मला ओळखलेंस याबद्दल मला फार आनंद झाला. तुमचा शत्रु सर्पकेतू थोड्या वेळापूर्वींच नदी पार करून गेला. तो



ज्या होड्या व पडावांत बसून गेला ते पडाव व होड्या मी ह्या किनाऱ्यावर आणून ठेविल्या आहेत. त्या झाडाखालीं." असें सांगून तो चंद्रवर्माचा हात धरून त्याला तिकडे नेऊं लागला. तो म्हणाला—"मी तुझ्या कृपेमुळें मनुष्य झालों. कपालिनीला मरून फार दिवस झाले. मरतांना तो वर्तमान भूत-भविष्य दाखविणारा गोल आणि ती माणसाची कवटी तिनें मला दिली. म्हणूनच तुमच्यावर आलेल्या संकटाची मला कल्पना आली. मी तुम्हांला मदत करण्यासाठींच धांवत धांवत येथें आलों. आपण पाहूं या का 'आपला शत्रु सर्पकेतू कोठें असेल तो?"

कालकेतूनें झाडाच्या आड ठेवलेला गोल काढून घेतला आणि कवटीला स्पर्श केला. त्याबरोबर त्या गोलांत त्यांना कांहींतरी दिसूं लागलें.

त्या गोलांत त्यांनी पाहिलें तो त्यांना दिसलें कीं कांशाचा किल्ला सूर्यकिरणांनीं तळपत आहे. किल्ल्याच्या तटाचा उत्तर दरवाजा उघडा असून कांहीं शिपायी तेथें पाहारा देत आहेत. किल्ल्यांत जागोजागीं पडलेल्या इमारतींचे चबूतरे आहेत. तेथें सर्पकेतूचे सैनिक हिंडून फिरून रत्नें गोळा



करीत आहेत. "पाहिलेत?" कालकेतु म्हणाला.

असें म्हणतात कीं कांशाच्या किल्ल्याचा तट समुद्राला लागून आहे. पण वास्तविक तसें दिसत नाहीं. अगदीं सुरवातीला तो तसा होता. पण सुमारें शंभर वर्षांपूर्वीं एकदां समुद्र फार खवळला आणि त्याच्या गगनचुंबी लाटांनीं तो किल्ला पाण्यांत बुडून गेला. नंतर हळूं हळूं समुद्र मागें हटत गेला आणि इतका हटला कीं आतां तो किल्ला समुद्रापासून एक कोस अंतरावर आहे. आपण जर किल्ल्याला वेढा घालावयाचें

म्हटलें तर कांहीं अशक्य नाहीं." कालकेतूनें सुचविलें.

कालकेतूची कल्पना त्याला पटली. लगेच त्या होड्या व पडावांच्या मदतीनें त्यांनीं आपलें सैन्य नदीपार नेलें.

कालकेतु एका घोड्यावर बसून सैन्याच्या पुढें पुढें चालला होता आणि सारें सैन्य त्याच्या पाठोपाठ चाललें होतें. सर्व सैन्य वायुगतीनें मार्ग कापीत चाललें होतें. सुमारें तासभर चालल्यावर त्यांना कांशाच्या किल्ल्याच्या उंच उंच भिंती दिसूं लागल्या. कालकेतु त्या सर्वांना घेऊन किल्ल्याच्या उत्तरेकडील दरवाज्याकडे गेला. पण जवळ गेल्यावर दरवाजा तो बंद असल्याचें त्यांना आढळून आलें.

चंद्रवर्मा, सुबाहु व सेनापति धीरमल्लाला घेऊन दरवाज्याच्या अगदीं जवळ गेला आणि पाहिलें. परंतु किल्ल्याचे दरवाजे चांगले मजबूत असल्याचें त्यांच्या नजरेस पडलें. आतां हे दरवाजे तोडून आंत कसें जावयाचें? चंद्रवर्माला प्रश्न पडला.

किल्ल्याच्या भिंतीवर कोणी ओरडत असल्याचा आवाज त्यांना ऐकूं आला. म्हणून त्यांनीं वर पाहिलें, तर सर्पकेतु आपल्या सैनिकांच्या मदतीनें पोती, टोपल्या वगैरे भरभरून तटावर चढवीत असल्याचें त्यांना दिसलें.

सपकेतूनें चंद्रवर्माचें सैन्य पाहिलें. थोडा विचार केला. नंतर चंद्रवर्माच्या सैनिकांना म्हणाला—"हें पहा, आमच्या जवळ हीं जीं पोतीं, टोपल्या, पिशव्या भरलेल्या दिसत आहेत ना? त्या सर्व हिऱ्या-माणकांनीं आणि सोन्या चांदीनें भरलेल्या आहेत. चंद्रवर्माला सोडून देऊन जे कोणी माझ्या बाजूला येतील त्यांना मी एवढेंच सोनें आणि मोती देईन. पहा, ज्याची ज्याची येण्याची इच्छा असेल त्याच्यासाठीं दरवाजा उघडवितों."

त्यांचा विश्वास बसावा म्हणून सर्पकेतूनें दोन तीन पोती हिरे माणकें चंद्रवर्माच्या सैन्यावर उधळलीं. तीं वेंचण्यासाठीं सैनिकांत धक्काबुक्की सुरू झाली. आतां प्रश्न जरा पेंचाचा येणार हें ओळखून चंद्रवर्मा सुबाहूला म्हणाला—"तूं आपल्या वीरपूरच्या सैनिकांना घेऊन जा व सर्पकेतूच्या पक्षांत मिळाल्याचें सोंग कर व दरवाजा उघडायास सांग. त्यानें तुझ्यावर विश्वास ठेवून दरवाजा उघडला कीं धीरमल्ल बाकी सैन्य घेऊन तुझ्या पाठोपाठ







आंत शिरेल. तेथें आपण शत्रु, सैन्याचा नाश करूं."

सर्पकेतूची घोषणा ऐकूनच जसे कांहीं सुबाहू आपल्या सैन्याकडे पळाला. आपलें सैन्य एका बाजूला नेऊन त्यांच्याशी कांहीं तरी मंत्रणा केली व तेथून एकाएकी "सर्पकेतू महाराज की जय" असें ओरडत तो दरवाज्याकडे धांवला. कांहीं सैनिक जय-जयकार करीत त्याच्या पाठोपाठ निघाले. एक दोन तुकड्यांनीं जणूं त्यांच्याशीं युद्ध करण्याचें नाटक केलें. हें सर्व पाहून सर्पकेतूला बरें वाटलें. आपलें काम सोळा आणे फत्ते झालें असें वाटून त्याला आनंद झाला आणि त्यानें पाहारेकऱ्यांना दरवाजा उघडण्याची आज्ञा दिली. त्यानें विचार केला "आतां ह्या सैन्य बळावर क्षणार्धांत चंद्रवर्माला नामशेष करतां येईल."

सर्पकेतूची आज्ञा मिळतांच सर्पकेतूच्या रक्षकांनीं किल्ल्याचें दार उघडलें. सुबाहु आपलें सैन्य घेऊन आंत गेला. त्याच्या पाठोपाठ धीरमल्ल व चंद्रवर्मा सुद्धां आपापली सेना घेऊन आंत घुसले. आंत घुसतांच चंद्रवर्माच्या सैन्यानें सर्पकेतूच्या सैन्याची कत्तल करण्यास आरंभ केला. सुबाहूच्या व धीरमल्लाच्या सैन्यानेंहि सर्पकेतूच्या सैन्यावर हल्ला केला. एक क्षणार्धांत परिस्थिति बदलली. सर्पकेतूचें सैन्य किंकर्तव्य विमूढ होऊन सैरावैरां पळूं लागलें.

आपण चांगलेंच फसलों असें पाहून सर्पकेतूचा जळफळाट झाला. त्यानें आपल्या तटावरील सैन्याच्या मदतीनें शत्रूवर दगडफेक करण्यास सुरवात केली. हें पाहून चंद्रवर्मा सुबाहूला म्हणाला—"सर्पकेतूला जिवंत पकडतां आलें तर पहा. नाहीं तर त्याला सरळ तलवारीचें पाणी दाखीव."

सुबाहू कांहीं सैनिकांना घेऊन किल्ल्याच्या भिंती जवळ गेला आणि भिंतीच्या पडीक भागांतून हळूं हळूं चढत तटावर चढला. पण सर्पकेतूला लढतांना पाहून सुबाहूनें अंदाज केला कीं ह्याला जिवंत पकडणें साध्य नाहीं. इतक्यांत सर्पकेतु उन्मत्त हत्तीप्रमाणें सुबाहूच्या सैन्यावर तुटून पडला.

त्याचा तो पराक्रम पाहून चंद्रवर्माचें सैन्य सैरावैरां पळूं लागलें. तितक्यांत चंद्रवर्माला कालकेतूची आरोळी ऐकूं आली—

"चंद्रवर्मा सर्पकेतूचें आव्हान स्वीकार करण्याची शक्ति या कालकेतूंत आहे. तूं निश्चिंत रहा. पाहातों तो कसा माझ्या हातांतून निसटून जातो. तो स्वतःचा कडेलोट करून घेण्याच्या खटपटींत आहे. पण त्याला जिवंत पकडण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

कालकेतूचा आवाज ओळखून सर्पकेतु तिकडे वळला. कालकेतूनें त्याच्या तलवारीचा वार चुकवून उलट त्याच्यावर वार करीत म्हटलें—"सर्पकेतु, आतां तूं कालकेतूसमोर उभा आहेस हें विसरूं नकोस. कालकेतू म्हणजे तीन फडांचा नाग! समजलास....!!'

असें म्हणत त्यानें एकदम आपलें रूप बदललें. सर्पकेतूला समोर एक तीन फडांचा नाग दिसला. सर्पकेतू मागें सरकूं लागला



आणि किल्ल्याच्या भिंतीपर्यंत येऊन पोंचला. मागें पळण्यास मार्ग नसल्यामुळें शेवटीं तो खालीं खंदकांत पडला. चंद्रवर्मा व धीरमल्ल त्याच्याजवळ धांवत गेले. पण ते पोंचण्या-पूर्वींच सर्पकेतूची इहलोकाची यात्रा संपली होती. सर्पकेतूचे सर्व सैनिक चंद्रवर्माला शरण गेले.

* * *

कालकेतूनें चंद्रवर्माजवळ विनंति केली कीं उरलेलें आयुष्य काशाच्या किल्ल्यांत घाल-विण्यास त्याला परवानगी मिळावी. चंद्रवर्मानें तात्काळ ती विनंति मान्य केली. चंद्रवर्मानें

ती रात्र कोशाच्या किल्ल्यांतच काढली. उजाडल्यावर त्याला किल्ल्यांत जितकें धन मिळालें तें बरोबर घेऊन तो रुद्रपुराकडे निघाला.

दोन तीन दिवस प्रवास केल्यावर तो रुद्रपुरांस येऊन पोंचला. तेथील नागरिकां-कडून त्याला कळलें कीं शिवसिंहानें वान-प्रस्थाश्रम ग्रहण केला आहे. चंद्रवर्मानें शिवसिंहाचा मुलगा देवल याचा राज्याभिषेक मोठ्या थाटामाटानें करून त्याला गादीवर बसविलें.

चंद्रवर्मा माहिष्मती नगरीहून थोड्या अंतरापर्यंत पोंचला असेल त्यापूर्वीच नागरिकांना सर्पकेतूच्या मृत्यूची बातमी कळली होती. म्हणून ते मंगलवाद्यें घेऊन चंद्रवर्माच्या स्वागतासाठीं सामोरे आले व त्यांनीं माहिष्मतीचा चक्रवर्ती राजा होण्याची त्याच्याजवळ विनंति केली. परंतु चंद्रवर्मानें त्यांना सांगितलें कीं यशोवर्धन महाराजांचा मोठा मुलगा तपोवर्धन याला गादीवर बसविणेंच बरोबर होईल.

माहिष्मती नगराजवळच्या रानांत तपोवर्धन तप करीत होता. चंद्रवर्मानें त्याला आदरपूर्वक बोलावून आणलें व सिंहासन स्वीकारण्याची विनंति केली. परंतु तपोवर्धन राजानें तें मान्य केलें नाहीं. "तूंच राजा होण्यास योग्य आहेस असें सांगून चंद्रवर्माच्याच डोक्यावर राज्यमुकुट ठेवला." प्रजेनें आपल्या नव्या राजाचा जय-जयकार केला.

चंद्रवर्मानें विश्वासपात्र धीरमल्ल व सुबाहु यांस अनुक्रमें आपला पंतप्रधान व प्रधान सेनापति म्हणून नेमलें. चंद्रवर्माच्या राज्यांत त्याची प्रजा सुखी झाली. [ गोष्ट संपूर्ण ]





## नांदा सौख्य भरें

काशी जवळ एका गांवांत एक शेतकरी राहात असे. त्याचें नांव जनार्दन. त्याच्या जवळ एक लहानसें घर व अर्धा बिघा जमीन होती. त्यांत भाजीपाला लावून जें उत्पन्न निघेल त्याच्यावर तो आपला चरितार्थ चाल-वीत असे. त्याला सात मुली होत्या. त्या सर्वांचें पालन पोषण तो मोठ्या प्रेमानें करीत असे. मुली मोठ्या होऊं लागल्या तशी त्याला हळूं हळूं काळजी वाटूं लागली कीं ह्या मुलींच्या लग्नासाठीं हुंडा कोठून द्यायचा आणि म्हातारपणीं आपल्याला आधार कोणाचा ? ह्या चिमण्या काय ? भुर्रर दिशी उडून जातील. मग आपल्याजवळ कोण ? सात मुली आहेत ह्या गोष्टीची त्याला कधीं काळजी वाटली नाहीं.

एकदां त्यानें आपल्या शेतांत कांदे लावले. पीक आल्यावर तें विकण्यासाठीं तो काशीस गेला. तेथें वेशीवरच त्याला त्याचा बालमित्र विश्वनाथ भेटला. दोघांनीं परस्परांची विचारपूस केली. विश्वनाथनें सांगि-तलें कीं मी व्यापार करीत असून त्यांत मला पुष्कळ पैसा मिळतो. मी एक मोठें घर सुद्धां विकत घेतलें आहे.

जनार्दन म्हणाला—"मी बाबा शेतकरीच आहें. मला सात लेकरें आहेत. तीन मुलगे व चार मुली." आपल्याला मुलगा नाहीं हें सांगण्यास त्याला जरा संकोच वाटला.

हें ऐकतांच विश्वनाथ म्हणाला—"भाग्य-वान आहेस बोवा. मग मला थोडी मदत कर. माझा धाकटा मुलगा नुकताच आजा-रांतून उठला आहे. त्याच्या बरोबर राहण्या-साठीं कांहीं दिवस तुझ्या एका मुलाला पाठव. अरे आपण जसे दोस्त तशी त्यांची दोस्ती होईल."



आतां पंचाइत पडली. नाहीं म्हणावें तरी बरें नाहीं. तो विचारांत पडला. त्यावर विश्वनाथ म्हणाला—" विचार कसला करतोस पाठवूनच दे."

जनार्दनाला त्याचें म्हणणें कबूल करणें भागच पडलें. तो परत निघाला तेव्हां तोच विचार त्याच्या मनांत घोळत होता. मित्राकडे कोणाला व कसें पाठवावें. आपल्या एकाद्या मुलीला मुलाचा वेष देऊन पाठविल्यास कसें काय होईल ?

शेवटीं घरीं आल्यावर त्यानें आपल्या मुलींना एकेकीला बोलावून विचारलें. पण मोठ्या साही मुली आपले केस कापून मुलाचा वेष घेण्यास तयार झाल्या नाहींत. त्या म्हणाल्या—" मुलीनें केस कापणें हें अशुभ मानतात. आम्ही कांहीं तें करणार नाहीं."

मुलींचें म्हणणें खरें होतें. म्हणून बाप सुद्धां पुढें कांहीं बोलूं शकला नाहीं.

सर्वांत धाकटी मुलगी चुणचुणीत होती. ती आपल्या वडिलांना म्हणाली—" बाबा तुम्ही आमच्यासाठीं एवढे कष्ट सहन करतां. आमच्या हौशी पुरवितां. त्याच्या बद्दल आम्ही तुम्हांला काय देऊं शकणार ? म्हणून मी तुम्ही सांगाल तें ऐकण्यास तयार आहें."

बापाच्या इच्छेप्रमाणें शशीनें आपले केस कापून मुलाचा पोशाख केला. पायांत वहाणा व हातांत काठी घेऊन विश्वनाथ याच्या घरीं गेली.

विश्वनाथ मोठा व्यापारी होता. त्याचें घर एकाद्या राजवाड्यासारखें होतें. शशीला पाहून विश्वनाथाला फार आनंद झाला. त्यानें आपल्या सर्वांत धाकट्या मुलाला बोलावून त्याच्या बरोबर शशीला पाठविलें.

सुदर्शन नुकताच आजारांतून उठला असल्यानें फार अशक्त झाला होता. शशी त्याची छान सेवा करीत होती. तिच्या प्रेमळ





सेवेमुळें सुदर्शन फार लवकर सुधारत चालला. शशीला पाहिल्यापासून त्याला वाटे ही मुलगी आहे. नुसता मुलाचा वेष घेऊन तेथें आली आहे. जसजसा परिचय वाढत गेला तसतसा सुदर्शनचा संदेह दृढ होत चालला आणि हळू हळू शशीविषयीं त्याच्या मनांत प्रेम वाटूं लागलें. ह्या नवीन रोगानें त्याची प्रकृति पुन्हां बिघडूं लागली.

त्याच्या आईनें पाहिलें कीं सुदर्शन अशक्त होऊं लागला आहे. तिनें त्याला विचारलें. तो म्हणाला—" आई ! शशी कोण आहे असें तुला वाटतें ? माझें ठाम मत आहे कीं ती मुलगी आहे आणि मला तिच्याविषयीं प्रेम वाटूं लागलें आहे. पण ती मुलाच्या वेषांत असल्यामुळें माझें प्रेम मी तिच्या पुढें स्पष्टपणें व्यक्त करूं शकत नाहीं. ह्यामुळें मला फार वाईट वाटतें. तूंच कांहीं तरी ह्यांतून मार्ग काढ."

" एवढेंच ना ? अरे त्याला सोपा उपाय आहे. असें कर, उद्यां तूं तिला घेऊन शिकारीला जा. तिला नाठाळ घोडा दे. जर खरोखरच ती मुलगी असेल तर ती त्यावर बसूं शकणार नाहीं आणि शिकारीसाठीं धनुष्यबाण दे. तोहि ती मुलगी असेल तर नीटपणें धरूं शकणार नाहीं. त्यांत तिची परीक्षा होईल आणि मग खरी गोष्ट बाहेर पडेल." आईनें सांगितलें.

सुदर्शन आईच्या सांगण्याप्रमाणें दुसरे दिवशीं शशीला घेऊन शिकारीला निघाला. तिच्या हातांत धनुष्यबाण देऊन एक नाठाळ घोडा दिला. शशीनें त्याच्यावर एकाद्या कसलेल्या स्वाराप्रमाणें स्वारी केली आणि शिताफीनें घोडा दौडविला. शिकारींत सुद्धां तिनें आपलें कौशल्य दाखविलें. सुदर्शन चकित झाला. घरीं आल्यावर त्यानें आपल्या आईला तिचें कसब सांगितलें. " अरे मग



खरोखरच मुलगा असेल शशी. तुला उगीचच भास होत असेल." आई म्हणाली.

"नाहीं ग आई. ती नक्कीच मुलगी आहे आणि तिचें तें स्वारी-शिकारीचें कौशल्य पाहून माझें प्रेम जास्तच दृढ होऊं लागलें आहे." सुदर्शन म्हणाला.

"आतां दुसऱ्या तऱ्हेनें तिची परीक्षा करूंया. उद्यां तिला माझे दागिने दाखविण्यासाठीं घेऊन ये. मग पुढें मी पाहीन." आईनें सुचविलें.

दुसरे दिवशीं सुदर्शन शशीला म्हणाला—"चल शशी, आपण दागिन्याची खोली आवरूं. कालच मला आई म्हणाली होती." दोघे खोली आवरण्यास गेले.

आवरतां आवरतां सुदर्शनानें आईची दागिन्यांची पेटी उघडून शशीला दाखविली. ते हिरे, मोती, माणकें पाहून शशी थक्क झाली. ती ते निरखून पाहूं लागली. ही संधि पाहून सुदर्शनला त्याच्या आईनें बोलाविलें. दागिने तसेच शशीजवळ सोडून तो निघून गेला.

शशीनें इकडे तिकडे पाहिलें. जवळ कोणी नाहीं असें पाहून ती एक एक दागिना घेऊन निरखून पाही. अंगावर घाली आणि काढून ठेवी. सुदर्शन व त्याची आई हें सर्व पडद्याच्या आडून पाहात होतीं. मध्येंच शशीला कांहीं तरी चाहूल लागल्याचा भास झाला. तिनें भराभर घातलेले सर्व दागिने काढून ठेविले. तिला वाटलें आपल्याला ह्या लोकांनीं पाहिलें असावें. म्हणून ती तेथून जी निघाली ती सरळ आपल्या घरीं निघून गेली.

सुदर्शन व त्याच्या आईनें खोलींत येऊन पाहिलें तर त्यांना तेथें शशी दिसली नाहीं. त्यांनीं तिचा शोध केला. पण ती कोठें दिसली नाहीं. शेवटीं ती घरीं गेली असेल असेंच त्यांना वाटलें.

"जर तूं जनार्दनरावांच्या घरीं गेलास तर तुला शशी तिच्या खऱ्या रूपांत दिसेल. जा, तेथें जाऊन त्यांना सर्व सांग आणि म्हणावें मी तिच्याशीं लग्न करावें, म्हणतो. मला वाटतें ते कांहीं नाहीं म्हणणार नाहींत." आईनें सांगितलें.

सुदर्शन जनार्दनाकडे गेला. त्यावेळीं तो आपल्या घराच्या सोप्यावर काय करावें या विचारांत बसला होता.

"तुमचा मुलगा घरांत कोणाला सांगितल्या शिवाय निघून आला आहे. माझें त्याच्याशीं थोडें काम आहे म्हणून भेटावयाचें आहे मला त्याला. थोडें बोलवा त्याला." सुदर्शन म्हणाला.

"बैस बोलावतों." असें सांगून जनार्दनराव आंत गेले. पण तोंपर्यंत तिनें पुरुष वेष टाकून आपले नेहमीचें कपडे दागिने घातले होते. सुदर्शन आलेला कळतांच तिनें पुन्हां आपले सर्व दागिनें उतरविले, मुलाचे कपडे चढविले आणि बाहेर आली. तिला पाहून सुदर्शन मोठ्यानें हंसला. पुढें जाऊन तिचे कान आपल्या हातानें झांकले. "आतां ठीक झालें. तूं आपली कुडी काढायची विसरलीस कीं? किती लपवशील आपल्याला.



मी केव्हांच ओळखलं होतं. चल आमच्या घरीं. मी तुझ्याशीं लग्न करण्याचें ठरवूनच आलों आहें." सुदर्शन म्हणाला.

"तूं आलास पण तुझे वडील कबूल होतील का बाळा?" जनार्दननें विचारलें.

"तुम्हींच चला आणि विचारा माझ्या वडिलांना." सुदर्शन म्हणाला.

सुदर्शन शशीला व तिच्या वडिलांना घेऊन आपल्या घरीं आला.

विश्वनाथरावांच्या कानावर सर्व प्रकार गेला होता. तरीपण जनार्दनरावांच्या तोंडून सर्व प्रकार ऐकल्यावर ते म्हणाले—"तुझी मुलगी माझ्या घरांत आली तर मला आनंदच आहे. पण मी तुला तुझ्या मुलाला पाठव म्हणून सांगितलें असतां तूं मुलीला कां पाठविलेंस?"

जनार्दनराव खजील झाले. मान खालीं घालून ते म्हणाले—"मुलगा असता तर पाठविला असता! काय करणार! खरी गोष्ट सांगणें मला बरें वाटलें नाहीं. तुला जसे सात मुलगे आहेत तशा मला सात मुली आहेत. तें सांगायची मला तेव्हां लाज वाटली म्हणून खोटें सांगून वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला. पण तो अंगाशींच आला."

जनार्दनरावांच्या पाठीवर थाप मारून विश्वनाथराव म्हणाले—"वा! फारच छान!! मग एकच काय तुझ्या सातीं मुली माझ्या घरीं घेऊन येतों."

पुढें थोड्याच दिवसांत विश्वनाथरावांनीं आपल्या सातीं मुलांचा विवाह जनार्दनरावांच्या सातीं मुलींशीं लावून दिला. लग्न समारंभ मोठ्या थाटानें पार पडला. त्या दोघां मित्रांनीं आपल्या मुलांना प्रेमानें आशीर्वाद दिला—

"नांदा सौख्यभरें."





हेच ते रामपुरचे प्रख्यात पेटी वादक. त्यांना 'छोटे बापू' म्हणतात.



हा आत्तां आलों भांग काढून.



त्या गोळ्या. एक झोंपतानां आणि एक उठल्याबरोबर घ्या.



हे म्हणे मास्तर! असले त्रिक किती मला विचारताहेत. एकही सुद्धां येत नाहीं त्यांना.

चित्रकार : एस. शंकरनारायण




# चारुदत्त

पूर्व काळांतील गोष्ट आहे. उज्जयिनी नगर व्यापारासाठीं फार प्रसिद्ध होतें. त्याच नगरांत एक ब्राह्मण राहात होता. त्याचें नांव चारुदत्त. तो फार उदार आणि भावुक होता. त्याच्याजवळ कोणी कांहीं मागितलें तर तो कधीं त्याला विन्मुख पाठवीत नसे आणि म्हणूनच कांहीं दिवसांनीं तो अगदीं गरीब झाला.

त्या गांवांत एक वसंतसेना नांवाची एक सुंदर नर्तकी होती. एकदां नगरांत कामदेवाचा उत्सव चालला असतां वसंतसेनेची दृष्टि चारुदत्तावर पडली. त्याच्या चेहेऱ्यावरील तें पवित्र्याचें तेज पाहून ती त्याच्यावर मोहित झाली. वसंतसेनेला पाहून चारुदत्ताचें मन देखील तिच्यावर बसलें. पण दोघांना परस्परांच्या प्रेमाविषयीं कल्पना नव्हती.

एकदां वसंतसेना रात्रीं उत्सव संपल्यावर रीं परत येत होती. एका गल्लींतून जात असतां राजाचा मेहुणा शकार यानें तिला पाहिलें आणि तिचा पाठलाग केला. मूर्ख व दुष्ट होता. शकार कसें तरी करून त्यांच्या दृष्टींतून सुटावें म्हणून वसंतसेना जवळच असलेल्या एका घराच्या दारांतून आंत शिरली.

योगायोग असा कीं तें घर चारुदत्ताचेंच निघालें. त्यावेळीं नुकतीच बहुला षष्ठीची पूजा संपवून तो बसला होता आणि पूजा करण्यासाठीं आलेल्या आपल्या मैत्रेय नांवाच्या मित्राला आपली दासी रदनिका हिच्याबरोबर जाऊन दीप विसर्जन करून येण्यास सांगत होता.

त्या दोघांना येतांना पाहून वसंतसेनेला वाटलें कीं आतां दोघे आपल्याला ओरडून विचारणार आणि बाहेर शकाराला आपला सुगावा लागणार. म्हणून तिनें मैत्रेयाच्या हातांतील दिवा आपल्या पदरानें मालवून टाकिला. दिवा वाऱ्यानें गेला असें वाटून पुन्हां लावण्यासाठीं तो आंत गेला. तों पर्यंत रदनिका रस्त्यांत उभी राहिली.

शकार वसंतसेनेला शोधतच होता. रदनिकेला पाहून शकाराला वाटलें कीं ती वसंतसेनाच असावी. म्हणून त्यानें तिचा हात धरला. तिनें जोरानें शकाराला लाथ मारली व मैत्रेयाला हाक मारली. "काय झालें म्हणून तो दिवा घेऊन आला. तेव्हां शकाराला आपली चूक समजली. पण धैर्य धरून तो मैत्रेयाला म्हणाला—"वसंतसेना नांवाची एक नर्तकी बरेचसे दागिने घेऊन चारुदत्ताच्या घरांत शिरलेली आहे. तिला उद्यांपर्यंत जर माझ्या स्वाधीन केलें नाहींत तर पहा मुंड्याच उडवीन एकेकाच्या."

"असें काय!" असें म्हणत मैत्रेयानें त्याच्या तोंडावर दिव्याचा उजेड पाडला. शकार मुकाट्यानें तेथून पसार झाला.

वसंतसेनेला आंत आलेली पाहून चारुदत्ताला वाटलें रदनिकाच आहे. म्हणून तो तिला म्हणाला—"झालें दीप विसर्जन ? ठीक. बरं हें आंत नेऊन ठेव." असें म्हणत त्यानें




आपलें उपरणें काढून तिच्या हातांत दिलें. ती तेथेंच उभी राहिली. तें पाहून चारुदत्त म्हणाला—"कसला विचार करीत आहेस."

एवढ्यांत बाहेरून मैत्रेय व रदनिका आंत आलीं. मैत्रेय म्हणाला—"शकारानें तुला सांगावयास सांगितलें आहे कीं वसंतसेना आपल्या घरांत आली आहे. तिला जर तूं त्याच्या स्वाधीन केलें नाहींस तर तो तुझें डोकें उडवणार आहे."

मैत्रेयाचें बोलणें ऐकतांच वसंतसेना चारुदत्ताजवळ जाऊन "माझें रक्षण करा" म्हणत त्याच्या पायां पडली.

श्री. का. गो. देसाई












"कोण? वसंतसेना? काय झालें काय?" चारुदत्तानें आश्चर्यानें विचारलें.

अनपेक्षित वेळीं, तो तिचें स्वागत तरी कसें करणार? क्षणभर वसंतसेनेनें विचार केला आणि परतण्याचें ठरवून ती परत निघाली. परंतु पुन्हां चारुदत्ताची भेट घेण्यास संधि मिळावी म्हणून तिनें युक्ति केली. आपल्या अंगावरचे दागिने उतरविले आणि चारुदत्तास म्हणाली—"मला घरीं जायचें आहे. पण जर माझ्या अंगावर हे दागिने असतील तर तो दुष्ट माझा पाठलाग करील. म्हणून आपण हे आपल्याजवळ ठेवून घ्या."

चारुदत्तानें तें कबूल करतांच वसंतसेनेनें आपली दागिन्याची पेटी त्याच्या स्वाधीन केली. त्यानें ती मैत्रेयाला दिली व मैत्रेयानें रदनिकेच्या हातांत देत म्हटलें—"आज षष्ठी, उद्याची सप्तमी होऊन अष्टमी आल्यावर पुन्हां माझ्याजवळ ही पेटी दे."

नंतर चारुदत्त तिला सडकेपर्यंत पोहोंचवून आला आणि पुढें मैत्रेयाला पोहोंचवून येण्यास सांगितलें. त्या दिवसापासून वसंतसेनेला चारुदत्ताचा जणूं ध्यास लागला.

एक दिवस एक मनुष्य तिच्या घरीं आला. त्यानें तिच्याजवळ शरण मागीतली. कोणाचें



तरी कर्ज चुकवावयाचें होतें म्हणून तो घाबरला होता. वसंतसेनेनें विचारल्यावरून त्यानें आपली हकीगत सांगितली.

तो म्हणाला—"मी पाटलीपुत्र नगराचा रहिवाशी आहें. तेथें माझा मोठा व्यापार होता. खूप पैसे मिळविले. पण सर्वच दिवस कुठें सारखे असतात? व्यापार बसला. सांठवलेला पैसा संपला व शेवटीं मला गांव सोडणें भाग पडलें. मालिश विद्या हस्तगत करून घेतली होती. आतां तोच धंदा करून पोट भरतों. पोटाचा प्रश्न सोडवावा म्हणून येथें आलों. येथें चारुदत्त ब्राह्मणानें मला थारा दिला. परंतु आतां तो फार गरीब झाला आहे. मला जुगारीचा फार नाद आहे. एकदां मी जुगारीसाठीं एका कडून दहा मोहोरा घेतल्या होत्या. त्या अजून द्यायच्या बाकी आहेत. आज मी त्या माणसाला पाहिलें. तोंड लपविण्यासाठीं मी येथें आलों आहें."

चारुदत्ताचें नांव घेतांच वसंतसेनेनें त्याला पैसे दिले व म्हणाली—"हे चारुदत्तानेंच दिले आहेत, असें समज."

तो मनुष्य तिच्याजवळून पैसे घेऊन निघून गेला. चारुदत्ताची आठवण करीत ती तेथेंच उभी होती. इतक्यांत तिचा

















नोकर धांवत धांवत आला. म्हणाला—“ आज बघा बाईसाहेब, भद्रकपोत नांवाचा आपल्या राजाचा हत्ती आहे ना ? तो नदीवरून येत असतां भगवें वस्त्र नेसलेल्या एका संन्याश्याला पाहून एकाएकी भडकला. त्यानें त्या संन्याश्याला सोंडेंत धरलें. ओरडा झाला, “ अरे मेला रे मेला बिचारा.” पण हत्तीला आवरण्याची कोणाची छाती झाली नाहीं. माझ्याच्यानें राहवलें नाहीं. मी प्राण तळहातावर घेवून गेलों भद्रकपोताजवळ आणि दिले त्याला दोन तडाखे. त्यामुळें त्यानें संन्याश्याला तेथेंच टाकून दिलें व आपल्या वाटेनें निघून गेला. सर्वांनीं माझी पाठ थोपटली. पण कोरडीच. कोणी कांहीं बक्षिस वगैरे दिलें नाहीं. त्याच वेळीं तेथें एक सुंदर तरुण आला. त्यानें मला कांहीं तरी बक्षिस द्यावें म्हणून पाहिलें. पण त्याच्याजवळ अंगठी सुद्धां नसल्यानें त्यानें मला आपलें उपरणें दिलें. हें पहा.”

चारुदत्ताचें तें उपरणें वसंतसेनेनें ओळखलें. त्याचवेळीं उपरण्याशिवाय जात असलेला चारुदत्त तिला दिसला. तो दृष्टीआड होईपर्यंत ती त्याच्याकडे पाहात राहिली.

अष्टमीचा दिवस आला. त्या दिवशीं रात्रीं चारुदत्त व मैत्रेय वीणावादन ऐकण्यास गेले होते. परत येण्यास त्यांना फार उशीर झाला. तरी रदनिकेनें ठरल्याप्रमाणें वसंतसेनेच्या दागिन्याची पेटी चारुदत्ताच्या स्वाधीन केली. त्यानें ती मैत्रेयाजवळ ठेविण्यास दिली.

“अरे आंतल्या खोलींत नीट ठेव. येथें कशाला ?” मैत्रेय म्हणाला.

“माझ्या बायकोनें पाहिलें तर पंचाईत होईल. तुला नाहीं का माहीत तिचा स्वभाव ?” चारुदत्त म्हणाला.

“बघ बाबा ! नाहींतर चोरांनीं नेली तर मला नाहीं माहीत.” असें म्हणत मैत्रेयानें ती पेटी जवळ ठेवून घेतली आणि दोघे निजले. चारुदत्ताला लगेच झोंप लागली. परंतु मैत्रेय बराच वेळ नुसता तळमळत पडून राहिला.

त्याच दिवशीं चारुदत्ताच्या घरांत एक चोर शिरला. त्याचें नांव होतें सज्जलक. त्याचें मदनिकेवर प्रेम होतें. ती वसंतसेनेची दासी होती. तिची वसंतसेनेकडून सुटका करावयाची म्हणजे पैसे हवेत. म्हणून तो चोरीसाठीं निघाला.

तो चारुदत्ताच्या घरांत शिरला. त्याला तेव्हांच कळून आलें कीं हें गरीबाचें घर आहे. गरीबाच्या घरीं चोरी करणें त्याला मान्य नव्हतें. लोकांना फसवून पैसे मिळविणाऱ्या व्यापाऱ्यांच्याकडे चोरी करण्यांत त्याला संकोच नव्हता. म्हणून तो चोरी केल्याशिवाय परत चालला होता. इतक्यांत त्याच्या कानावर शब्द पडले. “घेऊन जा ही दागिन्यांची पेटी. म्हणजे मला शांत झोंप येईल.”

सज्जलकानें पाहिलें कीं तेथें झोंपलेल्या एका व्यक्तीच्या हाताखालीं एक सोन्याची



पेटी आहे. ती व्यक्ति झोपेंतच बोलत आहे. म्हणून त्यानें आपल्या जवळची एक डबी उघडली. त्यांतून दोन तीन कीट पतंग बाहेर उडाले आणि दिव्यावर बसले. त्यामुळें दिवा विझला.

अंधार पडतांच मैत्रेय बडबडला व म्हणाला—“ दिवाहि पण विझला. संभाळ रे, बाबा चारुदत्ता आपली ही पेटी. मला स्वस्थपणानें झोंपू दे.”

सज्जलकानें त्याच्या हातांतून ती पेटी घेतली. “ आतां मला शांत झोंप येईल.” असें म्हणत मैत्रेयानें अंगावर पांघरूण घेतलें.

सज्जलक पेटी घेऊन निघून गेला.

पहाट झाली. रदनिका उठली आणि 'चोर चोर' करीत मैत्रेयाला उठवूं लागली. "आं! कुठें? कुठें?" करीत मैत्रेय उठला. इकडे तिकडे पाहिलें आणि म्हणाला—"बरें झालें बोवा! मी कालच तुझी पेटी तुझ्याजवळ दिली."

"केव्हां रे? वा! छान." म्हणत चारुदत्तानें चौकशी केली. तेव्हां त्याला समजलें कीं दागिन्याची पेटी खरोखरच चोरानें नेली. चारुदत्ताच्या बायकोला सर्व गोष्ट समजली. तिनें विचार केला कीं आपण गरीब. आपल्यावर कोण विश्वास करणार? आपणच चोरी केली म्हणून आळ येणार. तिनें झटपट आपल्या जवळची पुतळ्यांची माळ मैत्रेयाजवळ दिली आणि म्हणाली—"वसंतसेनेला सांग कीं तिच्या दागिन्यांच्या ऐवजीं ही माळ घे." आपल्या बायकोचें हें मोठें मन पाहून चारुदत्ताचे डोळे भरून आले.

इकडे वसंतसेना चारुदत्ताची आठवण करीत बसली होती. तेव्हां शकारानें तिच्यासाठीं दागिने आणि गाडी पाठवून दिली.

हा प्रकार संपतो न संपतो तोंच सज्जलक तिच्या घरीं आला व मदनिकेला बोलावूं लागला. त्या दोघांचें संभाषण वसंतसेनेच्या कानावर पडले.

"दासीवृत्तींतून तुझी सुटका करण्यासाठीं मी हे दागिने आणले आहेत. मी काल रात्रीं चारुदत्ताच्याकडे चोरी करून हे आणले आहेत. दे ते आपल्या मालकिणीला आणि घे सुटका करून."

मदनिकेनें आपल्या मालकिणीची ती पेटी ओळखली. म्हणाली—"अहो, ही आमच्या मालकिणीचीच पेटी आहे आणि सर्व दागिनेहि त्यांचेच. आतां असं करा, ही पेटी तुम्हीच त्यांना नेऊन द्या आणि सांगा कीं चारुदत्तानें ही पाठविली आहे."

नेमका त्याच वेळीं मैत्रेय पुतळ्यांची माळ घेऊन वसंतसेनेकडे आला व माळ देत म्हणाला—"चारुदत्त फार चांगला माणूस आहे असें समजून तुम्ही आपले दागिने त्याच्याजवळ ठेवावयास दिलेत. पण त्यानें ते सर्व जुगारींत घालवून टाकले आणि त्या बद्दल ही माळ पाठविली आहे. ह्यांतच सर्व भरपाई मानून घ्या."

"ठीक. दे." म्हणून तिनें ती माळ ठेवून घेतली. मैत्रेय निघून गेला. "बाईसाहेब, आपली भेट घेण्यासाठीं चारु-















दत्ताकडून कोणी माणूस आला आहे." मदनिकेनें निरोप सांगितला. मालकिणीनें आड उभें राहून सर्व कांहीं ऐकलें आहे ह्याची तिला कल्पना देखील नव्हती. म्हणून मालकिणीचा इशारा मिळतांच आपला प्रियकर सज्जलक याला आंत बोलावून आणलें. दागिन्यांची पेटी पुढें करीत तो म्हणाला—"आमच्या मालकांनीं हे आपले दागिने आपल्याला देऊन येण्यास सांगितलें आहे. तेथें चोरांचें फार भय आहे."

"असें का? तरी पण आणखी कांहीं दिवस ठेवून घ्यायला सांगितलें आहे म्हणून सांग मालकाला." वसंतसेनेनें खोचकपणानें सांगितलें.

"तें काम माझ्यानें होणार नाहीं." सज्जलक म्हणाला. "मला माहीत आहे सर्व कारण. त्यांच्याकडून तूं ही चोरून आणली आहेस ना!" वसंतसेनेनें विचारलें. सज्जलक ओशाळला. त्याला तें कोडें उलगडलें नाहीं. परंतु वसंतसेनेनें ते सर्व दागिने मदनिकेला दिले आणि म्हणाली—"तूं ह्याला वाईट कामापासून बचावलें आहेस. जा, हे दागिने तुला बक्षिस घे आणि तुम्ही दोघं लग्न करून सुखानें रहा."

त्या दोघांना पाठवून दिल्यानंतर वसंतसेना आपल्या चतुरिका नांवाच्या दासीला म्हणाली—"चल आपण ही पुतळ्याची माळ चारुदत्ताला देऊन येऊं."

"पावसाची लक्षणें दिसत आहेत बाईसाहेब." ती म्हणाली.

"मला उत्तरें देतेस?" वसंतसेना गरजली. "नाहीं. कांहीं नाहीं." चतुरिका म्हणाली. नंतर दोघी चारुदत्ताकडे निघाल्या.






[५]

कुबलायखान हा चंगेज खानाचा वंशज. तो 'बड्या' खानांच्या पैकीं एक होता. 'बडा' खान म्हणजे राजाधिराज. त्यानें आपलें साम्राज्य वाढविलें होतें. तो खान होऊं नये म्हणून त्याच्या नातेवाइकांनीं तऱ्हेतऱ्हेचे प्रयत्न केले. परंतु तो त्या सर्वांना तोंड देऊन राजा झाला व इ. स. १२५६ मध्यें गादीवर बसला.

गादीवर बसल्यावर मात्र त्यानें १२८६ पर्यंत शस्त्र उचललें नाहीं. फक्त राजद्रोह्यांना दंड देण्यासाठीं त्याला युद्ध करावें लागे.

त्याच्याच नातलगांपैकीं एक नयन नांवाचा मनुष्य होता. त्यानें आणखी एका कायद नांवाच्या माणसाशीं संगमत करून कुबलायखानावर स्वारी करण्याचें ठरविलें. परंतु ही गोष्ट कुबलायखानाच्या कानावर गेली.

नयन आपलें सैन्य घेऊन कायदकडे चालला होता. त्याचें सैन्य पोहोंचण्या पूर्वीच त्याचा नायनाट करावा असें कुबलायखानानें ठरविलें व मोठें घोडदळ व पायदळ सैन्य घेऊन तो निघाला.

कुबलायखानानें नयनच्या सैन्याला वेढा दिला तेव्हां तें आपल्या डेऱ्यांत आरामपणें



घोरत पडलें होतें. अर्ध्या रात्रींच युद्ध सुरू झालें. दुसऱ्या दिवशीं दुपारपर्यंत युद्ध चालू होतें. शेवटीं खानाच्या सैन्यानें नयनला कैद केलें. तो राजवंशाचा असल्यामुळें त्याचें रक्त जमीनीवर पडणें नियमबाह्य होतें. चंद्रसूर्यांच्या प्रकाशांत त्याचा मृत्यु पाहाणें सुद्धां शास्त्र संमत नव्हतें. म्हणून त्याला एका पोत्यांत घालून तो मरेपर्यंत इकडून तिकडे सारखे ओढत राहिले.

नयनाच्या मृत्यूचा समाचार कळतांच कायदनें आपलें सैन्य मागें घेतलें. अशा-प्रकारें शत्रूचें दमन होताच कुवलायखान आपली राजधानी 'खान बालिक' ला परत निघून गेला.

कुवलायखान नीतिकुशल आणि उदार विचाराचा होता. त्याच्या राज्यांत सर्व धर्मांचे लोक सुखा-समाधानानें नांदत असत. तो कोणावर अन्याय करीत नसे. नयन ह्यानें ख्रिस्ती ख्रिस्ती धर्म घेतल्यामुळें त्याच्या निशाणावर क्रॉस चिन्ह होतें. तें पाहून कुवलायखानाच्या सैनिकांनीं त्याची कुचेष्टा केली आणि म्हणाले—"शेवटीं क्रॉसनें फसविलेंच."

हें कुवलायखानाला आवडलें नाहीं. त्यानें आपल्या सैनिकांना व ख्रिस्ती सैनिकांना समजावून सांगितलें—"ह्या क्रॉसचा पराजयाशीं कांहीं संबंध नाहीं. क्रॉस झाला तरी तो धर्माचेंच रक्षण करणार. अधर्माचें नाहीं. नयननें राजद्रोह केला. तो पथभ्रष्ट झाला. मग क्रॉस तरी अन्यायाचें अनुमोदन कसें करील?" ह्या कुवलायखानाच्या युक्तिवादावर ख्रिस्ती लोक फार खूष झाले.

कुवलायखानाच्या चार बायका होत्या. प्रत्येकीचा वेगळा वेगळा दरबारी थाट असे. प्रत्येकीला दहा दहा हजार नोकरांची तैनात होती. ह्या चौघींचे मिळून त्याला बावीस



मुलगे होते. त्यांपैकीं सर्वांत वडील मुलाचें नांव कुळांतील नामवंत खान जो चंगेजखान त्याचेंच ठेविलें होतें. परंतु तो अल्पवयींच कालवश झाल्या कारणानें दुसरा मुलगा त्याच्या मागून बडाखान झाला. त्याचें नांव तैमूर. ह्या शिवाय त्याच्या आणखी कांहीं बायका होत्या. त्यांचे सर्व मिळून पंचवीस मुलगे होते. त्या सर्वांना कुवलायखानानें लहान लहान जहागिरी वांटून दिल्या होत्या.

कार्थे देशाच्या राजधानीचें नांव होतें, 'खान-बालिक.' तेथें बडे खानांचा एक मोठा किल्ला होता. त्यांत राजवाडा होता. त्याच्या भोंवती दोन तट होते. बाहेरील तटाची भिंत फार मोठी आणि फार दूरवर पसरलेली होती. किल्ल्याच्या मध्यभागीं दहा वीती उंच बांधलेला एक संगमरवरी चबुतरा होता. त्यावर राजवाडा बांधला होता. एक मजलीच इमारत होती ती. परंतु त्यांत असंख्य खोल्या होत्या आणि एक खोली तर एवढी मोठी होती कीं त्यांत एकाच वेळीं सहा हजार लोक जेवावयास बसूं शकत असत. राजवाड्या मागच्या खोल्यांत खानाच्या सोन्याचांदीच्या आणि हिऱ्या मोत्यांच्या राशी ठेविलेल्या असत. बाहेरील



पटांगणांत खानानें सदाफुलीची झाडें लावून ठेविली होतीं. त्यामुळें तेथें नेहमीं हिरवळ दिसे. मनाला आल्हाद वाटे.

खान-बालिक येथें बडाखान वर्षांतून फक्त तीन महिनेंच राहावयास येत असे. म्हणून तेथील कारभार पाहण्यासाटीं कुवलायखानानें एकाची नियुक्ति केली होती. त्याचें नांव अहमद. तो फार दुष्ट होता. त्यानें कित्येक सुंदर मुलींना कैद करून ठेविलें होतें. पण बड्या खानाचा त्याच्यावर फार विश्वास असल्या मुळें त्यानें अव्याहतवा वीस वर्षे असा कारभार चालविला. त्याचें शासन अगदीं

असख झाल्यामुळें 'वानहू' व 'चेयेनहू' नांवाच्या काथे येथील दोन नागरिकांनीं त्याला ठार मारण्याचा कट रचला. बडाखान तेथें नव्हता. अशा वेळीं एक दिवस संधि साधून वान हू राजवाड्यांत घुसला. चारी बाजूंनीं खूप दिव्यांचा झगझगाट केला आणि अहमदाकडे निरोप पाठविला कीं युवराज चिंगेजखान आले आहेत व त्याला बोलाविलें आहे. अहमद स्वागतासाठीं धांवत आला. त्या एवढ्या झगझगाटांत त्याचे डोळे दिपले. वान हूला पाहून त्याला वाटलें तोच युवराज आहे. म्हणून त्याच्या समोर जाऊन त्यानें गुढघे टेकले आणि मान वाकविली. तेवढ्यांत चियेन हू नें आपली तलवार उपसून त्याचें डोकें उडवलें. आरडा ओरडा होतांच तेथील सैनिकांनीं त्याला कैद केलें. वान हू अजून सिंहासनावरच होता. इतक्यांत कोठून तरी बाण आला व त्याच्या छातींत लागून तो तेथल्या तेथेंच मरण पावला.

अहमदच्या खुनाची गोष्ट ऐकून बडा खान चईचाईनें खान बालिक गांवीं आला. त्यानें शांत मनानें सर्व बाबतींत चौकशी केली. त्या वेळीं त्याला अहमद व त्याच्या पंचवीस मुलांच्या कृती कळून आल्या. त्यानें त्याच्या सर्व मुलांना यथायोग्य प्रायश्चित्त दिलें. अहमदचे प्रेत त्यानें कोल्ह्या कुत्र्यांच्या तोंडीं दिले.

ह्या सर्व घटना घडल्या तेव्हां मार्कोपोलो त्या नगरांतच वास्तव्य करीत होता. त्यामुळें सर्व गोष्टी प्रत्यक्षपणेंच त्याच्या नजरे खालून गेल्या. त्या त्यानें आपल्या प्रवास वर्णनांत स्पष्टपणें लिहून ठेविल्या आहेत.





# समुद्रमंथन

इंद्र आणि अनुयायी त्याचे
हिंडूं लागले रानोमाळ।
नाहिं खावया नाहिं प्यावया
असा लोटला पुष्कळ काळ॥

कंदमुळें कधि पाला कधिं कधि
मिळे खावया नुसता त्यांस।
त्यावर भय दैत्यांचें त्यांना
नव्हती स्थिरता थोडि जिवास॥

आंगिरसानें एके दिवशीं
इंद्रा म्हटलें–"हे देवेश!
लक्ष्मीपतिच्या कृपेविना हे।
अशक्य सरणें अपुले क्लेश।"

"यज्ञ करावा यास्तव आपण
कृपा करुनि ध्या संपादन।
शिवाय याच्या उपाय दुसरा
नाहीं आतां हे भगवन्!"

कबूल केलें इंद्रानें तें
केलें त्यानें खडतर तप।
केले शंभर यज्ञ तयानें
हरि नामाचा करीत जप॥

तप इंद्राचें पाहुनि आली
दया ब्रह्मदेवाला फार।
"माग पाहिजे काय तुला तें!"
वदला होउनि देव उदार॥

हात जोडुनी इंद्र म्हणाला–
"तूं चतुरानन जगत्पिता!
कपाळिं अमुच्या जें तूं लिहिलें,
प्राप्त जाहलें तें आतां॥"

"तुझ्या कृपेनें पुन्हां सुखाचे
मिळतिल बघण्या दिवस अम्हां।
स्वर्गाचें तें राज्य सुखाचें
मिळेल देवा कधिं आम्हां॥"

श्री. भालचंद्र आपटे, हैदराबाद

दिसतां इंद्रा धरून नेलें
दैत्यांनीं बलि नृपतिकडे।
त्यास बलीनें विचारलें-"तूं
होतास कुठें कोणिकडे?"

"ब्रह्मा विष्णूंच्या आज्ञेनें
आलों बलि मी तुझ्याकडे।
सुरासुरांच्या एक हिताची
गोष्ट सांगतों ऐक पुढें॥"

नम्रपणानें करून निवेदन
इंद्र बोलला असें पुढें-
"मिळेल अमृत सुटेल सत्वर
परस्परांचें वैर पुढें॥"

"सुरासुरांनीं मिळून मंथन
क्षीरसागराचें केल्यास,
ब्रह्माविष्णूंनीं सांगितलें,
मिळेल अमृत सर्वां खास!"

बलिराजा तें ऐकुनि वदला-
"इंद्रा मजला हें स्वीकार।
व्यर्थ भांडलों पुरे करूं या
वैरभाव पण झाला फार!"

बलिनें आज्ञा दैत्यां दिधली-
"समुद्रमंथन चला करा।
सुरासुरांनीं मिळुन करावें
भांडूं नका जा त्वरा करा!"

आज्ञा बलिची होतां झाला
बलि राजाचा जयजयकार।
वज्रदंत कुणि काळकेतु कुणि
नाम भयंकर अन् आकार॥

दैत्य निघाले, तुफान जणुं तें
समुद्रमंथन करण्याला।
इंद्रामागें देव निघाले
भाग्य परीक्षा बघण्याला॥






# ❊ समुद्र देवता ❊

रशियांत एक नवगोरद नांवाचें नगर होतें. तेथें एक गवई राहात होता. त्याचें नांव साद्को. गांवांत कोठेंहि जेवणाजवळ किंवा कांहीं पानसुपारीचा कार्यक्रम असला कीं लोक त्याला गाण्यासाठीं बोलवीत असत. साद्को आपल्या मधुर कंठानें वीर पुरुषांच्या गाथा म्हणत असे. अशा तऱ्हेनें साद्कोचें जेवण बाहेर पडत असे आणि वर त्याला कांहीं पैसे सुद्धां मिळत असत.

पण दैव गति विचित्र आहे. एक दिवस त्याला कोणी बोलाविलें नाहीं. म्हणून कंटाळून जाऊन त्या दिवशीं तो वाद्य घेऊन गांवाबाहेर एका तळ्याच्या कांठीं बसून गाऊं लागला.

तो तन्मय होऊन गात होता. थोडा वेळ गेल्यावर त्याचें लक्ष तळ्यांतील लाटांकडे गेलें. तळ्यांत एवढ्या मोठ्या लाटा कुठल्या? म्हणून त्याला आश्चर्य वाटलें. आणखी कांहीं वेळानें त्यांतून जोरानें आवाज येऊं लागला. तें पाहून सादकोला भीति वाटली. तो घाबरून गेला व घरीं जाऊन दारें खिडक्या बंद करून बसला.

दुसऱ्या दिवशीं पण त्याला काम न मिळाल्यानें तो तळ्याकाठीं गेला. कालच्या प्रमाणें पुन्हां होतें का हें पाहण्यासाठीं तेथें बसून गाऊं लागला. त्या दिवशीं सुद्धां तसेंच झालें. पुन्हां तिसऱ्या दिवशीं सुद्धां सादको काम न मिळाल्यानें तळ्याकांठीं गेला. त्या दिवशींहि तेंच झालें पण सादको उठून निघून यावयाच्या आंत त्याला पाण्यांत कांहीं तरी उभें असल्याचें दिसलें. तें पाहून त्याची बोबडीच वळली. तो शून्य दृष्टीनें तिकडे पाहूं लागला. तोंच त्याच्या कानावर शब्द आले—"मी तळ्याचा राजा आहें. तीन दिवसांपासून आमच्या

सौ. रमाबाई पाटील



येथें मेजवान्या चालल्या आहेत आणि आम्हांला तुझें गाणें ऐकावयास मिळालें आहे. आमच्याकडे आलेले सर्व पाहुणे तुझ्या गाण्यावर फार खुष झाले आहेत. मलाहि फार आनंद झाला. तुला त्याचा मोबदला द्यावा म्हणून मी आलों आहें. उद्यांपासून तुला पुन्हां गाण्यासाठीं बोलवणीं येतील. उद्यांच एका श्रीमंताकडून आमंत्रण येईल. तेथें मोठमोठे धनी लोक येतील आणि गप्पागोष्टी करतां करतां एकापेक्षां एक लांब लांब बढाया मारतील. त्या वेळीं तूं सुद्धां सांग कीं ह्या तळ्यांत सोनेरी पंखांचे मासे आहेत. कोणी तुझ्यावर विश्वास करणार नाहीं आणि तुझ्याशीं पैजा लावतील. तूं त्या सर्व कबूल कर. बारीक रेशमाच्या धाग्यानें विणलेलें एक लहानसें जाळें आण व पाण्यांत सोड. पुढील जबाबदारी माझी. मी तुझ्या जाळ्यांत तसे मासे घालीन. ते मासे पाहिल्यावर त्या सर्व व्यापाऱ्यांना हार मानावी लागेल व तूं पैज जिंकल्यामुळें तुला ते पुष्कळ धन देतील आणि तूं श्रीमंत होऊन जाशील.

इतकें सांगून जलदेवता अदृश्य झाली. सादको आपलें वाद्य घेऊन घरीं आला. त्या जलराजानें सांगितल्याप्रमाणें दुसरे दिवशीं त्याला एका राजाच्या घरचें बोलावणें आलें. तेथें बरेच मोठमोठे आणि धनी लोक आले होते. जेवणें चाललीं असतां सादकोनें गीत गाऊन सर्वांना आनंदित केलें. मेजवानी झाल्यावर गप्पा चालल्या असतां ते सर्व लांब लांब बढाया मारूं लागले. सादको गप्प बसून सर्वांच्या गोष्टी ऐकत होता.

"अरे तूं कां नाहीं कांहीं बोलत?" एकानें सादकोला विचारलें.

"मी कशाच्या जोरावर बढाया मारूं? काय आहे माझ्या जवळ चायला! हो पण मी एक अशी गोष्ट सांगूं शकेन जी ऐकून तुम्हांला आश्चर्य वाटेल."

"काय सांगणार आहेस रे? सांग पाहूं?" ते म्हणाले.

"आपल्या गांवाच्या वेशीवर एक मोठें तळें आहे ना? त्यांत सोनेरी पंखाचे लहान लहान मासे आहेत." सादकोनें सांगितलें.

"शहाणा आहेस. अरे त्या तळ्यांतील मासे पकडायला रोज इतके कोळी जातात, त्यांच्या रे जाळ्यांत नाहीं आला कधीं तसला मासा? दे थाप झालं" सर्वांनीं त्याची टिंगल केली.

"तुमचा विश्वास बसणार नाहीं ह्याची मला खात्री होती. पण मी सांगितलेली गोष्ट मात्र खरी आहे. पाहिजे तर प्रत्यक्ष बघांच माझ्याबरोबर तळ्या कांठीं येऊन." सादकोनें आत्मविश्वासपूर्वक सांगितलें.

"चल, पैज. त्या तळ्यांत सोनेरी पंखांचे मासे सांपडले तर मी माझी ह्या गांवांतील सर्व दुकानें तुला देईन." एका व्यापाऱ्यानें सांगितलें.

"होय, होय रे, मी सुद्धां माझें दुकान तुला देईन." दुसऱ्या व्यापाऱ्यानें सांगितलें. ह्या प्रमाणें बऱ्याच व्यापाऱ्यांनीं पैज लावली.



"पण.....पण.....माझ्याजवळ माझ्या डोक्याशिवाय काय आहे? कांहींच नाहीं. तरी मी जर पैज हारलों तर तुम्हांला तेंच देईन." सादको म्हणाला.

पैज ठरली. मग तेथें जमलेले सर्व लोक सादकोबरोबर गांवाबाहेरील तळ्याच्या कांठीं गेले. सादकोनें आपल्याबरोबर बारीक रेशमाचें एक जाळें घेतलें होतें. तेथें गेल्यावर सर्वांना कांठावर उभे करून सादको पाण्यांत उतरला. जाळें पाण्यांत टाकलें व क्षणभरानें बाहेर काढलें, आणि त्यांत खरोखरच एक सोनेरी पंखांचा मासा सांपडला होता.

"कांहीं तरी हात चलाखी करतो आहे." एका व्यापाऱ्यानें शेरा मारला. त्यांची शंका दूर करण्यासाठीं सादकोनें तो मासा बाहेर काढून तें रिकामें जाळें पुन्हां पाण्यांत टाकलें. क्षणभरानें बाहेर काढतांच त्यांत आणली एक सोनेरी पंखांचा मासा सांपडला होता, ह्या प्रमाणें सादकोनें पांच सहा वेळां तरी जाळें टाकून मासे काढले. सादकोनें पैज जिंकली. त्याला खूप आनंद झाला.

पैज लावणारे व्यापारी हारले होते. म्हणून त्यांनीं दिलेल्या वचनाप्रमाणें आपापली दुकानें सादकोला बहाल केलीं. सादको एका दिवसांत धनी व्यापारी झाला. पुढें त्यानें परदेशांशीं सुद्धां व्यापार सुरू केला आणि थोड्याच दिवसांत जगांतील सर्वांत श्रीमंत माणूस म्हणून प्रसिद्ध झाला. त्यानें स्वप्नांत सुद्धां कल्पना केली नव्हती. 'दैवानें द्यावयाचें ठरविलें कीं आकाश फाडून देतें.' असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. गाण्याच्या व्यासंगानें त्याला दैवी आधार मिळाला व सुखाचे दिवस आले.






# कोणार्कचें सूर्य मंदिर

ओरिसा प्रांतांत कोणार्क म्हणून एक ठिकाण आहे. तेथील सूर्याचें देऊळ फार प्रसिद्ध आहे. हें जगन्नाथपुरीच्या ईशान्येला सुमारें ५३ मैलावर आहे.

भुवनेश्वरापासून हें देऊळ चाळीस मैलावर आहे. दोन्ही कडून तेथपर्यंत रस्ते काढलेले आहेत.

पुरीमधील जगन्नाथाच्या देवळाला पांढरें देऊळ व सूर्याच्या देवळाला काळें देऊळ असें म्हणतात.

हें देऊळ इ. स. १२३८–६४ च्या दरम्यान पहिल्या नरसिंहदेवानें बांधविलें होतें. हें मोडकळीस आल्यामुळें ह्याचे कांहीं अवशेष मात्र दिसतात. पण त्यावरून हें देऊळ फार विशाल असलें पाहिजे, एवढें मात्र कळतें.

ह्या देवळांत हत्तींचीं व सिंहांचीं बरींच चित्रें कोरलेलीं आहेत. त्यांचें वैशिष्ट्य म्हणजे तीं सर्व खऱ्या हत्तींच्या व सिंहांच्या प्रमाणांत कोरलेलीं आहेत.

तज्ञ शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे कीं ह्या देवळांत असलेल्या मूर्ती जितक्या प्रमाणबद्ध आहेत तितक्या दुसऱ्या कोणत्याहि देवळांत नाहींत.





# पुनर्विवाह

खांद्यावरील शव अदृश्य होतांच विक्रमार्क त्याच पावलीं परतला. पुन्हां त्या वडाच्या झाडापर्यंत गेला. शव उचलून खांद्यावर टाकलें व स्मशानाच्या दिशेनें जाऊं लागला. तेवढ्यांत शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"आपलें वचन पाळण्यांत जसा तूं पक्का आहेस तसेच सर्व लोक असतील तर किती बरें होईल? एवढी निश्चयी सुजाता, पण तिनें सुद्धां पुनर्विवाह केला. तुला माहीत नसेल ती गोष्ट. मी सांगतों. ऐक. वेताळानें गोष्ट सांगण्यास सुरवात केली.

वज्रशीला नगरांत उदयसेन नांवाचा एक कुलीन क्षत्रिय राहात असे. तो एक फार शूर व अभिमानी क्षत्रिय होता. त्याला सुजाता नांवाची एक मुलगी होती. ती उपवर झाल्यावर तिच्या वडिलांनीं तिच्या साठीं वरसंशोधन सुरू केलें. बरेच दिवस तिच्या-

## वेताळाच्या गोष्टी

साठीं योग्य वर न मिळाल्यामुळें त्याला काळजी वाटूं लागली.

त्याच गांवांत एक पुरंदर नांवाचा क्षत्रिय तरुण होता. त्याचें सुजातावर प्रेम बसलें. त्यानें तिच्याशीं लग्न करण्याची आपली इच्छा तिच्या बापाजवळ बोलून दाखविली. परंतु उदयसेनला तें पसंत पडलें नाहीं. तो त्याला तुच्छतेनें म्हणाला— "तुझें कुलगोत काय? तुझी योग्यता काय? तुझ्यासारख्या कपर्दी माणसाला मी माझी मुलगी देऊं? छे! माझी मुलगी एकाद्या राजकुमाराच्या नाहीं तर वीर सेनापतीच्या गळ्यांत माळ घालणार आहे." म्हातारा मोठा करारी होता.

उदयसेनाचें बोलणें ऐकून त्याला वाईट वाटलें. परंतु तो निराश झाला नाहीं. त्यानें आपली इच्छा एका दासीकरवीं सुजाताला कळविली. सुजातानें तें मान्य केलें. तिनें विचार केला कीं उगीच नांवानें मोठा असलेल्या माणसाशीं लग्न करण्या-पेक्षां जो खरें प्रेम करील त्याच्याशीं लग्न करणें बरें. पण वडील ह्या लग्नाला संमति देणार नाहींत, आणि चार लोकांसमोर लग्न लावण्यास तर मुळींच तयार होणार नाहींत



म्हणून मुकाट्यानेंच कोठें तरी जाऊन लग्न करून घ्यावें.

सुजाताचा विचार ऐकून तो फार खूष झाला. त्यानें पुरोहिताला बोलावून मुहूर्त ठरविला. त्या गांवाच्या पलीकडे जंगलांत एक कालीचें देऊळ होतें ती जागा त्यानें लग्नासाठीं ठरविली आणि सुजाताला सुद्धां तसें कळविलें. तो लग्नाच्या तयारीस लागला.

लग्नाच्या दिवशीं पुरंदरानें संध्याकाळीं एक पालखी भोयांच्याबरोबर देवीच्या देवळांत पाठवून दिली. त्याच प्रमाणें एका पुरोहिताला व एका सुहासिनीला हि देवळांत



घेऊन जाण्याची त्यानें व्यवस्था केली. मुहूर्त मध्यरात्रीचा होता. म्हणून संध्याकाळीं अंधार पडल्यावर पुरंदर घोड्यावर बसून देवळांत जाण्यास निघाला. तें देऊळ थोडें दूर होतें.

सुजाताला पुरंदरचा निरोप मिळाला होता. त्या दिवशीं रात्रीं जेवणें खाणें झाल्यावर सुजाता आपल्या खोलींत जाऊन निजली. सर्वकडे निजानीज झाल्यावर तिच्या दासीनें येऊन सांगितलें कीं घोडा तयार आहे. त्याबरोबर ती उठली. हळूच घराबाहेर पडली व दासीला बरोबर घेऊन कालीच्या देवळाकडे निघाली.

त्या दोघी घोड्यावर बसून जात होत्या. देवळाच्या जवळ जवळ पोहोंचल्या इतक्यांत असें जोराचें वादळ सुटलें कीं कोठें काय आहे कांहीं दिसेनासें झालें. पाठोपाठ मुसळधार पाऊस पडूं लागला. मग काय विचारतां त्यांची त्रेधा! परंतु दोघी कशातरी त्या देवळांत पोहोंचल्या.

इकडे वादळ आणि पाऊस सुरु झाला. तेव्हां पुरंदर जंगलांत अर्धी वाट चालून गेला होता. पुढील रस्त्यांत तो वाट चुकला आणि बराच वेळ भटकत राहिला. पहाटेच्या सुमारास वादळ व पाऊस बंद झाला. आकाश निवळलें. दिशा फांकल्या. त्या उजेडांत कसा तरी मार्ग काढीत तो देवळांत पोहोंचला. परंतु योग पहा! सुजातांचें लग्न ठरलेल्या मुहूर्तावर होऊन गेलें होतें.

मुहूर्ताच्या थोडाच वेळ अगोदर एक तरुण घोड्यावर बसून त्या देवळांत आला. जंगल पार करून जात असतां पाऊस लागल्यामुळें निवाऱ्यासाठीं तो देवळांत शिरला. त्याचे सर्व कपडे भिजलेले होते. तेथें असलेल्या पुरोहिताला वाटलें, हाच नवरामुलगा आहे. म्हणून त्यानें त्याच्याशींच सुजातांचें लग्न लावून दिलें. पण माळ



घालावयाच्या वेळीं सुजातानें डोकें वर उचललें तों तिला दुसराच माणूस दिसला. "हे नव्हेत ते." असें म्हणत ती मूर्छा येऊन खालीं पडली.

दासी घाबरून गेली. आपल्याला जाण्यास उशीर झाला तर घरांत सर्व घोटाळा होईल. म्हणून कसें तरी करून ती सुजाताला घेऊन घरीं आली. तेव्हां पासून सुमारें पंधरा दिवस सुजाताला ताप येत राहिला.

पुरंदर तिला भेटण्यासाठीं म्हणून आला. परंतु तिच्या दासीची सुद्धां तो भेट घेऊं शकला नाहीं. तो थोडासा वैतागला. निराश झाला. त्याला जिणें भार वाटूं लागलें.

पुढें थोड्याच दिवसांत वज्रशील व त्याच्या शेजाऱ्याच्या राज्यांत युद्ध सुरू झालें. ह्या संधीचा फायदा घेऊन तो सैन्यांत भरती झाला आणि युद्धांत मारला गेला.

त्या नंतर थोड्याच दिवसांत उदयसेनहि मरण पावला. सुजाताचा ताप थोड्या दिवसांत कमी झाला होता. तरी पण तिची प्रकृति पूर्वीप्रमाणें झाली होती.

उदयसेनाच्या पाठीमागें सुजाताच त्याच्या सर्व संपत्तीची मालकीण झाली. तिच्याशीं



लग्न करण्यासाठीं बऱ्याच मोठमोठ्या लोकांनीं विचारलें, पण तिनें त्यावर कधीं विचारच केला नाहीं.

तिच्या मैत्रिणींनीं आणि कांहीं वडील-धाऱ्या मंडळींनीं तिला पुष्कळ सांगून पाहिलें, पण तिनें कोणाच्याच म्हणण्याकडे लक्ष दिलें नाहीं.

कांहीं दिवस लोटले. पुढें तेथें मिलिंद नांवाचा एक क्षत्रिय आला. युद्धांत फार मोठा पराक्रम दाखविल्यामुळें राजानें त्याला आपल्या नोकरींत घेतला होता. त्यानें सुजाताविषयीं माहिती ऐकली. त्याला तिची

दया आली. म्हणून तिची ओळख करून घेऊन परिचय वाढविला.

हळूं हळूं मिलिंदाच्या दयेचें प्रेमांत रूपां-तर झालें. शेवटीं एक दिवस त्यानें सुजाताला विचारलेंहि. म्हणाला—"दैवगति विचित्र असते. पुरंदराचें तुझ्यावर प्रेम होतें, पण योग नव्हता. त्याला विसरण्याशिवाय आतां कांहीं मार्ग नाहीं. तूं माझ्याशीं लग्न कर. आपण सुखानें राहूं."

"होय. मी पुरंदरला जवळ जवळ विसरलेंच आहें. पण तुमचें जर माझ्यावर प्रेम असेल तर तुमच्याशीं लग्न करीन." तिचा होकार मिळतांच त्या दोघांचें लग्न झालें व तीं सुखानें राहूं लागलीं.

एवढें सांगून वेताळ थांबला आणि राजाला म्हणाला—"मिलिंदाशीं लग्न करून सुजातानें आपलें पावित्र्य बिघडविलें कीं नाहीं? तिनें प्रेम एकावर केलें आणि लग्न दुसऱ्याशींच करावें लागलें आणि तो मनुष्यहि कोठें तरी निघून गेला. जर सुजाता सच्चरित्र असती तर तिनें असें केलें असतें का? उत्तर माहीत असूनहि सांगितलें नाहींस तर तुझ्या डोक्याचे शतशः तुकडे होतील आणि तुझ्या पायाशींच पडतील."

"सुजाताला माहीत होतें, तिचें एका युवकाशीं लग्न झालें आहे आणि ह्या साठींच तिनें कोणशींहि लग्नाविषयीं बोलण्याचें नाकारलें. पण तिनें मिलिन्दाला ओळखलें. कारण त्याच्याशींच तिचें लग्न लागलें होतें. म्हणून ती त्याच्याशीं लग्न करण्यास तयार झाली." राजानें सांगितलें.

अशा तऱ्हेनें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह अदृश्य झाला. (कल्पित)






पौर्णिमेची रात्र होती. चोहोंकडे दुधासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. आजोबा खुर्ची टाकून अंगणांत बसले होते. मुलें त्यांच्या भोंवतीं गोळा झालीं. आजोबांना एक श्लोक आठवला व ते गुणगुणले—

"भाग्यं फलति सर्वत्र
न विद्या न च पौरुषम्
कूष्माण्डाभ्यन्तरे मुक्ता
स्तुरुष्केण विलोकिताः"

"म्हणजे हो काय आजोबा?" मुलांनीं प्रश्न केला.

आजोबा चिमटींत तपकीर घेऊन म्हणाले—"ह्याचा अर्थ ऐका. शेवटीं सर्व भर भाग्यावरच द्यावा लागतो. विद्या किंवा पौरुष असून चालत नाहीं. भोपळ्यांतील मोती शेवटीं एका तुर्क्याच्याच दृष्टीस पडले."

"भोपळ्यांत कसे मोती आले आजोबा? कोणच्या तुर्क्याला ते मिळाले? सांगा आजोबा, ती गोष्ट सांगा." मुलें म्हणालीं.

"आतां समजलं, तुम्ही गोष्ट ऐकण्यासाठीं येथें आलां आहांत? बरं बाबा!" आजोबा गोष्ट सांगूं लागले. एक होता राजा. त्याचें नांव होतें विष्णुगुप्त. व्याघ्रपुर त्याची राजधानी होती. कधीं कधीं तो वचनांचें खरेंपण प्रत्यक्ष अनुभवानें पाहात असे.

एक दिवस तो अंथरुणावर पडला होता. त्याच्या मनांत कांहीं तरी विचार घोळत होते. इतक्यांत त्याला एका श्लोकाची आठवण झाली. तो श्लोक हा—

"हरिणापि, हरेणापि,
ब्रह्मणापि, सुरैरपि,
ललाट लिखिता रेखा,
परिमाष्टुं न शक्यते।"

ह्याचा अर्थ असा कीं हरि असो वा हर, ब्रह्मा असो वा देव कपाळावर लिहिलेली रेष कोणी नष्ट करूं शकत नाहीं.

ह्या श्लोकांतील वचन बरोबर आहे किंवा नाहीं हें पाहाण्याची त्याला एकदां इच्छा झाली. म्हणून त्यानें काय केलें? एक भोपळा घेतला. त्यांतील बिया वगैरे काढून टाकल्या आणि त्यांत त्यानें मोती भरले.

दुसरे दिवशीं सकाळीं एक ब्राह्मण त्याच्याकडे भिक्षेला आला. त्यानें तो भोपळा त्याला दान दिला. त्याच वेळीं एक तुर्कीसुद्धां तेथें आला. राजानें त्याच्या हातावर पावली ठेविली आणि त्याला पाठवून दिलें.

ब्राह्मण व तो तुर्की माणूस दोघेहि एकाच वाटेनें निघून गेले. जातांना ब्राह्मणाच्या मनांत आलें कीं आपल्याकडे पुष्कळसे भोपळे असतांना पुन्हां हा कशाला आणखी? उगीच वजन मात्र वाहावयाचें त्याचें झोळींत. म्हणून तो त्या तुर्की माणसाला म्हणाला—"मिया साहेब, तुम्ही हा भोपळा घेऊन जा. माझ्या घरीं पुष्कळ आहेत. ती पावली मला द्या."

चार आण्याला एवढा मोठा भोपळा मिळत आहे म्हणून तो कबूल झाला. त्यानें चार आणे देऊन तो भोपळा घेतला. घरीं गेल्यावर कापून पाहिला तर त्यांतून मोती निघाले. त्यानें प्रामाणिकपणानें ते राजाला नेऊन दिले व सर्व हकीगत सांगितली.

"भाग्यवान आहेस म्हणून तुला ते मिळाले. घेऊन जा तें." राजानें त्याला ते मोती देऊन टाकले.

आजोबा म्हणाले—"पाहिलेंत भाग्य? कोणी कितीहि हुशार असला, श्रीमंत असला, पराक्रमी असला तरी जर त्याचें नशीब बलवत्तर नसेल तर त्याचे सर्व श्रम फुकट.








त्या राजानें गांवाबाहेरील एका झाडाखाली माझी राहाण्याची व्यवस्था केली आणि गाडे भरभरून माझ्यासाठीं खाण्यापिण्याचे सामान आणून दिलें.



एक दिवस मी समुद्रावर फिरावयास गेलों असतां एक मोठी होडी वाहात असलेली माझ्या नजरेस पडली.





होडी पाहून मला धीर आला. ती वादळांत एकाद्या जहाजावरून दूर वहात आली असावी. कांहीं असो. कसें तरी करून होडीला दोन्या बांधून त्या वीस जहाजांच्या मदतीनें मी ती किनाऱ्यावर आणली.



होडी तशी सर्व चांगली होती. फक्त तिचा तळ थोडा फुटला होता.



सुतारांच्या मदतीनें मी ती दुरुस्त केली आणि शिडाचा दांडा व वल्हें सुद्धां तयार करून घेतलें.



शिंप्यांनीं बरेचसे कापडाचे तुकडे जोडून शीड तयार करून दिलें.



मी राजाकडे स्वदेशास जाण्याची परवानगी मागीतली. राजानें निरोप देत प्रवासासाठीं थोडे खाद्य पेयहि ढोपल्यांत पिंपांत भरून दिलें.



येथील आठवण म्हणून राजानें दोन बैल, सहा गाई व बकऱ्यांचा एक लहानसा कळप माझ्या-बरोबर दिला.



ह्या अवधींत लिलिपुट राजाचा संदेश आला कीं मी लागलीच तिकडे परत जावें नाहीं तर मी देशद्रोही समजला जाईन.



त्यानें राजालाहि कळविलें कीं मला बेड्या घालून लिलिपुटला पाठवून द्यावें. पण राजानें तें मानलें नाहीं.



मी ब्लेफुस्कु राजाजवळ आपली कृतज्ञता व्यक्त केली. नंतर राजानें एकदेंच सांगितलें कीं शक्य तो लवकर मी तेथून निघून जावें.



विलंब न लावतां मी होडींत बसून निघालों. शीड चढवून नाव चालू केली. नंतर कांहीं दिवस लागोपाठ असाच प्रवास करीत राहालों.



तीन दिवसांनी मला दूरवर एक मोठें जहाज दिसलें. तें पाहून मी वेड्या सारखा ओरडून आणि हात वारे करून बोलूं लागलों.



तें जहाज ब्रिटिशांचें होतें. त्यावर कांहीं माणसें होतीं. मी त्यांच्याशीं आपल्या भाषेत पोटभर बोलून घेतलें.



मी जहाजाच्या खलाशांची खात्री पटण्यासाठीं तेथून आणलेलीं जनावरें दाखविलीं. तीं पाहून त्यांनाहि फार आश्चर्य वाटलें. एवढ्यांत एक उंदीर आला आणि त्यानें एका बकरीवर झडप घालून तिला खाऊन टाकलें.



सुदैवानें तें जहाज माझ्या देशाकडेच जात होतें. तेथून मी आपल्या गांवीं पोहोंचलों पण आपल्या कुटुंबियांत मी फक्त दोन महिनेच राहूं शकलों.



जोंपर्यंत बाहेर देशीं फिरत होतों तों पर्यंत घरीं कधीं जाईन असें वाटत होतें. पण आतां पुन्हां दर्यावर जाण्याचीं स्वप्नें पडूं लागलीं.

प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळ :

# श्री क्षेत्र गोकर्ण महाबळेश्वर

[सौ. प्रतिभा पांडुरंग, पै. मुंबई]

**का**रवार हें दक्षिणेकडील एक सुंदर व निसर्गशोभेनें नटलेलें शहर अरबी समुद्रावर वसलें आहे. कारवारपासून ५० मैलांवर सुप्रसिद्ध श्री क्षेत्र गोकर्ण आहे. त्यालाच कोणी महाबळेश्वर असेंहि म्हणतात.

रावणानें भगवान शंकराकडून आणलेलें श्री शंकराचें आत्मलिंग अजूनहि येथें मूळ स्वरूपांत पहावयास मिळतें. हें सुप्रसिद्ध देवालय पांडवांनीं एका दिवसांत बांधलें होतें अशी दंतकथा आहे. हें भव्य देवालय म्हणजे शिल्पकलेचा एक नमुना आहे. येथें हिंदुस्थानांतल्या सर्व प्रांतांतले लोक श्री महाबळेश्वराचें दर्शन घेण्यासाठीं येतात व हें शिल्पकलेचें वैभव पाहून आश्चर्यानें थक होतात. देवळाच्या उजव्या बाजूस आदि गोकर्ण नांवाचें मंदिर असून त्यांत एक तळें आहे व एक लिंग त्या पाण्यांत आहे. त्याच पाण्यांत लिंबू टाकलें तर तें काशीला जातें, अशी समजूत आहे. त्याच प्रमाणें ताम्रपर्णी नांवाची देवी पाठीमागच्याबाजूस असून तेथेंहि एक तळें आहे व त्यांत मृतांच्या अस्थी टाकतात. त्या पाण्यांत पडल्याबरोबर विरघळून जातात.

गोमुख नांवाची एक गाईच्या आकाराची गुहा आहे. त्याच प्रमाणें श्री गणपतीचें विशाल देवालय कोटीतीर्थ, रामतीर्थ, जटायुतीर्थ, नागतीर्थ वगैरे असंख्य तीर्थें असलेलें, हें क्षेत्र महाशिवरात्रीला लाखों यात्रेकरूंनीं नुसतें फुलून जातें.

एकदां एका यात्रेकरूचें नख अभिषेक करतांना महादेवाच्या लिंगाला चुकून लागलें व जो हाहाकार येथें झाला तो भयंकरच होता. नुसतें नख लागल्यानें क्षेत्रानजीकचा सर्व समुद्र रक्तानें लालभडक झाला व भयंकर तुफान होऊन सारें क्षेत्र हादरलें. पण महादेवाच्या कृपेनें जनतेच्या हाकेला श्री भोलानाथानें 'ओ' दिली व सर्व पूर्ववत झालें.



# चीनचा वीर

चीन देशांत एक वीर पुरुष राहात असे. तो शस्त्रविद्येंत फार प्रवीण होता. तो आपल्या पौरुषाचा उपयोग दुष्टांपासून दुबळ्यांचें रक्षण करण्याकडे करीत असे.

तो एकदां घोड्यावर बसून कोठेंतरी प्रवासाला निघाला. सुमारें चार पांच दिवसांनंतर एक दिवस तो रस्ता चुकला. अंधार पडूं लागला तरी त्याला आपल्या मुक्कामाची जागाच सांपडेना.

तो तसाच पुढें गेला. त्याला एक गांव लागलें. तेथें एका घराचा दरवाजा उघडा असलेला व त्यांतून दिव्याचा प्रकाश डोकावत असलेला त्याला दिसला. तें घर म्हणजे ओळीनें मोठमोठ्या तीन खोल्या होत्या. त्यांच्या मागें दोन्हीं बाजूंनीं आणखी दोन खोल्या होत्या. मधल्या खोलींत एक म्हातारी दिव्याच्या उजेडाशीं कांहीं तरी करीत होती.

घोड्याच्या टापांचा आवाज ऐकून म्हातारी पुढें आली व तिनें प्रवाशाची चौकशी केली.

तो म्हणाला—"मी रस्ता चुकून इकडे आलों आहें. रात्रीपुरती येथें राहाण्यास जागा मिळाल्यास फार कृपा होईल."

"मी काय सांगूं? तें कांहीं माझ्या हातांत नाहीं बाबा. माझा मुलगा व्यापारासाठीं नेहमीं फिरतीवर असतो. घरांतील सर्व काम सूनच बघते. मी म्हातारी, मला कोण विचारतो?" म्हातारी म्हणाली.

"कोठें आहेत तुमच्या सूनबाई?" त्या वीरानें विचारलें.

"तूं त्या भानगडींत पडूं नकोस. कोणत्याहि पुरुषाची डाळ शिजावयाची नाहीं तिच्याजवळ. फार तापट आहे. मला सारखी बोलत असते. म्हणूनच म्हटलें कीं मी कांहीं तुला रहा किंवा राहूं नको म्हणून सांगूं शकत नाहीं." बोलतां बोलतां म्हातारीच्या डोळ्यांतून अश्रू आले.

म्हातारीचें म्हणणें ऐकतांच हा दीनकनवाळू वीर आवेशांत आला. आपल्या सेवेची येथें सुद्धां गरज आहे असें त्याला वाटलें. तो म्हणाला—"केवढा हा अन्याय! हा अन्याय दूर करण्याची जबाबदारी माझ्यावर आहे. येऊं द्या तिला." असें म्हणत त्यानें आपला घोडा एका दगडाला बांधला आणि तलवार उपसून सुनेची वाट पाहात उभा राहिला.



"तें शक्य नाहीं. तुला माहीत नाहीं ती कशी आहे तें. अरे ती पुरुषाप्रमाणें रानांत जाते आणि कांहीं तरी एक शिकार करून आणते. त्यासाठीं तिला कोणाची मदत वगैरे लागत नाहीं. तें सर्व विकून जें काय मिळतें त्यावरच आमचें चालतें. तिच्या वाटेला तूं गेलास तर मला जे चार घास मिळत आहेत ते सुद्धां नाहीं मिळावयाचे." म्हातारीनें त्याला निक्षून सांगितलें.

"दीन दुबळ्यांची दुष्टांपासून मुक्तता करून त्यांची मदत करण्याचें माझें व्रत आहे. पण तुम्हीं म्हणाल कीं तिच्यावरच तुमची सर्व भिस्त आहे. तर मग राहूं दे. तरी पण तिला थोडें ठिकाणावर आणूनच पुढें जाईन." त्याचें एवढें बोलणें चाललें होतें तोंच सूनबाई आली. आपल्या पाठीवरील वाघाला जमिनीवर टाकीत ती गरजली—"ए म्हातारे, दिवा घेऊन ये, आणि ही शिकार आंत घेऊन जा."

दिव्याच्या उजेडांत त्यांना तो वाघ दिसला. दोघेंहि भिऊन दोन दोन पावलें मागें सरकलीं.

"हा दारांत घोडा कोणाचा आहे?" तिनें विचारलें.

श्री. भा. गो. देसाई

     

वीर प्रवासी पुढें होऊन म्हणाला– "माझा आहे. मी राजधानीकडे निघालों आहें. पण रस्ता चुकल्यामुळें येथें आलों. अंधार पडल्यामुळें निरुपाय झाला. आपल्या घरांत उजेड दिसला. म्हणून रात्रीपुरती टेकायला जागा मिळेल का म्हणून विचारीत होतों."

"काय म्हणावें म्हातारीला! पाहुण्याला खुशाल बाहेर उभा केला आहे. क्षमा करा हं तिला. आज ह्या वाघाशीं थोडी झुंज करावी लागल्यामुळें उशीर झाला. बरं या. बसा असे." सून म्हणाली.

सून आंत गेली चटकन वाघाचें मांस काढून शिजविलें आणि पाहुण्याला वाढलें. स्वयंपाक चांगला झाला होता. वाढतांना ती मोठ्या नम्रतेनें म्हणाली–"आमचें गरीबांचं अन्न गोड करून घ्या."

"वा! वा!! असें काय म्हणतां! फार छान झाला आहे स्वयंपाक." प्रवासी म्हणाला.

जेवणें आटोपल्यावर तो सुनेला म्हणाला– "आपण बाई असून पुरुषासारखा पराक्रम आहे आपल्या अंगांत आणि त्याचबरोबर आपला विनय सुद्धां स्त्रीला साजेसाच आहे. मग आपण आपल्या सासूचाच आदर कां नाहीं करीत?"

त्याचें वाक्य पूर्ण होण्याच्या आंतच सून नागिणीप्रमाणें उसळून म्हणाली–"म्हातारीनें चहाडी केलेली दिसते आहे."

"शांतं पापं! छे! छे!! त्या माउलीनें कांहीं सांगितलें नाहीं. तुम्ही त्यांच्याशीं केलेल्या व्यवहारावरूनच ती अनुमान केलें. बाकी तुम्ही सुसंस्कृत व सभ्य दिसतां त्या बद्दल प्रश्नच नाहीं." तो म्हणाला.

सुनेचा राग अनावर झाला. तिनें एका हातांत दिवा घेतला आणि दुसऱ्या हातानें त्या वीराला फराफरा ओढीत बाहेर अंगणांत आणलें. एके ठिकाणीं मुकाट्यानें उभें राहण्यास सांगितलें, आणि अंगणांतील त्या मोठ्या दगडांपैकीं एका दगडावर दगडानें रेघ ओढीत म्हणाली–"एक दिवस सासूबाईनीं असें केलें. दुसऱ्या दगडावर दुसरी रेघ ओढीत आणखी एक दिवस असें केलें आणि तिसऱ्या दगडावर रेघ ओढीत आणखी एक चूक सांगितली. रेघा बोट बोट आंत गेल्या होत्या. तें पाहून तर त्या वीराचे डोळेच पांढरे झाले.














ह्या बाईंत कांहीं दैवी शक्ति असली पाहिजे. त्या शिवाय कांहीं दगडावर बोटभर खोल रेघ उठणार नाहीं. तें कांहीं असो आपल्याला कांहीं तरी करून येथून लवकर पाय काढला पाहिजे. हे विचार त्याच्या मनांत घोळत होते. तोंच तिनें त्याला प्रश्न केला. म्हणाली–"सांग आतां, मी ज्या गोष्टी सांगितल्या त्यांत चूक कोणाची वाटते तुला?"

"तुम्ही सांगितलेल्या सर्व गोष्टींत तर आपल्या सासूचीच चूक आहे हें स्पष्टपणें दिसत आहे. त्यांत संशय करण्याची गरजच नाहीं." प्रवासी म्हणाला.

"झालं तर मग. पटली ना तुमची खात्री? मला तेंच पाहिजे होतें. उगीच नको कोणाचा गैरसमज व्हायला." असें म्हणत ती उठली.

घरांत गेली पाहुण्यासाठीं अंथरुण पांघरूण घेऊन आली. बाहेरच्या ओसरीवर घालून दिलें. नंतर घोड्याला नीटपणें दगडाला बांधून त्याला दाणापाणी दिलें. त्याच्या पाठीवरून हात फिरविला. नंतर पाहुण्यास निजावयास सांगून ती आंत निघून गेली.

अंथरुणावर पडतां पडतां त्यानें सुटकेचा एक श्वास सोडला. मनांत म्हणाला–"आहे खरी राक्षशीण. काय करील सासू बिचारी हिच्या पुढें. आतांच्या अनुभवावरून कान धरला कीं पुन्हां कोणाच्या भानगडींत पडतां कामा नये."

तो थोडा वेळ अंथरुणावर पडून राहिला. त्याला झोंप कांहीं लागेना. शेवटीं उठला व हळूंच बाहेर पडला. आपला घोडा घेतला आणि फाटका बाहेर गेला. आपण येथून सही सलामत सुटलों म्हणून परमेश्वराचे आभार मानले. घोड्यावर स्वार झाला आणि त्याला टांच मारून पसार झाला.






# शाहणा घोडा

पाळीव जनावरांमध्यें घोडा हुशार आणि समजूतदार प्राणी म्हणून समजला जातो. कुत्र्याप्रमाणें सदोदित सेवा करण्याची त्याला संधि मिळत नाहीं. तरी संधि मिळतांच त्याची बुद्धि काम करते. अमेरिकेंतील लोकांनीं जेव्हां इंग्रजांविरुद्ध बंड पुकारलें त्या वेळच्या युद्धांतली ही गोष्ट आहे.

अमेरिकेंतील कनेटिकट राज्यांत मोजेस गुडदेन नांवाचा एक मुलगा होता. त्याच्या जवळ एक लाल रंगाचा घोडा होता. त्याचें नांव होतें जेनी. तो मोठ्या प्रेमानें त्याला कांहीं कांहीं शिकवीत असे आणि त्याची अमी सेष्टर नांवाची एक समवयस्क मैत्रीण होती तिला, तें दाखवीत असे. तीं दोघें फार कौतुक करीत त्या घोड्याचें.

मोजेस बारा वर्षांचा होता. तेव्हां एकदां त्यानें आपल्या घोड्याला चाबकाच्या तालावर पुढील दोन्हीं पाय उचलून नाचायला शिकविलें.

घोडे बँडच्या आवाजावर किंवा दुसऱ्या मैदानी वाद्य संगीताच्या आवाजावर तालांत मान हलवून आणि पावलें टाकून साथ देत असलेले आपण पाहातों. घोड्यांच्या नाचा बाबत अमीला कांहीं माहीत नसल्यानें ती मोजेसला म्हणाली–"तूं मोठा झालास म्हणजे ह्या घोड्याला सरकशींत पाठव. म्हणजे तो जगभर हिंडून येईल."

तो घोडा खरोखरच सर्कशींत पाठविण्याच्या लायकीचाच होता. मोजेसनें त्याला सरकशींत पाठविलें नाहीं. पण त्याच्याकडून त्याहून जास्त महत्वाचें काम करून घेतलें.

कांहीं वर्षें लोटलीं. अमेरिकेंतील तेरा राष्ट्रांनीं स्वातंत्र्याची घोषणा केली. अर्थातच ब्रिटिशांच्या बरोबर युद्ध सुरू झालें. ह्या












युद्धांत अमेरिकन सैन्याचा सेनापति जॉर्ज वॉशिंगटन होता. अमीचे वडील सैन्यांत होते. मोजेस सुद्धां भर्ती झाला. थोड्याच दिवसांत तो लेफ्टनंट झाला. स्त्रियांबरोबर अमी लोकरीचे कपडे तयार करून सैनिकांना मदत करीत असे.

मोजेसला सैनिकांना कवायत शिकविण्याचें काम करावें लागे. त्यामुळें घोड्यावर बसून इकडे तिकडे भटकावयाला त्याला फार कमी वेळ मिळत असे.

सन् १७७७ मध्यें थंडीच्या सुमारास वॉशिंगटनच्या सैन्यांत अन्नवस्त्राची फार तूट भासूं लागली. त्यामुळें बरेच सैनिक आजारी पडले. वॉशिंगटन काळजींत पडला.

त्याला मदत करण्यासाठीं हार्टफर्डच्या लोकांनीं वर्गणी गोळा करण्यासाठीं फंड उभा केला. हें सारें धन वाली फोर्ज नांवाच्या ठिकाणीं पोहोंचवावयाचें होतें. पण तें काम म्हणजे एक दिव्यच होतें. मोजेसनें त्याची जबाबदारी आपल्यावर घेतली. पैसे घेऊन तो निघाला. जाण्यापूर्वी तो अमीला भेटावयाला गेला. मोजेसचें तें साहस पाहून तिला बरें वाटलें. तरी मनांत एक शंका होती, तो निर्विघ्नपणें ह्या संकटांतून कसा काय पार पडेल. म्हणाली—"घोड्यावर एवढें सोनें चांदी लादून एकटा जात आहेस. समज वाटेंत तुला लाल डगलेवाल्या इंग्रजांनीं पाहिलें तर!"

"तें संकट तर आहेच. परंतु पैसे पोहोंचविणें सुद्धां तितकेंच महत्वाचें आहे. कांहीं तरी युक्ति करून मार्ग काढावयाचा आहे." मोजेस म्हणाला.

मोजेसनें त्याला कोणी ओळखूं नये म्हणून साधे कपडे घातले होते. पण तो घोडा इतका चांगला होता कीं सहज त्याच्यावर कोणाचीहि नजर पडली असती.



अमी म्हणाली सुद्धां—"लाल डगलेवाल्यांनीं पाहिलें तर हा घोडा जरूर ओढून घेऊन जातील."

"त्या साठीं जेनीला तयार केलें आहे. आलेंच तसें संकट तर त्याच्यावर भरंवसा." मोजेस म्हणाला.

अशा तऱ्हेनें अमीचा निरोप घेऊन मोजेस निघाला. वाटेंत त्याला एक नदी लागली. तिच्या किनाऱ्या किनाऱ्यानें जात असतां घोड्याचें व त्याचें अंग चिखलानें भरलें. नंतर तो पुन्हां सरळ वाटेनें जाऊं लागला.

ह्या प्रवासांत त्याला त्याच्या पक्षांतील लोकांच्या कडेच मुक्काम करावयाचा होता. त्या लोकांची यादी मोजेस जवळ होती. सोइस्कर ठिकाणीं मुक्काम करीत तो चालला होता.

एक दिवस निर्विघ्नपणें पार पडला. दुसऱ्या दिवशीं लाल डगलेवाल्यांच्या सैन्याच्या तुकड्या त्याला दोन वेळां दिसल्या. त्यावेळीं तो लपून बसला. एका वेळीं पुलाच्या खालीं आणि दुसऱ्या वेळीं गवताच्या गंजीच्या पाठीमागें. सुदैवानें ह्या दोन्ही वेळां कोणाचीच दृष्टि त्याच्याकडे वळली नाहीं.



रात्र होईपर्यंत आपल्या मुक्कामाच्या ठिकाणीं आला. तें एक हॉटेल होतें. त्याचें नांव 'वेल अँड कॅंडल' असें होतें. त्याचा मालक स्वातंत्र्यवादी पक्षांतील असल्यामुळें मोठ्या सावधगिरीनें मोजेसची सोय करण्यांत आली. त्यांतून विशेष सोय करण्याचें कारण म्हणजे त्याच हॉटेलांत दोन इंग्रज सैनिक अधिकारी उतरले होते.

हॉटेलच्या मालकानें जेनीला सर्व घोड्याबरोबर न बांधतां वेगळ्याच तबेल्यांत बांधावयास सांगितलें होतें. त्या घोड्याच्या अंगावर चिखल उडाला असला तरी त्याची

चांदोबा









जात कांहीं लपत नव्हती. तो चटकन कोणाच्या नजरेस पडूं नये व बदलला जाऊं नये म्हणून मालकानें त्याची फार काळजी घेतली होती.

सर्व सैनिक अधिकारी व मोजेस जेवायला एकदमच बसले. त्यांनीं त्याला पाहिलें, पण त्यांना कांहीं संशय आला नाहीं. रात्रीं झोपतांना मोजेस आपला थैल्या उशाखालीं घेऊनच झोपला होता.

चौथ्या दिवशीं दुपारीं मोजेस न्यूयार्क शहरीं येऊन पोहोंचला. तेथें एका रस्त्यांतून जात असतां एके ठिकाणीं तो पुढील रस्ता विचारण्यासाठीं म्हणून थांबला. तेवढ्यांत समोरच्या घरांतून दोन लाल डगलेवाले बाहेर पडले. त्यांपैकीं एकानें जेनीचा लगाम धरला आणि म्हणाला—"माझ्या तट्टापेक्षां हें घोडं चांगलें आहे." "माझ्या घोड्यापेक्षां सुद्धां चांगला दिसतो आहे रे!" दुसऱ्यानें दुजारा दिला. "आपण ओली सुकी करून ठरवूं या घोडा कोणी घ्यावयाचा तें."

मोजेस मंद स्मित करून म्हणाला—"तुम्ही फंसाल हें घोडं घेऊन! फार वाईट जात आहे."

"आम्हांला फसवूं नकोस. आम्हांला घोड्याची पारख आहे." एक जण म्हणाला.

"हा मध्येंच केव्हां तरी बिथरतो. त्या-वेळीं तो मला सुद्धां पाडून टाकतो. तुम्हीं सरकारी नोकर!" मोजेसनें अगदीं साधेसुदें उत्तर दिलें.

"उगीच गप्पा मारूं नकोस. उत्तर घोड्यावरून अगोदर." एका सैनिकानें पकडून म्हटलें.

मोजेस निरुपाय म्हणून उतरला. सारें सामान काढून घेतलें आणि जेनीला कांहीं तरी खूण केली. शिपाई घोड्यावर बसला व त्याचा लगाम ओढला. त्या-बरोबर तो जो भरधांव सुटला तो थांबलाच नाहीं आणि पुढें जाऊन एके ठिकाणीं एकदम थांबला त्यामुळें शिपाई जमिनीवर पडला. भोंवती गर्दी जमा झाली. तेवढ्यांत तेथें त्या शिपायाचा साथीदार आला. त्यानें देखील घोड्याला पाहण्यासाठीं त्याच्यावर टांग टाकून टांच मारली. घोड्यानें त्याला एक गटारच दाखविलें. त्याला मोजेसचा खूप राग आला. म्हणाला—"लक्षांत ठेव, पुन्हां जर का घोडा घेऊन आमच्या नजरेस पडलास तर तुझी चामडीच सोलवीन."













संकट तर टळलें होतें. मोजेसनें आपल्या घोड्याचा लगाम हातीं धरला. कोणी पाठलाग करीत नाहीं असा विश्वास वाटल्यावर मग तो घोड्यावर बसला. गल्लींतून वळणें घेत घेत तो शहराच्या बाहेरील रस्त्यास लागला. तो दुसरे दिवशीं दुपारीं सैनिकी शिबिरांत जाऊन पोहोंचला.

वॉशिंगटन आपल्या सैन्याला धीर देऊन कसें तरी त्यांचें समाधान करीत होता. परंतु आंतून त्याला खर्चाची काळजीच लागून राहिलेली होती. मोजेसनें त्याच्याकडे पैसे पोंचते करून त्याला नमस्कार केला व उलट्या पावलीं परत फिरण्याच्या विचारांत होता. तोंच वॉशिंगटननें त्याला थांबावयास सांगितलें. त्याची चौकशी केली. सर्व सैनिकांसमोर त्याचें कौतुक केलें आणि बक्षीसहि दिलें.

जनतेनें अशा तऱ्हेनें पैसे देऊन ह्या चळवळीमार्गें आपलें पाठबळ व्यक्त केलें, या गोष्टीचा वॉशिंगटनला आनंद झाला. लोकांच्या पाठिंब्यानें सैनिकांत नवा उत्साह आला. मोजेसनें सुद्धां स्वातंत्र्य मिळविल्या-शिवाय परतावयाचें नाहीं असा निर्धार केला.

कांहीं दिवसांनां हें स्वातंत्र्य युद्ध संपलें. वॉशिंगटनचा विजय झाला. सर्व सैनिक आपापल्या घरीं परतले. मोजेसला व त्याच्या घोड्याला सुद्धां वॉशिंगटननें त्यांच्या उत्तम कामगिरी बद्दल इनाम पाठविलें.

पुढें इ.स. १७७९ मध्यें मोजेस व अमी ह्यांचें लग्न झालें. त्यांचा संसार फार सुखाचा झाला. त्यांना बारा मुलें झालीं. मोजेसच्या ह्या कामगिरीची आठवण म्हणून पैसे घेऊन गेलेल्या पिशव्या त्यानें अगदीं जपून ठेविल्या होत्या. आज देखील त्याच्या वंशजांच्याकडे त्या फार काळजीपूर्वक ठेविलेल्या आहेत.



# फोटो जोडनांवें चढाओढ

डिसेंबर १९६० :: बक्षिस १० रुपये




**कृपा करून जोडनांवें पोस्ट-कार्डावरच पाठवावीत.**

वरील फोटोंची ओळख करून देणारीं जोड-नांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठीं पण परस्परांशीं थोडेंफार साम्य दर्शविणारीं असावीत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ५ आक्टोबर १९६० पूर्वीं खालील पत्त्यावर पाठवावीत. पोस्ट-कार्डाशिवाय आलेलीं जोडनांवें स्वीकार-ण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ,**
**चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६.**

## आक्टोबर महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालील जोडनांवें सर्वोत्तम ठरलीं आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होतांच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषकाचें नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो : **दिसतें तसें नसतें !**

दुसरा फोटो : **म्हणूनच जग फसतें !!**

प्रेषक : **श्री. आर. डी. रणपिसे**

C/o एच १८-५ ऑर्डिनन्स फॅक्टरी इस्टेट, पो. अंबरनाथ, जिल्हा ठाणे.



# महाभारत

अर्जुनाला प्राणपणानें युद्ध करतांना पाहून दुर्योधन घाबरला. तो द्रोणाकडे गेला. म्हणाला—"गुरुजी, अर्जुन आपल्या सैन्याची मारकाट करीत जयद्रथाच्या बाजूला चालला आहे. पाहिलेंत ना! वेळेवरच त्याला थोपविलें नाहीं तर अनर्थ होईल व आपले आतांपर्यंतचे सर्व प्रयत्न वायां जातील."

"होय, पण त्याला आतां मी तरी काय करूं! मी त्याला थोपवून धरण्यासाठी येथें आडवा उभा होतो. पण कृष्णानें अर्जुनाचा रथ तिकडे नेला व इकडे मला चुकवून पुढें निघून गेला. अर्जुनाचा पाठलाग करणें शक्य नव्हतें. व्यूह द्वारासमोर जमा झालेल्या पांडव सेनेला थोपविणें मला भाग होतें. तुला काय पाहिजे! मी तुला एक असें कवच देतो कीं तें जोपर्यंत तुझ्या अंगावर असेल तोपर्यंत कोणाच्याहि शस्त्रानें तुला कांहीं अपाय होणार नाहीं तूंच निर्भयपणें पुढें जा आणि अर्जुनाला थोपवून धर." असें सांगून द्रोणाचार्यांनीं मंत्र म्हटला व एक दिव्य सोनेरी कवच त्याला दिलें. कवच घालून सेना घेऊन दुर्योधन अर्जुनाबरोबर युद्धास निघाला.

संध्याकाळ होत आली. अर्जुन जयद्रथा-पर्यंत पोहोंचला नव्हता. अर्जुन नेटानें युद्ध करीत होता आणि कृष्ण वेगानें आपला रथ पुढें पुढें नेत होता. घोडे फार दमले होते. त्यांच्यावर बाणवर्षा होतच होती. तहानेनें व भुकेनें ते कासावीस झाले होते. तरी कृष्णाच्या इशाऱ्यावर ते प्रेतें तुडवीत पुढें चालले होते. त्यांचे पाय थोडे मंदावले होते. ही संधी साधून कौरवांनीं त्याला घेरलें व युद्ध करूं लागले. अर्जुनानें आपल्या बाणांनी त्यांना दूरच थोपवून धरलें.

घोडे दमले आहेत हें पाहून अर्जुनानें त्यांना थोडा विसावा मिळावा म्हणून मध्येंच एका अस्त्रानें जवळ एक सरोवर तयार केलें. बाणांनीं त्याच्या किनाऱ्यावर एक झोपडें उभें केलें. शत्रूला ह्याचें फार आश्चर्य वाटलें. कौतुक करीत ते युद्ध बंद करून गंमत पहात उभे राहिले. कृष्णानें रथाचे घोडे सोडले. त्यांच्या शरिरांत घुसलेले बाण काढले, जखमा धुतल्या. त्यांना दाणापाणी दिलें व पुन्हां रथाला जुंपलें. तोंपर्यंत अर्जुन जमिनीवर उभा राहून शत्रु सैन्याशीं लढत होता. क्षणार्धांत अर्जुन रथांत बसला आणि पुढें निघाला.



ताज्या दमानें निघालेले घोडे वायुवेगानें कौरवांनीं जयद्रथाला ज्या जागीं लपवून ठेविलें होतें तेथपर्यंत जाऊन पोहोंचले.

अर्जुनाची जयद्रथाशीं दृष्टादृष्ट होतांच कौरव घाबरले. दुर्योधनानें दिव्य कवच धारण केलें असल्यानें तो एकटाच त्याच्याशीं लढूं लागला. दुर्योधनाचे बाण लागून अर्जु-नाला पुष्कळच जखमा झाल्या. परंतु अर्जु-नाच्या बाणांनीं दुर्योधनाला कांहींच झालें नाहीं. शेवटीं अर्जुनानें दुर्योधनाचे बाणच अडविण्यास सुरवात केली. त्याचे घोडे व सारथी यांच्यावर बाण सोडून त्यांना मारण्याचा प्रयत्न केला.

तिकडे व्यूहाच्या द्वाराशीं द्रोणाचार्य पांड-वांशीं लढतच होते. त्यांत भीम आणि अलम्बस राक्षस यांचें भयंकर युद्ध चाललें होतें. प्रथम अलंबसानें भीमाला मूर्छित केलें. पण शुद्धीवर येतांच भीमानें त्या राक्षसाचा समाचार घेतला. तो तेथून पळून गेला. पण भीमाचा मुलगा घटोत्कच याच्याशीं त्याला युद्ध करावें लागलें. दोघेहि राक्षस. मग काय

त्यांचें युद्ध छान रंगलें, आणि शेवटीं त्यांत अलंबस मारला गेला.

युधिष्ठिराचें सारें लक्ष अर्जुनाकडे लागलें होतें. तो चिंतातुर होऊन सात्यकीला म्हणाला—" अर्जुन सकाळपासून शत्रु सैन्यांत घुसलेला आहे. अजून परतला नाहीं, काय झालें आहे कोण जाणें. तूं जरा पाहून तरी ये."

सात्यकीनें युधिष्ठिराच्या रक्षणाची जबाबदारी भीमावर सोडली आणि रथ घेऊन गेला. झपाट्यानें जात असतां द्रोणानें त्याला अडविलें. म्हणाला—" अरे, तुझा गुरु अर्जुन सुद्धां युद्ध केल्याशिवाय नुसती प्रदक्षिणा करूनच पुढें गेला. तूंहि तेंच कर. नाहींतर फुकट मरशील."

सात्यकीनें प्रसंग ओळखून व द्रोणाचार्यांशी युद्ध करून वेळ फुकट घालविण्यांत अर्थ नाहीं असा विचार करून म्हटलें—" बरोबर आहे आपलें म्हणणें. गुरूच्या पदचिन्हांचें अनुसरण करणें हा शिष्याचा धर्म आहे." असें म्हणत तो निसटला. पण आपलें सैन्य कृतवर्म्याला सोपवून द्रोण त्याच्या मागें धांवला.

सात्यकीनें जातां जातां वाटेंत एक गजदल उधळून लावलें. मगध देशाचा राजा जलसिन्धु याचा नाश केला. दुःसह, विकर्ण, चित्रसेन, दुर्मद, सत्यव्रत वगैरे कौरव वीरांनीं सात्यकीला घेरलें. त्या सर्वांना सात्यकीनें मागें हटविलें. तेवढ्यांत दुर्योधन पुढें आला. त्याला आपल्या नवीन कवचाचा अभिमान वाटत होता. पण सात्यकीनें त्याला पळवून लावलें. कृतवर्म्यास घायाळ केलें. त्याचें शरीर रक्तबंबाळ झाल्यानें तो रथावरून खालीं कोसळला.





# समुद्रमंथन

देवदानवांमध्यें झाली
चढाओढ मग चुरशीची।
कोण पोंचतो सागरतीरीं
पहिल्यानें या गोष्टीची ॥

पार करित नद, नद्या नि डोंगर
पायीं चालत दिवस अनेक,
करीत कौतुक सर्व धांवले
समोर दिसतां पर्वत एक ॥

शिखर तयाचें उन्नत पाहुनि
विचार केला सर्वांनीं,
चढुन पाहुं या किती दूर तरि
आहे सागर डोळ्यांनीं ॥

सुमेरु पर्वत नांव तयाचें,
त्यावर चढले सर्व मिळून।
क्षीरोदधिच्या दिसल्या त्यांना
लाटा सुंदर उंच दुरून ॥

रम्य रूप तें क्षीरोदधिचें
पाहुनि झालें चित्त प्रसन्न।
अफाट होतें पात्र तयाचें,
चित्त जाहलें म्हणून खिन्न ॥

खचला त्यांचा धीर पाहुनी
क्षीरोदधिचा तो विस्तार।
त्यांस वाटलें अपुला आतां
अशक्य होणें हेंनु पार ॥

बली म्हणाला—" इंद्रा, वदरे,
घुसळणार या कोण कसा?
पर्वत शिखरें गिळून टाकिल
क्षीरोदधि हा खोल असा ॥

रवी कशाची, दोरी कसली,
कसें समुद्राचें मंथन?"
इंद्र म्हणाला—" मंदर पर्वत,
त्यानें करूं याचें मंथन।

शेषनाग मग इंद्रा वदला–
"बोल काय ठरलें आतां?
लवकर गेलें पाहिजे मला
काम जाहलें का आतां?"

इंद्र म्हणाला–"तव रूपें प्रभु,
रवी लाभली उपयोगी।
समुद्रमंथन करतां आतां
निघेल अमृत उपयोगी॥"

शेषनाग तें ऐकुनि हंसला
आणि म्हणाला–"सर्व खरें!
रवीस मोठ्या दोरी मोठी
नको पहाया काय बरें?"

सुचलें नाहीं उत्तर इंद्रा,
उभा राहिला तसाच मौन।
थोड्या वेळानें मग वदला–
"तूंच सहाय्या, दुसरा कोण?"

त्यास म्हणाला शेषनाग–"पण
नाहीं मजला आतां वेळ।
आता माझा वासुकि त्याच्या
डाव्या हाताचा हा खेळ!

"पूर्ण करिल तो इच्छा तुमची,
होइल दोरी रविची तो।
भेटा जाउन पाताळीं त्या
मान्य करिल हें निश्चित तो॥"

झाला सांगुन आदिशेष हें
त्याच क्षणाला अंतर्धान।
इंद्र पोंचला वासुकीकडे
त्यानें दिधला त्याला मान॥

कारण येण्याचें ऐकुनिया
मान्य वासुकीनें केलें।
आदर पूर्वक त्यास बरोबर
घेउन देवासुर गेले॥






नर्मदा नदीच्या कांठीं धवल राज्य नांवाचें एक राज्य होतें. तेथें तारकेश्वर नांवाचा राजा राज्य करीत असे. त्याला दोन मुलें होतीं. थोरल्याचें नांव शूरसेन होतें व धाकट्याचें चित्रसेन. शूरसेनाचें वय पंचवीस वर्षांचें होतें, चित्रसेनाचें अठरा वर्षांचें.

दोघे राजकुमार एके दिवशीं सकाळीं आपल्या मित्रमंडळींबरोबर शिकारीला रानांत गेले. रानांत त्यांना हरणांचा एक कळप दिसला. त्याचा पाठलाग करीत दोघे खोल रानांत गेले.

एका जागीं त्यांना झाडींत सिंहगर्जना ऐकूं आली. अर्थातच हरिणांकडचें लक्ष सिंहगर्जनेकडे गेलें. आवाजाच्या रोखानें ते बाण सोडण्याच्या विचारांतच होते, पण तेवढ्यांत दोन सिंह उड्या मारीत त्यांच्या समोर येऊन दाखल झाले. त्यांना पाहून दोघांचे घोडे बिथरले व उलट्या दिशेनें भर-धांव पळूं लागले.

चित्रसेनानें घोड्याला आवरण्याचा पुष्कळ यत्न करून पाहिला. परंतु घोडा वाट फुटेल तिकडे पळूं लागला. पळत पळत तो एका डोंगराळ प्रदेशांत पोंचला. एका जागीं त्याचा पाय घसरला आणि मालक जमिनीवर पडला. परंतु त्याचें नशीब बलवत्तर होतें. कारण तो पडला म्हणूनच वांचला; नाहींतर
















घोड्याबरोबर तो एका खोल दरींत जाऊन पडला असता.

चित्रसेनानें घोड्याचा पुष्कळ शोध केला पण घोडा सांपडला नाहीं. शेवटीं निराश होऊन तो एका दरींत ओढ्याच्या काठीं येऊन बसला. ओढ्याचें पाणी प्याल्यावर त्याला थोडी हुशारी वाटली.

त्याला त्याचा भाऊ कोठें दिसला नाहीं. त्यानें विचार केला, तो देखील आपल्या सारखाच कोठेंतरी अपरिचित जागीं पोंचला असावा. त्याची व त्याच्या घोड्याची अशीच ताटातूट झाली असावी. तो त्याच्या व माझ्या शोधार्थ हिंडत असावा. तें एक भयंकर मोठें रान होतें. झाडी इतकी दाट होती कीं दिवसांसुद्धां संध्याकाळ-सारखा काळोख चहूंकडे पसरला होता. झाडांवर निरनिराळ्या प्रकारचीं माकडें उड्या मारीत होतीं. चित्रविचित्र रंगाचे पक्षी व कधीं न ऐकलेलें असें त्यांचें ओरडणें ऐकून साधारण माणसाला भीतीच वाटा-वयाची. एक दोन ठिकाणीं मोठमोठे अजगर झाडाच्या फांद्यांना विळखा घालून खालीं लोंबकळत असलेले दिसले.

आपण मनुष्यवस्ती पासून फार दूर कोठेंतरी आलों आहों, असें त्याला वाटलें. आतां स्वदेशीं कसें पोंचावयाचें ! कोणत्या दिशेनें गेल्यास आपण स्वदेशीं पोहचूं ! त्याला कांहींच कळेना.

थोडा वेळ याच विचारांत तो गढून गेला. त्याला पुन्हां आपल्या भावाची आठवण झाली. कदाचित तो इकडेच आला नसेल कशावरून ! तो जवळच कोठेंतरी असेल व माझ्याविषयीं काळजी करीत बसला असेल तो विचार मनांत येतांच तो ताडकन उभा राहिला आणि मोठ्यानें हाक मारली—

"दादा ! शूरसेन....!"





चित्रसेनाचा आवाज त्या दरींत घुमघुमला. कांहीं उत्तर येईल अशी चित्रसेनाला अपेक्षा होती आणि आश्चर्य म्हणजे त्याचें उत्तर ओढ्यापलीकडच्या डोंगरांतून आलें—"कोण तूं ! तूं मनुष्यच का बोलत आहेस ! किती भाग्यवान आहेस ! जरा इकडे माझ्याकडे आलास तर !" त्याला असा एक आवाज ऐकूं आला.

चित्रसेनानें जरा निरखून पाहिलें. पण त्याला कोणी मनुष्य दिसला नाहीं. पण पलीकडच्या डोंगरांत त्याला एक गुहा दिसली. तिच्या आंतून तो आवाज आला असावा, असा विचार करून त्यानें जरा धीर करून विचारलें—"हें बोलणारा तूं कोण ! राक्षस की नरभक्षक मनुष्य ! गुहे-च्या बाहेर ये, मी तुला माझ्या तलवारीचें पाणी पाजणार आहें."

चित्रसेन बोलतच होता, उत्तरादाखल त्याला गुहेंतून कोणीतरी हंसत असल्याचा भास झाला. त्या पाठोपाठ कोणीतरी म्हटलें—"अरे ! तूं कोणीतरी साहसी वीर दिसतो आहेस ! मी तुझ्या सारख्या शूर बहाद्दरा-चीच इतके दिवस वाट पहात होतों. मी नरभक्षक मनुष्य किंवा राक्षस नाहीं. मी एक सिद्धयोगी आहें. मी एक अद्भुत वस्तु तुला देणार आहें. कित्येक वर्षांच्या तपस्येनंतर मला त्या वस्तूचा लाभ झाला आहे. पण तिचा मला आतां कांहीं उपयोग नाहीं."

चित्रसेन आतां जास्त वेळ विचार करीत उभा राहिला नाहीं. त्या गुहेंत कोणी राक्षसच असेल तर त्याच्या हातून सुटका मिळणें अशक्यच आहे. त्यापेक्षां त्याच्याशीं दोन हात करून मरण्यांत भूषण आहे. आणि जर गुहेंत कोणी सिद्धपुरुषच असेल तर मला त्याच्या पासून कांहींच इजा होणें



शक्य नाहीं. चित्रसेन म्यानेंतून तलवार काढून ओढा पार करून पलीकडच्या डोंगरांत गेला. डोंगरांत त्याला पुष्कळ गुहा दिसल्या. ह्यांपैकीं आपल्याला बोलावणारा कोणत्या गुहेंत असेल हें कळायला मार्ग नव्हता. म्हणून तो प्रत्येक गुहेंत डोकावून पहात पुढें जाऊं लागला. एका गुहेंत डोकावल्याबरोबर त्याला आंतून प्रेमळ आवाज ऐकूं आला—"बाळ! ये आंत! भिण्याचें कारण नाहीं तुला."

चित्रसेनानें तलवारीची मूठ जास्त घट्ट धरली आणि गुहेंत पाऊल टाकलें. त्याला आंत खरोखरच एक सिद्धपुरुष दिसला. त्याचे सर्व केस पिकलेले होते. तो गुहेंत एका दगडावर व्याघ्रचर्म टाकून बसला होता. गुहेंत छप्पराच्या भोंकांतून सूर्याचा प्रकाश येत होता.

त्या सिद्धपुरुषाला पाहून चित्रसेनाला स्वतःवरच राग आला. आपण या सिद्धपुरुषाशीं तसें उद्धटपणानें बोलावयास नको होतें. त्यानें तलवार म्यानेंत ठेवली व त्या योग्याला आदरपूर्वक नमस्कार केला. म्हणाला—"महात्मा! क्षमा करावी!"

तें ऐकून तो योगी थोडा हंसला. म्हणाला—"तुझा विनम्रपणा पाहून मला फार आनंद झाला. मरणापूर्वीं कोणी योग्य पुरुष भेटावा, असें वाटत होतें. देवाच्या कृपेनें ती इच्छा-पण पूर्ण झाली. मी साठ वर्षें तप करून एक अपूर्व वस्तु मिळविली आहे. ती वस्तु मी तुला देणार आहें. त्याचा उपभोग घेणें मला शक्य नाहीं. पण तुला तिचा उपयोग होणें शक्य आहे. ही घे!" असें म्हणत त्यानें चंद्रसेनासमोर एक बांबूची टोपली ठेवली.

चित्रसेन ती टोपली घेऊन उघडूं लागला. पण योगी म्हणाला—"थांब, तूं ती येथें नको



उघडूस. तूं जेथें कायमचें राहण्याचें ठरविशील तेथेंच जाऊन ही टोपली उघड."

चित्रसेनानें संमतीसूचक मान हलविली व म्हणाला—"महात्मन्! मी आपला अत्यंत आभारी आहें. आपण सांगाल ती सेवा करण्यास तयार आहे."

म्हातारा हंसला व म्हणाला—"आतां मी कांहीं तासांचाच पाहुणा या जगांत आहें. आज चंद्राच्या अस्ताबरोबर माझी जीवनयात्रा पण पूर्ण होणार आहे. मग तूं माझी काय सेवा करणार व मी तरी तुझ्याकडून काय सेवा घेणार! पण एक काम सांगतों. तूं गुहेंतून बाहेर जातांना गुहेच्या तोंडाशीं जो त्रिकोणाकृति दगड आहे तो थोडा ओढून तोंडावर ठेव."

चित्रसेनानें त्या सिद्धपुरुषास नमस्कार केला आणि गुहेच्या बाहेर येऊन दोन्ही हातांनीं त्यानें तो दगड ओढला. त्या बरोबर इतका मोठा आवाज झाला कीं चित्रसेन दचकला. त्यानें वळून पाहिलें तर तेथें गुहेचें द्वार होतें, असें कोणास वाटणार देखील नाहीं असें दिसूं लागलें.

चित्रसेन तेथें कांहीं वेळ उभा राहिला. नंतर ओढा पार करून पुन्हां रानांत वाट



काढीत चालूं लागला. स्वदेशी जाण्याची वाट त्याला मिळणेंच शक्य नव्हती. पाय नेतील तिकडे तो जात होता. कांहीं वेळ चालल्यानंतर त्याला पश्चिमेकडे सूर्य अस्ताचलाकडे जात असल्याचें दिसलें. त्याला फार भूक लागली होती.

एका जागीं त्याला एक मोकळी जागा दिसली. ती जागा थोडी उंच डोंगरावर होती. तेथें झाडी वेताची होती. तेथें तो कांहीं वेळ विचार करीत बसला. तेव्हां त्याला त्या टोपलीची आठवण झाली. त्या टोपलींत काय बरें असेल! उघडून पाहूं या. इच्छा

इतकी अनावर झाली कीं त्या सिद्धपुरुषानें त्याला जी सूचना केली होती त्याची आठवण तो पार विसरून गेला.

त्यानें टोपली काढून समोर ठेवली व उघडून आंत काम आहे हें पाहिलें. त्याला वीज कडाडल्यासारखें भासलें. त्याचे डोळे दिपून गेले आणि कानठळ्या बसल्या. त्यानें डोळे घट्ट बंद करून घेतले. थोड्या वेळानें डोळे उघडून पाहातो तों समोर त्याला एक गगनभेदी महाल दिसला.

तें आश्चर्यजनक दृश्य पाहून चित्रसेन चित्रवत् थोडा वेळ पहात उभा राहिला. त्याच वेळीं त्याला सिद्धपुरुषानें ती टोपली देत असतां सांगितलेली गोष्ट आठवली. मी किती मूर्खपणा केला हा! या अरण्यांत या सुंदर महालांत कोण राहणार! हाच धवल नगरांत असता तर सर्व प्रजेनें याचें कौतुक केलें असतें. परंतु आतां पश्चात्ताप करून काय उपयोग!

त्याच वेळीं त्याला रानांतून एक भयंकर "हुंकार!" ऐकूं आला. त्याचें सर्व अंगहादरून गेलें व अंगाला घाम सुटला. वादळ आलें म्हणजे जशीं झाडें हलूं लागतात तसें सर्व रान हलूं लागलें. आश्चर्यानें तो तिकडे



पाहूं लागला. तेव्हां त्याला एक महा भयंकर राक्षस येत असलेला दिसला. तो दोन्ही हातांनी वाटेंतली झाडें उपटून टाकीत होता. चित्रसेन म्यानेंतून तलवार काढून समोर उभा राहिला.

राक्षस मोठ्यानें हंसून म्हणाला—"अरे माणसाच्या पिला! तुझें साहस तर अजब दिसतें आहे. या उग्राक्षासमोर येतांच बेशुद्ध होऊन पडणारे मी पाहिले आहेत. तूंच एक तलवार उपसून समोर उभा राहिला आहेस." मागें वळून त्या जादूच्या महालाकडे बोट दाखवीत तो पुढें म्हणाला—"हें घरकुल कोणाचें? तूंच येथें बांधलेंस वाटतें?"

चित्रसेन म्हणाला—"होय!"

तें उत्तर ऐकून उग्राक्ष मोठ्यानें हंसला. त्याच्या त्या हंसण्यानें सारें रान हादरलें व झाडाचीं पानें गळून पडली. "हें जंगल तुझ्या बापाचें आहे असें वाटलें होय तुला! खबरदार! हें उग्राक्षाचें जंगल आहे हें विसरूं नकोस. तूं माझ्या आज्ञेशिवाय येथें हा आपला महाल बांधला आहेस. त्याबद्दल मी तुला यमलोकास पाठवितों व तुझा हा महाल एका क्षणांत मी दूर उचलून फेंकून












देतों, पहा!" असें म्हणत तो चित्रसेनाला धरण्यासाठीं पुढें सरसावला.

चित्रसेन मागें सरकत म्हणाला— "उग्राक्ष! अशी घाई करूं नकोस. जरा विचार कर. मी येथें घर बांधल्यानें तुझें कांहीं नुकसान झालें आहे का सांग! तुला पाहिजे तर तूं हें घर स्वतःसाठीं ठेवून घे. माझी ना नाहीं."

"ही सर्व लटपट माझ्याजवळ चालणार नाहीं. तूं माझ्या आज्ञेबगैर हें घर येथें बांधलें आहेस. तुला जगायचेंच असेल तर तुला एका अटीवर मी सोडायला तयार आहें." उग्राक्ष म्हणाला.

"कोणती अट!" चित्रसेनानें विचारलें.

"तूं या घरांत राहालास तरी माझी हरकत नाहीं. तुला मुलें झालीं म्हणजे आणि त्यानंतर मोठा मुलगा अठरा वर्षांचा झाल्यावर त्याला माझ्या स्वाधीन कर!" उग्राक्ष म्हणाला.

राक्षसाची ही इच्छा चित्रसेनाला विचित्रच वाटली. अजून आपलें लग्न देखील झालेलें नाहीं व या जंगलांत राहून लग्न कोठून होणार! स्वदेशीं गेलों तर याच्या राज्याच्या बाहेर आपण जाऊं. म्हणून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं राक्षसाची ही अट मान्य करण्यांत काय हरकत आहे! असा विचार करून चित्रसेन म्हणाला—"उग्राक्ष! मला तुझी अट मान्य आहे. माझ्या मोठ्या मुलाला अठरावें वर्ष लागलें कीं तूं खुशाल त्याला उचलून घेऊन जा."

तें ऐकून राक्षसाला परमानंद झाला. "बरें तर मी तुला जीवनदान देतों. आपल्या वचनाचें पालन कर. विसरूं नकोस." असें सांगून राक्षस रानांत निघून गेला. (पुढें चालू)





# वाढ-दिवस



उद्यां नरकचतुर्दशी असल्यामुळें अदल्या दिवशींच संध्याकाळीं गोपाळची ताई व मेहुणे गांवाहून आले.

"बघ, कोण आलें आहे गोपाळ!" आईनें बोलाविलें. परंतु पांच वर्षांचा गोपाळ जागेवरून हलला नाहीं. अंथरुणावर लोळत पडून राहिला. इतरांची नजर चुकवून कोण आलें आहे हें पहात होता.

"कोठें आहे गोपाळ!" वडिलांनीं विचारलें. "गोपाळ! ए गोपाळ!" वडिलांनीं हाक मारली.

"मी नाहीं येत!" गोपाळ म्हणाला.

"रुसली आहे वाटतें स्वारी!" मेहुणे म्हणाले.

"तें कांहीं विचारूं नका. राग कसा अगदीं सदोदित नाकावर बसलेला असतो." आई म्हणाली.

"काय, करतो आहे काय पण!" ताईनें विचारलें.

"कांहीं नाहीं. यंदा तारखे प्रमाणें त्याचा वाढ दिवस दिवाळीच्या दिवशींच आला आहे. म्हणून दोन्ही एकांत एक करून टाकण्याचा विचार आहे माझा. म्हणून स्वारीचें बिनसलें आहे." आई थट्टेंत म्हणाली.

"बरोबर आहे." मेहुणे म्हणाले.

"तें कांहीं नाहीं. माझा वाढदिवस वेगळा करायचा." असें म्हणत गोपाळ पुढें आला.

तो रागावलेला आहे हें पाहून बहिणीनें जवळ बोलाविलें, तरी तिचा हात हिसकावून तो दूर गेला.





"बरं मग असं करूं या. उद्यां तुझा वाढदिवस आणि परवां दिवाळी." मेहुणे म्हणाले.

"अंऽऽहं! तें नाहीं. मग नरक चतुर्दशी?" गोपाळनें विचारलें. म्हणजे एक दिवसाचे फटाके आणार, नवे कपडे आणार आणि लाडूकरंज्या आणार असा त्याच्या म्हणण्याचा हेतू होता.

"हं! हं!! आतां आलं लक्षांत. तूं उद्यां दोन दोन नवे शर्ट चड्डी घाल. मग झालं कीं नाहीं!" बहीण म्हणाली.

"एवढेंच? छे! तसें नाहीं बोवा. ताईच्या हातची दोनदां आंघोळ चुकेल ती? दोनदां तेल लावून आंघोळ करायची आणि मग दोनदां नवे कपडे घालावयाचे." मेहुणे म्हणाले.

"आणि जेवण सुद्धां दोनदां जेवलें पाहिजे, बरं का हो महाराज!" बहीण म्हणाली.

सर्व खोखो करून हंसूं लागले. सर्व आपली थट्टा उडवीत आहेत हें पाहून गोपाळ जास्तच फुगला.

नाहीं! नाहीं!! तें कांहीं नाहीं." तो म्हणाला.

"मग काय? तूंच सांग काय करायचें तें." वडिलांनी विचारलें.

"दोन्हीं वेगळे वेगळे करायचे एक दिवस वाढदिवस आणि दुसऱ्या दिवशीं सण" तो फणकाऱ्यानें म्हणाला.

"निरनिराळे म्हणजे काय! तूंच सांग बरं, काय करायचें तें." आईनें विचारलें.

काय सांगावें हें न सुचल्यामुळें गोपाळ कांहीं बोलला नाहीं. त्याला दिवाळीवरच राग आला होता. नेमकी वाढदिवसाच्या दिवशींच ती कां बरें आली! हा अन्याय आहे. पण तोंड काय! त्याला सुचेना.





"अरे आम्ही या वेळीं तुझ्या वाढदिवसासाठींच आलों आहोंत. दिवाळी साठीं नाहीं." बहीण म्हणाली.

"ऐट आहे बरं का एका माणसाची. अगदीं थाटांत व्हावयाचा आहे वाढदिवस. मजा आहे अन् काय." मेहुण्यानें दुजोरा दिला.

सर्वांनीं त्याला नानाप्रकारें समजावण्याचा प्रयत्न केला पण त्याची कांहीं समजूत पटली नाहीं. "द्या सोडून त्याला. असूं दे. आज त्याच्या डोक्यांत भूत शिरलेलें दिसतें आहे." वडिलांनीं वैतागून सांगितलें.

* * *

ढुणऽऽऽ, ठो....! ढाम....! फट फट फट फट! फडार फट! चहूं कडून फटाक्यांचा आवाज ऐकूं येऊं लागला. त्यामुळें गोपाळची झोप मोडली. बहिणीनें त्याला तोंड धुवून आंघोळी साठीं तयार होण्यास सांगितलें.

"मला नाहीं नाहायचें." गोपाळ म्हणाला. त्याचा राग अजून कमी झाला नव्हता.

"उगीच हट्ट केलास तर मग कांहींच होणार नाहीं. वाढदिवस नाहीं अन् दिवाळी पण नाहीं. मग बसशील रडत." मेहुण्यानें सांगितलें.





बसले रडतराव घोड्यावर. झाली एकदाची तेल लावून आंघोळ. ताईनें त्याला नवीन कपडे घालण्यास दिले. तेवढ्यांत मेहुणे फटाके वाजवूं लागले. गोपाळला फार आनंद झाला. पण त्यानें तो आपल्या चेहऱ्यावर दिसूं दिला नाहीं. तसाच गाल फुगवून बसला. मेहुण्यानें त्याला त्याच्यासाठीं आणलेला एक रेशमी रुमाल आणि खाऊचा पुडा दिला. त्यानें तो हिसकावून त्यांच्या हातांतून घेतला परंतु आपला आनंद दाखविला नाहीं.

कोठें तरी बसून पुडा सोडावा म्हणून तो जागा शोधूं लागला. पण सर्व ठिकाणीं कोणी ना कोणी तरी होतेंच. शेवटीं ताईच्या खोलींत गेला. तेथें ती एक पुस्तक वाचीत होती. त्यांत किती तरी छान छान रंगीत चित्रें होतीं. गोपाळला ती फार आवडलीं. म्हणून तो तिच्या शेजारी बसून पाहूं लागला.

"किती छान चित्रं आहेत. नाहीं! मला बघूं दे ना!" तो म्हणाला. "ही काय गोष्ट आहे ताई! मला सांग ना!" त्यानें ताईची विनवणी केली. ताईनें त्याच्या हातांत तें मासिक दिलें. आणि त्याला चित्रांतील त्या सर्व गोष्टी सांगितल्या. तें मासिक पाहून गोपाळला फार आनंद झाला. इतके छान होतें तें मासिक.

सांगा पाहूं कोणतें मासिक होतें तें!





जरा थांबा बरं! त्यानें तुमच्या काकाच्या पेटीत फटाके लपवून ठेवले आहेत.



लेका! मी पहा आतां बाँब लावणार. बाँब मोठीं माणसें लावतात ना. म्हणून तर मी मिशा लावून आलों आहे.



आई! आई! मी बाबांचा काळा चष्मा, मामांची तीन चाकी, दुकानदाराला नेऊन दिली तर तो मला किती फटाके देईल?



माझ्या भावाला जे पाहूं इच्छितात त्यांना तिकिटें विकण्यांत येतील. एका तिकिटाची किंमत तीन फटाके आणि दहा फुलबाज्या.



















बाबा! आई खोटें बोलते आहे. तुम्ही तिकडे लक्ष देऊं नका. उन्हांत फटाके वाळत होते. मी एकच पेटवला. बाकीचे आपल्याआप उडाले.



ए मोपू! बऱ्या बोलानें त्यांतले अर्धे मला दे. नाही तर मी आईला बोलावून गाणी म्हणायला सांगेन. मग पाहतों तुझ्या फटाक्यांचा आवाज कसा ऐकूं येतो तो!










बहीण दरवाज्या आड लपून बसली. मेहुण्यानें कितीदां हाक मारली पण पुढें आली नाहीं.
पण गोपूच्या हातांत एक आणा ठेवल्या बरोबर एक उडी मारून पुढें आली.



हें पहा, माझ्या आजीनें तुमच्याकडून दहा फुल बाज्या व दहावीस फटाके उधार मागून आणायला सांगितले आहेत.



ताई एक नवीन गणित विचारूं ! ह्यांत दहा फटाके व पन्नास फुलबाज्या बांधून ठेवल्या आहेत. त्यातला एक फटाक पेटवला तर बाकी किती उरतील !



[ ६ ]

कुबिलाय खानाकडे नोकरी करीत असतां मार्कोपोलोला राज्याच्या कामासाठींच पश्चिमेकडे सुमारें चार महिने प्रवास करावा लागला. खान-बालिक (पेंकिंग) नगराहून तीन आठवड्याच्या प्रवासानंतर त्याला 'काय-चु' किल्ला लागला. हा किल्ला पूर्वी कोणीं सुवर्णराजानें बांधला होता, म्हणें. हा सुवर्णराज एक बलाढ्य राजा होता. त्याच्या सेवेला नेहमी सुंदर तरुण स्त्रियाच नेमलेल्या असत. तो आपल्या राजधानींत एका हलक्या रथांत बसून फिरे. हा रथ स्त्रियाच ओढीत असत.

सुवर्णराज तसा उन्गखान (प्रेस्टर जान) याचा एक मांडलिक राजा होता. परंतु तो स्वतः एक पराक्रमी राजा असल्या कारणानें आपल्या चक्रवर्ती महाराजांना जुमानीत नसे. एकदां दोघांचें परस्परांशीं युद्ध झालें. परंतु उन्गखान सुवर्णराजाचा पराभव करूं शकला नाहीं. कारण त्याचा किल्ला दुर्भेद्य होता. उन्गखानाला अनावर राग आला. तेव्हां त्याच्या सात स्वामिभक्त नोकरांनीं प्रतिज्ञा केली कीं आम्ही सुवर्णराजाला कैद करून आपल्या धन्यासमोर हजर करूं. तें ऐकून उन्गखानाला फार आनंद झाला. त्यानें सर्वांना वचन दिलें कीं ही कामगिरी सात



जणांनीं करून दाखविली तर त्यांना मोठें इनाम दिलें जाईल.

उन्गखानाचे सात नोकर सुवर्णराजाच्या पदरीं नोकरीला लागले. त्यांनीं दोन वर्षें सेवा करून सुवर्णराजाची मर्जी संपादन केली. सुवर्णराजाच्या मनांत त्यांच्यावर स्वतःच्या मुलांपेक्षां जास्त विश्वास बसला. तो कधीं शिकारीला निघाला कीं त्यांना बरोबर घेऊन जात असे.

एकदां तो संवयीप्रमाणें आपल्या सातहि नोकरांना बरोबर घेऊन शिकारीला निघाला. राजवाड्यापासून सुमारें एका मैलावर एका नदीच्या काठीं राजानें आपल्या इतर नोकरांना सोडून दिलें आणि या सात नोकरांना बरोबर घेऊन नदीपार गेला. ते याच संधीची वाट पहात होते. सहाय्य करणारा तेथें दुसरा कोणी नव्हता.

सातहि जणांनीं आपापल्या तलवारी उपसल्या आणि म्हटलें—"महाराज, आपण आमचे कैदी आहांत. कांहीं हालचाल कराल तर आमच्या तलवारी आरपार होतील."

तें ऐकून सुवर्णराज चकित झाला. "म्हणजे! तुम्ही मला कैद करून नेणार?"

"आमचे महाराज उन्गखान यांच्याकडे" त्यांनीं उत्तर दिलें.

"विश्वासघात! तुमच्यावर मी स्वतःच्या मुलांपेक्षां जास्त विश्वास ठेवला त्याचें हेंच का बक्षिस! आज पर्यंत मी तुम्हांला आपल्या पदरीं ठेवलें त्याची कांहीं चाड!"

परंतु त्यांनीं त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलें आणि त्याला धरून ते उन्गखानाकडे घेऊन गेले. उन्गखानानें सुवर्णराजाला समोर उभा पाहून विचारलें—"तुझें आदरातिथ्य तुझ्या इभ्रतीला साजेल असेंच करण्याचें मी ठरविलें आहे. हें तुला माहीतच असेल!"

सुवर्णराज काय उत्तर देणार! उन्गखानानें त्याला आपलीं गुरें चरायला नेण्याचें काम दिलें. याहून जास्त अपमान आणखी काय होणार!

सुवर्णराजानें दोन वर्षें तें काम निमूटपणें केलें. त्याच्यावर उन्गखानाच्या नोकरांचा सतत पाहारा असे. दोन वर्षें पूर्ण झाल्यावर उन्गखानानें त्याला बोलावून त्याला राजवस्त्रें देऊन विचारलें—"माझ्याशीं वैर केल्याचें प्रायश्चित्त कसें असतें, हें तुला आतां कळलेंच असेल!"

"होय महाराज! आपल्याशीं वैर करून या जगांत जिवंत राहणें कोणास शक्य नाहीं, हें मला कळलें!" सुवर्णराजा म्हणाला.

"तुला ही गोष्ट पटली तर! ठीक!" असें सांगून उन्गखानानें त्याला एक घोडा दिला व कांहीं नोकर चाकर बरोबर पाठवून आदरपूर्वक त्याला निरोप दिला.

* * *

मार्कोपोलोच्या वाटेवर बोचान नांवाचें आणखी एक नगर लागलें. त्या नगराविषयीं एक गोष्ट सांगतात.

इ. स १२७२ च्या पूर्वी बंगाल व ब्रह्मदेशांत एकच राजा राज्य करीत असे. तो



बडेखानाचें प्रभुत्व मानण्यास तयार नव्हता. बोचानच्या राजाचें पारिपत्य करण्यासाठीं बडेखानानें सेना देऊन नजीरुद्दीन नामक एका तातार सेनापतीला पाठविलें.

बंगाल ब्रह्मदेशाच्या राजानें या सैन्याशीं युद्ध करण्याचें ठरविलें. एक मोठें सैन्य जमवून तो युद्धास निघाला. या सैन्यांत दोन हजार हत्ती होते. या गजदलाव्यतिरिक्त त्याच्या सैन्यांत चाळीस हजारांचें सैन्य होतें. त्यांत घोडेस्वारांची संख्याच जास्त होती.

तें सैन्य पाहून नजीरुद्दीन घाबरला. त्याच्याजवळ फक्त १२ हजार घोडेस्वारांचें

सैन्य होतें. परंतु युद्ध करणें भाग होतें. त्यानें सैन्य उभें केलें आणि येईल त्या संकटांस तोंड देण्याचें ठरवून शत्रुपक्षाची प्रतीक्षा करूं लागला.

बंगाल-ब्रह्मदेशांच्या राजांचें अफाट सैन्य पाहून त्यांत त्याचें मोठें गजदल पाहून तार्तार घोडेस्वारांचे घोडे घाबरून पळून गेले आणि झाडींत लपून बसले. त्यांना पकडणें अशक्य होतें.

पळून जाणें एक प्रकारें तार्तारांच्या हिताचेंच झालें. तार्तार सैनिक घोड्यावरून उतरले व रानांत शिरून झाडावरून शत्रु-सैन्यावर बाणवृष्टि करूं लागले. त्यांचा मारा असह्य झाल्यामुळें गजदल सैरावैरा पळूं लागलें. हत्तींच्या पाठोपाठ बंगाल-ब्रह्म-देशाचें घोडदल सुद्धां पळून गेलें. आणी-बाणीच्या प्रसंगीं तार्तारी सैनिकांनीं घोड्यावर बसून शत्रुसैन्यावर अचानक छापा मारला. या युद्धांत बंगाल-ब्रह्मदेशाच्या राजाचें फार मोठें नुकसान झालें.

तार्तारांनीं हत्तींना धरण्यासाठीं त्यांच्या वाटेवर मोठमोठीं झाडें तोडून पाडलीं. परंतु त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. परंतु ब्रह्मदेशाच्या राजाच्या कैद झालेल्या कांहीं सैनिकांनींच स्वतःची सुटका करून घेण्या-साठीं कांहीं हत्ती धरून तार्तार सेनापतीच्या स्वाधीन केले. तार्तार सेनापतीनें दोनशे हत्ती बडे खानाला नजर केले.

या युद्धानंतर बंगाल-ब्रह्मदेशाच्या राजानें बडे खानाला खंडणी देण्याचें कबूल करून त्याचें आधिपत्य स्वीकारलें.

( पुढें चालू )





लिलिपुटहून परत आल्याला जेमतेम दोन महिने झाले असतील, मी पुन्हा "ॲडव्हेंचर" नांवाच्या एका जहाजांत बसून निघालों.



सुरतेकडे जाण्यासाठीं आम्ही निघालों होतों. कांहीं दिवस प्रवास निर्विघ्न पार पडला. पण एकाएकी एक मोठें वादळ आलें.



वादळानंतर आणखी एक संकट ओढवलें. जहाजां-तील गोडें पाणी संपलें. पण सुदैवानें जवळच जमीन दिसली.



आम्ही बाराजण एका लहानशा पडावांत बसून जमिनीवर पोंचलों. तें एक मोठें द्वीप होतें. सर्व निरनिराळ्या दिशेनें पाण्याच्या शोधार्थ निघालों.



पुष्कळ शोध केल्यावर देखील जेव्हां पाणी मिळालें नाहीं. तेव्हां हताश होऊन परतलों. परंतु माझे साथी पडावांत बसून निघाले होते.



मी ओरडलों-"थांबा, मी इकडे आहे" माझे शब्द तोंडांतच राहून गेले. समोर एक भयंकर दृश्य नजरेस पडलें.



एक पर्वताकार मनुष्य नाव अडविण्यासाठीं झपाट्यानें पुढें येत होता. सुदैवानें नाव पुष्कळ दूर खोल पाण्यांत गेली होती.



माझें दुर्भाग्य, मी ज्या शेतांत लपायला म्हणून शिरलों होतों त्याची कापणी चालली होती. एकेक जण ६० फूट उंचीचा होता.



त्यांचे विळे लागूं नयेत म्हणून मी मागें मागें सरकत होतों. परंतु ते प्रत्येक पावलाबरोबर १०-१० फूट पुढें येत होते.



त्याची नजर आपल्यावर पडूं नये म्हणून मी एका शेतांत शिरलों. सुमारें चाळीस फूट उंचीचें पीक उभें होतें.



आतां जीव वांचणें शक्य नाहीं अशी खात्री झाल्यावर मी मोठ्यानें ओरडलों-"थांबा, थांबा!"



माझा आवाज त्या मनुष्याला ऐकूं आला असावा. कारण तो थांबला व मला हातांत घेऊन धन्याकडे घेऊन गेला.



मालकानें मला एखाद्या किड्यासारखें धरून उचललें. मला जगांतल्या जितक्या भाषा येत होत्या त्यांत मी म्हटलें-"मी मनुष्य आहें!"



त्याला कांहीं कळलें नसावें. त्यानें मला खालीं सोडलें. मी मागें पुढें चालून मी पळून जाणार नाहीं असें दर्शविलें.



मी आपला बटवा उघडून मोहरा देऊं लागलों. त्यानें करंगळी लावून पाहिली व मोहरा घेतल्या नाहींत.



त्यानें आपल्या तळहातावर आपला रुमाल ठेवला व मला वर बसायला सांगितलें. त्याचा हात एक फूटभर जाड असेल, मी चढून बसलों.



रुमालांत बांधून तो मला घरीं घेऊन गेला. त्यानें मला आपल्या बायकोला दाखविलें. ती दचकून मागेंच सरकली.



तीस फूट उंचीच्या टेबलावर मालकाच्या कुटुंबांतलीं सर्व माणसें जेवायला बसलीं. त्यांच्या ताटांचा व्यास २४ फूट होता.



मालकिणीनें रोटी वाढली. मी सुरी काढून कापूं लागलों व खाऊं लागलों तर सर्व खदखदां हंसूं लागले.



एकाएकी मालकाच्या मुलानें माझी डावी तंगडी पकडून मला जमिनीपासून ६० फूट उंचीवर उलटें उभें धरलें.



मालकानें मला वांचविलें व वाह्यातपणा बद्दल मुलाला तो बडवणार होता. परंतु मी नको म्हटलें म्हणून एका थापटीवर काम भागलें



तेवढ्यांत पाठीमागून एक डरकाळी ऐकूं आली. वळून पाहिलें तर तें मांजर होतें. आपल्या बैलांच्या तिप्पट मोठी होती ती.



जेवण झाल्यावर मालकिणीनें मला बिछान्यावर निजवून आपला हातरुमाल मला पांघरूण म्हणून घातला. मी उठलों आणि समोर पाहिलें......



# प्रियदर्शिका

उदयन वत्स देशाचा राजा होता. त्याचें वासवदत्ताशीं लग्न होण्यापूर्वी दृढवर्मा नांवाच्या एका राजानें आपली मुलगी प्रियदर्शिका त्याला देऊं केली. त्याच सुमारास उज्जयनीच्या प्रद्योत महासेन राजानें कपटानें उदयनला कैद केलें. कारण त्याच्या मनांतून आपली मुलगी वासवदत्ता त्याला द्यावयाची होती.

उदयन राजाला हत्तीच्या शिकारीचा फार नाद होता. एकदां तो हत्ती पकडण्यासाठीं जंगलांत गेला असतां प्रद्योतच्या खोट्या हत्तीनें त्याचें मन वेधलें, आणि त्याच्या मागें गेल्याबरोबर प्रद्योत राजाच्या सैनिकांनीं त्याला कैद करून उज्जयिनीला नेलें.

प्रियदर्शिका वासवदत्ताची मावस बहीण होती. दृढवर्माच्या मनांतून प्रियदर्शिकेचें लग्न उदयनबरोबर करून द्यावयाचें होतें. तें तर साध्य झालें नाहींच आणि वर तो कलिंग राजाच्या कोपास मात्र कारण झाला. कारण कलिंग राजानें प्रियदर्शिकेशीं लग्न करण्याची आपली इच्छा दृढवर्माला कळविली होती. पण दृढवर्मानें नकार दिला. म्हणून कलिंग राजानें दृढवर्माच्या किल्ल्याला वेढा दिला. उदयन प्रद्योतच्या कैदेंत असल्यामुळें तो दृढवर्माच्या मदतीस येऊं शकणार नाहीं ही गोष्ट जाणूनच त्यानें वेढा दिला होता.

विनयवसू नांवाचा दृढवर्मा राजाचा एक स्वामिभक्त नोकर होता. केव्हां ना केव्हां तरी आपल्या राजाची इच्छा पूर्ण होईल या इच्छेनें त्यानें प्रियदर्शिकेला किल्ल्यांतून, शत्रूची नजर चुकवून पळवून नेलें.

श्री बा. मा. वागळे





विनयवसू प्रियदर्शिकेला घेऊन आपला एक मित्र विन्ध्यकेतु ह्याच्याकडे गेला. तेथें तिला ठेवून 'अगस्त्य तीर्थांत स्नान करून येतो' असें सांगून तो निघून गेला.

ह्या अवधींत उदयनचें वासवदत्तेशीं लग्न झालें आणि तो आपल्या राजधानींत परत आला. त्यानें आपला शत्रू विंध्यकेतू ह्याच्या-वर स्वारी करण्यासाठीं सैन्य देऊन आपल्या सेनापतीस पाठविलें. ह्या युद्धांत विन्ध्यकेतु मारला गेला. शत्रूनें त्याच्या राजवाड्याला आग लावली आणि प्रियदर्शिका त्याची मुलगी समजून आपल्या बरोबर घेऊन गेला. इतकें होईपर्यंत विनयवसू परत आलेला नव्हता. उदयनला वाटलें कीं ती विंध्यकेतूची मुलगी असेल. म्हणून तो म्हणाला—"ती वासवदत्तेची सखी म्हणून राहील."

ह्याच सुमारास उदयनला दृढवर्मा... आलेल्या संकटाची बातमी समजली. म्हणून त्यानें आपल्या सेनापतीला सैन्यासह त्याच्या मदतीस पाठविलें.

प्रियदर्शिका 'अरण्यिका' नांवानें वासवदत्तेबरोबर राहूं लागली. एकदां प्रियदर्शिका बागेंत फुलें तोडीत असतां अचानक तेथें तिची उदयनशीं भेट झाली. खरोखरच आपल्या वडिलांनीं आपल्यासाठीं योग्य वर पाहिला होता. म्हणून तिला मनांत आनंद झाला. उदयनचें मन देखील तिच्यावर बसलें. शेवटीं त्यानें आपल्या मनांतील गोष्ट विदूषका-जवळ बोलून सुद्धां दाखविली.

उदयनच्या अंतःपुरांत एक संन्यासिनी राहात होती. तिनें 'वासवदत्तेचें अपहरण' म्हणून एक नाटिका लिहिली. हें नाटक वासवदत्तेच्या सखी-दासींच्या कडून राज-वाड्यांत करण्याचा बेत ठरला. त्यांत वासव-दत्तेची भूमिका प्रियदर्शिकेला व उदयनची भूमिका मनोरमेला देण्याचें ठरलें.



नाटक सुरू झालें. वासवदत्ता आपल्या मैत्रीणी बरोबर खेळ पाहण्यास आली. प्रिय-दर्शिका वासवदत्तेचे वस्त्रालंकार धारण करून रंगभूमीवर आली, जणूं अगदीं वासवदत्ताच.

त्यानंतर मनोरमा राजा उदयन म्हणून रंगभूमीवर आली. तिची भूमिका अशी वठली होती कीं वासवदत्ता उठून उभी राहिली आणि—'महाराजांचा जयजयकार असो' असें ओरडून म्हणाली. तिच्या शेजारीं बस-लेल्या मैत्रिणीनें तिला भानावर आणलें. म्हणाली—"राणी सरकार! ते खरे महाराज नाहींत. तो नट आहे."

उदयनला प्रियदर्शिकेची भेट घ्यावयाची होती. म्हणून खेळ सुरू होण्यापूर्वीच तो विदूषकाला घेऊन रंगशाळेंत गेला आणि मनोरमेला प्रेक्षकांत पाठवून देऊन आपला अभिनय स्वतः त्यानेंच केला. पण ही गोष्ट प्रेक्षकांत जाहीर नसल्यानें सर्वच प्रेक्षकजन उदयनच्या अभिनयावर खूष झाले. विदूषकहि प्रेक्षकांत बसून नाटक बघूं लागला. पण डुलकी येतांच तो तेथेंच आडवा झाला आणि घोरूं लागला.

आपल्या आयुष्यांतील घडलेल्या घटना पाहून वासवदत्ता क्षणाक्षणाला आश्चर्य करीत





होती. पण अवास्तव गोष्टी रंगभूमीवर येत तेव्हां ती थोडी रागावे. एकदां उदयन कैदेंत असतां त्या दोघांना एकाच आसनावर बसविल्याचें दृश्य दाखविलें असतां तिनें विरोध केला. म्हणाली—"उदयन कैदेंत असतां वीणा शिकविण्याच्या निमित्तानें आम्हीं एकत्र येत होतों. परंतु एका आसनावर कधींच बसलों नाहीं".

"नाटकांत रस उत्पन्न करण्यासाठीं कधीं कधीं अशा काल्पनिक गोष्टी आणाव्या लागतात." संन्यासिनीनें तिला समजावून सांगितलें.

इकडे उदयनला मात्र प्रियदर्शिकेजवळ बसतांना फार आनंद झाला. अभिनयाच्या आवेशांत त्यानें तिचा हात धरला आणि तो खरोखरच स्वतःला विसरून गेला.

हें घडघडीत असत्य पाहून वासवदत्ता संतापून प्रेक्षकगृहांतून बाहेर निघून गेली. तिला घोरत पडलेला विदूषक दिसला. तिनें त्याला खडसून विचारलें कीं महाराज कोठें आहेत.

"ते तिकडे रंगभूमीवर आहेत. ओळखलें नाहींत का त्यांना?" संथपणें त्यानें उत्तर दिलें.

"मग मनोरमा कोठें आहे?" वासवदत्तेनें विचारलें. ती पलीकडेच बसली होती. तिला पाहतांच व्यंग्य करून ती म्हणाली—"फार छान झाला बरं का तुझा अभिनय."

"मी काय करणार! मला बाजूला सारून विदूषकानें महाराजांना पुढें केलें." मनोरमा म्हणाली.

उदयननें वासवदत्तेची क्षमा मागून आपली सुटका करून घेतली. पण आरण्यिकेला मात्र कैद करण्यांत आलें.

याच अवधींत वासवदत्तेला तिच्या आई-कडून पत्र मिळालें. त्यांत सर्व समाचार

       

होता. तिनें लिहिलें होतें कीं दृढवर्माला कलिंग राजानें एक वर्ष कैदेंत ठेविलें होतें. परंतु त्याची मुलगी म्हणजे तुझी मावस-बहीण प्रियदर्शिका कोठें नाहींशी झाली कांहीं कळलें नाहीं. पत्र वाचतां वाचतां तिच्या डोळ्यांत अश्रुबिंदू आले. ते पुसत असतांच एका दासीनें येऊन सांगितलें कीं अरण्यिकेनें आत्महत्या करण्यासाठीं विष खाल्लें आहे. तिला तें ऐकून फार पश्चात्ताप झाला. विष उताराचें औषध उदयनला माहीत असल्यामुळें ती लगबगीनें त्याच्याकडे गेली व तिला वांचविण्यासाठीं विनवणी करूं लागली.

"त्या दिवशीं एवढा फणकारा आला होता. मग आतां मरूं दे कीं!" उदयननें तिचें मन पाहण्याच्या हेतूनें म्हटलें.

"तसें नाहीं हो. पण....पण तिला वांचवा." ती काकुळतीस येऊन म्हणाली.

"अरण्यिका जंगलाच्या राजाची शत्रूची मुलगी. पण मी प्रियदर्शिकेला मात्र जरूर वांचवणार." असें सांगून त्यानें अरण्यिकेला औषध देऊन तिच्या अंगांत चढलेलें विष उतरविलें. वासवदत्तेला त्याच्या बोलण्याचें आश्चर्य वाटलें व ती त्याच्याकडे पाहूं लागली. त्या वेळीं प्रियदर्शिकेनें आपली हकीगत सांगितली. त्याच वेळीं उदयनला त्याच्या सेनापतीनें येऊन दृढवर्माच्या सुटकेचें वर्तमान सांगून त्यांच्या आनंदांत भर घातली.

प्रियदर्शिकेचें मूक प्रेम पाहून महाराणी वासवदत्तेनें आपलें मन मोठें करून स्वत: आपल्या हातानें त्या दोघांचे हात परस्परांच्या हातांत दिले.

उदयननें आपल्या दोन्ही राण्यांसह बरेच दिवस प्रजेचें पुत्रवत् पालन करून सुकीर्ति मिळविली.





# बदकाचें कुरूप पिल्लूं

एकदां एका बदकाच्या मादीनें डबक्याच्या कांठावरील झुडपांत अंडीं घातलीं. कांहीं दिवसांनीं अंडीं फुटून ल्हान ल्हान गोजि-रवाणीं पिलें बाहेर पडलीं. पण एक अंडें फुटावयाचें अजून शिल्लक होतें. तें अंडें होतेंहि थोडें मोठें. तें उबवत ती बसली होती.

मादीला झुडपाखालीं बसलेली पाहून एक म्हातारी बदकी म्हणाली—"अग! अजून काय येथेंच बसली आहेस! चल पिलांना घेऊन पाण्यांत!"

अजून एक अंडें फुटायचें राहिलें आहे. केव्हां फुटेल कोण जाणें!" ती म्हणाली.

"अजून एक अंडें राहिलें आहे! बघूं!" असें म्हणून तिनें तें अंडें पाहिलें व तोंडांत बोट घालून म्हणाली—"हें कांहीं बदकाचें अंडें नव्हे. असेल एखाद्या विदेशी कोंबडीचें. म्हणून म्हणतें. दे सोडून तें अंडें आणि चल पाण्यांत."

"इतके दिवस उबवलें आतां थोड्या साठीं कशाला बाई," बदकी म्हणाली.

"बघ बाई! मी आपलें नुसतें सांगितलें." असें सांगून वृद्धा निघून गेली.

एक दिवस अंडें फोडून त्यांतून पिलूं बाहेर आलें. बाकी पिलांप्रमाणें तें नव्हतें. अगदीं कुरूप वाटलें तिला. मनांत म्हणाली—"खरोखरच हें एखाद्या विदेशी कोंबडीचें असलें पाहिजे. बघूं या पाण्यांत येतें का!" असा विचार करीत ती पाण्यांत शिरली. तिच्या पाठोपाठ तिचीं सारीं पिलें



गेलीं व पाण्यांत खेळूं लागलीं. हें कुरूप पिल्लूं सुद्धां त्यांच्या बरोबर पाण्यांत वागडूं लागलें.

"माझेंच तर पिल्लूं आहे. पहा किती छान पोहोतें आहे तें!" ती आपल्याशीं पुटपुटली.

मनसोक्त पाण्यांत डुंबल्यावर ती मादी आपल्या पिल्लांसह घरीं गेली. ह्या कुरूप पिल्लाला पाहून सर्व पिलें त्याच्या पाठीस लागलीं. त्याची चेष्टा करूं लागलीं. 'कुरूप, कुरूप' म्हणून नांवें ठेवूं लागलीं. त्या बिचाऱ्या पिल्लाला फार वाईट वाटलें. त्याची बाजू घेणारा कोणीच त्याला भेटला नाहीं. त्याला कोणीच खेळायला घेईना.

जसजसे दिवस लोटले तसतसे त्याचें दुःख वाढतच गेलें. आतां तर त्याची आई सुद्धां त्याला रागावूं लागली. ती त्याला म्हणे—"तुला मांजर तरी कां पकडून नेत नाहीं कोण जाणें! तुझ्यामुळें सर्व बदकें मला नांवें

कां राहात नाहींस!"

त्याला फार दुःख झालें. तेथून निघून जाण्याचा त्यानें निश्चय केला. दुसरे दिवशीं सर्व बदकें जेव्हां डबक्यांत डुंबण्यास निघालीं तेव्हां हें कुरूप बदक त्यांच्यांत न मिसळतां एका बाजूस दूर निघून गेलें. जवळच एका डबक्यांत बरेंच पाणी तुंबलें होतें. तेथें बरेच जल पक्षी त्याला दिसले. तेथें तें गेलें व तेथेंच घर करून राहूं लागलें.

तेथेंहि पक्ष्यांनीं त्याला विचारलें—"तूं बदकापेक्षां असा वेगळाच कसा झालास! फार कुरूप दिसतोस बाबा." पण त्यांनीं त्याला वाळींत टाकलें नाहीं.

त्याला बरा वरें वाटलें पण अजून त्याची साडेसाती संपली नव्हती. दोन चार दिवस झाले नाहींत, तोंच एकदां तेथें कांहीं शिकारी आले. त्यांनीं भराभर गोळ्या झाडून बऱ्याच पक्ष्यांना मारलें. कुत्र्यांनीं ते मेलेले पक्षी तोंडांत



पकडून मालकाला नेऊन दिले. हें कुरूप पिल्लूं गोळ्यांच्या आवाजानें भिऊन एका झुडपांत लपून बसलें. त्याला कुत्र्यांनीं पाहिलें. परंतु उचलून नेलें नाहीं. सूर्यास्ताच्या सुमारास शिकारी आपल्या घरीं निघून गेले.

कुरूप बदकानें बाहेर येऊन पाहिलें. पक्ष्यांच्या रक्तानें जिकडे तिकडे लाल लाल झालें होतें. तें पाहून त्याचें हृदय हादरून गेलें. त्याला त्या कुत्र्याचा चेहरा आठवला. एक लांब श्वास सोडून तें मनांत म्हणालें—"बरें झालें. कुरूप आहे म्हणून माझे प्राण तरी वांचले."

पिल्लूं हळूं हळूं तेथून बाहेर पडलें. थोडें अंतर गेलें असेल तोंच एकाएकीं जोराची पावसाची सर आली. निवाऱ्यासाठीं इकडे तिकडे पाहूं लागलें तेव्हां त्याला एक झोपडी दिसली. त्यांत शिरून तें भिंतीशीं दडून बसलें.

सकाळीं शेतकरणीनें पाहिलें कीं एक बदकाचें पिल्लूं वाट चुकून आलें आहे.





तिनें त्याला हांकलून दिलें नाहीं. आप-ल्याला बदकाचीं अंडीं मिळतील म्हणून ठेवून घेतलें.

तें कुरूप पिल्लूं एक महीनाभर तेथें आनंदानें राहिलें. एक दिवस शेतकरीण बडबडली—"हें भाकड बदक पाळून काय फायदा. नुसता दाण्याला काळ!" तिनें तें घोळणें तेथून तें निघून गेलें.

त्या नंतर तें बदक एका मोठ्या सरो-वरांत गेलें. तेथें खूप मजेंत पोहूं लागलें. चोवीस तास पाण्यांत डुंबूं लागलें. तेथील पक्षीसुद्धां ह्या कुरूप पिल्लाला आपल्यांत खेळा-वयास घेत नसत. म्हणून हें एकटेंच खेळत असे. मधून मधून तें उडण्याचीहि सवय करूं लागलें.

थंडीचे दिवस आले. सरोवरांतील पाणी त्याला गार लागूं लागलें तरी तें तसेंच पोहत पडे. एकदां त्यानें राजहंस पक्षांची झुंड आकाशांतून उडत जातांना पाहिली. फार



सुंदर दिसले ते पक्षी त्याला. त्यांचा पांढरा-शुभ्र रंग, लांब बांकदार मान, तांबूस पिवळी चोंच. फार मोहून टाकलें त्या पक्ष्यांनीं या कुरूप पिलाला. त्याला त्यांच्याबद्दल ओढ वाटूं लागली. त्यांच्यांत जाऊन मिसळावें असें वाटूं लागलें. तें सारखें त्या पक्ष्यांची वाट पाहूं लागलें. कांहीं दिवसांनी त्याला पुन्हां दिसले ते पक्षी परत जातांना.

कडाक्याची थंडी पडूं लागली. सरोवरांतील पाणी गोठूं लागलें. आपल्या भोंवतालचें पाणी तरी गोठूं नये म्हणून तें तेथल्या तेथें सारखें पोहूं लागलें. पण पोहून तें पिल्लूं किती पोहोणार! दमलें बिचारें आणि त्याचे पाय आपोआपच थांबले. आतां त्याला कांठापर्यंत जाण्याची सुद्धां शक्ति उरली नव्हती. थंडी मुळें त्याचें अंग गोठून जाऊन तें जवळ जवळ अर्धें मेलेंच झालें होतें. त्याच्या चारी बाजूनें पाणी गोठून घट्ट झालें होतें. त्या बर्फावरच मान टाकून तें पडलें होतें.

दुसरे दिवशीं सकाळीं एका शेतकऱ्याला तें दिसलें. त्यानें वल्यानें त्याच्या भोंवतालचें सर्व बर्फ दूर केलें आणि त्याला पाण्यांतून बाहेर काढलें. तें अजून जिवंत होतें. तो तें घरी घेऊन गेला. त्याला जरा शेकलें त्याबरोबर तें पुन्हां सावध झालें. त्याला पाहून शेतकऱ्याच्या मुलांना फार मजा वाटली. त्याला पकडण्यासाठीं तीं मुलें त्या बदकाच्या जवळ येऊं लागली. पण बदक भीतीनें दूरदूर पळूं लागलें. गोंधळून जाऊन पळत असतां त्याच्या धक्यानें दुधाचें भांडें लवंडलें. वाटेंत असलेल्या लोण्याच्या भांड्यांत तें पडलें. पण पुढें मार्ग न बघतां तें तसेंच धूम पळूं लागलें. शेवटीं कसें तरी करून तें दरवाज्यांतून बाहेर पडलें आणि दूर झाडींत जाऊन नाहींसें झालें.

ती थंडी त्यानें तशीच संकटांना तोंड देत घालविली. थंडी संपल्यावर थोडें ऊन पडूं लागलें. तेथून निघून गेलेले पक्षी पुन्हां परत येऊन आनंदानें नाचूं बागडूं लागले. या बदकालाहि त्यांना उडतांना पाहून उडण्याची स्फूर्ति झाली. पंखांना नेट देऊन त्यानें भरारी मारली. आणि आश्चर्य हें कीं आपल्याला चांगलें उडतां येत आहे हें त्याला कळलें. त्या आनंदाच्या भरांत तें खूप खूप दूर उडत गेलें. एके ठिकाणीं त्याला एक नदी दिसली. तिच्या कांठावर बरेच वृक्ष होते आणि त्यावर सुंदर पक्षी













बसलेले होते. ह्या पक्ष्यांना पाहून सुद्धां तो पूर्वीप्रमाणेंच मुग्ध होऊन गेला. त्याच्या मनांत आलें कीं त्या इतर सर्व पक्ष्यांच्या जाचांत राहण्यापेक्षां ह्या पक्ष्यांकडून मरण आलें तरी पतकरलें. तें आपल्या तुच्छ समजल्या जाणाऱ्या जीवनास अगदीं कंटाळलें होतें.

मनांत विचार येतांच त्यानें त्या पक्ष्यांच्या भोंवती आकाशांतून घिरट्या घातल्या आणि ते जेथें पोहोत होते तेथें पाण्यांत उतरलें. अन्यमनस्कपणें तें पोहोत पोहोत त्यांच्या जवळ गेलें. मान खालीं वांकविली आणि म्हणालें—"मारा मला."

मान खालीं घालतांच त्याला आपलें प्रतिबिंब दिसलें, आणि त्या सुंदर पक्ष्यां-प्रमाणेंच आपण आहोंत हें पाहून त्याला फार आनंद झाला. तोहि एक राजहंसच होता.

ह्या उदास आणि निराश राजहंसाजवळ ते राजहंस आले. त्यांनीं प्रेमानें आपली चोंच त्याच्या पाठीवरून फिरविली. ह्या मायेच्या ओलाव्यानें त्याचें उर भरून आलें. आपण आपल्या जातीच्या पक्ष्यांत आलों असें वाटून त्याला हायसें वाटलें.

नव्या चिमुकल्या राजहंसाला पाहून मुलें धांवतच तेथें आलीं आणि त्या गोजिरवाण्या राजहंसाचें कौतुक करूं लागलीं. त्यांनीं त्याच्यासाठीं दाणे पाण्यांत टाकले.

अशा तऱ्हेनें वेड्या कुरूप पिल्लाचे त्रासाचे दिवस संपून सुखाचे दिवस आले.





# महावीर जीतवर्मा

पूर्व काळची गोष्ट आहे. कलिंग आणि बंग देशाच्या सीमेवर एक किल्ला होता. त्याच्या चारी बाजूंनीं तट होता. किल्ल्याच्या भिंतीला बुरूज होते. आंत मोठा महाल होता. ह्या किल्ल्यांत एक व्यक्ति राहात असे. त्याचें नांव जीतवर्मा असें होतें. तो थोडासा चक्रम प्राणी होता. तो आपल्याला महावीर समजत असे. तो म्हणे—"आम्हांला नुसतें पाहूनच पाहाणारा घाबरून जातो, मग आम-च्यावर हल्ला करावयास कोण येणार! प्रत्यक्ष अर्जुन जरी कर्णाला मदतीला घेऊन आला तरी मी एकटा त्या दोघांना पुरून उरेन."

शेजाऱ्यांच्या समोर जेव्हां तो बढाया मारीत असे तेव्हां ते त्याला अगदीं हरभऱ्याच्या झाडावर चढवीत आणि पाठी-मागें त्याची चेष्टा करीत. आपलें शौर्य दाख-विण्यासाठीं एखाद्या जमीनदाराची कोंबडी चोरून नेई तर कधीं एखादी बकरी पळवून नेई. जमीनदार ह्या साऱ्या गोष्टीकडे काना-डोळा करीत. पण कधीं मोठी चोरी करण्याचा तो प्रयत्न करूं लागे तर त्याला आपल्या नोकरांच्याकडून चांगलें पिटून काढीत. एकदां असाच मार खाऊन आल्यावर जीत वर्मा ऐटीनें सांगूं लागला—"भित्रे भागूबाई. एवढे जमीनदार पण ताकद कुठें आहे पुढें येऊन लढण्याची. आपल्या नोकरांना पाठवून देतात. असल्या हलक्या लोकांशीं कोण लढतो."

कधीं कधीं तो दरोडाहि घालीत असे आणि मार खाऊन आला म्हणजे बायको बसत असे मलमपट्टी करीत. तिला आपल्या पतीच्या योग्यतेची कल्पना होती. पण



काय करते बिचारी. कसें तरी सावरून घेणें तिला भाग होतें. त्याचा उत्साह भंग न करण्यासाठीं ती म्हणे—"तुमच्या पाठी-वरच घाव बसले आहेत. कोणी बहादूर लढायला आला असता तर त्यानें पुढें वार केले असते."

मग तो तिच्या समोर मिशावर ताव देऊन म्हणे—"पुढें येण्याची कोणाची छाती असेल तर ना!"

एकदां त्याच्या पाहारेकऱ्यानें धावत्या धावत्या येऊन सांगितलें कीं त्यांच्या किल्ल्या-वर हल्ला करण्यासाठीं एक मोठी सेना येत आहे. त्यांत हत्ती, घोडे, रथ, पायदळ सर्व आहे.

जीतवर्मानें बुरुजावर जाऊन पाहिलें, म्हणाला—"हें कलिंगाचें सैन्य आहे. माझी शस्त्रास्त्रें सज्ज करून घेऊन या. मी एकटा या सैन्याशीं लढणार आहें. या कलिंग राजाला आपला मांडलीक करीन तरच नांवाचा जीतवर्मा."

यावर अर्थातच नोकरांचा विश्वास बसला नाहीं. कारण कलिंगाचें सैन्य जवळ जवळ वीस हजार होतें.

पाहतां पाहतां सैन्य किल्ल्याच्या जवळ आलें आणि एका फर्लांगाच्या अंतरावर तंबू ठोकून बसलें. सैन्याची व्यवस्था करून सेनापति एका घोड्यावर स्वार झाला. बरोबर कांहीं सैनिकांना घेतलें व किल्ल्याजवळ आला. तटावर कांहीं लोक उभे असलेले पाहून वर मान करून त्यानें विचारलें की या किल्ल्यांत कोण वीर पुरुष राहात आहे?

"कोण म्हणजे! मी जीतवर्मा येथें राहातों आहे." जीतवर्मानें मोठ्या ऐटींत सांगितलें.

"ठीक! मुकाट्यानें आपला किल्ला आमच्या ताब्यांत दे. नाहीं तर आम्ही किल्ल्यावर हल्ला चढवूं आणि तुझ्यासकट किल्ल्याला जमीनदोस्त करून टाकूं. आम्हांला वंग देशावर स्वारी करावयाची आहे. म्हणून हा किल्ला आम्हांला पाहिजे आहे." सेनापतीनें अधिकार वाणीनें सांगितलें.

"ओहो! बरीच आहे तुझ्या राजाची मजल. काय समजला आहेस तूं! तुला व तुझ्या सैन्याला आतां यमसदनास पाठवितों." असें म्हणत त्यानें एक बाण सेनापतीवर सोडला. पण नेम चुकला.

सेनापतीचा इशारा झाला. एक तुकडी पुढें आली आणि किल्ल्यावर बाण सोडूं लागली. जीतवर्मानेंहि आवेशांत येऊन बाण वृष्टि करण्यास सुरवात केली. अर्धापाऊण तासपर्यंत मोठ्या धडाक्याचें युद्ध झालें. पण गंमत अशी कीं कोणाचेहि बाण कोणाला लागले नाहींत. संध्याकाळ झाली म्हणून कलिंगाचें सैन्य आपल्या डेऱ्यांत निघून गेलें.

"मित्रें! हटले मागें. म्हणे, वंग देशा-वर स्वारी करणार आहेत. बरें झालें माझ्या पराक्रमाची त्यांना कल्पना तरी आली." जीतवर्मा म्हणाला.



कलिंगाच्या सैन्यानें किल्ल्याच्या समोरच डेरा दिला होता. त्यांतील रोज एक एक तुकडी सकाळ संध्याकाळ येऊन अर्धा तास पर्यंत किल्ल्याच्या भिंतीवर बाण वृष्टि करून निघून जात असे. जीतवर्मा मात्र आपली सगळी शक्ति एकवटून युद्ध करीत असे.

अशा तऱ्हेनें सुमारें दहा दिवस गेले. अकराव्या दिवशीं सेनापति घोड्यावर स्वार होऊन किल्ल्याजवळ आला आणि जीत-वर्माला म्हणाला—"हे वीर, आम्ही युद्धांत हारलों आहोंत. आतां कांहींतरी तडजोड करण्यासाठीं मी आलों आहें. तर किल्ल्याचें दार उघड."

"ही गोष्ट पहिल्यानेंच कां नाहीं सुचली. बिनाकारण आपल्या दोन्हीं सैन्यांना त्रास पडला कीं नाहीं !" असें म्हणत त्यानें किल्ल्याचें दार उघडून सेनापतीस आंत येण्यास सांगितलें.

"तुमचा कलिंग राजा आमचा मांडलीक म्हणून आम्हांला खंडणी देण्यास तयार आहे का !" जीतवर्मानें विचारलें.

"प्रथम आपण असें लिहून द्या कीं आमचें अर्धें सैन्य युद्धांत मेलें आणि अर्धें आपल्या कडे कैदी झालें." सेनापतीनें सांगितलें.

जीतवर्मानें मोठ्या अभिमानानें लिहून दिलें. तो कागद घेऊन सेनापति वंगराजा-कडे गेला. या वंग सेनापतीच्या मनांतून कलिंग देश जिंकावयाचा होता. म्हणून राजाला प्रोत्साहन देण्यासाठीं त्यानें हें युद्धाचें नाटक केलें. जीतवर्माकडून कलिंगाची हार लिहून घेऊन तें पत्र वंग राजाला नेऊन दिलें.

पुढें कांहीं दिवसांनी वंग राजानें सैन्य जमवून कलिंगावर स्वारी केली व त्याला जिंकलें.

ही खरी गोष्ट परेच वर्षे कोणाला समज-लीच नाहीं. खुद्द जीतवर्माला सुद्धां हें नाटक समजलें नाहीं. त्यामुळें सीमा प्रांतांतील लोक असेंच समजत कीं कलिंग देशाचा हल्ला एकट्या जीतवर्मानें परतविला. फार पराक्रमी होता तो राजा.

या मुळें जीतवर्माला तर स्वर्गच मिळाल्या प्रमाणें वाटलें. आपल्या पराक्रमाच्या बढाया मारायला त्याला आतां छानच संधि मिळाली.

हें युद्ध कोणीहि प्रत्यक्ष पाहिलें नसल्या मुळें कोणीहि कांहींहि म्हणालें तरी लोक त्यावर विश्वास करीत.



# कालीचा वर



पूर्वी कधीं तेनाली गांवीं रामकृष्ण नांवाचा एक मुलगा रहात असे. तो शाळेंत जात नसे, मुलांत्या उनाडक्या करी.



एकदां त्याच्या वडिलांचे एक मित्र त्याला फार रागावले, म्हणाले–" तुला लाज नाहीं वाटत लहान मुलांबरोबर खेळायला !"



रामकृष्ण म्हणाला–" तुमच्यासारखीं मोठीं माणसें खेळायला येत नाहींत. मी काय करूं ?" ते म्हणाले–"बरें जा. वडील वाट पहात आहेत तुझी."



रामकृष्ण म्हणाला–"पण मी जेवण खाऊन निघालों आहें !" ते म्हणाले–"म्हणून नव्हे ! तूं शाळेंत गेला आहेस की आणखी कुठें, म्हणून."



त्या मित्रानें त्याची समजूत घालण्याचा यत्न केला. पण "थोडा वेळ देखील खेळूं देत नाहींत !" पुटपुटत रामकृष्ण निघून गेला.



त्या मुलाची हुशारजबाबी पाहून एक मित्र दोघां त्याला म्हणाला–"थोडा वेळ खेळ बंद करून जरा इकडे ये पाहूं !"





"बरें माझ्याबरोबर कालीच्या देवळांत चल." "बाळ, तुझें नांव काय ?" गोसाव्यानें विचारलें. रामकृष्ण— "माझें नांव रामकृष्ण, वडिलांचें नांव रामय्या, गोत्र कौंडिन्य." "मी तुला एक मंत्र सांगतो. तूं त्याचा जप केलास तर काली तुला......" "जो मी मागेन तो वर देईल !" रामकृष्णानें विचारलें. "नाहीं, तुला





काय वाटेल तें माग. तुला भीति वाटली ?" गोसावी म्हणाला. "देवीजवळ विद्याच मागावी, म्हणतो," रामकृष्ण म्हणाला; गोसाव्यानें रामकृष्णाच्या कानांत मंत्र सांगून म्हटलें— "श्रद्धा-भक्ती पूर्वक जप केलास तर तुझी इच्छा पूर्ण होईल." "विद्येचें दान करावें ! विद्यादानास तूं पात्र दिसलास, म्हणून केलें. तूं हें





विद्यादान चालू ठेव !" असा आशीर्वाद देऊन गोसावी निघून गेला.



नंतर रामकृष्णानें मंत्राचा भक्तीपूर्वक जप केला. कालीदेवी, जिला सहस्र मुखें व आठ हात आहेत, प्रसन्न झाली.



देवीला प्रत्यक्ष समोर पाहून साष्टांग नमस्कार करणें तर दूरच रामकृष्ण जोरानें हंसला. देवी रागावली. लगेच कान धरून तो म्हणाला—



"चुकलों. आम्हांला एक डोकें आहे. पडसें झालें तर दोन हातांनी आवरणें कठीण होतें. आणि......



तुला तर एक हजार मुखें आहेत, पण हात आठच आहेत. तुला पडसें झालें तर !" देवीचा राग उतरला. ती हंसली.



"हा भांड्यांतलें दूध प्यालास तर तुला विद्येचा लाभ होईल. दहीं प्यालास तर संपदा मिळेल. जें पाहिजे तें घे !"



"देवी ! मी एक मूर्ख माणूस आहे. काय मागावें कळत नाहीं मला. म्हणून दोन्ही वाटी दिलीस तर..." म्हणत.



त्यानें देवीच्या हातांतली दोन्ही वाटी घेतली आणि एकदम दूध दही पिऊन टाकलें. देवीनें शाप दिला—"तूं विकट कवि होशील !"



रामकृष्णानें निवेदन केलें—"तूं माझी माउली, मी तुझा तान्हा. चूक करणें माझें काम आणि माफ करणें तुझें !"



देवीला आनंद झाला. तिनें आशीर्वाद दिला—"विकटकवि म्हणून तुला राजदरबारी मान मिळेल व तुझी कीर्ति वाढेल."

[redacted]




तेनाली रामकृष्ण कोठून तरी परत येत होता. वाटेत रामू भेटला. त्याला त्यानें विचारलें—"अमरकोश कोठून शिकें चालले आहे, वाटतें."



रामूला राग आला. म्हणाला—"कळलें, तुमचें ज्ञान पाणी भरतें आहे तें. रामनं म्हणून ! ऐक पाहिजे तर !"



"नको बाबा ! ह्या तालपत्रांचें ओझें डोक्यावर घेऊन फिरत बसलास तर टक्कू निघून जाईल व पुन्हां शंक लागेल." रामकृष्ण म्हणाला.



"उद्यां महाराज मला सोन्याचा आंबा देणार आहेत. आहे का माहीत का तें ! जा मी नाहीं सांगणार तें." रामू म्हणाला.



रस्त्यावर शंभू शास्त्र्यांनी विचारलें—"कविवर ! पोट मोठं व्हायला उपाय सांगा !" "नको, पोट फाटलें तर जरा नाहीं व्हायचें !"



"उद्यां महाराज कृष्णदेवराय ब्राह्मणांना सोन्याचा आंबा दान करणार आहेत. म्हणून कपडे ठाक ठीक असले पाहिजेत.



अल्लसानी पेद्दना कृष्णदेवरायांच्या दरबारातले मोठे कवि होते. रामकृष्णने त्यांना जाऊन विचारले, "खरेंच का महाराज सोन्याचा आंबा देणार आहेत?" ते म्हणाले—"उद्यां महाराजांच्या मातोश्रींचे श्राद्ध आहे. त्यांना आंबे आवडत. म्हणून श्राद्धाच्या वेळी ब्राह्मणांना सोन्याचे आंबे महाराज दान करणार आहेत."



त्यावेळी तेथे राजगुरु तताचार्य उभे होते. ते म्हणाले—"रामकृष्ण, या वेडेपणाला आळा बसेल असें कांहीं तरी कर बुवा!"



दुसऱ्या दिवशी किल्ल्याच्या मुख्य द्वारावर ब्राह्मणांची एक गर्दी झाली होती. रामकृष्ण प्रत्येकाला सांगत होता—"सोन्याचा आंबा दान म्हणून घेण्यापूर्वी कमरेला डाग देण्याचें ठरलें आहे. जो जितक्या वेळां डाग लावून घ्यायला तयार होईल त्याला तितके आंबे मिळतील."



ब्राह्मण रांगेत उभे राहून सोन्याचे आंबे कृष्णदेवरायांच्या हातून घेत होते व त्यांना आशीर्वाद देत होते. कुळसद राजू सुद्धां आला आंबा घ्यायला. तो पुढच्या लोकांना मागें सारीत पुढें जात म्हणाला—"मला तीन आंबे. मी तीनदां डाग लावून घेतला आहे."





कृष्णदेवरायांनी विचारले—"डाग लावून घेतले आहेत? कोणाकडून?" तेथे आलेले सर्व ब्राह्मण ओरडून म्हणाले—"रामकृष्णाकडून!"



कृष्णदेवरायांना फार राग आला. त्यांनी शिपायाला आज्ञा दिली—"जा रामकृष्णाला पकडून दरबारांत तात्काळ हजर कर!"

"परम भट्टारक, राजमार्तंड श्रीमन्महाराजाधिराज कृष्णदेवराय की जय!" असा जयघोष करीत रामकृष्णानें दरबारांत प्रवेश केला.



महाराजांनी रागाच्या भरांत विचारलें—"राम-कृष्ण, हा काय खेळ संतोषानें आरंभला आहेस! ब्राह्मणांना जळक्या कोलिताचे डाग!"



रामकृष्ण शांतपणानें म्हणाला—"माझ्या आईला मरतेवेळीं कमरेचें दुखणें होतें. ती खूप रडली पण कोणी डाग दिला नाहीं."



"आजच तिचें श्राद्ध आहे. तिच्या आत्म्याला शांति मिळावी म्हणून ब्राह्मणांच्या कमरेला डाग देत आहे." रामकृष्ण म्हणाला.



शहाण्या कृष्णदेवरायाला रामकृष्णाची युक्ति कळली व त्यानें व्यर्थ खर्च न करण्याचें मनाशीं ठरवून रामकृष्णाला मोठें बक्षिस दिलें.



# जगण्याची आशा

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो तसाच वडाच्या झाडाकडे गेला. शव खांद्यावर टाकलें आणि मुकाट्यानें स्मशानाकडे जाऊं लागला. त्याला मौन पाहून शवांतील वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, खरोखर तुझा निश्चय स्तुत्य आहे. मरणाचें भय प्रत्येकाला असतें, पण आयुष्यांत वारंवार अयशस्विता मिळत गेली तर मनुष्य वैतागून जाऊन प्रदीपाच्या प्रमाणें आत्महत्या करण्यास प्रवृत्त होतो. तूंच एकटा मला जगावेगळा दिसत आहेस तुला कंटाळा येऊं नये म्हणून मी प्रदीपची गोष्ट सांगतो. ऐक." त्यानें गोष्ट आरंभ केली—

विदिशा नगरांत प्रदीप नांवाचा एक तरुण मुलगा रहात असे. तो लहान असतांनाच त्याचे आई वडील वारले. त्याला दुसरें कोणी भांवडहि नव्हतें इतकेंच नाहीं

## वेताळाच्या गोष्टी



तर त्याला जवळचे असे कोणीहि नातलग पण नव्हते. तो लहानपणापासूनच अनाथ झाला होता.

त्याच्या शेजारीच एक ब्राह्मण शिक्षक राहात असे. त्यानें ह्या मुलाला आपल्या घरीं ठेवून घेतलें. तो आपल्या शिष्यांबरोबर ह्याला थोडेंसें शिकवीत असे आणि ह्याच्याकडून खूप काम करून घेत असे.

प्रदीप साधारण पंधरा सोळा वर्षांचा झाला तेव्हां तो ब्राह्मण त्याला म्हणाला— "तुला जेवढें शिकवणें शक्य होतें तेवढें शिकवलें. आतां तूं मोठा झाला आहेस. कोठें तरी जाऊन कांहीं तरी कामधंदा करून रहा." असें सांगून त्याला पाठवून दिलें.

प्रदीपला थोलावा, ओढावा कोठेंच कांहीं नसल्यामुळें तो अगदींच उघडा पडला. तो गांवोगांव हिंडूं लागला. प्रत्येक गांवाहून जात असतां तो विचार करीत असे कीं पुढच्या गांवांत गेल्यावर मला कोणी तरी काम देईल व मी तेथें राहून लोकांप्रमाणें तेथील परस्परांच्या सुखदुःखांत सह भागी होऊन दिवस घालवीन. पण प्रत्येक गांवांत त्याची निराशा झाली. त्याला कोठेंच कोणी विचारलें नाहीं. तो गांवांत थोडीशी भिक्षा मागे. संध्याकाळीं कोठें तरी बसून चार घास खाई, रात्रभर एकाद्या झाडाखालीं निजे आणि सकाळीं उठून दुसऱ्या गांवीं जाण्यासाठीं निघे.

ह्याप्रमाणें तो पांच सहा वर्षें भटकतच राहिला. त्याला कष्टाशिवाय दुसरी कसलीच कल्पना नव्हती. पण दुसऱ्या लोकांचे आपसांतील प्रेमभाव, भ्रातृभाव पाहून त्याला वाटे कीं आपलेपणानें एकमेकांच्या सुख-दुःखांत भागीदार होण्यांत जो संतोष आहे, जें सुख आहे तें अमोल आहे. पण दुर्दैवानें तेंच त्याच्या नशिबीं नव्हतें. त्याला कोणींच आपलेपणानें जवळ केलें नाहीं. मोठ्या घरांत राहाणें उंची उंची वस्त्राभूषणें घालणें स्वादिष्ट रुचकर खाणें ह्या गोष्टींत त्याला महत्व वाटत नव्हतें. कारण खाण्यास कोंडा आणि निजण्यास धोंडा नेहमींच सुखावह असतो हें त्याला स्वानुभवावरून कळून चुकलें होतें.

चार चौघांना एकत्र बसून हंसतां खेळतांना किंवा सुखदुःखांत भाग घेतांना पाहून त्याला त्यांचा हेवा वाटे. 'हाय रे दैवा! आपल्याला एखादाहि मित्र मिळूं नये ना?' म्हणून तो दुःखी होई. हळूं हळूं त्याला आपल्या जीवनाचा कंटाळा येऊं लागला. वीट आला. मनांत वैराग्याच्या भावना घोळूं लागल्या. 'छे! मी जगांत असून नसल्या-सारखाच आहे. मग आत्महत्या करून घेतली तर काय वाईट.' अशा प्रकारें आत्महत्येचे विचार त्याच्या मनांत डोकावूं लागले.

तो जेव्हां फार तीव्रतेनें आत्महत्येकडे प्रवृत्त होई तेव्हां मध्येंच त्याला मनांत आशा वाटे कीं केव्हां ना केव्हां तरी आपल्याला एखादा मित्र भेटेल, अगदीं जीवश्चकंठश्च मित्र व त्यावेळची त्याची आत्महत्या टळे.

मित्र मिळविण्यासाठीं तो अनोळखी माणसाशीं बोलावयास जाई. त्यांच्या बाल-



लेल्या गप्पांत भाग घेण्याची इच्छा करी. परंतु ह्याला पाहतांच ते आपलें हंसणें खेळणें थांबवून त्याच्याकडे नुसते पाहात राहात. आपल्या गप्पा थांबवीत आणि चुप बसत.

असें कांहीं दिवस गेल्यावर त्याची उरली सुरली आशा सुद्धां मिटली. प्राणत्याग हा एकच उपाय त्याच्या डोळ्यासमोर होता. अशा मनःस्थितींत तो विरुवा नगराच्या दिशेला जात असतां त्याला वाटेंत एक नदी लागली. तींत उडी घेऊन जीव देण्याचा त्यानें निश्चय केला. त्याला चांगलें पोहोतां येत होतें. म्हणून तो जरा कचरूं लागला.



पण हात पाय थकल्यावर तरी आपलें काम होईल म्हणून तो पाण्यांत उडी मारण्यास सिद्ध झाला.

प्रदीपनें उडी मारण्या पूर्वी एकदां नदीच्या विशाल पात्राकडे पाहिलें. तेव्हां त्याला एक मुलगा पाण्यांत बुडत असल्या-सारखें दिसलें. त्याला बहुतेक पोहोतां येत नसेल असें वाटून त्यानें पाण्यांत उडी घेतली.

झपाट्यानें हात मारीत प्रदीप त्या मुलाच्या जवळ गेला. त्याला पाहतांच त्या मुलानें झडप घालूनच प्रदीपला पकडलें आणि लगेच देहभान विसरून बेशुद्ध झाला.

त्यानें प्रदीपचा गळाच पकडला असल्यामुळें त्याला पोहोणें अगदीं कठिण जात होतें. किनारा कांहीं फार दूर नव्हता तरी पण किनाऱ्यावर येईपर्यंत प्रदीप फार थकून गेला. इतका कीं किनाऱ्याजवळ कांहीं लोक पाण्यांत शिरले व त्याला पकडून किनाऱ्यावर ओढला.

त्या लोकांनीं बुडणाऱ्या मुलाला ओळ-खलें. 'धाकटे सरकार' म्हणून त्याला शुद्धीवर आणून घरीं नेण्याच्या प्रयत्नाला लागले. प्रदीप बिचारा अर्धमेला शक्तिहीन होऊन तसाच किनाऱ्यावर पडला होता. कोण विचारणार बिचाऱ्याला.

थोड्या वेळानें जरा तकवा आल्यावर तो तसाच ओल्या कपड्यानेंच विरुपा नगरीं गेला. कांहीं वेळ रस्त्यां–गल्ल्यांतून भटकला. त्याला कोठें घासभर अन्न मिळालें नाहीं कीं एक तुकडा भाकरी मिळाली नाहीं. आधींच दमलेला संध्याकाळच्या सुमारास गांवांतील अंबाबाईच्या देवळांत येऊन भिंतीला टेकून बसला आणि जाणाऱ्या येणाऱ्यांचें निरीक्षण करूं लागला.

इतक्यांत तेथें एक धनी कुटुंब पूजेसाठीं आलें. त्यांच्या बरोबर त्यांची एक षोडशा कन्या व तिचीं दोन लहान भावंडें होतीं. त्या शिवाय दोनचार नोकर बरोबर होते. त्यांच्या हातांत पुजेची सामग्री होती.

लव्याजम्यासह आलेल्या गिऱ्हाईकाला पाहून पुजारी उपरणें सावरीत तोंडानें मंत्र पुटपुटत लगबगीनें पुढें सरसावला. तेवढ्यांत एका नोकरानें प्रदीपला पाहिलें व मालकाला म्हणाला–"धाकट्या धन्याला ज्यानें पाण्यां-तून काढलें तसा दिसतो आहे बाहेर देवडीशीं बसलेला माणूस."

मालक थोड्या मोठ्या मनाचा होता. तो त्या नोकराबरोबर बाहेर गेला. प्रदीपला पाहिलें व त्याची सर्व चौकशी केली. हा क्षण प्रदीपला जीवनांतील अनमोल वाटला. आजपर्यंत इतक्या आपुलकीनें त्याच्याशीं कोणींच बोललें नव्हतें. त्याच्या बोलण्या-वरून मालकाला समजलें कीं ह्याच माणसानें आपल्या मुलाचे प्राण वांचविले आहेत. त्याला फार आनंद झाला. म्हणाला–शुद्धीवर आल्यापासून आमचा मुलगा सारखा विचारतो आहे कीं कोठें आहेत मला वांचविणारे. त्यांच्याकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. मग काय ते नदींत वाहून तर गेले नाहींत! आपण भेटलांत फार बरें झालें. अंबाबाईच्या कृपेनेंच ही गांठ पडली.



      

चला, आम्ही पुजेसाठीं आलों आहोत. तुम्हीं सुद्धां आमच्या बरोबर चला.

प्रदीपला इतक्या आपुलकीच्या वर्षावानें गदगदून आलें. आपले आनंदाश्रू लपवीत तो मुकाट्यानें त्यांच्या मागोमाग देवळांत गेला व देवीचें दर्शन घेतलें.

ते गृहस्थ प्रदीपला घेऊन घरीं आले. कांहीं दिवस आपल्या जवळ ठेवून घेऊन त्याचे गुण पाहिले. कुलशीलाची चौकशी केली व योग्य वर आहे असें जाणून आपल्या मुलीचें त्याच्याशीं लग्न लावून दिलें. अशा तऱ्हेनें इतक्या काळानंतर प्रदीपचें स्वप्न खरें झालें.

इतकें गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला—"राजा, आत्महत्येला प्रवृत्त झालेला प्रदीप त्या मुलाचे प्राण वांचविल्या नंतर कां बदलला. कोणत्या विचारानें त्याला पुन्हां जीवनाचें आकर्षण वाटूं लागलें ! जर माहीत असून सुद्धां तूं उत्तर दिलें नाहींस तर परिणाम म्हणजे तुझें डोकें तुटून तुझ्या पायाशीं पडेल."

विक्रमार्क म्हणाला—"परोपकारानेंच समाजांत भ्रातृभाव उत्पन्न होतो आणि वाढीस लागतो. प्रदीपला अजूनपर्यंत दुसऱ्याची मदत करण्यास संधि न मिळाल्यामुळें त्याची विचारशक्ति थकून गेली होती. त्यामुळें त्याला चहूंकडे निराशा दिसत होती. परंतु एकाचे प्राण वांचवून परोपकार साधल्यानें त्याच्या कल्पनाशक्तीला पुन्हां चालना मिळाली. त्यामुळें पुन्हां त्याच्या आशेला अंकुर फुटला आणि त्याला सुखाचा लाभ झाला."

अशा प्रकारें राजाचें मौन भंग होतांच वेताळ शवासह अदृश्य झाला आणि पुन्हां पूर्ववत आपल्या वडाच्या झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





# अहिल्याबाई

आपल्या महाराष्ट्रांत पथरी गांवीं आनंदराव शिंदे नांवाचा एक शेतकरी राहात होता. तो सर्व प्रकारें सुखी होता. परंतु अपत्य नसल्यामुळें त्याला फार वाईट वाटत असे. त्यानें पुष्कळ नवस केले, दानधर्म नेमधर्म केले, तीर्थयात्रा केल्या तरी त्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं.

एकदां त्यांच्या गांवांत एक साधू आला. शिंद्यांनीं त्याच्यासमोर आपला दुखडा गाइला. तो ऐकून साधू म्हणाला—"तुम्ही कोल्हापुरच्या अंबाबाईची आराधना करा तुमची इच्छा पूर्ण होईल. तेव्हां पासून नवराबायको दोघं कोल्हापुरास जाऊन राहिली आणि एक वर्षभर मनोभावे देवी अंबाबाईची आराधना केली. अंबाबाई प्रसन्न झाली. आनंदरावांच्या स्वप्नांत येऊन देवी म्हणाली—"मी तुमच्यावर प्रसन्न झालें आहें, म्हणून मीच तुमच्या घरीं जन्म घेऊन येणार आहें."

आनंदरावांच्या बायकोलाहि त्याच वेळीं स्वप्न पडलें कीं एका स्त्रीनें तिच्या हातांत एक अर्भक देऊन त्याच्या कपाळीं टिळा लावून ती अदृश्य झाली.

त्यानंतर तीं दोघं आपल्या गांवीं निघून गेलीं. योग्य वेळीं आनंदरावांची बायको प्रसूत होऊन इ. स. १७३५ मध्यें कन्यारत्न झालें. तिचें नांव त्यांनीं अहिल्याबाई असें ठेविलें. तिच्या कुंडलींत राजयोग होता.

अहिल्याबाईचें बाल्यपण फार सुखा-समाधानांत गेलें. ती रामायण महाभारतांतील गोष्टी मोठ्या प्रेमानें वाचीत असे. ती तशी फार सुंदर नव्हती तरी तिच्या चेहेऱ्यावर एक प्रकारचें तेज होतें.

सौ. गंगादेवी आपटे



ती नऊ वर्षांची होतांच आनंदरावांना तिच्या लग्नाची काळजी लागली. कुंडलींत राजयोग होता. परंतु मुलीजोगा एकहि वर त्यांना आढळला नाहीं. शेवटीं दैवावर भरंवसा ठेवून ते निश्चिंत झाले.

कांहीं दिस गेले. रघुनाथराव पेशवे मल्हारराव होळकर वगैरे सरदार उत्तरेकडे विजय मिळवून परत येत होते. त्यांनीं वाटेंत पथरी गांवीं मुक्काम केला. महाराष्ट्रांत वीर पुरुषांचें दैवत म्हणजे मारुती. आनंदरावांच्या घरासमोर असेंच एक मोठें मारुतीचें देऊळ होतें. मल्हारराव, पेशवे वगैरे मंडळी त्या देवळांत दर्शनासाठी आली. त्याच वेळीं अहिल्याबाईहि दर्शनास आली होती. तिला पाहतांच सर्वांचें चित्त तिच्याकडे वेधलें गेलें. तिचा थोरपणा तिच्या चेहेऱ्यावर उमटला होता. मल्हाररावानें तिच्याविषयीं चौकशी केली. तेव्हां तिच्याबरोबर असलेल्या भट-जींनीं सर्व माहिती देऊन तिच्या कुंडलीची माहितीपण दिली. मल्हाररावांनीं तिला आपली सून करून घेण्याचें ठरविलें. त्यांनीं शिंद्यांशीं बोलणीं केलीं आणि पुढील महिन्यांत खंडेराव व अहिल्याबाईचें मोठ्या थाटांत लग्न झालें.

अहिल्याबाई नव्यानेंच राजमहालांत आली होती तरी ती कांहीं भांबावली नाहीं. तिचा सासरा तापट होता. सासू राजसी प्रकृतीची होती. तरी अहिल्याबाई दोघांशींहि तोल सँभाळून वागत असे. तिनें कधीं आपला अधिकार कोणावर दाखविला नाहीं किंवा उगाच नसत्या मोठेपणाच्या भानगडींत पडली नाहीं. तिच्या अशा सात्त्विक वागणुकीनें ती सर्वांची प्रिय आणि आदरणीय झाली.

तिच्या अंगांतील उत्तम गुण ओळखून मल्हाररावांनीं तिला राज्यकारभाराचें सुद्धां शिक्षण दिलें. त्यानंतर जेव्हां जेव्हां ते युद्धाला किंवा अन्य कांहीं कामाला बाहेर गांवीं जात तेव्हां अहिल्याबाईवर सर्व कारभार सोंपवीत. कमी खर्चांत राज्याचीं सर्व कामें पुरी करण्यांत तिनें आपलें कौशल्य दाखविलें.

इ. स. १७५४ मध्यें भिल्लांनीं बंड केलें त्यांचा बीमोड करण्यासाठीं खंडेराव सैन्य घेऊन गेला. भिल्लांशीं त्याचें युद्ध झालें त्यांत तो मारला गेला. त्यावेळीं अहिल्या-बाईचें वय अवघें वीस वर्षांचें होतें. तिला मालेराव नांवाचा मुलगा आणि मच्छाबाई नांवाची मुलगी अशी दोन अपत्यें होती.

पतीच्या मरणानंतर अहिल्याबाई सती जाण्यास निघाली. परंतु मल्हाररावांनीं तिला सती जाऊं दिलें नाहीं. ते म्हणाले—"तूं मला मुलासारखीच आहेस. तूं गेलीस तर हें सर्व काम कोण पाहील ! तूं माझी म्हातान्याची काठी. तूंच प्रजेची संरक्षक. प्रजा सुखदुःखाचे वेळीं तुझ्याकडेच पाहाते. तूं गेल्यावर तिचा कैवारी कोण ! तूं आम्हांला सोडून जाऊं नकोस." तिला सासऱ्याचें मन मोडता आलें नाहीं.

मल्हाररावांच्या मनांतून अखिल भारताचें साम्राज्य एका छत्राखालीं आणावयाचें होतें व त्या दृष्टीनें ते प्रयत्नशील होते. त्यांना आपल्या कामांत बरेंचसें यशहि मिळालें होतें. दिल्ली सुद्धां त्यांच्या हातांत आली होती. पण त्यांचें कार्य ऐन रंगांत आलें असतांच त्यांना देवाज्ञा झाली.



अहिल्याबाईनें मालेराव याला राज्यावर बसविलें. परंतु त्यांत राजोचित गुणांचा अभाव होता. इतकेंच नव्हें तर तो दुष्टहि होता. प्रजेला त्याचें राज्य मुळींच नको होतें. पुढें तो नऊ महिन्यांतच वारला.

आतां गादीवर कोणाला बसवावें म्हणून सर्वांना प्रश्न पडला. परंतु अहिल्याबाईनें

स्वतःच राज्यकारभार करण्याचें ठरवून अधिकार सूत्रें आपल्या हातांत घेतली.

स्वार्थी व चतुर लोकांना वाटलें कीं एक स्त्री गादीवर बसल्यामुळें आपला बराच फायदा होईल. म्हणून त्यांनीं ह्या गोष्टीस मान्यता दिली. परंतु अहिल्याबाई मनुष्य पारखी होती. तिनें गादीवर बसल्यावर जे लोक खरोखरच योग्य होते अशाच लोकांना अधिकाराच्या जागा दिल्या. जे लोक प्रजेचे हितचिंतक होते त्यांना मंत्र्यांच्या जागेवर नेमलें.

ही गोष्ट चतुर लोकांच्या लक्षांत येतांच ते अहिल्याबाईला हुसकावून लावण्याच्या मार्गाला लागले. त्यांनी कारस्थान करून तिला गादीवरून काढून टाकण्याचा बेत केला. गंगाधर यशवंत नांवाचा एक माणूस ह्या सर्वांचा मार्गदर्शक होता. हा होळकरांच्या-कडला पुरोहित होता.

एके दिवशीं तो अहिल्याबाईला म्हणाला—"राणी साहेब, राज्य कारभाराचीं सूत्रें आपण आपल्या हातांत घेतल्यानें फार मोठी जबाबदारी आपल्या डोक्यावर येऊन पडली आहे. वास्तविक अबलांचें हें काम नव्हें. म्हणून मला आपलें असें वाटतें कीं आपण आपल्या वंशांतील कोणाला तरी गादीवर बसवावें व त्याच्या वतीनें कारभार पाहण्यासाठीं मंत्री मुत्सद्यांच्या हातीं सर्व सूत्रें द्यावीत. आपलें हें काम नव्हें. हरिनामाचा जप व्रत वैकल्यें ह्यांतच आपल्या मनाला विरंगुळा वाटेल."

"मला वाटलें पूजेअर्चेसंबंधीं कांहीं उपदेश करतां आहां. हे बघा शास्त्रीबोवा, मी एका राजाची सून, एका राजाची बायको आणि एका राजाची आई आहें. माझा त्या गोष्टींशीं जास्त संबंध आला आहे. म्हणून त्या संबंधीं काय करावयाचें तें माझें मी पाहून घेईन. तुम्हांला कष्ट करण्याची गरज नाहीं. पूजे अर्चे संबंधी कांहीं असेल तर सांगा." अहिल्याबाईनें गंगाधर यशवंताला खूप खडसावून सांगितलें.

गंगाधररावाला ही गोष्ट फार बोचली. त्यानें पुण्याचे माधवराव पेशवे यांचे चुलते राघवराव यांना कळविलें कीं सध्यां आमच्यावर एक स्त्री राज्य करीत आहे. तरी आपण स्वतः येऊन अधि कार सूत्रें आपल्या हातीं घ्यावीत.

राघोबादादा जेवढा पराक्रमी होता तेवढाच लोभीहि होता. चालून आलेली संधि तो वाया कशी जाऊं देईल! त्यानें अहिल्याबाईकडे निरोप पाठविला कीं आपल्या
















राज्यावर स्वारी करण्यासाठी एका बाजूनें रजपूत व दुसऱ्या बाजूनें इंग्रज टपून बसले आहेत अशा परिस्थितींत तोंड देणें अबलेला शक्य होणार नाहीं. करितां राजवंशांतील कोणासहि राज्यावर बसवून मंत्र्यांच्या हातीं राज्यसूत्रें देण्याची व्यवस्था करावी.

"आपला निरोप व मानस समजला. मी येथें डोळे उघडे ठेवूनच कारभार चालवीत आहें. तेव्हां सर्व गोष्टींची मला संपूर्ण माहिती आहे. कोणाच्या धमक्यांना भीक घालणारी मी नाहीं. आपल्या ह्या धोरणाचा कांहीं अनिष्ट परिणाम झाला तर प्रायःश्चित्त भोगण्यास तयार रहावें ही विनंती." अहिल्याबाईनें उलट उत्तर पाठविलें.

अहिल्याबाईचा निरोप कळतांच राघोबादादांचा क्रोध भडकला. एका बाईची एवढी हिम्मत ! तिचा सासरा तर आमचा एक सरदार होता. तें कांहीं नाहीं. तिला एकदां धडा दिलाच पाहिजे. त्यानें ठरविलें.

इकडे अहिल्याबाईनें षडयंत्र कारस्थानें करणारांस पकडून कैदेंत टाकलें.

कांहीं दिवसांनीं तिनें राघोबाला पाहुणा म्हणून इंदुरांतच ठेवून घेतलें. त्यावेळीं त्यानें अहिल्याबाईचा कारभार व नीति कुशलता पाहून घेतली. त्याला धन्य वाटली. तरी पण एका बाईनें आपला दिमाख दाखवावा. हें शल्य त्याला बोचत होतें.

गंगाधर यशवंतानें राणीची क्षमा मागून आपली सोडवणूक करून घेतली आणि पुन्हां पूर्वीप्रमाणेंच पौरोहित्य करूं लागला. त्यानंतर त्यानें कैदेंत असलेल्या इतर लोकांकडून सुद्धां राजनिष्ठ राहाण्याची शपथ घेवविली आणि त्यांची तुरुंगांतून सुटका करवून घेतली.

हें सर्व झालें तरी राघोबाच्या मनांतील शल्य नाहींसें झालें नव्हतें. त्यानें रजपुतांना इंदूरवर चढाई करण्यासाठीं भडकविलें.



ह्या बातमीमुळें अहिल्याबाई भ्याली नाहीं. तिनेंहि सैन्याची जमवाजमव केली. शिंदे, भोंसले, गायकवाड वगैरेंनीं आपल्या फौजा तिच्या मदतीसाठीं पाठविल्या. ह्या सर्व सैन्याचें आधिपत्य तिनें तुकोजीरावांकडे सोंपविलें होतें. तो फार हुशार आणि युद्धनीतिकुशल होता. त्यानें आपल्या चातुर्यानें रजपुतांना युद्धांत हारवलें आणि मैदानांतून पळवून लावलें.

एवढें झालें तरी राघोबाची खुमखुमी कांहीं जिरली नाहीं. त्यानें तिच्याकडे पैसे मागितले. त्यानें तिला लिहिलें 'माझ्याजवळ पैसे नाहींत आणि आपला खजिना भरलेला आहे. त्यांतील थोडा पैसा इकडे पाठविल्यास आपल्या राज्यांत कोण त्याहि प्रकारची लूट भासणार नाहीं.'

अहिल्याबाईनें उलट कळविलें—"माझ्या खजिन्यांतील सर्व धन कृष्णार्पण केलेलें आहे. भगवंताच्या नांवानेंच त्याचा सद्व्यय झाला पाहिजे. अन्यथा नाहीं. तरी सुद्धां आपल्याला फारच गरज असेल तर त्यांतील थोडें द्रव्य देवाच्या नांवानें दान म्हणून आपल्याला देऊं शकतें. आणि आपण ब्राह्मण असल्या कारणानें दान घेऊं शकतां."











"ही बाई दान देणार! हं!! मला पाहिजे तेवढें मीच स्वतः जाऊन घेतो." असें म्हणून त्यानें सैन्य जमवून इंदूरनगरावर चाल केली.

अहिल्याबाईला कल्पना होतीच. तिनें आपल्या पांचशें दासींचें सैन्य तयार केलें आणि स्वतः चिलखत घालून घोड्यावर बसून ते सैन्य घेऊन राघोबाला सामोरी गेली.

राघोबाला जरा विचित्र वाटलें. त्यानें विचारलें 'सैन्य कोठें आहे?'

"आम्ही पेशव्यांचे सरदार. त्यांच्याशीं युद्ध करूं? परंतु माझ्या शरीरांत प्राण असेपर्यंत खजिन्यांतील एक कोडीहि आपल्याला घेऊं देणार नाहीं. मला मारून मग पाहिजे तर घ्या."

अहिल्याबाईच्या उत्तरानें त्याला लाज वाटली. मनांतल्या मनांत तिच्या हुशारीचें कौतुक करीत तो आल्या मार्गानें परत गेला.

अहिल्याबाई बुद्धिमान होती. युद्धांतच नव्हे, तर तिचें चातुर्य रोजच्या कारभारांतहि दिसून येत होतें. तिच्या कारकिर्दीत दिवसेंदिवस राज्याची भरभराट होत गेली.

ती गादीवर बसली तेव्हां राज्यांत ठग आणि डाकूंचा फार सुळसुळाट माजला होता. त्यांचें दमन करण्यासाठीं तिनें घोषणा केली की जो वीर पुरुष यांचा बंदोबस्त करील त्याच्याशीं माझ्या मुलीचें लग्न लावून देईन. यशवंतराव नांवाच्या एका तरुण वीरानें तें काम करून दाखविलें, आणि अहिल्याबाईनें आपल्या मुलीचें-मच्छाबाईचें त्याच्याशीं लग्न लावून दिलें.

ती राज्याच्या सर्व मुख्य अधिकाऱ्यांच्या कामावर विशेष नजर ठेवीत असे. प्रजेला कोणी दुःख दिल्यास ती त्याला कधीं क्षमा करीत नसे.

एकदां बसिया नांवाच्या गांवांत एक धनी गृहस्थ वारला त्याला संतान नसल्यामुळें एवढ्या संपत्तीला कोणी वारस राहिला नाही. त्या स्त्रीच्या मनांतून एक मुलगा दत्तक घ्यावयाचा होता. परंतु बेवारशी संपत्ति सरकारी खजिन्यांत यावी म्हणून पाटलानें तिला अडथळा घातला. अहिल्याबाईला ही गोष्ट समजतांच तिनें गांवच्या पाटलाला चांगली तंबी दिली आणि त्या बाईच्या इच्छेप्रमाणें तिला दत्तक घेण्याचा अधिकार दिला.

एकदां आणखी एका गांवांत दोघे धनी व्यापारी निस्संतान वारले. त्या दोघांच्याहि बायका विरक्त होत्या. त्यांना





कशाचाहि मोह नसल्यानें त्यांनी आपली सर्व संपत्ति अहिल्याबाईच्या पायावर ओतली आणि स्वतः तीर्थ यात्रेस जाण्यासाठीं तयार झाल्या.

अहिल्याबाईनें त्यांना उपदेश केला. म्हणाली—"सरकारी खजिन्यांत सध्यां पैशाचा तुटवडा नाहीं. म्हणून तुम्ही आपलें हें धन सत्कार्यी लावा. तुम्हांला पुण्यलाभ होईल आणि प्रजेचा आशीर्वाद मिळेल." तिच्या उपदेशाप्रमाणें त्या स्त्रियांनी आपल्या धनाचा उपयोग विहिरी आणि तलाव बांधण्याकडे केला. कोठें कोठें गरीबांच्या-साठीं अन्नछत्रें सुरू केलीं आणि त्यांचे आशीर्वाद घेतले.

अहिल्याबाई साध्वी आणि साधी स्त्री होती. ती कधीं उंची वस्त्रें भूषणें घालीत नसे. आपली सारी संपत्ति शुभकार्यामध्यें व्यय करीत असे. परमेश्वरावरील श्रद्धा आणि विश्वास वाढावा म्हणून तिनें जागोजागी देवळें बांधविलीं. तिनें बांधविलेल्या देवळांत गयेला बांधविलेलें विष्णुपादालय फार प्रसिद्ध आहे.

अहिल्याबाई सत्तर वर्षे जगली. तिचें आयुष्य सुखशांतिमध्यें गेलें. परंतु तिला एका गोष्टीचें फार दुःख होई. तें म्हणजे तिची मुलगी तिच्या देखत नवऱ्याबरोबर सती गेली.

अहिल्याबाई विषयीं ज्योतिष्यांनीं जें भाकित केलें होतें तें सोळा आणे खरें झालें. ती एका शेतकऱ्याची मुलगी होती. पण राजाची राणी होऊन तिनें बरेच दिवस उत्तम तऱ्हेनें राज्य चालविलें. तिच्या सात्त्विक धार्मिक आचरणामुळें तिची कीर्ति अजरामर झाली.



## मोहाच्या सांजोऱ्या





काबरी शहरांत मोहा नांवाचा एक प्रसिद्ध विदूषक रहात असे. एकदां त्याला सांजोऱ्या खाण्याची फार इच्छा झाली. शेजारच्या घरीं जाऊन तो कढई मागून घेऊन आला.







मोहानें सांजोऱ्या तयार करून पोट भर खाल्ल्या. रिकामी कढई कशी द्यावी म्हणून त्यानें एक सांजोरी तींत घालून शेजाऱ्याकडे कढई नेऊन दिली व म्हणाला—"आपल्या कढईला एक मूल झालें आहे."

शेजारी लोभी होता. त्यानें अशाच सांजोऱ्या पुन्हां मिळाव्या म्हणून मोहाला आपली कढई नेऊन दिली. पण कढई परत आली नाही., तेव्हां त्यानें ती परत मागितली. तेव्हां मोहा म्हणाला—"तुमची कढई मेली! जिला मुलें होतात तिला कधीं मरण हें येणेंच......!"

# गोहाचा पाहुणा





गोहा एक भोजन भट्ट होता. एकदां त्याला त्याच्या ओळखीच्या माणसानें एक कोंबडी दिली. गोहानें ती भाजून आपली कृतज्ञता दर्शविण्यासाठीं त्या माणसाला त्यानें जेवायला बोलाविलें. जेवणखाण झाल्यावर त्याचा पाहुणा निघून गेला.





थोड्या वेळानें त्या पाहुण्याच्या शेजाऱ्यानें येऊन गोहाच्या दरवाज्यावर थाप दिली. गोहानें त्याला पण जेवायला वाढलें. तितक्यांत आणखी एक जण येऊन म्हणाला–

"तुम्हांला ज्या मित्रानें कोंबडी दिली त्या मित्राचा मी मित्र आहें." "असें म्हणत तो बोलीत आला. "ओहो असें होय ! ती कोंबडी ज्या पाण्यांत शिजविली होती त्याची ही बहीण आहे !" गोहा म्हणाला.





## कांसवाची पाठ

चेन्शी हा सू चौ नगरांत राहात असे. नगराच्या पश्चिम द्वाराजवळ त्याचें घर होतें. सुमारें पांचशें वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. तो सर्वकला प्रवीण होता. खेळ, चित्रकला, नाट्यकला, गायन वादन वगैरे जें कांहीं तो शिकत असे त्यांत प्राविण्य मिळवीत असे. तो लहान असतां एकदां एका ज्योतिष्यानें त्याला सांगितलें की तूं मोठा श्रीमंत होशील. तेव्हांपासून त्यानें पैसा जमविणें तर राहोच असलेला पैसा सुद्धां उडवून टाकिला.

थोड्याच दिवसांत त्याची जमीन जायदाद जें कांहीं जवळपास होतें, तें सर्व संपुष्टांत आलें. या उलट बाकीच्या व्यापाऱ्यांनीं आपली संपत्ति दुप्पट तिप्पट वाढविली. त्यांना पाहून चेननें सुद्धां व्यापार करण्यास सुरवात केली.

तो हुशार होता म्हणून फार विचार करून निवडक वस्तूच विकत घेत असे. ज्यांचा बाजारांत जास्त खप आहे किंवा ज्यांच्या किंमती वाढण्याची शक्यता आहे अशाच वस्तू तो मागवीत असे. पण त्याच्या दुर्दैवानेंच म्हटलें पाहिजे त्या जिनसा पावसा-पाण्यानें भिजून घाण होत असत नाहीं तर अपघातांत जळून जात असत. अशा कांहीं ना कांहीं कारणानें नुकसानच त्याच्या पद-रांत पडत असे. त्याचें नुकसान होई, त्याबरोबर त्याच्या भागीदारांचेंहि नुकसान होई. लोक त्याला दुर्दैवी समजूं लागले व त्याच्याशीं भागीदारी सोडून दिली आणि शेवटीं त्याचें दैव खरोखरींच त्याच्या विरुद्ध होतें की काय, त्याला आपल्या मित्रांच्या तोंडाकडे पहात दिवस काढावे लागत.

श्री. मा. गो. देसाई



एकदां चाळीस व्यापारी मिळून एक जहाज भर माल घेऊन समुद्रपार व्यापार करण्यासाठीं निघाले. वेनलाहि वाटलें कीं आपणपण त्यांच्याबरोबर जावें. व्यापार नाहीं तर नाहीं निदान गप्पा मारून वेन करमणूक तरी करील म्हणून त्यांनीं त्याला आपल्या-बरोबर येण्यास परवानगी दिली.

वेनला निरनिराळे देश हिंडून फिरून पाहण्याची फार हौस होती. पण चांग म्हणून व्यापाऱ्यांचा एक पुढारी होती. वेननें सुद्धां व्यापार करावा असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें आपल्या मित्रमंडळीं जवळून थोडे थोडे पैसे वसूल केले. कांहींनी पैसे दिले कांहींनीं दिले नाहींत. जेवढे जमले तेवढेच त्याला देऊन तो म्हणाला—"माल विकत घ्यावयाला कांहीं हे पैसे पुरणार नाहींत म्हणून कांहीं फळफळावळ विकत घे. वाटेल खाण्यापिण्यास तरी उपयोगी पडतील."

बंदराजवळ पुष्कळशीं फळें विकायला होतीं. वेननें त्याच्या जवळील पैशांची खूपशीं संतरीच विकत घेतलीं. ते पाहून सर्व व्यापारी त्याची चेष्टा करूं लागले. तरी वेन कांहीं बोलला नाहीं.

कांहीं दिवसांनीं तें जहाज एका देशांत पोहोंचलें. या देशांत चिनी मालाला दसपट किंमत येत असल्यामुळें प्राणाची पर्वा केल्या-शिवाय चिनी व्यापारी तेथें जात असत. धक्क्याला लागून जहाजानें नांगर टाकतांच सर्व व्यापारी आपापला माल घेऊन गांवांत गेले. आपल्या फळांना सर्व हंसल्यामुळें वेननें त्याच्याकडे लक्षच दिलें नव्हतें. सर्व-जण उतरून गेल्यावर वेननें फळांची काय दशा आहे हें पाहण्यासाठीं सर्व फळें वर आणून पसरून ठेविलीं त्यांची चव बघण्या-करितां त्यानें एक फळ सोलून खाल्लें. ती खाण्याची वस्तू आहे हें पाहून जवळ पासचे








लोक ती लाल केशरी फळें पाहून जवळ आले. एका माणसानें एक रुपया देऊन एक संत्रें घेतलें आणि खाऊन टाकलें. त्याला तें फार आवडलें म्हणून त्यानें दहा रुपयांची फळें घेतली. त्यानंतर बऱ्याच लोकांनीं येऊन त्याच्या जवळून फळें खरेदी केली. हां, हां, म्हणतां त्याचा अर्धा अधिक माल उडाला. आतां त्यानें त्याची किंमत दुप्पट केली. तरीहि लोकांनीं माल विकत घेतला. वेनचें भाग्य पालटलें. या व्यापारांत त्याला फार चांगला फायदा झाला.

इतर व्यापाऱ्यांना जेव्हां हें समजलें तेव्हां त्यांनीं वेनला सुचविलें कीं आतां झालेल्या नफ्यांत येथून कांहीं तरी माल घेऊन जाऊन आपल्या देशांत वीक. पण त्यानें लोभ दाखविला नाहीं. म्हणाला—"जेवढें माझ्या नशिबानें मिळालें आहे तेवढेंच मला पुरें."

जहाजावरील व्यापाऱ्यांना आपला माल विकून दुसरा माल घेण्यास सुमारे पंधरा दिवस लागले. तोंपर्यंत वेननें आरामपणें गांवांत हिंडून फिरून मजेंत दिवस घालविले.

सर्व व्यापारी जहाजावर आल्यावर जहाज परत आपल्या देशांत जाण्यासाठीं निघालें. थोडे दिवस गेल्यावर एक मोठें वादळ आलें व त्यांत तें जहाज वाहात एका निर्जन बेटाला लागलें. तेथेंच त्यानें नांगर टाकला. वादळ थांबेपर्यंत सर्वजण बोटीवर अडकून राहिले. वेनला हिंडण्याची फार हौस म्हणून तो तें बेट पहावयास निघाला. सर्व त्याला हंसले. तरी त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें. म्हणाला—"मी ओसाड बेटावरील हिरवळच बघावयाला जात आहें."

सर्व बेट त्यानें हिंडून पाहिलें. त्यावर त्याला फारसे प्राणी सुद्धां दिसले नाहींत. एके ठिकाणीं एक मोठा उंचवटा दिसला त्यावर चढून त्यानें पाहिलें. चारी बाजूस












त्याला सर्व हिरवेंगार दिसलें आणि त्या पलीकडे समुद्र. इतक्यांत त्याची नजर जवळच पडलेल्या कांसवाच्या पाठीकडे गेली. ती खूप मोठी होती. "इतकें मोठें कांसव तरी असतें का!" म्हणून त्याला आश्चर्य वाटलें. 'आपण इतकी मोठी कांसवाची पाठ पाहिली असें जर सांगितलें तर आपल्या-वर कोणी विश्वास देखील करणार नाहीं. आणि जर ह्याला पाय लावले तर छान चांगला पलंग तरी होईल. ही पाठ घेऊन जावी म्हणून त्यानें त्याला कापड गुंडाळलें आणि ओढत ओढत जहाजापर्यंत नेलें.

"हें काय हें हा घेऊन आला आहे! सर्व फुकट आहे." एक जण म्हणाला. "अरे कांहीं नाहीं तरी औषधाला ह्याचा उपयोग होईल." दुसरा म्हणाला. "तुम्हीं नाहीं कां विदेशांतून माल आणलांत! तसाच हा. फरक एवढाच कीं तुम्हीं विकत आणलांत. मी फुकट आणला आहे." वेन म्हणाला.

तुफान थांबल्यावर जहाज स्वदेशी परत गेलें. व्यापारी दलालाच्या सांगण्यावरून त्यांच्या मालकांच्याकडे गेले. वेनला सुद्धां एक दलाल एका इराण्याकडे घेऊन आला. त्याचें नांव होतें अबू अहसन. त्यानें आपल्या पाहुण्याच्या सत्कारासाठीं मोठी मेजवानी दिली. त्यांत वेन बरोबर आलेल्या व्यापाऱ्यांना सुद्धां त्यानें बोलविलें.

अशा जेवणाच्या वेळीं त्यावेळीं त्या देशांत असा रिवाज होता कीं जो व्यापारी सर्वांत उत्तम आणि किंमती वस्तू आणील त्याला जेवतांना प्रथम स्थान दिलें जात असे. जेवणाच्या वेळीं इराण्यानें सर्वांच्या मालाची यादी पाहिली आणि त्या प्रमाणें सर्वांना बसविलें. त्या हिशोबानें वेनला अगदीं शेव-टच्या पानावर बसावें लागलें. पण त्यामुळें त्याला जेवण गोड लागलें नाहीं.

दुसरे दिवशीं इराणी माल पाहण्यासाठीं बोटीवर गेला. वर चढतांच समोरच त्याला भली मोठी कांसवाची पाठ दिसली. ती पाहून त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें चौकशी केली तेव्हां त्याला समजलें कीं ती वेननें आणली आहे. तें ऐकतांच त्याला थोडें दुःख झाल्याचा भास झाला आणि त्याच्या चेहेऱ्यावर राग प्रगट झाला. म्हणाला—"इतके दिवस आपला व्यापारी संबंध असून ही अशी मूल्यवान वस्तू आणणाराचें नांव मला कसें कळविलें नाहींत आणि काल सुद्धां त्याच्या मालाचा उल्लेख केला नाहींत.





      

त्याचा पहिला मान असून त्याला काल पंगतींत अगदीं शेवट बसावें लागलें. अगोदर जाऊन मला त्याची क्षमा मागितली पाहिजे. मागून बाकी सर्व." असें म्हणून तो चेनकडे गेला. त्याची क्षमा मागून त्याला आपल्या दुकानांत बसवून तो बाकीच्या मालाची विल्हेवार लावण्यास सर्वांना घेऊन आला. अबू हसननें सर्वांच्या समक्ष चेनला विचारलें कीं तूं ती कासवाची पाठ विकणार आहेस का ?

"जर चांगली किंमत आली तर विकीन." चेननें विचार करून सांगितलें.

"केवढ्याला विकण्याचा विचार आहे ! मी सौदा करावयास आलों आहें. नुसती विचारणा नाहीं !" अबू हसन म्हणाला. चेननें चांगच्या कानांत कांहींतरी सांगितलें. तेव्हां चेनच्या वतीनें चांग अबू हसनला म्हणाला—"हे दहा हजार सांगावें म्हणत आहेत."

"उगीच चेष्टा नको. नसेल विकावयाची तर तसें सांगा." इराणी म्हणाला.

त्यावर चांगनें चेनची सर्व कहाणी त्याला सांगितली आणि म्हणाला—"त्याची किंमत काय ती आपणच ठरवा." अबू हसननें चेनला पन्नास हजार चांदीचे तुकडे देऊन ती विकत घेतली. तेव्हां सर्वांना कळलें कीं कांसवाची पाठ फार महाग असते.

असें म्हणतात कीं कांसवाच्या पाठींत मूल्यवान मोती असतात. कधीं कधीं ते मोती तर सागरगोट्या एवढे मोठे असतात.

अशा तऱ्हेनें चेनची साडेसाती संपून त्याला चांगले दिवस आले.

दैव अनुकूल असेल तर प्रयत्न केल्या-शिवाय माणसाला यश मिळतें. पण दैवानें पाठ फिरविली तर मात्र त्याचे सर्व श्रम व प्रयत्न अयशस्वी ठरतात.






पौर्णिमेच्या दिवशीं आजोबा मागच्या प्रमाणेंच खुर्ची टाकून चांदण्यांत बसले. अर्थातच मुलें त्यांच्या भोंवती गोळा झालीं. आजोबा कांहीं विचार करतां करतां हंसले आणि एक श्लोक म्हणाले—

"मनसा बध्यते जीवो,
मनसैव विमुच्यते—
देवदासो मतो बन्धै
वेश्यादासो विमोचितः ।"

"म्हणजे काय हो आजोबा !" मुलांनीं विचारलें.

"ह्या श्लोकाचा अर्थ ! बरंऽऽ. सांगतों हां." असें म्हणत त्यांनीं तपकिरीची डबी उघडली. एक चिमूट बोटांत घेतली. नाक-पुडींत खुपसली आणि नाक उपरण्यास पुशीत सांगूं लागले. म्हणाले—

जीव आणि मन हे एक मेकाशीं संबंधित म्हणजे गुंतलेले असतात आणि मनामुळेंच मनुष्याला मोक्ष मिळत असतो. केव्हां केव्हां देवदास नांवाचा नरकांत जातो तर वेश्या-दास नांवाचा मोक्ष मिळवितो.

"कोण देवदास ! मग वेश्यादासालाच कसा मोक्ष मिळाला ! सांगा ना आजोबा त्यांची गोष्ट. खूप मोठी आहे !"

"आहे आपली लहानशीच. बरं ऐका." आजोबांनीं गोष्ट सांगण्यास सुरवात केली.

अवंती नगरांत दोन ब्राह्मण तरुण राहात होते. ते दोघे जीवश्चकंठश्च मित्र होते. परंतु दोघांच्या स्वभावांत आणि आचरणांत आकाश पाताळाचें अंतर होतें. एक नेहमी देवाची पूजा अर्चा करीत असे. त्याच्या भक्तींत दिवस घालवीत असे. भजन करून

श्री. का. गो. देसाई









देवाला आळवीत असे. सदाचरणानें वागत असे. ते पाहून लोक त्याला 'देवदास' म्हणत असत.

दुसरा दुराचारी होता. भोगविलासांत दिवस घालवीत असे. त्याला लोक वेश्यादास म्हणत.

असे ते दोघे मित्र कांही दिवसांनी मरण पावले. त्यांचे प्राण नेण्यास यमदूत व विष्णुसेवक आले. विष्णुसेवकानें वेश्यादासाला मोक्षाला नेलें आणि यमदूतानें फास टाकून देवदासाला नरकांत पाठविलें.

"हा काय तुमचा न्याय आहे? मी एवढें पुण्यकर्म करून नरकांतच का!" देवदासानें विचारलें.

"जसें ज्याचें मन तसें फळ. आम्ही तरी काय करणार! तूं कर्मानें चांगला होतास पण तुझें मन नेहमीं म्हणत असे, "तो किती मजेंत दिवस घालवीत आहे नाहीतर! आपण सारखे उदास." आणि तो म्हणत असे, "देवदास कसें सत्कर्मानें वागतो आहे. त्याला मोक्ष मिळणार. नाहीतर आपण. नरकांतच." जसें मन तशी गति. नुसत्या कर्मावर कांही नाहीं." यमदूतानें सांगितलें.

म्हणूनच म्हटलें आहे—

"न काष्ठे विद्यते देवो,
न पाषाणे न मृण्मये,
भावेषु विद्यते देव
तस्माद्भावोहि कारणम् ।"

[देव लाकडांत, दगडांत, किंवा मातींत कशांतहि नाहीं. तो आपल्या बुद्धि मध्यें, भावनेमध्यें आहे.]

जैसा भाव तैसा देव.

इटकुली मिटकुली गोष्ट. आमची गोष्ट संपली, बाळांना झोप आली. जा आतां निजा.



# सांचीचा स्तूप

भोपाळहून झांशीकडे जाऊं लागलों म्हणजे भोपाळपासून तीस मैलावर सांची गांव आहे. बौद्धकालीन अवशेषांच्या साठीं सांची गांव फार प्रसिद्ध आहे. असें म्हणतात, हिंदुस्तानांत येथील स्तूपच सर्वांत जुना आहे. सारिपुत्त आणि मोगल्ल नांवाचे बौद्धाचे दोघे शिष्य होते. त्यांच्या अस्थि एका स्तूपांतच ठेविल्या आहेत. ह्या ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं बरेच दिवस लंडन वस्तु संग्रहालयांत ठेविल्या होत्या. परंतु सन् १९४९ मध्यें त्यांनीं त्या परत पाठविल्या. सांचीचा स्तूप फार प्रसिद्ध आहे. त्याचा व्यास जवळ जवळ १२० फूट आहे व उंची ५४ फूट आहे. ह्याची बांधणी रेताड दगडाची असून त्याच्या चौफेर दगडांनीं चिणलेला मार्ग आहे आणि ह्या सर्वां भोंवतीं दगडीच प्राकार आहे. ह्याला चार दरवाजे आहेत. प्रत्येकाची उंची सुमारे साडे २८ फूट आहे. ह्या दारांवर जातक कथा चितारल्या आहेत. दक्षिण दरवाज्याजवळ अशोकाच्या शिलालेखाचा एक भाग आहे

हा स्तूप इ. स. पूर्वी २५० वर्षे अशोक राजानें बनविला होता. ह्या प्राचीन स्तूपाची प्रशंसा जगभर पसरली आहे.















# पुणें येथील वैभवशाली शनिवारवाडा

[लेखक :—श्री दामोदर शंकर जोशी, पुणें.]

मिति माघ शुद्ध ३ शके १६५१ म्हणजे १० जानेवारी १७३० ला पुणें येथें पहिल्या बाजीरावाच्या कारकीर्दीत प्रसिद्ध अशा शनिवार वाड्याचें बांधकामास सुरवात झाली. या गोष्टीला आज २३० वर्षें लोटलीं आहेत.

बाजीराव मधून मधून पुण्यास येत असत तेव्हां त्यांचा मुक्काम कसब्यांत धडफळे यांच्या वाड्यांत असे. शके १६५० मध्यें नदीकिनाऱ्याला जो कोट होता तो कोट बाजीरावांनीं पाडून मैदान केलें आणि मुत्सद्दी वगैरे लोकांस घरें बांधावयास जागा दिली. पूर्वेच्या बाजूस दोन गांव होतें तें मोडून कसबा केला. कसबा शाहूनें पेशव्यांस इनाम दिला. शके १६५१ मध्यें मावळवेसीजवळ जागा घेऊन वाडा बांधावयास आरंभ केला. नवबुरजी कूस वाड्यास घालून आंत इमारत केली. या वाड्यांत जयपूर येथील कारागिरांकरवीं भिंतींवर सुंदर चित्रें बाजीरावानें काढून घेतलीं. प्रथमच्या इमारतीत दोन मजले व दोन चौक होते. पुढें नानासाहेब पेशवे यांनीं त्यांत अनेक फेरफार करून तो मोठा केला. कांहीं भागाचे सहा मजले करून चार चौक केले. चौक फरसबंदी असून मध्यें कारंजीं होतीं. वाड्याच्या सभोंवतालचा कोट नानासाहेबांनीं सन १७५५ त बांधला.

महाराष्ट्रांतील सर्व मोठ्या वाड्यांप्रमाणें शनिवारवाड्याचें तोंडहि उत्तरेकडे आहे. त्याला दिल्ली दरवाजा असें नांव आहे. मराठे सरदारांची दृष्टि नेहमीं उत्तरेस दिल्लीवर खिळून राहिलेली असावयाची. शनिवारवाडा सागवानी लाकडाचा असून त्यांतील नक्षीचें काम प्रेक्षणीय होतें. 'शनिवारवाडा इंद्रप्रस्थ येथील पुराणप्रसिद्ध वाड्याचे वर हुकूम बांधला होता. वाड्यांतील कारंजापैकीं कमलाकृति कारंजें भारतांत सर्वांत मोठें असून त्या कल्पनेचा उगमहि भारतीयच आहे.' असा उल्लेख या वाड्या संबंधीं सांपडतो. याच शनिवार वाड्यांतून मराठ्यांचें राजकारण चालत असे.



काय रे शोधतो आहेस ?
कांही नाहीं.
ओहो! खालच्या खणांतील डावीकडचा दुसरा डबा पहा.



ह्या चष्म्यानें मला वाचतां येईल म्हणतां !
छान! छान!! आजपर्यंत मला कधीच वाचतां येत नव्हतें.



लाम लाम, काय तुला लिहता तरी येतं का! हो! लिहता येतं, पन वाचाल्ला नाहीं येत अजून.



मुलांनीं खोटें बोलले तर काय होतें माहीत आहे!
हो, तिकिटाशिवाय आगगाडीतून जातां येतें.

चित्रकार : एस. शंकरनारायण




# महाभारत

महारथी- सात्यकी वाटेंत हत्ती, रथी किंवा महारथी जो कोणी आडवा आला त्याला कापीत सैन्याचा संहार करीत अर्जुन युद्ध करीत होता तेथें येऊन पोंचला.

परंतु युधिष्ठिराला अर्जुनाची फार काळजी वाटत होती. सात्यकी अर्जुनाच्या मदतीस गेला तो अद्याप परतला नाहीं. त्याच्या कडून कांहीं निरोप देखील नाहीं. म्हणून धर्मराजानें भीमाला बोलावून म्हटलें—" या दोघांना काय झालें कांहीं समजत नाहीं. तूंच गेलें पाहिजे त्यांच्या मदतीस."

भीमानें युधिष्ठिराच्या रक्षणाचा भार धृष्टद्युम्नावर टाकला आणि रथांत बसून अर्जुन व सात्यकी ज्या दिशेनें गेले होते त्याच दिशेनें प्रस्थान केलें. त्याला देखील द्रोणानें अडविलें. द्रोणाला वाटलें कीं ही स्वारी देखील अर्जुन व सात्यकीप्रमाणें पुढें निसटून जाईल. परंतु भीमानें कधीं कोणाचें अनुकरण केलेंच नव्हतें. त्यानें आपली गदा गरगर फिरवून द्रोणाच्या रथावर फेंकली. द्रोणानें रथांतून वेळींच उडी मारली म्हणून वांचला.

कौरवांनीं रचलेल्या व्यूहाच्या द्वारावर दुर्योधनाचे अनेक भाऊ रक्षणार्थ उभे होते. भीमानें एका मागून एक कुंडभेदी, सुषेण, दीर्घनेत्र, वृन्दारक, अभय, रौद्रकर्म, दुर्विमोचन, सुशर्मा, सुदर्शन वगैरेंचा संहार केला.

मार्ग मोकळा होतांच भीम वेगानें अर्जुन आणि सात्यकी होते तेथें पोंचला. अर्जुनाला पाहतांच त्यानें सिंह गर्जना केली. ती वरून अर्जुन जिवंत असल्याचें युधिष्ठिराला कळल्यानें त्याला परमानंद झाला.

भीमाला पाहून कर्णाला त्वेष चढला. दोघांचें युद्ध सुरू झालें. भीम गदा युद्धांत पटाईत होता. परंतु धनुर्विद्येंतहि त्यानें असें कौशल्य दाखविलें कीं कर्णाला रथ सोडून थोडा वेळ का होईना पळून जावें लागलें. कर्ण पुन्हां दुसऱ्या रथांत बसून युद्धास तयार झाला.

आतां रथावरून उतरण्याची पाळी भीमाची होती. त्याच्या हातांत शस्त्र देखील नव्हतें. त्यावेळीं भीमाला यमलोकीं पाठविणें कर्णाला शक्य होतें. परंतु त्याला कुंतीला दिलेल्या वचनाची आठवण झाली म्हणून कर्ण अर्जुनाला एका बाणानें जखमी करीत म्हणाला—" तूं लाडवांवर हात मारायचें सोडून इकडे युद्ध करण्यास कशाला रे आला आहेस ?"

भीमाचा चेहरा या अपमानानें लाल झाला. तो म्हणाला—" दुष्टा ! माझ्या समोरून कितीदां शेपूट दावून पळालास हें विसरलास वाटतें. असेल हिम्मत तर शस्त्र फेंकून देऊन ये पुढें. मी तुझा मित्र कीचक याच्या भेटीला तुला पाठवून देतों."

तितक्यांत अर्जुन येत असलेला पाहून कर्णानें पाय काढला. कारण अर्जुनाचे बाण येऊन त्याच्यावर आदळूं लागले होते. भीम सात्यकीच्या रथांत जाऊन बसला.




त्यानंतर सात्यकी आणि भूरिश्रवा यांचें युद्ध सुरू झालें. या युद्धांत सात्यकीला भूरिश्रवानें निःशस्त्र करून सोडलें. त्याला मारण्यासाठीं भूरिश्रवानें तलवार उचलल्याबरोबर अर्जुनानें अर्धचंद्राकार बाण काढून त्याच्यावर सोडला. तो बाण लागतांच तलवारी सकट तो हात तुटून दूर जाऊन पडला. त्याच तलवारीनें सात्यकीनें भूरिश्रवाचें डोकें उडविलें. सात्यकीनें धर्मविरुद्ध अन्यायानें भूरिश्रवाचा वध केला आहे असा कौरवांनीं गिल्ला केला. " निःशस्त्र अभिमन्यूवर पांच पांच महारथ्यांनीं एकाच वेळीं वार करून










त्याचा वध केला त्यावेळीं तुमची ही धर्म व न्याय बुद्धी कोठें गेली होती गवत चरायला?" असा प्रश्न विचारून सात्यकीनें त्यांचीं तोंडें बंद केलीं.

अर्जुनाचा मार्ग आतां मोकळा होता. त्यानें सरळ जयद्रथाकडे आपला रथ सोडला. दुर्योधनानें कर्णाला जयद्रथाच्या मदतीस पाठविलें. "आज भीमानें नको जीव करून सोडले होतें. तरी मी यथाशक्ति अर्जुनाला अडविण्याचा प्रयत्न करतों." असें कर्ण म्हणाला.

त्याच वेळीं सूर्यास्ताची वेळ झाल्यासारखें वाटूं लागलें. सूर्यास्तापर्यंत जयद्रथाला वांचविलें तर अर्जुन अग्नि प्रवेश करील व युद्धच कायमचें बंद होईल असा विचार करून दुर्योधन, कर्ण, अश्वत्थामा, वृषसेन, शल्य, कृप सर्वांनीं एक जुटीनें अर्जुनाला अडविलें. भीम व सात्यकी दोघांनीं अर्जुनाला मदत करण्याची पराकाष्ठा केली. पण व्यर्थ. तितक्यांत अंधकार वाढूं लागला. कौरव आनंदानें उड्या मारूं लागले. जयद्रथ अर्जुनाचा अग्निप्रवेश पाहण्यासाठीं खुषींत पुढें आला. त्याच वेळीं सर्वांना पुन्हां सूर्य दिसला. कृष्ण म्हणाला—"अर्जुना! तो पहा सूर्य आणि तो जयद्रथ!" कृष्णाच्या तोंडांतून इकडे हें वाक्य बाहेर पडलें आणि तिकडे जयद्रथाचें डोकें अर्जुनाच्या बाणानें उडालें. तें जयद्रथाचा बाप तप करीत बसला होता त्याच्या मांडीवर जाऊन पडलें. त्यानें असा शाप दिला होता कीं ज्याच्या हातून जयद्रथाचें शिर भूमीवर पडेल त्याचें डोकें फुटून जाईल. जयद्रथाचें शिर मांडीवर पडतांच तो असा कांहीं भ्याला कीं त्यानें तें न ओळखून जमिनीवर टाकून दिलें. त्यामुळें त्याच्या शापाप्रमाणें त्याचेंच डोकें फुटलें व तो मुलाच्या भेटीस यमलोकीं गेला.





# समुद्रमंथन

मिळेल अमृत या आशेनें
सुरासुरांनीं ऐक्यानें
समुद्रमंथन करावयाचें;
असें ठरविलें नेटानें ॥

मंदरगिरिची रवी करुनिया
आणि वासुकीची दोरी।
करूं लागले मंथन सत्वर
मनांत दोघांच्या चोरी ॥

तोंडाकडचा भाग सुरांनीं
शेपुट असुरांनीं धरलें।
कावा दिसला त्यांत सुरांचा
असुरांना तें ना पटलें ॥

भांडण केलें त्यावर त्यांनीं
म्हणून हंसला इंद्र मनांत।
मूर्खपणा असुरांचा होता
लाभ सुरांचा होता त्यांत ॥

"कबूल!" आम्हां इंद्र म्हणाला.
असुरांनीं मग धरलें तोंड।
देवांनीं अन् शेपुट धरलें
धिपलें खोडन विपाक तोंड ॥

एकवटुन बळ सुरासुरांनीं
मंथन केलें सिंधूचें।
त्रास वासुकिस फार जाहला
हातपाय गळले त्याचे ॥

तोंडावाटे गळूं लागला
फेस नि सुटला त्याचा धीर।
निराश होउनि सर्पा सोडुनि
बसले स्वस्थ सुरासुर वीर ॥

मंदर पर्वत तत्क्षण बुडला
क्षीरसागराच्या मध्यें।
भांडूं लागले परस्परांशीं—
"तुम्हिच सोडिलें कां मध्यें?"

ठेवुनि कंठामधें ठेवलें
सारें विष, गिळलें नाहीं।
लीला पाहुनि विश्व चराचर
थक जाहलें, हरि पाही ॥

सर्प शिवाचे तिथेंच होते
डोलत फण ते उभे करून।
थेंब विषाचे गिळले त्यांनीं
पडलें 'विषधर' नांव म्हणून ॥

'नीळकंठ' हें नांव शिवाचें,
झालें प्रसिद्ध या जगतीं।
करतो शुभ तो म्हणुनि तयाला
जगीं भक्त 'शंकर' म्हणती ॥

प्रभुशंकर कैलासिं परतले
फिरुनि सुरू झालें मंथन।
श्वेत गाय अवतीर्ण जाहली,
केलें देवांनीं वंदन ॥

"अम्हां मिळावी कामधेनु ही!"
देव म्हणाले असुरांना।
करतिल हरकत प्रथम वाटलें,
नव्हती हरकत पण त्यांना ॥

"नको अम्हांला दुसरें कांहीं,
हवें अम्हांला अमृत एक!"
असुर म्हणाले; इंद्र म्हणाला—
"निघतिल वस्तू इतर अनेक!"

समुद्रमंथन पुन्हां जाहलें
अश्वश्वेत अन् वर आला।
चपळ अश्व तो पाहुनि सुंदर
हवा वाटला इंद्राला ॥

परंतु वदले राक्षस-"जणुं हा"
बलिराजास्तव अवतरला।
बलिच्या अस्तबलाची शोभा
वाढविण्या जणुं निर्मियला ॥




[ २ ]

[धवलगिरीचा राजकुमार चित्रसेन रानांत शिकारीस गेला होता. वाट चुकून तो एका ओढ्याच्या कांठीं पोंचला. तेथें गुहेंत सिद्धपुरुषानें त्याला एक बांबूची टोपली दिली. त्या टोपलीचें झांकण उघडल्याबरोबर एक सुंदर राजमहाल चित्रसेनाला दिसला. त्याच वेळीं रानांतून उग्राक्ष नांवाचा राक्षस आला. त्याच्या हातून आपला जीव वांचविण्यासाठीं चित्रसेनानें त्याला आपला पहिला मुलगा देण्याचें वचन दिलें. नंतर—]

उग्राक्ष दृष्टिआड झाल्यावर चित्रसेनाच्या जिवांत जीव आला. आतां तरी जीव वांचला. या रानांतून कसा तरी पाय काढला पाहिजे आणि धवलगिरीला पोंचलें पाहिजे.

चित्रसेनानें असा विचार करून पश्चिमेकडे वळून पाहिलें. सूर्यास्ताची वेळ होती. समोर महालावर सूर्याचीं किरणें पडलीं होतीं. त्याचा सोनेरी कळस तांबूस किरणांनीं कसा छान झळकत होता.

"किती सुंदर महाल आहे. पण यांत रानटी जनावरें, वटवाघळें आणि घुबडेंच तर राहणार!" असा विचार करून चित्रसेन निराश मनानें मागें वळला आणि चार पावलेंच चालून गेला असेल, त्याला कोणीतरी पाठी मागून हाक मारली—"महाराज! महाराज!"



महाराज कोण ! आणि या निर्जन रानांत मनुष्याचा आवाज ! चकित होऊन चित्रसेनानें मागें वळून पाहिलें. त्याला उंची वस्त्रें घातलेल्या तीन व्यक्ति दिसल्या. त्यांच्या मागाहून कांहीं सैनिक देखील येत होते. चित्रसेन अनपेक्षितपणें त्या सर्वांना तेथें पाहून कांहीं विचारणार होता, तेवढ्यांत त्या तिघां-पैकीं एकानें पुढें येऊन नम्रपणें नमस्कार केला.

महाराज, आपण बराच वेळ आलां नाहीं म्हणून आम्ही आपला शोध काढीत सारें रान पालथें घातलें. आपली भेट झाल्यानें आम्हांला फार आनंद झाला." तो म्हणाला.

"मी आणि महाराज ! हें काय गौड-बंगाल आहे !" चित्रसेनाला आश्चर्य वाटलें.

"महाराज, आपण फार दमल्यासारखे दिसतां !" तो मनुष्य म्हणाला. त्यानंतर तो दुसऱ्या व्यक्तीकडे वळून म्हणाला—"सेनापति ! भोई कोठें आहेत ? मेणा घेऊन यायला सांगा, त्यांना !"

"पंत प्रधान ! आपल्या आज्ञेची वाट पहात आहेत ते !" त्यानें टाळी वाजविल्या-बरोबर तिकडून आवाज आला—"आलों धनी !" दोन मिनिटांत भोई मेणा घेऊन आले.

पंत प्रधाननें पुढें येऊन चित्रसेनाला लवून नमस्कार केला आणि म्हणाला—"महाराज ! मेणा तयार आहे. यावें. मेणा सरळ राजवाड्यांत जाईल. आपण शयनगृहांत रात्रीं आराम केल्यावर सकाळीं राज्याच्या कामाविषयीं बोलतां येईल."

चित्रसेनाला खरोखरच आपण दमलों आहों असें वाटलें. एक पाऊल पुढें टाकणें सुद्धां त्याला जड वाटूं लागलें. म्हणून सरळ मेण्यांत जाऊन बसला.

पंत प्रधानांनीं खूण केल्याबरोबर भोयांनीं मेणा उचलला आणि चालूं लागले. त्याच वेळीं पंत प्रधानांकडे येऊन कोणीतरी त्यांच्या कानांत कांहींतरी सांगितलें. त्याला संबोधन करून पंत म्हणाले—"खजीनदार ! याविषयीं आपण उद्यां बोलूं. प्रथम महा-राजांना पूर्ण विश्रांतीची गरज आहे."

मेण्यांत बसल्यानंतर चित्रसेनानें वरील बोलणें ऐकलें. त्यानें विचार केला, ही काय भानगड आहे बुवा ! माझ्याकडे राजवाडाच नव्हें, तर पंत प्रधान पंत अमात्य, सेनापति, खजीनदार सर्व आहेत." हें स्वप्न आहे कीं सर्व खरें आहे !

थोड्या वेळानें भोयांनीं मेणा वाड्याच्या अगदीं वरच्या मजल्यावर नेला. तेथें एक मोठें दालन होतें. एक मोठा पलंग, गाद्या गिर्द्या, खुर्च्या सर्व कांहीं होतें. मेणा खालीं ठेवल्यावर चित्रसेन मेण्यांतून खालीं उतरला. मऊमऊ गालिच्यावर पाय पडतांच त्याला बरें वाटलें.

ही सर्व कृपा त्या सिद्ध पुरुषाचीच नव्हे काय ? त्यानें मला रहायला एक वाडा दिला तर त्याबरोबर एक राज्यहि दिलें. मी त्याची कांहींच सेवा करूं शकलों नाहीं. पण हें सर्व खरें कीं खोटें ?

तो या विचारांतच पलंगावर पडून त्या शयनगृहा कौतुकचें करीत होता, तेवढ्यांत



चार नोकरांनीं त्याच्यासाठीं पंच पक्वान्नांचें ताट वाढून आणलें. त्याला फार भूक लागली होती. म्हणून तो लगेच उठला आणि त्यानें पोटभर जेवून घेतलें. नंतर पुन्हां कोचावर बसून आतां पुढें काय करायचें याच्याविषयीं विचार करूं लागला. त्याच विचारांत तो इतका गर्क होऊन गेला होता कीं त्याचा केव्हां डोळा लागला हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं. तो झोपून उठला तेव्हां खिडकींतून सूर्याची सोनेरी किरणें आंत येत असलेली त्याला दिसलीं. त्याचें चित्त त्यावेळीं प्रसन्न होतें. सारी रात्र आपण

या जादूच्या महालांतच घालविली तर! आतां जास्त विचार करावयाचा नाहीं. दैवावर भरंवसा ठेवून चालावयाचें.

तो पलंगावरून उठला. नित्यकृत्य आटोपून तो पुन्हां शयनगृहांत आला. त्याच वेळीं पंत प्रधानांनीं शयनगृहांत प्रवेश केला आणि विचारलें—"महाराज! आपल्याला स्वस्थपणें झोप लागली का? कांहीं त्रास तर झाला नाहीं? आज्ञा असेल तर राज्याचे कागद-पत्र घेऊन येतो."

राज्यकारभाराविषयीं चित्रसेनाला कांहींच अनुभव नव्हता. कारण धवलगिरीचें राज्य त्याच्या वडिलांचें होतें व ते स्वतःच सर्व कारभार पहात असत. त्यांचा वारस मोठा भाऊ शूरसेन होणार. म्हणून त्यालाच राज्यकारभाराची कामें कशीं करावयाचीं याचें शिक्षण देण्यांत येत असे. चित्रसेनानें तिकडे कधीं लक्ष दिलें नाहीं. राज्यकारभाराचें नांव ऐकतांच त्याला आपल्या वडिलांची आठवण झाली. जर शूरसेन सुखरूप घरीं पोंचला असेल तर आईवडील माझ्या काळजींत जास्तच पडले असणार. म्हणून प्रथम वडिलांकडे निरोप पाठविला पाहिजे. मी येथें सुखरूप आहें, हें त्यांना कळलें पाहिजे.



असा विचार करून चित्रसेन पंतप्रधानांना म्हणाला—"आपल्याला धवलगिरी राज्याची माहिती असेलच. तेथील महाराज तारकेश्वर यांच्याकडे निरोप पाठवून कळवा कीं मी येथें सुखरूप आहें. इतर गोष्टी मला वेळ मिळाल्यावर मी पाहून घेईन."

"आज्ञा महाराज! मी तारकेश्वर महा-राजांकडे निरोप पाठवितों. खजीनदारांनीं मणि-माणिक्यें व राज्यांतील इतर मूल्यवान वस्तूंची एक यादी तयार केली आहे. आपली आज्ञा असेल तर ती घेऊन हजर राहण्यास मी त्यांना कळवितों." पंत प्रधान म्हणाले.

"त्यांनीं स्वतः इतके येण्याची गरज नाहीं. त्यांना यादी पाठविण्यास सांगून पाठवा, म्हणजे पुरे!" चित्रसेन म्हणाला.

थोड्या वेळानें एका नोकरानें यादी आणून दिली. खजिन्यांतल्या बहुमूल्य रत्नांची व धनाची यादी वाचून चित्रसेनाला आश्चर्य वाटलें. इतकें धन आपल्या खजिन्यांत आहे! इतकें धन तर धवलगिरीच्या खजिन्यांत सुद्धां असेल कीं नाहीं शंकाच.

संध्याकाळीं तो आपल्या खजिन्याची पाहणी करण्यासाठीं गेला. सुमारें तासभर तो पाहणी करीत राहिला. त्यानें अर्धा



       





खजिना सुद्धां पाहिला नसेल, एका सैनिकानें येऊन महाराज तारकेश्वर आल्याचें वर्तमान दिलें. लगेच चित्रसेन महालाबाहेर आला आणि वडिलांना भेटला.

तारकेश्वर महाराजांना परमानंद झाला. म्हणाले—"बाळ, तुझ्या दादाच्या तोंडून तूं वाट चुकल्याचें ऐकून मी व राणीसाहेब किती काळजींत पडलों होतों. या रानांत तूं कोठें गेला असशील आणि तुला आतां कोठें शोधायचें या काळजींत मला कांहींच सुचत नव्हतें. पण इकडे तुला सुखी पाहून मला किती आनंद होत आहे. तुझ्या पंतप्रधानांनीं मला सांगितलें कीं तूं या राज्याचा राजा आहेस. हा सुंदर महाल तुझाच बाटतें ! किती भाग्यवान आहेस ! या सर्वांचा खरोखरच का तूं मालक आहेस !"

चित्रसेनानें मान हलवून सर्व खरें असल्याचें सुचविलें.

"अरे पण हें सर्व राज्य तुला कसें काय मिळालें ! या महालांत पूर्वी कोण रहात होता ! हें राज्य कोणाचें ! हें तरी कळूं दे." तारकेश्वर महाराजांनीं आश्चर्यानें विचारलें.

"या सर्व गोष्टी थोडक्यांत सांगण्यासारख्या नाहींत. चला आपण स्वस्थपणें बसून बोलूं या." असें सांगून चित्रसेनानें आपल्या वडिलांना आपल्या खास महालांत बोलावून नेलें.

त्या दिवशीं रात्रीं धवलगिरीचे महाराज तारकेश्वर यांच्या सन्मानार्थ एक मोठी मेजवानी देण्यांत आली. नृत्य व गायनाची पण व्यवस्था करण्यांत आली होती. त्या रानांतील रानटी जातीचे सर्व पुढारी बोलाविण्यांत आले होते. त्या सर्वांना हें ऐकून आनंद झाला कीं त्यांचे महाराज हे धवलगिरीच्या तारकेश्वर महाराजांचेच सुपुत्र

आहेस. धवलगिरीच्या महाराजांची कीर्ति त्यांनीं ऐकली होती. त्यांच्या मुलाच्या राज्यकारभारांत प्रजा सुखी राहील या गोष्टीची सर्वांना खात्री वाटली.

मेजवानी झाल्यावर व सर्व पाहुणे मंडळी आपापल्या घरीं परतल्यावर चित्रसेनानें वडिलांना एकांतांत घेऊन जाऊन त्याला तें राज्य कसें मिळालें याचा वृत्तांत वर्णन करून सांगितला. त्याची व उग्राक्ष राक्षसाची कशी गांठ पडली व त्याला त्यानें काय वचन दिलें हें देखील त्यानें सांगितलें.

"राक्षसाला जें वचन दिलें आहेस त्याचें पालन कसें काय करणार? तूं क्षत्रिय कुळांत जन्माला आला आहेस. स्वतः राजा आहेस. दिलेलें वचन मोडणें क्षत्रिय धर्माला अनुसरून नाहीं. आपलें पहिलें मूल राक्षसाला देणें हें देखील धर्मसंगत दिसत नाहीं." तारकेश्वर महाराज म्हणाले.

"बाबा! अजून माझें लग्न कोठें झालें आहे! लग्न झाल्यावर व मुलगा झाल्यावर अठरा वर्षांनीं हा प्रश्न उठेल. तेव्हां पाहून घेऊं. आतांपासून त्याची काळजी कशाला. तोंपर्यंत कांहीं ना कांहींतरी मार्ग निघेलच. ज्या देवानें या संकटांतून वांचविलें तो त्या संकटांतून वांचविणार नाहीं का? आणि त्याचीच मर्जी नसेल तर आपल्याकडून तरी काय होणार आहे? म्हणून येईल त्या संकटाला हंसत खेळत तोंड देण्या व्यतिरिक्त मला दुसरा उपाय दिसत नाहीं." चित्रसेन म्हणाला.

बापाला मुलाचें तें बोलणें पटलें नाहीं. त्या राक्षसाचा नाश करणें तरी तितकें सोपें नव्हतें. पुष्कळ विचार करून तारकेश्वर महाराज म्हणाले—"तुझें राज्य धवलगिरीच्या सीमेवरच आहे. तसाच कांहीं प्रसंग ओढवला तर माझ्याकडे निस्संकोच निरोप पाठव."

(पुढील गोष्ट पुढील अंकीं)





# ❋ सेवाभाव ❋

जीमूतकेतु नांवाचा एक गंधर्व राजा होता. त्याचा मुलगा होता जीमूतवाहन. जीमूतकेतु म्हातारा झाला तेव्हां त्यानें आपलें राज्य आपल्या मुलावर टाकून स्वतः वानप्रस्थाश्रमांत प्रवेश केला आणि मुलाला राज्याभिषेक केला. परंतु जीमूतवाहन पितृभक्त होता. त्याचें लक्ष राजभोगांत किंवा राज्यकारभारांत कोठेंच लागेना. म्हणून राज्याचा सर्व भार मंत्र्यांवर टाकून तो सुद्धां आपल्या आई-वडिलांच्याबरोबर वनांत गेला. त्यांनीं सर्वांनीं मिळून वनांत एक चांगलीशी जागा पाहिली आणि झोंपडी बांधून तेथें राहूं लागले.

आई वडिलांच्या सेवेंत कांहीं दिवस गेले. पुढें ते रहात होते त्या रानांतील कंदमुळें संपुष्टांत आलीं. तें पाहून जीमूतकेतूनें आपल्या मुलाला मलय पर्वतावर चांगली जागा शोधून येण्यास सांगितलें. वडिलांच्या आज्ञेनें जीमूतवाहन आपल्या आत्रेय नांवाच्या मित्राला बरोबर घेऊन निघाला.

मलय पर्वतावर एक गौरी आश्रम नांवाचा आश्रम होता. तेथें ते दोघे जाऊन पोहोंचले. आसपासची शोभा पाहून आंत शिरणार तोंच किरट्या आवाजांत मधुर संगीताचा स्वर त्यांच्या कानावर पडला. दोघेहि मुग्ध होऊन बाहेर उभे राहून गाणें ऐकूं लागले.

आंत विश्वावसु नांवाच्या गंधर्वाची कन्या मलयवती देवीची स्तुति करीत होती. गायन संपल्यावर तिची सखी तिला म्हणाली—

"मलयवती, अग, त्या कुमारिकेची आराधना करून का तुला योग्य वर मिळणार आहे?"

आंत एक कुमारिकाच योग्य वर मिळावा म्हणून देवीची प्रार्थना करीत आहे. तेव्हां

तिला पाहण्यास कांहींच हरकत नाहीं. असा विचार करून जीमूतवाहन आंत शिरला. दोघांची दृष्टादृष्ट झाली. दोघांचे मुखचंद्र रक्तवर्ण झाले. पण कोणाच्याहि तोंडून एक शब्दहि निघाला नाहीं. घरून निरोप आल्यामुळें मलयवती आपल्या सखीबरोबर घरीं निघून गेली.

थोड्याच दिवसांत जीमूतवाहन आपल्या आई-वडिलांना गौरी आश्रमांत घेऊन आला.

जीमूतवाहनाला पाहिल्यापासून मलयवती त्याच्या प्रेमामुळें झुरूं लागली होती. एक दिवस अंगाला चंदन लावून केळीच्या पानानें वारा घेत मलयवती चंदन कुंजांत बसली होती. त्याच वेळीं जीमूतवाहन आपल्या मित्रांबरोबर तेथें गेला. त्यांना पाहतांच त्या दोघी जणी संगमरवरी चवुतऱ्यावरून उठून आंत निघून गेल्या. त्याच दगडावर जीमूतवाहनानें आपल्या प्रेयसीचें चित्र काढिलें होतें. परंतु त्यावर मलयवतीची नजर गेली नव्हती. तिनें एवढेंच ऐकलें होतें कीं जीमूतवाहनाचें एका मुलीवर प्रेम आहे. तिच्या मनाला ही गोष्ट टोचत होती. 'मी ज्याच्यावर इतकें प्रेम करीत आहें त्यानें दुसरीवर प्रेम करावें ना!' याचा विचार करून ती दुःखी होई व आपल्या दैवाला दोष देई.

जीमूतवाहन ज्यावेळीं त्या संगमरवरी चवूतऱ्याजवळ आला त्याच वेळीं माया-वतीचा भाऊ मित्रवसु जीमूतवाहनाचा शोध करीत करीत तेथें आला. त्या बरोबर जीमूत-वाहनानें आपण काढलेलें चित्र केळीच्या पानाखालीं लपविलें व त्याच्याशी बोलूं लागला.

कोण कोठले वगैरे चौकशी झाल्यावर मित्रवसु म्हणाला—"आमच्या वडिलांनीं आमची बहीण मलयवती आपणांस देण्याचें ठरविलें आहे."

"ह्या संबंधानें मला खरोखर फार आनंद झाला असता. परंतु काय करणार! माझें मन माझ्या हातांत नाहीं. तें परक्याचें झालें आहे."

जीमूतवाहनाचें बोलणें मलयवती आडून ऐकत होती. त्याचा नकार कानीं पडतांच ती घेरी येऊन खालीं पडली.

त्याच्या म्हणण्याचें काय एवढें महत्व. त्याच्या वडिलांनीं सांगितलें म्हणजे तो येईल वळणावर असा विचार करीत मित्रवसु निघून गेला.

ह्या अवधींत तिच्या सखीनें पाणी वगैरे शिंपडून तिला सावध केली. डोळे उघडतांच



















मलयवतीनें आपल्या सखीस भाऊ आहे का गेला हें पाहून येण्यासाठीं म्हणून पाठविलें आणि ती स्वतः गळ्याला वेलीचा फास लावून बसली. तिच्या सखीनें हें पाहिलें व "वांचवा! धांवा!!" म्हणून ओरडली. बाहेरच जीमूतवाहन होता. त्याच्या कानावर आरोळी येतांच तो आंत आला आणि मलयवतीच्या गळ्या भोंवतालचा फांस काढून फेंकून दिला. तेथें दोघांची ओळख पटली आणि त्याला समजलें कीं थोड्या वेळापूर्वी आपल्याशीं बोलत असलेला माणूस हिचाच भाऊ आहे. मलयवतीनें देखील संगमरवरी दगडावरील जीमूतवाहनाच्या प्रेयसीचें चित्र पाहिलें. तें चित्र दुसऱ्या कोणाचें नसून तिचेंच होतें. तें पाहून तिला फार आनंद झाला. पुढें यथा विधि त्या दोघांचें लग्न झालें.

एके दिवशीं मित्रवसूनें बातमी आणली कीं जीमूतवाहनाचें सारें राज्य मतंगानें बळकावलें आहे. "मला फक्त तुम्ही आज्ञा करा. मी आत्तां जाऊन त्या मतंगाला पदच्युत करून तुमचें राज्य तुम्हांला परत मिळवून देतों." मित्रवसु म्हणाला.

"जाऊं दे. दुसऱ्याचे प्राण वांचविण्यासाठीं प्राण देणारा हा जीमूतवाहन कोणाची हत्या करण्याची आज्ञा कशी काय देईल?" असें सांगून जीमूतवाहनानें तो विषय टाळला.

कांहीं दिवस गेले. एकदां मित्रवसु आणि जीमूतवाहन मलयपर्वताच्या पायथ्याशीं समुद्राच्या चढ उताराची गंमत पाहात फिरत होते. डोंगराचें उंच शुभ्र शिखर पाहून जीमूतवाहन म्हणाला—"बघ, हें पर्वतशृंग कसें हिमाच्छादित दिसत आहे."

"हे जे तूं पर्वत समजत आहेस ते वास्तविक पर्वत नाहींत ते नागांच्या हाडांचे ढीग आहेत." मित्रवसु म्हणाला.



"इतके नाग असे एकाएकी मरण पावले!" जीमूतवाहनानें विचारलें.

"त्याचा एक इतिहासच आहे. एकदां गरुडराज येथें आला होता. त्यानें आपल्या पंखाच्या झपाट्यानें समुद्राचें सर्व पाणी बाजूस सारलें आणि त्यांत असलेल्या नागांना भराभर भक्षण करूं लागला. त्याचें हें कृत्य म्हणजे नागांवर एक मोठें संकटच होतें. तेव्हां नागाधिराज वासुकीला चिंता पडली. तो कांहीं तरी तडजोड करण्यासाठीं गरुडराजाकडे गेला आणि रोज त्याला एक नाग बळी द्यावयाचें ठरवून आला. यामुळें बाकीच्या नागांचें तरी रक्षण झालें." मित्रवसूनें तो वृत्तांत सांगितला.

"अरे, मग वासुकीच्या एवढ्या हजार फण्यांपैकीं एका फण्यानें तरी आपलें बलिदान करण्याची इच्छा प्रगट करूं नये! माझ्या भक्षणानें एकाद्या नागाचे जरी प्राण वांचले तरी मी आपला बळी द्यायला तयार आहें." जीमूतवाहन म्हणाला. अशा तऱ्हेनें त्यांचें बोलणें चाललें असतां मित्रवसूला घरीं नेण्यासाठीं निरोप आला. म्हणून तो निघून गेला. जातांना त्यानें सांगितलें कीं ही



जागा चांगली नसल्यानें येथें फार वेळ थांबणें बरें नाहीं.

जरा समुद्राच्या लाटांचा आनंद लुटावा म्हणून जीमूतवाहन तिकडे जाण्यास निघाला. वाटेंत त्याला कोठून तरी रडण्याचा आवाज ऐकूं आला—"हाय दैवा! पुत्राचें मरण पाहण्याची वेळ आली ना!! शंखचूड, कोणी नाहीं का रे तुला वांचविणार!"

जीमूतवाहनाला जवळच एक मोठी शिळा दिसली. तेथून तो आवाज येत होता.

गरुडराजाचा आहार ठेविण्याची ती शिळा होती आणि शंखचूड आज त्याचा

आहार होता. आपल्या वृद्ध आईचा तो एकुलता एकच मुलगा होता म्हणून त्याची आई विलाप करीत होती.

लाल रंगाचे कपडे घालून जो त्या दगडावर झोपेल त्याला आपला आहार समजून गरुडराज त्याला भक्षण करून निघून जाई. शंखीचूड लाल कपडे घालून मरणास सिद्ध होत होता आणि त्याची आई हंबरडा फोडून रडत होती. तीतिची सांत्वना तरी कोणत्या शब्दांनीं करणार !

जीमूतवाहन काय आहे हें पाहण्यासाठीं जवळ गेला. त्याला पाहतांच "हे गरुडराज, आज नागराजानें मला पाठविलें आहे. अगोदर मला खाऊन टाका." असें ओरडत ती म्हातारी त्याच्या पायांवर पडली.

"मी नाहीं तो गरुडराज. पण हे लाल कपडे जर मला घाल तर ते घालून मी त्याचा आहार होतों." जीमूतवाहन म्हणाला.

"तूंहि आपल्या आईचा लाडका आहेस. असा प्राणावर उदार होऊं नकोस. माझ्या शंखीचूडापेक्षांहि मला तूं जास्त आहेस. जा. तूं आपल्या घरीं." वृद्ध माता म्हणाली.

तो तेथेंच उभा राहिला. शंखीचूड वेळ झाली म्हणून गोकर्णेश्वराची प्रदक्षिणा करण्यासाठीं गेला. त्याची आई पण त्याच्या पाठोपाठ गेली.

त्याच वेळीं मलयवतीच्या आईनें जावयासाठीं कांहीं वस्त्रें पाठविलीं तीं लाल भडक होतीं. तीं देत नोकर म्हणाला—"आईसाहेबांनीं आपल्याला लवकर घरीं येण्यास सांगितलें आहे."

"तूं पुढें हो. जा माझा नमस्कार सांग त्यांना." त्यानें नोकराला पाठवून दिलें, आणि स्वतः तीं लाल वस्त्रें परिधान करून त्या दगडावर निजला. तितक्यांत गरुडराज येऊन त्याला घेऊन गेला आणि डोंगराच्या शिखरावर बसून त्याला खाऊं लागला. शंखीचूड त्याच्या पाठोपाठ धांवला. वाटेंत जीमूतवाहनाचा चूडामणि जीमूतकेतूच्या झोपडीजवळ पडलेला आढळला. जीमूतवाहनाच्या आईनें तो ओळखला. भयभीत होऊन ती पाहूं लागली. तोंच लालवस्त्रें धारण करून शंखीचूड तेथें आला. त्यानें सर्व हकीगत सांगितली. ती ऐकतांच सर्वांना फार दुःख झालें. पुत्रशोकानें वेडे होऊन त्या दोघांनीं अग्निप्रवेश करण्याचा निश्चय केला. मलयवतीहि सती जाण्यास सिद्ध झाली.





“तुम्ही अशी घाई करूं नका. पाहिजे तर अग्नि तयार करून ठेवा. मी गरुड-राजाची भेट घेऊन येतों.” असें सांगून शंखीचूड गरुडाकडे गेला.

तेथें गरुड एका बाजूनें टक्के मारून मारून त्याला खात होता आणि तो आपला निर्विकार मनानें पडला होता. त्याच्या चेहेऱ्यावर संतोषाची छटा पाहून गरुडाला आश्चर्य वाटलें. अर्थातच त्यानें तसें त्याला विचारलेंहि.

“प्रथम आपली भूक शांत होऊं दे.” जीमूतवाहन शांत स्वरांत म्हणाला.

“सोडा त्याला ! त्याला सोडा !! तो तुमचा आहार नाहीं. तो नाग नाहीं.” असें दुरूनच ओरडत शंखीचूड तेथें येऊन पोहोंचला. त्याचे ते लाल भडक कपडे पाहून गरुडाला कळेना आपला खरा आहार कोणता ? तें पाहून शंखीचूडानें आपला फणा त्याला दाखविला आणि म्हणाला हा गंधर्व आहे. हें कळतांच गरुडाला पश्चात्ताप झाला त्यानें लगेच त्याला सोडून दिलें, आणि झटपट स्वर्गांत जाऊन अमृत घेऊन आला.

जीमूतवाहनाच्या तोंडांत चार थेंब घालून त्याच्या शरिरावर सुद्धां शिंपडलें. त्यामुळें त्याचा सुंदर देह पुन्हां पहिल्यासारखा बरा झाला. त्यानें गरुडाला अहिंसेचा उपदेश दिला व अशी नागहत्या न करण्याविषयीं समजावून सांगितलें. तें ऐकून गरुडाचें अंतःकरण विरघळून गेलें व त्यानें उरलेलें अमृत त्या हाडांच्या ढिगाऱ्यावर शिंपडलें. पाहतां पाहतां सर्व नाग जिवंत होऊन एकत्र झाले. त्या सर्वांनीं जीमूतवाहनाचे आभार मानले. नंतर जीमूतवाहन आपल्या घरीं गेला. त्याचें राज्य त्याला मिळालें व तो मलयवतीसह सुखानें राज्य करूं लागला.





# सोन्याचा डोंगर

खूप खूप वर्षांपूर्वी रशियांत एक शेतकरी राहात असे. त्याला ग्रीष्क नांवाचा एक मुलगा होता. शेतीवर त्यांचें भागत नसे. म्हणून शहरांत मजूरी करण्यासाठीं ग्रीष्क निघाला.

सकाळच्या वेळीं सर्व मजूर जेथें जमत असत तेथें खांद्यावर फावडें टाकून तो उभा राहिला. बरेच लोक आले आणि जितके मजूर हवे होते तितक्या मजुरांना बोलावून घेऊन ते गेले. पण त्यांत ग्रीष्कला कोणीच बोलाविलें नाहीं.

राहिलेले मजूर वाट पाहात होते. तोंच एक व्यापारी सोन्याच्या गाडींत बसून येतांना दिसला. त्याला पाहतांच सर्व मजूर तेथून पळून गेले. ग्रीष्क तेथेंच उभा राहिला.

व्यापाऱ्याची गाडी तेथें येऊन थांबली. त्यानें डोकें बाहेर काढून विचारलें—“मजुरी करणार काय ?” “होय त्या साठींच तर येथें उभा आहें.”

“बरं तर मजुरी काय घेणार ?” व्यापाऱ्यानें विचारलें.

थोडा विचार करून ग्रीष्क म्हणाला—“शंभर रूबल घेईन एका दिवसाचे.”

“बस्स ?” व्यापारी उद्गारला.

“पाहून थोड्यांत कोणी येत असेल तर बघा. घेऊन जा त्याला.” ग्रीष्क म्हणाला.

“तर मग उद्यां सकाळीं घाटावर ये. मी तेथें तुझी वाट पाहतों.” असें सांगून व्यापारी निघून गेला.

ठरल्याप्रमाणें ग्रीष्क सकाळीं घाटावर गेला. व्यापाऱ्याची नाव तेथें तयारच होती. तो नावेंत चढल्यावर नाव चालू झाली. थोड्या दिवसांनीं नाव ज्या बेटाला लागली तेथून ज्वाळा निघत होत्या. ग्रीष्कनें











भिऊन विचारलें कीं या ज्वाळा कसल्या ! "तो माझा सोन्याचा महाल आहे. सूर्याच्या किरणांनीं चमकत आहे." व्यापारी म्हणाला.

व्यापाऱ्याच्या घरांत त्याची मुलगी व बायको एवढींच माणसें होतीं. त्याची मुलगी फार सुंदर होती. तिला पाहून श्रीष्कचें यौवन जागें झालें. तो स्वतः सुंदर असल्यामुळें त्या मुलीचें सुद्धां त्याच्यावर प्रेम बसलें. त्या दिवशीं रात्रीं व्यापाऱ्यानें त्याला मेजवानी दिली. जेवतांना म्हणाला–"उद्यांपासून कामाला लागावयाचें आहे."

जेवणानंतर व्यापाऱ्याची मुलगी श्रीष्कला एका बाजूला घेऊन गेली. तेथें त्याच्या हातांत एक लहानशी पेटी देऊन म्हणाली– "ही पेटी सतत आपल्याजवळ बाळग. यांत एक लोखंडाचा तुकडा व एक गारेचा तुकडा आहे. या बेटावर जर कधीं कांहीं तुझ्यावर संकट आलें तर त्या लोखंडी तुकड्यानें त्या गारेवर जोरानें मार म्हणजे तुझें संकट दूर होईल." इतकें सांगून ती निघून गेली.

दुसऱ्या दिवशीं व्यापारी त्याला घेऊन सोन्याच्या डोंगराजवळ आला. त्यानें श्रीष्कला डोंगरावर चढण्यास सांगितलें. परंतु तो डोंगर अगदीं गुळगुळीत असल्यानें त्याला वर चढतां आलें नाहीं.

"दमलास वाटतें ! बरं, हें सरबत घे म्हणजे हुशारी वाटेल." असें म्हणत त्यानें कांहीं तरी त्याला प्यायला दिलें. त्या बरोबर तो बेशुद्ध होऊन पडला.

व्यापाऱ्यानें बरोबर आणलेल्या घोड्याचें पोट फाडलें. त्यांतील आंतडें वगैरे सर्व बाहेर काढून टाकलें. नंतर त्यांत श्रीष्कला घालून शिवून टाकलें व तो एका झाडा खालीं जाऊन बसला. थोड्याच वेळांत दोन मोठमोठे पक्षी आले आणि घोड्याला उचलून डोंगराच्या शिखरावर घेऊन गेले. तेथें बसून त्यांनीं घोड्यावर यथेच्छ ताव झोडला आणि त्याचा सांगाडा शिल्लक राहिल्यावर पक्षी तेथून उडून गेले.

सावध झाल्यावर श्रीष्क चहूंकडे पाहूं लागला आणि घाबरून मोठ्यानें ओरडला– "शेटजी ! शेटजी !! कुठें गेलांत ?"

"मी कोठें गेलों नाहीं येथेंच डोंगराच्या पायथ्याशीं उभा आहें. तूं आपल्या फावड्यानें बरचें सोनें खणून खालीं ढकल." व्यापारी म्हणाला.

श्रीष्क उठला. बिकट परिस्थिति जाणून कामास लागला. संध्याकाळपर्यंत त्यानें खणून





खालीं लोटण्याचें काम करीत राहिला. व्यापाऱ्यानें खालीं आपल्या गाड्या भरल्या व म्हणाला—"बस्स. आतां पुरें. फार मोठें काम केलेंस. उपकार झाले माझ्यावर. आतां मी निघालो." असें म्हणत तो जाऊं लागला.

"आणि मी ?" ग्रीष्क ओरडला.

"तुझ्यासारखे नव्याण्णव मजूर तेथेंच राहिले. तूं शंभरावा. रामराम चलतों मी." व्यापारी गाडी घेऊन निघून गेला.

ग्रीष्कला आतां कळलें कीं व्यापाऱ्याला पाहतांच मजूर कां पळाले. आतां काय करावें हें त्याला कळेना. तेव्हां त्याला खिशांतील पेटी लागली. तेव्हां त्याला त्या मुलीनें पेटी देतांना सांगितलेली गोष्ट आठवली. त्यानें ती पेटी उघडली. गारगोटीवर लोखंडाची सळई आपटली. त्याबरोबर त्यांतून दोन मोती बाहेर पडले आणि क्षणार्धांत त्यांचीं दोन माणसें झालीं. "काय पाहिजे ?" त्यांनीं विचारलें.

त्यांना समोर पाहतांच ग्रीष्क प्रथम थोडा घाबरला. परंतु थोड्या वेळानें स्वतःला सावरून म्हणाला—"मला डोंगराच्या खालीं पोहोंचवा." त्या बरोबर आपण समुद्र किनाऱ्यावर पोहोंचल्याचें त्याला दिसलें. [illegible] वेळांत तेथें एक नाव आली. तो तिच्यांत बसला आणि आपल्या गांवीं जाऊन पोहोंचला.

कांहीं दिवस गेल्यावर ग्रीष्क पुन्हां एके दिवशीं कुदळ खांद्यावर टाकून मजुरीसाठीं नाक्यावर जाऊन उभा राहिला. पूर्वीप्रमाणेंच सोन्याच्या गाडींतून व्यापारी आला. त्याला पाहतांच सर्व मजूर भिऊन पळून गेले. ग्रीष्क मात्र तसाच तेथें उभा राहिला. व्यापाऱ्यानें गाडींतूनच बाहेर डोकें काढून 'मजुराचें काम करणार काय' असें ग्रीष्कला विचारलें. तो तयार झाला.

व्यापाऱ्यानें त्याला ओळखलें नाहीं. नेहमींप्रमाणें त्यानें विचारलें, मजूरी काय घेणार ?

"दोनशें रुबलपेक्षां एक कवडीहि कमी घेणार नाहीं." ग्रीष्क म्हणाला.

"इतकी ! अरे ! मी ह्याची अर्धी मजुरी सुद्धां कोणास दिलेली नाहीं." व्यापारी म्हणाला.

"तरी मी याहून कमीवर येणार नाहीं. जो कोणी येईल त्याला घेऊन जा. ते पहा, सारे मजूर तुमची गाडी पाहतांच पळून चालले आहेत." ग्रीष्क म्हणाला.





"ठीक आहे. उद्यां पाहाटेच घाटावर ये. मी तेथें तुझी वाट पाहतों." एवढें सांगून व्यापारी निघून गेला.

ठरल्याप्रमाणें श्रीष्क व्यापाऱ्याबरोबर सोन्याच्या बेटावर गेला. दुसऱ्या दिवशीं व्यापारी त्याला सोन्याच्या डोंगराजवळ घेऊन आला व वर चढण्यास सांगितलें. पण तो चढूं शकला नाहीं.

"हें औषध घे. यानें ताकद येईल." असें म्हणत व्यापाऱ्यानें त्याला पिण्यासाठीं एक पेय दिलें. पण श्रीष्कला तें माहीत होतें. म्हणून तो आपल्या जवळीचील पाण्या बाटली काढून व्यापाऱ्याला म्हणाला—" माझ्याजवळ आहे पाणी. तुम्हीं सुद्धां घ्या." आणि त्याला तें पिण्यास दिलें. व्यापाऱ्याला कसलीच कांहीं कल्पना नसल्यानें पाणी म्हणून त्यानें त्याचे दोन घोट घेतले. पण तें फार जहाल औषध असल्यानें व्यापारी लगेच बेशुद्ध होऊन पडला.

व्यापाऱ्यानें बरोबर आणलेल्या घोड्याचें श्रीष्कानें पोट चिरलें. त्यांत व्यापाऱ्याला घालून शिवून टाकलें व आपण थोडा दूर जाऊन उभा राहिला. थोड्या वेळांत पक्षी आले. घोड्याला उचलून डोंगराच्या शिखरावर नेलें. चोचीनें टोंचून घोड्याला फस्त करून निघून गेले. व्यापारी डोळे उघडून पाहूं लागला तों त्याला आपण डोंगराच्या शिखरावर असल्याचें समजलें. तो ओरडला— "मी कुठें आहें ?"

"घाबरूं नका. तुम्हीं डोंगराच्या शिखरावर आहांत आणि मी खालीं आहें. आत्तांपर्यंत नव्याण्णव झाले व तुम्हीं शंभरावे तुम्हीं तेथेंच रहा. मी जातों." असें म्हणून तो व्यापाऱ्याच्या घरीं निघून गेला.

नंतर त्यानें व्यापाऱ्याच्या मुलीशीं लग्न केलें आणि त्या सोन्याच्या बंगल्यांत ते दोघे सुखानें राहूं लागले.





#  व्याज 

एका गांवांत एक शेतकरी राहात होता. तो फार गरीब होता. शेतीच्या कामासाठीं तो वेळोवेळीं कर्ज घेत असे. हळूं हळूं तो आपली सर्व शेती घालवून बसला. एक दिवस तो आपल्या सावकाराकडे गेला व त्याला म्हणाला—"आतां तुम्हांला द्यायला माझ्या जवळ फुटकी कवडीसुद्धां नाहीं. मला आश्चर्य वाटतें तुमच्या जवळ कसे एवढे पैसे जमतात ?"

"आम्हीं काय कुणाचे खातोरे। तो राम आम्हांला देतो रे ॥" अरे ही सर्व त्या रामाची कृपा आहे. सावकारानें लोडाशीं रेलून तत्वज्ञान सांगितलें.

शेतकरी रामाच्या शोधार्थ निघाला. बरोबर थोडीशी शिदोरी बांधून घेतली.

जातांना वाटेंत एक ब्राम्हण भेटला. शेतकऱ्यानें आपल्याजवळील एक भाकरी त्याच्या हातावर ठेविली आणि "मी प्रभुरामचंद्राची भेट घेण्यास निघालों आहें. कोणत्या मार्गानें जावें सांगतां का ?" असें विचारलें. "याच मार्गानें" म्हणत तो पुढें निघून गेला.

थोडें अंतर गेल्यावर एक योगी दिसला. शेतकऱ्यानें आपल्या जवळील एक भाकर त्याच्यासमोर ठेवून दंडवत केला व म्हणाला— "रामचंद्राकडे जाण्याची वाट कोणची ? योगी कांहीं न बोलतांच पुढें निघून गेला.

शेतकरी तसाच आणखी पुढें गेला. तेथें त्याला रस्त्याच्या कडेला एक गरीब माणूस बसलेला दिसला. त्याला पाहतांच शेतकऱ्याला दया आली. त्यानें आपल्या जवळची उरलेली तिसरी भाकरी त्याला दिली आणि घटकाभर विसावा घेण्यासाठीं तेथेंच बसला.

आत्मा शांत झाल्यावर गरिबानें विचारलें कोठें चाललांत दादा ?

" असें ऐकलें आहे, रामाची भेट घेतली कीं धन मिळतें. म्हणून त्याला भेटायला निघालों आहें. मी वाटेंत एकदोघांना मार्ग विचारला. पण कोणी कांहीं उपाय सांगितला नाहीं. तुम्हांला माहीत असेल तर तुम्हीं तरी सांगा." शेतकरी म्हणाला.

" मीच आहें राम." स्मित करून तो माणूस म्हणाला—" हा घे शंख. हा वाजविलास म्हणजे तुला काय पाहिजे असेल तें मिळेल." त्यानें शेतकऱ्यास शंख वाजविण्यास शिकविलें.

शेतकरी शंख घेऊन घरीं आला. तेव्हांपासून त्याला कशाची कमतरता भासली नाहीं. तो सुखानें राहूं लागला.

सावकारानें हळूं हळूं शेतकऱ्याची सर्व माहिती काढली आणि शंखाचा महिमा कळतांच तो लांबविला. पण त्याला तो वाजवितां आला नाहीं. आतां काय करावें ! म्हणून तो शेतकऱ्याच्या घरीं गेला आणि म्हणाला—" तुझा शंख माझ्याजवळ आलेला आहे. तो तुला पाहिजे असेल तर एक अट कबूल करावी लागेल. म्हणजे या शंखांतून जेवढें तुला मिळेल त्याच्या दुप्पट मला मिळालें पाहिजें. नाहीं तर तुझ्या कर्जाबद्दल मी हा शंख ठेवून घेणार."

दुसरा मार्गच नसल्यानें शेतकऱ्यानें त्याचें म्हणणें मान्य केलें. तेव्हांपासून शेतकऱ्याला जें कांहीं धन मिळे त्याच्या दुप्पट सावकाराला मिळूं लागलें.

शेतकऱ्याला सावकाराचा फार राग आला. एक दिवस तो मनांत म्हणाला—' फुटूं दे माझा एक डोळा ' आणि त्यानें शंख फुंकला. शेतकरी एकाक्ष झाला पण इकडे सावकाराचे दोन्हीं डोळे फुटले.





[ ७ ]

काराभोरान नदीच्या दक्षिणेकडे मंजी नांवाचा एक देश होता. हा देश फार सुखवस्तू होता. चंडेस्खानाची नजर या देशावर जाण्यापूर्वी या देशावर फक्कूर नांवाचा राजा राज्य करीत असे. हा राजा प्रजावत्सल होता. गरिबांवर पोटच्या पोरांप्रमाणें त्याची माया होती. कोणी गरीब आपल्या मुलांचें पालन पोषण करूं शकला नाहीं तर राजा त्या मुलांना राज्याच्या अनाथालयांत ठेवून घेई. अशा तऱ्हेनें २० हजारांवर अनाथ मुलांचें लालन अनाथालयांत होत असे.

राजा कधीं राज्याच्या पाहणीस जाई तेव्हां त्याला जर कोठें दोन मोठ्या घरांमध्यें एखादी गवतानें शाकारलेली झोपडी दिसे तर तो त्या झोपडीच्या जागीं त्या दोन्हीं घरांच्या बरोबरीचें घर बांधून देई.

हा उदार व प्रजावत्सल राजा कधीं कोणाशीं युद्ध करावयास गेला नाहीं. त्याच्या प्रजेला देखील युद्धाची संवय नव्हती. त्याच्या राज्यांत सदा शांतता नांदत होती. कधीं कोणी त्याच्या राज्यावर स्वारी केली नव्हती. देशाच्या प्रत्येक नगराच्या चारी बाजूला मोठा खंदक होता. खंदक पार करून जायला लाकडी पूल असत. शत्रू दिसला



कीं पूल उचलून ठेवीत. शहरांत प्रवेश मिळणें शत्रूला अशक्य होतें.

मंजी देशांत योद्धे कमीच होते व घोडे देखील कमीच होते. म्हणून बल्या खानाला तो देश जिंकणें फार सोपें गेलें. ज्योतिष्यांनीं देखील असें भविष्य वर्तविलें होतें कीं जोंपर्यंत शंभर डोळे असणारा चौकस वीर या देशावर स्वारी करणार नाहीं तोंपर्यंत शत्रूचें भय नाहीं.

बल्या खानाची सत्ता बारा बलाढ्य मांडलिकांनीं मान्य केली होती. त्याच्या पदरीं बचान चिन्ग सियान्ग नांवाचा एक शूर सरदार होता. सन् १२६८ मध्यें बल्या खानानें आपल्या या सरदाराला एक मोठें घोडदळ आणि आरमार बरोबर देऊन मंजी देशावर स्वारी करण्यासाठीं पाठविलें.

बचाननें मंजी राज्यावर स्वारी केली. हायन्गान चौ नगरांत शिरून त्यानें तेथील प्रजेला बल्या खानाची सत्ता मान्य करण्यास सांगितलें. परंतु प्रजेनें तें मान्य केलें नाहीं. परंतु बचाननें त्यांच्यावर कोणत्याहि प्रकारें अत्याचार केला नाहीं. आपलें सैन्य घेऊन तो पुढें गेला. त्यानें आणखी एका नगरावर स्वारी केली. तेथील प्रजेनें देखील बल्या खानासमोर मान तुकविण्यास नकार दिला. अशा प्रकारें एका मागून एक पांच नगरांवर स्वाऱ्या करीत बचाननें सहाव्या नगरावर स्वारी केली. तेथील प्रजेनें बल्या खानाचें आधिपत्य स्वीकारण्याचें नाकारल्यावर त्यानें तेथील प्रजेची कत्तल केली.

बचाननें पहिल्या पांच शहरांवर अत्याचार केला नाहीं तर त्याचेंहि एक कारण होतें. बडा खान पाठीमागून मदतीसाठीं आणखी एक सैन्य पाठवणार आहे हें त्याला माहीत होतें. म्हणून तीं पांच नगरें सोडून बचाननें त्याच्या पुढील बारा नगरें एका मागून एक



जिंकली आणि मंजी देशाची राजधानी किन्साय नगरीं येऊन थडकला. राजा व राणी या किन्साय नगरीं रहात असत.

राजा बचानचें सैन्य पाहून घाबरून गेला. त्यानें एक हजारांवर जहाजें मागविलीं आणि समुद्री द्वीपांत पळून गेला. इकडे राणीनें नगराच्या रक्षणाची व्यवस्था करायाचें ठरवून उरलेल्या सैन्याची जमवाजमव केली. परंतु तिला असें कळलें कीं स्वारी करणाऱ्या सैन्याचा सेनापति शंभर डोळे असलेला कोणी वीर आहे. (बचान या शब्दाचा अर्थ 'शंभर डोळ्यांचा' असा आहे.) तिला ज्योतिष्यांनीं वर्तवलेलें भविष्य आठवलें. म्हणून तिनें हताश होऊन संधी करण्याचें कबूल केलें.

राजधानीच पडल्यावर बल्या खानाचें वर्चस्व सर्व देशानें मान्य केलें. फक्त एका नगरानें शत्रूसमोर मान तुकविणें मान्य केलें नाहीं. त्या नगराचें नांव सियान्ग-यून्ग-यू असें होतें. मंजी देश स्वाधीन होऊन पुरीं तीन वर्षें लोटलीं तरी तें एकटें नगर शत्रुसैन्याला तोंड देत राहिलें.

बल्या खानाचें सैन्य वेढा घालून बसलें असूनहि तें शत्रूला कां जिंकूं शकलें नाहीं?



या नगराच्या तीन बाजूला एक मोठें सरोवर होतें. फक्त उत्तरेकडून शत्रु सैन्याला हल्ला करणें शक्य होतें. नगराच्या रक्षणार्थ नागरिकांचें जें सैन्य उभारण्यांत आलें होतें त्यानें नगराच्या रक्षणासाठीं आपल्या शक्तीची पराकाष्ठा केली. जरूर असलेली रसद, दारू गोळा वगैरे सरोवर पार करून नागरिक आणीत असत. म्हणून वेढा अयशस्वी ठरला.

पोलोल, मार्को व त्यांचे वडील बल्या खानाच्या पदरीं नोकरीला होते. त्यांनीं मदत केली नसती तर सियान्ग-यून्ग-यू

नगर बड्या खानाच्या हातीं कधींच आलें नसतें.

एके दिवशीं सियान्ग-यून्ग-पू नगराचे कांहीं रहिवाशी बड्या खानाकडे गेले व त्यांनीं वेढा अयशस्वी होण्याचें कारण सांगितलें.

"हें शहर जिंकण्यासाठीं कांहीं तरी उपाय केला हा पाहिजेच." बडा खान म्हणाला.

तें ऐकून पोलोल म्हणाला—"एक उपाय आहे. एक विशेष प्रकारचें हत्यार आहे तें. तें करणारे लोक बड्या खानाच्या पदरींच आहेत. तें शस्त्र म्हणजे दगड फेंकण्याचें एक तऱ्हेचें यंत्र. हें यंत्र कित्येक मण वजनाचा दगड दूर फेंकूं शकतें.

"तर मग तें यंत्र तयार करायला सांग." बड्या खानानें पोलोलला आज्ञा केली. पोलोलच्या अनुयायांपैकीं दोघांना तें यंत्र तयार करतां येत होतें. त्यांनीं तीन यंत्रें तयार केलीं. बडा खान व त्याचे सरदार तें यंत्र पाहून चकितच झाले. त्यांनीं यंत्र तयार करणाऱ्या कारागिराला मिठीच मारली.

बड्या खानाच्या सैनिकांनीं हीं यंत्रें सियान्ग-यान्ग-पू नगराच्या तटाजवळ पोचतीं केलीं. या यंत्रानें नगरांत फेंकलेला एक दगड जेव्हां नगराच्या मध्यभागीं असलेल्या एका इमारतीवर जाऊन पडला तेव्हां तेथील लोकांची तारांबळच उडून गेली. लोक घाबरून वाट फुटेल तिकडे पळूं लागले. या हल्ल्यासमोर उभें राहण्याची कोणाची छाती नव्हती. म्हणून नागरिकांनीं इतर नगरांच्या रहिवाश्यांप्रमाणें बड्या खानाच्या सर्व अटी कबूल करून नगर त्याच्या स्वाधीन केलें.

[पुढील वर्णन पुढील अंकीं]

# चोराच्या मनांत चांदणें

एके दिवशीं एका नोकरानें अकबर बादशहाच्या राजमहालांतल्या कपाटांतला एक रत्नहार चोरून नेला. अकबरानें चोराला पकडून आणायचें काम बिरबलाकडे दिलें. बिरबलानें त्या कपाटांत आपलें डोकें खुपसलें आणि कांहींतरी पाहात असल्या सारखें ढोंग केलें. थोड्या वेळानें बाहेर डोकें काढून तो बादशहाला म्हणाला—"जहापनाह चोर सांपडला. चोरानें काळोख्या रात्रींच चोरी केली आहे. चांदण्या रात्रीं चोरी केली तर कोणी पाहील ही भीति त्याला वाटत होती. पण त्या काळोख्या रात्रीं देखील त्याच्या मनांत चांदणें होतेंच आणि आतां देखील आहेच. चोरी करतांना त्याच्या दाढीला चिकटलेली गवताची काडी मला त्या मनांतल्या चांदण्यामुळें आतां दिसत आहे."

बिरबलचें हें वाक्य कानीं पडतांच एका नोकरानें दाढीवर हात फिरवला. बिरबलनें त्या नोकराचा हात धरून सांगितलें—"हा पहा चोर!"





# गरीब जीवन

विक्रमार्कानें आपला हट्ट सोडला नाहीं. तो पुन्हां एकदां झाडाजवळ गेला. झाडावरचें शव खांद्यावर टाकून पुन्हां स्मशानाकडे निघाला. तेव्हां वेताळ बोलूं लागला. म्हणाला—"राजा, तूं या वेळीं गायागिर्यांवर लोळावयाचें सोडून हें काय आरंभिलें आहेस ? तुला कंटाळा कसा येत नाहीं ? तुझी थोडी तरी करमणूक व्हावी म्हणून मी तुला हेमांबिकेची गोष्ट सांगतो. तिचें ज्याच्यावर प्रेम होतें त्याचें दारिद्र्य पाहून तिनें त्याला सोडून दिलें. हें काय प्रेम म्हणावयाचें ? ऐक बरं का गोष्ट—

वलभी नांवाचें एक नगर व्यापारासाठीं फार प्रसिद्ध होतें. त्या गांवीं धनगुप्त नांवाचा एक वैश्य रहात असे. व्याज बट्ट्याच्या व्यापारांत त्यानें पुष्कळ चुका केल्या आणि शेवटीं गरीबी त्याच्या नशिबीं आली. त्याला हेमांबिका नांवाची एकुलती एक मुलगी होती.



मुलगी मोठी झाली तेव्हां तिच्या लग्नाची काळजी मातापित्यांना वाटूं लागली. अनेक स्थळें पाहिलीं. पण मनासारखें एकहि मिळालें नाहीं, कुळ मोठें तर विद्या नाहीं. गुण होते तर धन नाहीं. धन होतें तर धर्म नाहीं. परंतु हेमांबिकेनें एके दिवशीं स्वतःच वर-शोधन केलें. विनयगुप्त नांवाचा एक तरुण होता. तो रूपगुण संपन्न होता. सुशिक्षित व सुसंस्कृत होता. परंतु उच्चकुळांत त्याचा जन्म झालेला नव्हता. तो वलभी नगरच्या व्यापाऱ्यांकडे मेहनत मजुरी करून कसा तरी उदरनिर्वाह चालवीत असे.

हेमानें लग्न करण्याचें वचन दिलें. परंतु तिच्या आईवडिलांना नीच कुळांतल्या मुलाशीं आपल्या एकुलत्या एका मुलीचें लग्न लावून देणें मुळींच आवडलें नाहीं. विनय नांवा-प्रमाणेंच विनयशील गुणी व बुद्धिमान होता. परंतु कुळगोत्र पाहिल्या शिवाय मुलीला कसें द्यावयाचें ? मुलगीच हट्टाला पेटल्यावर धन-गुप्तनें निराश होऊन आपली पसंती दिली. एवढें मात्र त्यांनीं बजावून सांगितलें कीं पुढें आम्हांला नांवें ठेवूं नकोस.

हेमांबिका व विनयचें लग्न ठरलें व मुहूर्त पण ठरला. विनयला आनंद झाला. इतक्या मोठ्या कुळांतल्या मुलीशीं आपलें लग्न होणार हें आपलें केवढें मोठें भाग्य ! तो हेमांबिकेला म्हणाला—"हेमा, तुझ्या वडि-लांनीं संमति दिली हें आपलें दोघांचें भाग्यच समज ! परंतु मला आपलें असें वाटतें कीं तूं लग्नापूर्वी आपलें घर पाहून घ्यावें. घरांत कांहीं फेरबदल करावयाचा असेल तर तो मी करून ठेवतो. गृहप्रवेशाच्या पूर्वी हें करून टाकलेलें बरें असें मला वाटतें."

दुसऱ्या दिवशीं हेमानें मेणा आणविला व सर्वांत उत्तम अशी रेशमी साडी नेसून विनयचें घर पहावयास निघाली. विनयनें घराची








खूण सांगितली होती. मोठा रस्ता संपला, बाजारपेठ संपली व एका गल्लींत मेणा आला. ती गल्ली देखील संपली. गांवाच्या वेशी बाहेर मेणा आला तरी विनयचें घर आलें नाहीं. तिला कांहीं कळेना. दुतर्फा कचऱ्याचे ढीग पडले होते. "हें काय! विनयच्या घरीं जाण्याची वाट इतकी का घाण आहे?" हेमाच्या मनांत विचार आला.

शेवटीं मेणा कचऱ्याच्या एका ढिगा-जवळ थांबला. हेमा मेण्यांतून खालीं उतरली व तिनें समोरच्या घराकडे चकित होऊन पाहिलें. मातीच्या भिंती, कौलारू घर, मातीची जमीन, सर्वच तिच्या अपेक्षेबाहेर.

त्याच वेळीं हंसत मुखानें विनय घराच्या बाहेर आला. म्हणाला—"हेंच आपलें घर. आंत येऊन पहा. फार वेळ लागणार नाहीं पहायला. घर तसें मोठें नाहीं."

आंत जायची वाट फार चिंचोळी होती. हेमानें आंत पाऊल टेवल्याबरोबर तिच्या साडीचा रेशमी पदर केरसुणींत अडकला. ती बाजूला सरकली तर भिंतीवर जाऊन आदळली. तिच्या डोक्यांत कोळिष्टकें अडकलीं. तिच्या सुंदर रेशमी साडीला भिंतीवर सांचलेली धूळ लागली. हेमा रडकुंडीस आली.

विनयनें हें सर्व पाहिलेंच नाहीं. तो पुढें चालला होता. हेमा पाठोपाठ आंत चालली होती. तो म्हणत होता, 'हें स्वैंपाकघर, ही झोंपायची खोली, हा पुढें व्हरांडा आहे, ही सामानांची खोली वगैरे वगैरे.'

हेमांबिका विनयच्या पाठोपाठ चालली होती खरी. पण तिचें विनयच्या बोलण्याकडे लक्ष कोठें होतें? तिच्या मनांत एकच एक विचार घोळत होता, ह्या घरांत सर्व आयुष्य कसें काढायाचें?

झोंपायची खोलीच त्यांतल्या त्यांत जरा स्वच्छ होती. खोलींत एक जुनी खुर्ची होती. त्या खुर्चीवर देखील धूळ सांचलेली होती.

विनय म्हणाला—"बस येथें, घराची दुरुसी चालू आहे. मजूर काम करीत आहेत. मी त्यांना कामें सांगून हा आलोंच! तूं येथें बसून घरांत कोठें कशा तऱ्हेचा बदल करावा लागेल विचार करून मला सांग. जो होईल तो खर्च केलाच पाहिजे." असें सांगून विनय निघून गेला.

हेमानें सासरचें घर इंद्रभवन असेल अशी कल्पना केली होती. पण हें सर्व







काय! माझ्या नशिबीं आतां हेंच का येणार! नको बाई! त्यापेक्षां मी कुंवारीच राहीन. विचार करीत ती खुर्चीवर बसली. खुर्चीवर धूळ सांचली असल्याचें ती पार विसरून गेली. तिच्या हाताला धूळ लागली. साडी घाण झाली. "नको बाई हें कुलक्षणी घर! जिकडे पहावें तिकडे धूळ आणि कोळिष्टकें!" ती तेथून उठली आणि विनयशीं एक शब्द बोलल्याशिवाय मेण्यांत येऊन बसली.

तेवढ्यांत विनय बाहेर आला. तिला मेण्यांत बसलेली पाहून म्हणाला—"काय, झालें काय? तुला कोठें कांहीं लागलें का? रडायला काय झालें?"

"लागावयाचें काय? अंगाला धूळ, तोंडाला धूळ, साडीला धूळ, डोक्यांत कोळिष्टकें आणखी काय लागायचें उरलें आहे? मला एक क्षणभर देखील येथें रहावत नाहीं. जीव कोंदटल्यासारखा झाला आहे. मी येतें." हेमा म्हणाली.

"ही साडी थोडीशी खराब झाली म्हणून तूं रडते आहेस? माझें घर तूं आल्याबरोबर राजाचा महाल होणार आहे. तूं या घराची मालकीण झालीस म्हणजेच हा महालसारखा वाटूं लागेल मला! तूं आल्यावर तुला जें जें करावयाचें असेल तूंच करून घे." विनय म्हणाला.

"सोन्यासारखी साडी घाण झाली. सारें अंग धुळीनें माखलें आहे. घरीं जाऊन आंघोळ करीपर्यंत मनाला कांहीं सुचावयाचें नाहीं." विनयचें म्हणणें जणुं कांहीं तिच्या कानावरच पडलें नाहीं. ती आपल्याच नादांत बोलत होती.

विनयच्या विचारांत पण बराच बदल झाला हेमाचें वागणें पाहून. म्हणाला—"हेमा! मी मोठी चूक केली तुला येथें बोलावून. तूं येथें एक क्षणभर देखील राहूं शकत नाहींस तर पुढें आयुष्य कसें घाल-वणार! माझीच चूक. मी थोरा मोठ्यांशीं संबंध जोडण्याची हाव तरी कां दाखवावी!"

हेमा मेण्यांत बसून आपल्या घरीं निघून गेली. विनय पुन्हां तिला भेटायला देखील गेला नाहीं. त्यानें कान धरला, पुन्हां त्यानें धनगुप्त याच्याकडे निरोप पाठवला कीं मी तुमच्या मुलीच्या योग्य नाहीं.

हेमाच्या आईवडिलांना हा संबंध मोडल्याचें थोडें देखील दुःख झालें नाहीं. उलट त्यांनीं असा विचार केला कीं पोरीचें भाग्य म्हणून हें लग्न मोडलें. हेमाला वाटलें कीं विनयचें प्रेम खोटें होतें म्हणून त्यानें कांहीं तरी कारण काढून नकार दिला.

वेताळानें येथवर गोष्ट सांगून विचारलें—"राजा, आतां हें सांग कीं विनयनें केलें हें बरोबर केलें का? त्याचें हेमावरचें प्रेम खरें होतें कीं खोटें? त्याचें प्रेम खोटेंच होतें तर त्यानें हेमाच्या मनांत विश्वास उत्पन्न होण्यासाठीं तरी प्रेमाचें सोंग रचावयाचें होतें. तिच्या मनाला जो इतका धक्का बसला होता तो तरी कमी झाला असता. ती निघून गेल्यावर त्यानें निर्दयपणेंच हा निरोप



पाठवला नाहीं का कीं तिच्या योग्य मी नाहीं. या सर्व प्रश्नांचीं उत्तरें माहीत असून जर तूं दिलीं नाहींस तर त्याचा जो परिणाम होईल तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याचीं शंभर छकलें होऊन तुझ्याच पायावर पडतील."

विक्रमार्क म्हणाला—"हेमावर विनयचें खरें प्रेम होतें यांत मला तिळमात्र संशय वाटत नाहीं. हेमाचें देखील त्याच्यावर प्रेम होतें यांत शंका नाहीं. परंतु आपल्या प्रियकराच्या गरीबीची तिला कल्पना नव्हती. तिच्या लहानपणापासूनच्या सवयीच अशा कांहीं होत्या कीं तिला आपल्या भवितव्या-बद्दल शंका वाटूं लागली. म्हणून ती घाबरली. विनयनें थोड्या दमानें काम घेतलें असतें तर बरें झालें असतें. दुःखाचा वेग ओसरल्यावर तिनें नकार दिला असता तर तिच्या प्रेमाविषयीं संशय करायला जागा राहिली असती. विनयचें तिच्यावर प्रेम होतें यांत शंकाच नाहीं. नाहींतर त्यानें आपल्या गरिबीची लपवालपव केली असती. परंतु त्यानें आपल्या गरिबीची तिला पूर्वीच कल्पना यावी म्हणून तिला आपल्या घरीं बोलावून नेलें. तिच्या मनाला दुःख झालेलें पाहून त्याला वाटलें कीं तिच्या योग्य मी नाहीं. त्याचें प्रेम तिच्यावर नाहीं, हें कोठें सिद्ध होतें! उलट तिचें आयुष्य जास्त सुखी करण्यासाठींच तो तिच्या वाटेवरून बाजूला झाला. असें नाहीं का. मग प्रेमाचें सोंग पांघरून तो कसा काय बसणार?"

अशा प्रकारें मौन भंग होतांच वेताळ नाहींसा झाला व पुन्हां झाडावर जाऊन फांदीवर लटकूं लागला. (कल्पित)






# हातावर तुरी

सहस्र वर्षें लोटली असतील, फार पूर्वी हान्ग चौ नगरीं एक प्रसिद्ध चोर रहात असे. त्याचें खरें नांव कोणालाहि माहीत नव्हतें. त्यानें शेकडों घरीं चोरी केली असेल पण तो कधीं कोणाच्या नजरेस पडला नव्हता. तो ज्या घरांत चोरी करीत असे त्या घरांत भिंतीवर लिहून ठेवी—"हा पहा आलों!" म्हणून लोक त्याला "हा पहा आलों!" या नांवानेंच ओळखीत.

हळूं हळूं 'हा पहा आलों' चे अत्याचार इतके वाढले कीं लोकांना असह्य वाटूं लागले. सरकारकडे गाऱ्हाणी जाऊं लागलीं कीं चोराच्या अत्याचारांना आळा बसेल असें कांहीं तरी करावें. राजानें आपल्या कोतवालाला बोलावून हुकूम सोडला कीं एका महिन्याचा आंत चोर पकडला गेला नाहीं तर एकेकाला फांशीवर चढविण्यांत येईल.

चोर हुशार होता. त्याला पकडणें कांहीं सोपें काम नव्हतें. परंतु काम कितीहि कठीण असलें तरी मन लावून केलें तर अशक्य गोष्ट देखील शक्य होते. कांहीं सैनिकांनीं आपला जीव वांचविण्यासाठीं एका माणसाला धरलें आणि न्यायाधिशासमोर त्याला उभा करून म्हणाले—"हाच तो चोर! शिक्षा करावी!"

न्यायाधिशानें विचारलें—"तुमच्याजवळ पुरावा काय आहे? कोणी साक्षीदार आहे का?"

सैनिक म्हणाले—"साक्षीदार कशाला हवा? इतकी धांवपळ करून आम्ही त्याला पकडलें आहे. आमच्यावर आपला विश्वास नाहीं का?"

"मालक, मी नाहीं चोरी केली. कोणाला तरी पकडून आपल्या समोर हजर करून स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं यांनीं माझ्यावर



हा अत्याचार केला आहे." सैनिकांनीं कैद करून आणलेला मनुष्य म्हणाला.

सैनिकांच्या वतीनें कोतवाल म्हणाला—"याच्या थापांवर विश्वास करणें बरोबर होणार नाहीं. हाच खरा चोर आहे. जर आतां याला सोडून दिलें तर हा पुन्हां हातीं लागणार नाहीं."

कोतवालानेंच इतका आग्रह केल्यावर न्यायाधीश म्हणाला—"तर मग याला तुरुंगांतच ठेवा. जोंपर्यंत न्यायविचार पूर्ण होत नाहीं तोंपर्यंत याला तेथेंच राहूं द्या. खरें खोटें कळेलच लवकर."

ज्याला धरलें होतें तोच खरा चोर होता. तुरुंगांत पाय पडल्याबरोबर तो जेलरला विनम्रपणें म्हणाला—"हुजूर, नवे कैदी आपल्याकडे रिकाम्या हातानें आलेले आपणांस आवडत नसतील, नाहीं. पण मी काय करूं! या शिपायांनीं मला धरलें तेव्हां माझ्याजवळ जें कांहीं होतें तें सर्व यांनीं लुबाडून घेतलें. आपल्याला हरकत नसेल तर आपण त्या डोंगरावरच्या देवीच्या देवळांत जाऊन मागच्या बाजूस पिंपळाच्या पाराखालीं पुरून ठेवलेलें धन घेऊन या. सोन्याच्या दहा विटा आणि मणभर चांदी आहे."

त्याच्या बोलण्यावर जेलरचा विश्वास बसला नाहीं. तो म्हणाला—"तूं बराच बाताड्या दिसतो आहेस कीं रे!" पण तो त्याच्या बोलण्याची प्रचीति पटावी म्हणून देवीच्या देवळांत गेला व खरोखरच चोरानें सांगितल्या प्रमाणें त्याला तेथें धन मिळालें. म्हणून चोराची मिजास तुरुंगांत वाढली.

कांहीं दिवसांनीं चोर म्हणाला—"मालक, पुलाखालीं देखील मी धन पुरून ठेवलें आहे. तें सुद्धां पाहिजेतर घेऊन या."

"पुलावर नेहमीं लोकांची येजा असते!" जेलर म्हणाला.

"त्यांत काय? कपडे धुण्याकरतां म्हणून एका टोपल्यांत कपडे घालून पुलाखालीं जा. तेथें कपडे काढून ठेवा आणि धन टोपलींत भरून त्यावर पुन्हां ओले कपडे ठेवून घेऊन या! वेश पालटून जा म्हणजे झालें!" चोर म्हणाला.

जेलरनें तसेंच केलें. या खेपेस त्याला जास्तच सोनें व चांदी मिळाली. अर्थातच जेलरचा चोरावरचा विश्वास वाढत गेला. दोघांची मैत्री वाढत गेली. त्या दिवशीं रात्रीं जेलर चोराला भेटायला आला. बरोबर प्यायला दारूसुद्धां घेऊन आला.

दोघे दारू पिऊन गप्पा मारीत बसले होते. संधी पाहून चोर जेलरला म्हणाला—"मित्रा! तुझ्या सारखा मित्र मी आपल्या आयुष्यांत कधींच पाहिला नाहीं. म्हणून तुला आपली घरची स्थिति सांगत आहें. माझी बायको फार आजारी आहे. मला शिपायांनीं धरून आणलें तेव्हां तिच्या प्रकृतीची फारच नाजुक स्थिति होती. माझ्या एकुलत्या एका तहान्या मुलाची काय स्थिति झाली असेल, देवच जाणें. एकदां भेटून यावें म्हणतों. मी निर्दोष आहें. मी 'हा पहा आलों' नाहीं हें



कळल्यावर न्यायाधीश मला सोडीलच. पण तोंपर्यंत त्या माता व लेकरांचें काय होईल कोणास ठाऊक?"

कैद्याला असें जाऊं देणें कायद्याविरुद्ध असून सुद्धां त्याच्या उपकाराच्या भाराखालीं वांकून जाऊन जेलरला नकार देववेना. चोर फाटकांतून बाहेर गेला नाहीं तर भिंतीवर चढून पलीकडे गेला.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच तो परत आला आणि जेलरला जागा करून म्हणाला—"हा पहा आलों!" "हा पहा आलों!"

"तूं शब्दाचा धनी आहेस खरा!" जेलर खूष होऊन म्हणाला.

"अरे त्यांत काय! तुमचा अपमान झालेला मला कसा सहन होईल? तुमच्या उपकाराची फेड मी कधीं करूं शकणार नाहीं. तरी जराशी भेट म्हणून मी एक वस्तु तुमच्या घरीं टाकून आलों आहे. ती घेऊन या. मी जास्त वेळ येथें राहूं शकणार नाहीं." चोर म्हणाला.

जेलर घरीं निघून गेला.

"मी तुमच्याकडे निरोप पाठविणार होतें कीं तेवढ्यांत तुम्ही आलांत म्हणून बरें झालें. आज सकाळीं काय घडलें माहीत आहे का? घराच्या छपरावर धावलांचा आवाज ऐकूं आला. इतक्यांत हें गाठोडें वरून खालीं पडलें. सोडून पाहिलें तर आंत सोन्या चांदीच्या ताटल्या." जेलरची बायको म्हणाली.

जेलर तिला म्हणाला—"ठेवून घे. कोणाजवळ या विषयीं बोलूं नकोस. नीट संभाळून कोठें तरी ठेवून दे."

त्या दिवशीं न्यायालयांत जो कोणी आला, म्हणूं लागला कीं आज आमच्या घरीं "हा पहा आलों" आला होता आणि आमच्या घरांतील सोन्या चांदीच्या ताटल्या चोरून घेऊन गेला.

न्यायाधिशानें तें ऐकलें तेव्हां म्हणाला—मला वाटलेंच होतें कीं खरा चोर कोणी दुसराच असावा. सैनिकांनीं धरून आणलेला तो कोणी निरपराध असावा. खऱ्या चोराचे उपद्व्याप अजून चालूच आहेत. त्या बिचाऱ्या निरपराध माणसाला सोडून द्या. नंतर त्यानें सैनिकांना आज्ञा केली कीं खऱ्या "हा पहा आलों!" चोराला धरून घेऊन या. अशा तऱ्हेनें 'हा पहा आलों' नें सर्वांच्या हातावर तुरी दिली आणि पसरा झाला.





"मी नाहीं कांहीं केलें. तीच आळशी आहे आणि रडत बसली आहे."
"पण रडते कां आहे?"
"मुंग्यांच्या बिळावर बसली आहे. मुंग्या चावत आहेत. पण उठेल तर शपथ. आळशी कुठली!



"डॉक्टर साहेब! माझ्या बायकोच्या अंगावर नेहमीं मला डाग डाग दिसतात हो! माझ्या डोळ्यांत कांहीं दोष आहे का?"
"वा रे वा! तूं चित्ता आहेस, तुला डाग दिसणार नाहींत तर काय पट्टे दिसतील?"
"नव्हे हो, माझी बायको आहे चिंतीण!"




"ही एक पाय उचलून कां नाचते आहे?"
"दोन्ही उचलून नाचूं लागली तर जमिनी-वर आदळेल म्हणून!"



"हें पहा, जों पर्यंत तूं राजहंसिणी होशील तों पर्यंत मी देखील सोन्याची अंडीं देऊं लागेन, समजलें?"



# न्याय निवाडा

एका गांवीं एक शेतकरी रहात असे. त्याला तीन मुलें होतीं. वडील बारस्यावर वांटण्यासाठीं तिघांचें आपसांत भांडण सुरू झालें. प्रत्येक जण म्हणूं लागला कीं जमीन माझी आहे. भांडण अगदीं एकेरीवर आलें. आतां कोणी तरी मध्यस्थ शोधणें भाग होतें. ते तिघे गांवांतल्या एका वयस्क म्हाताऱ्याकडे गेले आणि म्हणाले—"तुम्हीच काय तो न्याय निवाडा करा!" म्हाताऱ्यानें तिघांचें म्हणणें ऐकून घेतलें आणि म्हणाला—"उद्यां मी काय तो निवाडा देईन.

म्हाताऱ्यानें उद्यां न्यायनिवाडा देईन असें सांगितलें खरें, पण काय उत्तर द्यावें हें त्याला सुचेना. त्याला असें वाटलें कीं जमिनीवर तिघांचा हक्क आहे. परंतु कांहीं तरी न्याय हा दिलाच पाहिजे. म्हणून तिघांच्या बुद्धीची परीक्षा घेऊन न्याय द्यावा.

दुसऱ्या दिवशीं तिघे त्याच्याकडे आले. तेव्हां म्हाताऱ्यानें त्यांना विचारलें—"मी जो निवाडा देईन तो तुम्ही मान्य करायला तयार आहां का?"

सर्व म्हणाले—"आम्ही तयार आहों!"

म्हातारा म्हणाला—"तर मग मी तुमच्या बुद्धीची परीक्षा घेणार आहें. मला जो सर्वांत अधिक हुशार वाटेल त्याला ही जमीन मिळेल. आहे कबूल?"

"कबूल?" सर्वांनीं एक मुखी उत्तर दिलें.

म्हातारा म्हणाला—"तुम्ही तिघे आळशी आहां पण तिघांत जास्त आळशी कोण हें नाहीं कळलें."

तिघे म्हणाले—"मी!"

मोठा म्हणाला—"मी रस्त्यावर कोठें आडवा निजलेला असलों आणि गुरें येऊन मला पायांखालीं तुडवून निघून गेलीं तरी मी उठणार नाहीं."

दुसरा म्हणाला—"मी घरांत झोपलों असलों आणि घराला आग लागली तरी मी पडात राहीन, पण उठणार नाहीं."

तिसरा म्हणाला—"वरून धूळ, माती व कोळिष्टकें खालीं पडत असलीं तरी माझ्या पापण्या लवतच नाहींत."

"एकाहून एक आळशी आहां तर तुम्ही! पण कायरे तुमच्यांत मोठा कोण, हें नाहीं कळलें मला," म्हाताऱ्यानें विचारलें.

"माझ्या लहानपणीं मला आठवतें मांजरें आडवीं पायांजवळ येऊन घुटमळत पण कोणी कधीं त्यांना बाजूला सारलेलें मी नाहीं पाहिलें." मोठा म्हणाला.

दुसरा म्हणाला—"आमच्या लहानपणीं मी बायकांनीं कोणाची निंदा केलेली पाहिली नाहीं." तिसरा म्हणाला—"मला ते दिवस आठवतात जेव्हां दहा जणांत फक्त एकच खरें बोलणारा मिळत असे!"

"तुमच्यापैकीं कोण मोठा आहे हें कळणें खरोखरच कठिण आहे. पण कोणाला जास्त चांगलें दिसतें सांगा पाहूं." म्हाताऱ्यानें विचारलें.



"दहा मैल दूर डोंगरावर बसलेला पक्षी कोण हें मी सांगूं शकेन." मोठा म्हणाला. "त्या पक्षानें डोळे मिटलेले आहेत कीं उघडलेले हें मी सांगूं शकेन!" दुसरा म्हणाला. "डोळ्यांत काय पडल्यामुळें त्यानें डोळे मिटले आहेत, हें मी सांगूं शकेन!" धाकटा म्हणाला.

"वा:! छान छान! प्रत्येकानें काय पण उत्तर दिलें आहे! आणखी एक प्रश्न विचारतों. तुम्हां तिघांत जास्त चपळ कोण आहे, सांगा पाहूं?" म्हाताऱ्यानें विचारलें.

"शेतांत तुम्ही एक हजार ससे आणि एक शिकारी कुत्रा सोडा. मी एक पायावर लंगडी करीत त्यांची राखण करीन. एक ससा देखील शेताच्या बाहेर जाऊं शकणार नाहीं." मोठा म्हणाला.

त्यांत काय ? डोंगरी किल्ल्यांत शिवरीचा कापूस ठेवा. मोठें तुफान आलें तरी कापसाची एक म्हातारी किल्ल्या बाहेर गेली तर शपथ !" दुसरा म्हणाला.

"मी पळत्या घोड्याच्या पायांना नाल ठोकूं शकतों." धाकटा म्हणाला.

"आतां सांगा, तुम्हां तिघांत जास्त अकलवान कोण ?" म्हाताऱ्यानें विचारलें.

"कोणाच्या केसांचा रंग मी पाहिला तर त्यावरून त्याच्या अंगाचें माप मला कळतें. मी सर्व कपडे माप घेतल्या-शिवाय छान शिवून देईन." मोठा म्हणाला.

"मला रंग पाहण्याची सुद्धां गरज नाहीं. फक्त नांव सांगा ! नांव ऐकूनच मला अंगाचें माप कळेल." मधला म्हणाला.

म्हाताऱ्यानें तिसऱ्याकडे वळून विचारलें— "काय रे बुवा ! तुझें काय म्हणणें आहे ?"

"माझें उत्तर विचारतां ? माझ्या समोर कोणी न्यायनिवाडा मागायला आलें आणि मला न्याय निवाडा द्यायचें साधलें नाहीं तर मी प्राण गेलें तरी तें कळूं देणार नाहीं कीं मला तें साधलें नाहीं !" तिसरा म्हणाला.

लगेच म्हातारा खाकरून म्हणाला— "बरोबर उत्तर दिलेंस ! ही जमीन याची आहे. हाच सर्वांत हुशार आहे." म्हातारा म्हणाला.

म्हाताऱ्याचा मनाची मनस्थिति फक्त धाकट्यानें बरोबर ओळखली होती. म्हातारा काय न्याय निवाडा द्यावा या विचारांत पडला होता. दुसऱ्याची मनःस्थिति ठीक आळखूं शकणाराच हुशार असतो.



## गलिवरच्या सफरी



मी ज्या पलंगावर निजलों होतों तो २४ फूट उंच व ६० फूट लांब रुंद होता. उठून पाहिलें तर दोन्ही बाजूंनी दोन भयंकर उंदीर माझ्यावर झडप घालायला टपून बसलेले होते. लगेच मी आपला सुरा काढला आणि एकाचा मुडदा पाडला. तें पाहून दुसऱ्यानें पाय काढला. त्यांची शेपटीच ६ फूट लांब होती.



इतक्यांत मालकीण आली. उंदराचा मुडदा पाहून तिनें आपल्या नऊ वर्षे वयाच्या मुलीला माझ्या संरक्षणासाठीं नेमलें.



त्या मुलीनें मला आपल्या घरकुलांतल्या पाळण्यांत बाहुल्यासारखें झोपविलें आणि भाषा शिकविली. ती मुलगी होती म्हणून फक्त ४० फूट उंच होती.



त्या दिवशीं मालकाचा कोणी म्हातारा मित्र मला पहायला आला. त्याचा चष्मा मला दोन चांदोबां सारखा भासला. मी हंसूं लागलों.



तो मित्र मालकाला एका बाजूला बोलावून घेऊन गेला आणि मला गांव गांव फिरवून पैसे मिळवितां येतील असा सल्ला दिला.



दुसऱ्या दिवशीं मालकानें मला एका पेटींत ठेवलें आणि मुलीच्या हातांत ती पेटी देऊन दोघे घोड्यावर बसून जवळच्या गांवच्या जत्रेला निघाले.



तो घोडा भरधांव पळूं लागल्यावर मी पेटीच्या आंत चेंडूसारखा वर खालीं पेटीच्या फळ्यावर आपटूं लागलों. त्या गांवांत उतरल्यावर...



"अद्भुत बुटका पहा!" अशी गांवभर दवंडी पिटविण्यांत आली. एका मोठ्या दालनांत तीनवेळां वर्गफूट मंचावर प्रदर्शनाची व्यवस्था करण्यांत आली. मला प्रश्नांचीं उत्तरें देणें, तलवारीचे हात दाखविणें आणि वाकून अथवा मान लववून दाखविणें अशीं कामें करून दाखवावीं लागत.



गांवोगांव माझी कीर्ति पसरली. पैशाचा पाऊस पडूं लागला. मालकाचा लोभ वाढूं लागला. सरळ राजधानींत तो मला घेऊन गेला.



रोज रोज बाराबारा वेळां माकडासारखें मला नाचविण्यांत येई. अगदीं दमून जात असें मी.



त्या दिवशीं त्या देशाच्या राणीकडून मला घेऊन यायला निरोप आला. मालकाबरोबर मी राजवाड्यांत गेलों.



राणीच्या हाताची करंगळी धरून मी रीतीप्रमाणें तिला अभिवादन केलें. तिनें मला आपल्याकडेच राहण्यास सांगितलें. मी कबूल केलें.



मालकाला हजार मोहरा देऊन तिनें त्याची बिदागी केली. पण मी अट घातली, माझी काळजी घ्यायला मालकाच्या मुलीनें रहावें.



मी त्या शेतकऱ्याच्या लोभामुळें किती त्रास सोसला त्याचें वर्णन आपल्या मोडक्यातोडक्या भाषेंत राणीजवळ निवेदन केलें.



तिला माझें बोलणें ऐकून फार आश्चर्य वाटलें, माझ्यासारख्या बुटक्या माणसाला सुद्धां सुखदुःख व ज्ञान आहे. तिनें मला नेऊन राजाला दाखविलें. राजानें प्रथम मला चालता बोलता बाहुला समजून दुर्लक्ष केलें. माझें बोलणें व वागणें पाहिल्यावर मात्र त्याला विश्वास वाटला.



त्यानें मला मागून पुढून ध्यानपूर्वक पाहिलें आणि नोकरांचाकरांना आज्ञा केली कीं माझी काळजी घेतली पाहिजे.



माझ्या राहण्यासाठी १६ फूट लांब रुंद व १२ फूट उंचीची एक लाकडी पेटी तयार करण्यांत आली. दोन खुर्च्या व एक टेबल पण देण्यांत आलें.



मी रोज राणीबरोबर जेवायला बसत असें व राजाबरोबर गप्पा मारीत असें. तो मला आपल्या देशाविषयीं प्रश्न करी आणि उत्तर ध्यानपूर्वक ऐकी.



राणीचा तर मी फारच लाडका होतों. ती मला आपल्या गालाजवळ उभा करून आरशांत पाही.



राजाच्या पदरीं एक खुजा नोकरी करीत असे. तसा तो तीस फुट उंच होता. त्याचें माझ्याशीं पटत नसे त्यानें मला एके दिवशीं मलईच्या भांड्यांत टाकलें.

# कोप कां असा ?

[श्री दत्ता भोंदकर पांढरकवडा]



सांग देवा सांग आतां
कोप हा रे कां असा ? ॥ ध्रु ॥

आकाशांतील ताऱ्यांसम मी
पोटीं होतो आईच्या त्यां
उभ्या वेलीची आंस छेडुनी
का रे केले दूर आईला ?

उंच शिखरीं प्रेमळ येतीं
सूर्याचीं तीं कोमल किरणें
मजपासून कां दूर सारलीं
आईची ती कोमल काया ?

धरतीवरच्या वनवेलींना
असे आसरा कुणी कुणाचा
मीच असा हा दुर्भागी कां
सांग देवा कोप कशाचा ?

खळखळणाऱ्या जलधारांना
दर्या घेतो पोटीं निरंतर
सांग देवा सांग आतां
दुर्भागी कां मीच असा ?

नेत्रांतील या गोलांवरती
ज्योत आईची मिणमिणतें
हृदयांतील या हुंदक्यांना
कसें आवरूं सांग आतां ।

या धरतीवर मजला आतां
कुणीच नाहीं घेण्याकरतां
आसूंसलेल्या डोळ्यांतील या
गळत्या धारा थांबविण्याला ।

सायंकाळी सूर्याला पण
संध्या घेतें पोटीं निरंतर
मनला आतां पोटीं घेण्यां
"आईला" मम पाठव देवा ।



टोन्क तोडाचा राजा राय सुर्तान फार उच्च अशा रजपूत क्षत्रिय कुळांतला एक वीर पुरुष होता. परंतु सिल्ला नांवाच्या एका पुरुषास आपला पुढारी करून पठाणांनीं तो किल्ला जिंकून स्वतःच्या स्वाधीन करून घेतला. त्यामुळें राय सुर्तानला टोन्क तोडा सोडून पळून जावें लागलें. तो मेवाड आणि बेदोर राज्यांत येऊन राहूं लागला. एवढें झालें तरी पुन्हां आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं तो सारखी खटपट करीत राहिला.

राय सुर्तानाला ताराबाई नांवाची एकुलती एक मुलगी होती. ती लहान असतां तिचे वडील तिला मांडीवर बसवून घेऊन मोठमोठ्या वीरांच्या युद्ध कौशल्याच्या गोष्टी सांगत असत. ती त्या गोष्टी लक्ष लावून ऐकत असे. त्या ऐकत असतां ती इतकी एकाग्र होत असे कीं आपण प्रत्यक्ष युद्ध करीत आहोंत असें तिला वाटे.

आपल्या पराजयाची गोष्ट आणि किल्ला सोडून आल्याचें वर्णन जेव्हां राय सुर्तान आपल्या मुलीला सांगत असे तेव्हां त्याच्या डोळ्यांत पाणी येई. तें पाहून त्या चिमुरड्या मुलीलाहि वडिलांची कींव येई. ती म्हणे—

“बाबा, मी मुलगा झालें असतें तर टोन्क तोडा जिंकून पुन्हां तुम्हांला परत आणून दिला असता.”

तिचे ते बोल ऐकून बापहि एक दीर्घ निश्वास सोडून तिला प्रोत्साहन देई. पण आपल्याला एकहि पुत्र नाहीं ह्याचें त्याला फार दुःख होई.

ताराबाई युद्धाचीं वर्णनें आणि नवीन नवीन गोष्टी ऐकत असे. त्या बरोबर तिच्या अंगांत स्फुरण चढत असे, आणि



आपल्या परिस्थितीचा विचार करून राज्य गेल्यामुळें बापाला जेवढें दुःख होई तेवढें दुःख तिला वाटूं लागे. इतकेंच नव्हे तर शत्रू विषयीं तिच्या मनांत क्रोध वाढूं लागला.

आपल्या मनाविरुद्ध झालेली कोणचीहि गोष्ट तिला सहन होत नसे.

ती वाढत गेली, तशी तिची युद्धाची हौस वाढत गेली, तिचे विचार वाढत गेले. आपण स्त्री असल्याबद्दल तिला फार वाईट वाटूं लागलें. तिला वाटे मी मुलगी आहें म्हणून मला शस्त्रास्त्र घेऊन वडिलांच्या बरोबर युद्धाला जातां येत नाहीं.

पण एक दिवस तिच्या मनांत आलें कीं पूर्वी जशा रजपूत स्त्रिया ढाल तलवार घेऊन रणांगणावर युद्धाला जात असत तसें आपण गेलें तर काय हरकत आहे? तिचे विचार बळाऊ लागले आणि शस्त्रविद्या शिकण्याचा तिनें पक्का निश्चय केला. तिनें आपले सुंदर कपडे व दागदागिने काढून टाकले. एकाद्या युवराजाप्रमाणें पोशाख केला आणि आपल्या वडिलांच्या समोर जाऊन म्हणाली—

“आजपासून तुम्हीं मला आपला मुलगा समजा.” तिच्या ह्या वागण्याचें सर्वांना कौतुक वाटलें. तिचे वडील तर क्षणभर स्तब्धच राहिले. त्यांना हे रूढीला सोडून केलेलें काम आवडलें नाहीं. जर तिला युद्धांत यश मिळालें नाहीं तर उगाच तिचें हंसें होईल ह्याची त्यांना कल्पना होती. पण ते तिला त्यापासून परावृत्त करूं शकले नाहींत.

ती आतां अंतःपुरांतील इतर स्त्रियांशीं फटकून वागूं लागली. कधीं कधीं कोणी म्हणत, ह्या असल्या मुलीशीं कोण लग्न करणार? पण ती तें हंसून उडवून लावी.

थोड्याच दिवसांत ताराबाई शस्त्रविद्येंत निपुण झाली. तलवारीचे हात, भालाफेक,

तीर मारणें वगैरे कलांत तिनें प्राविण्य मिळविलें. ती घोड्यावर उत्तम बसूं लागली. तिच्या ह्या सर्व हुशारीची आणि सौंदर्याची सर्वकडे वाहवा होत राहिली.

ह्या कालावधींत राय सुर्ताननें आपलें राज्य परत मिळविण्यासाठीं किती तरी वेळां प्रयत्न केले. परंतु त्याला यश आलें नाहीं. तरी त्यानें पुन्हां एकदां प्रयत्न करण्याचा निश्चय केला व युद्धाची तयारी करूं लागला.

"बाबा, ह्यावेळीं मीहि येतें. आपल्या बरोबर सर्व तऱ्हेचा त्रास सोसण्यास मी तयार आहें आणि युद्ध करण्याची हिम्मत सुद्धां माझ्यांत आहे. ह्यावेळीं युद्धाला जाल तेव्हां मी येणारच." ताराबाई म्हणाली.

"जशी तुझी इच्छा. जर पराभव झाला तर अपयशाचा वांटाहि पदरीं येईल." राय सुर्तान म्हणाला.

ताराबाईनें युद्धभूमीवर आपलें कौशल्य दाखविलें. बापाच्या खांद्याला खांदा लावून लढली. परंतु पराजयाचें ताटच त्यांच्या पुढें वाढून ठेविलें होतें. दोघेहि आपल्या उरलेल्या सैन्यासह माना खालीं घालून परतले. ह्या युद्धांत ताराबाईला पराजय मान्य करावा लागला. हा तिचा पहिला पराजय होता. पण राय सुर्ताननें पुन्हां युद्ध न करण्याचा निश्चय केल्यामुळें त्याचा हा अखेरचा पराजय ठरला.

ताराबाईच्या पराक्रमाची आणि सौंदर्याची कीर्ति देशोदेशींच्या राजवाड्यांत दुमदुमूं लागली. म्हणून तिच्याशीं लग्न करण्यासाठीं ठिकठिकाणच्या राजांनीं नजराणे पाठविले. परंतु तिनें कोणाचाहि नजराणा स्वीकारला नाहीं. तिनें त्या सर्वांना उलट निरोप पाठविला कीं जो कोणी माझ्या वडिलांचें गेलेलें राज्य परत मिळवून देईल त्याच्याशीं मी लग्न करीन. पण कोणीहि पठाणांशीं वैर करण्यास तयार होईना.

मेवाडच्या राण्याला तीन मुलें होतीं, पहिला राणा संग, दुसरा पृथ्वीराय आणि तिसरा जयमल्ल. हे तिघेहि राज्यासाठीं आपसांत लढत होते. पुढें पृथ्वीराय आपला देश सोडून गोंड्वारला गेला व तेथील राजा झाला. जयमल्ल कांहीं दिवस इकडे तिकडे भटकत राहिला व शेवटीं बेदोरांत येऊन थडकला.

तेथें आल्यावर त्यानें ताराबाईला मागणी घातली. परंतु इतर रजपूत राजकुमारांना तिनें जी अट घातली तीच याला देखील घातली.







जयमलानें तें मान्य केलें. परंतु त्यांत त्याचा हेतु फार निराळा होता. तो पठाणांशीं मुळींच युद्धास तयार नव्हता. त्यानें विचार केला कीं कसें तरी करून एकदां लग्न करून घ्यावें म्हणजे राय सुर्तानचें सैन्य आपल्याला मिळेल आणि मग त्या सैन्याच्या बळावर राणा संग याच्यावर स्वारी करून त्याचें राज्य बळकावतां येईल.

पण त्याचा कावा ताराबाईच्या लक्षांत आला. तिनें आपल्या वडिलांना ती गोष्ट सांगितली.

जयमल कांहीं दिवस पाहुणा म्हणून त्यांच्या घरीं राहिला. त्या अवधींत त्यानें ताराबाईला एकांतांत गाठण्याचा प्रयत्न केला. पण ताराबाईनें आपल्या वडिलांना बोलावून त्याला चांगला चोप देववून घालवून दिलें.

ही बातमी पृथ्वीरायाला जेव्हां समजली तेव्हां त्याला वाटलें कीं ताराबाईसारखी आपल्याला बायको मिळाली तर एकच काय दहा राज्यें जिंकून आणतां येतील. म्हणून राय सुर्तानला त्याचें राज्य देऊन ताराबाईशीं लग्न करण्यासाठीं तो बेदोरला आला.

पृथ्वीराय जितका पराक्रमी होता तितकाच सज्जन होता. त्याचें रूपहि राजाला शोभेसेंच होतें. त्याला पाहिल्याबरोबर ताराबाई त्याच्या रूपावर भाळली. तोहि तिला पाहतांच मोहित झाला.

पृथ्वीरायानें तिला सांगितलें कीं मी तुझ्या वडिलांचें राज्य जिंकून आणून त्यांना परत देण्यासाठीं जात आहें. "मीहि येतें युद्धाला तुमच्या बरोबर," ती म्हणाली. तिला त्याच्याबद्दल आपलेपणा वाटूं लागला. त्याच्या सुखदुःखांत सहभागी व्हावें असें तिला वाटलें.

पृथ्वीराय युद्धाच्या तयारीस लागला. त्यानें आपल्या सैन्यांतील निवडक पांचशें घोडेस्वार बरोबर घेतले आणि युद्धास निघाला. ताराबाईनें त्याच्या बरोबर युद्ध-भूमीवर जाण्याचा हट्ट धरला.

पृथ्वीराय युद्धास निघाला तेव्हां परिस्थिति अगदीं त्याच्या अनुकूल होती. मोहर्रमचे दिवस होते. सर्व मुसलमान शोक सागरांत जणूं कांहीं बुडून गेले होते. त्यामुळें पृथ्वीराय आणि ताराबाई सेना घेऊन आल्याचें कोणाला समजलेंहि नाहीं. त्यांनीं आपलें सारें सैन्य टोन्क तोडा शहराच्या बाहेर ठेविलें आणि एका विश्वासू सैनिकाला घेऊन ते तिघे शहरांत घुसले. त्यांच्या विषयीं कोणालाहि संशय आला नाहीं. म्हणून कोणीहि त्यांना अडविलें नाहीं. ते राजपथावरून जाऊं लागले. तेव्हां पठाण सरदार आपल्या महालांतून ओरडला—"हे तिघे कोण आहेत? कोठून आले आहेत? पकडा त्यांऽऽ...."

त्याचें वाक्य पूर्ण होण्याच्या आंतच पृथ्वीरायाचा भाला आणि ताराबाईचा बाण त्याच्या छातींत घुसला व तो वरच्या मजल्यावरून खालीं रस्त्यांत कोसळला.



      

एकाएकीं सर्वकडे धांवपळ सुरू झाली. लोक त्या तिघांना पकडण्यासाठीं धांवले. परंतु तेथील हिंदूलोकांनीं त्यांचें रक्षण करून त्यांना गांवाच्या बाहेर पोंचतें केलें. तरी वेशीवरच्या दाराशीं एक मोठा हत्ती त्यांची वाट अडवून उभा होता. ताराबाईनें मोठ्या धैर्यानें हत्तीची सोंड उडवून दिली. त्या वेदनेनें तो बेफाम होऊन पळत सुटला. संधी पाहून तिघेहि गांवाबाहेर निघून गेले.

बाहेर त्यांचें सैन्य तयार होतेंच.

त्यांनीं पठाणाच्या सैन्याचा सामना केला. त्यांत बरेच पठाण मारले गेले. कांहीं पळून गेले.

नंतर पृथ्वीरायानें सैन्यासह नगरांत प्रवेश केला आणि उरलेल्या शत्रूंचा नाश केला. अशा तऱ्हेनें त्यानें टोन्क तोडा आपल्या स्वाधीन करून घेतला. पुढें त्यानें राय सुर्तानला मोठ्या समारंभानें टोन्का तोडांत आणलें व सिंहासनावर बसविलें.

ताराबाईची अट पृथ्वीरायानें पूर्ण केली म्हणून ताराबाईला व राय सुर्तानाला फार आनंद झाला. राय सुर्ताननें सुद्धां आपल्या वचनाप्रमाणें मोठ्या थाटामाटानें ताराबाई व पृथ्वीराय यांचें लग्न लावून दिलें.

टोन्क तोडाच्या विजयामुळें अजमीरच्या सुलतानाचें रक्त खवळलें. परंतु पृथ्वीरायानें ताराबाईसह एक मोठें सैन्य घेऊन जाऊन त्याच्यावर हल्ला केला. दोघांचें मोठें युद्ध झालें. पण अजमीरचा सुलतान हारल्यानें तें राज्यहि पृथ्वीरायानें टोन्क तोडाच्या राज्यांत मिळवून टाकलें.

आज सुद्धां अजमीर जवळ एक किल्ला आहे. तो 'तारागड' नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचें नांव उच्चारतांच ताराबाईची आठवण आल्याशिवाय राहात नाहीं.






## बहिऱ्याची धांदल

रात्रीं जेवणें आटोपल्यावर आजोबा खुर्ची टाकून अंगणांत येऊन बसले. तपकीर नाकांत कोंबीत आकाशाकडे पाहांत आपल्या नादांत ते गुणगुणले.

"परोक्ष वा व्याकर्ण्य
न युक्तं प्रतिभाषितुम्
बहिर्निष्कासितः कोपि
बधिरः प्रतिकूल्याक् ।"

सर्व नातवंडें तेथेंच खेळत होतीं. त्यांच्या कानावर हा श्लोक पडला. त्यांना त्याचा अर्थ कळून घ्यावेसें अर्थातच वाटलें. "म्हणजे काय सांगाना आजोबा ?" मुलांनीं आजोबांना विचारलें.

"ह्याचा अर्थ ना ! लक्ष देऊन ऐका हं ! कोणाचेंहि म्हणणें पूर्ण ऐकून घेतल्या शिवाय कोणीं कधीं उत्तर देऊं नये. एका बहिऱ्यानें असेंच कांहीं तरी उत्तर दिल्यामुळें त्याला मार खावा लागला होता. असा अर्थ आहे याचा. समजलें ?" आजोबांनीं सांगितलें.

"नुसतें एवढेंच काय सांगतां हो आजोबा ! त्या बहिऱ्याचें काय झालें ती गोष्ट देखील नीट सांगा ना !" मुलें म्हणालीं आणि हट्टाला पेटलीं.

तेव्हां आजोबा गोष्ट सांगूं लागले, एकदां कांचीपुरांत देवशर्मा आणि हरिशर्मा नांवाचे दोन ब्राह्मण राहात होते. ते दोघे बालपणापासूनचे मित्र होते.

उतार वयांत देवशर्माची श्रवणशक्ति थोडी कमी होऊं लागली. पण ही गोष्ट कोणास कळूं नये व आपली मान खालीं होऊं नये म्हणून तो फार काळजी घेत असे.

एकदां हरिशर्मा फार आजारी पडला. बरेच औषधोपचार झाले तरी त्याला गुण आला नाहीं. शेवटीं तो अगदीं निराश झाला.








देवशर्माला हें समजतांच तो त्याला भेटण्यासाठीं आला. पण आपला बहिरेपणा त्याला कळूं नये म्हणून दोनतीन प्रश्नांनीं विचारपूस करून परत यावें असा त्यानें बेत केला.

देवशर्माला पाहून हरिशर्माला फार फार आनंद झाला. त्यानें त्याला आपल्या जवळ बसवून घेतलें.

"कशी काय आहे प्रकृति?" देवशर्मानें विचारलें.

"ठीक होण्याची कांहीं लक्षणें दिसत नाहींत." हरिशर्मा म्हणाला.

देवशर्माला कांहींच ऐकूं आलें नव्हतें. पण आपणांस छान ऐकूं आलें हें दाखविण्यासाठीं आणि "ठीक आहे" असेंच उत्तर असणार असें समजून तो म्हणाला— "हं! देवाच्या दयेनें असेंच होतें, राहूं दे! औषध वगैरे?"

"ह्याला औषध म्हणजे एक मरणच." हरिशर्मा म्हणाला.

"फार चांगलें औषध आहे. कोण, वैद्य कोण आहे?" त्यानें विचारलें.

"वैद्य! यमराज आणि कोण!" मनांतून संतापत हरिशर्मा म्हणाला.

"त्यांच्यावरचा विश्वास ठेव. फार चांगले आहेत ते!" देवशर्मा म्हणाला.

जवळ बसलेले हरिशर्माचे नातेवाईक त्या दोघांचा संवाद ऐकतच होते. त्यांना देवशर्माचा राग आला. म्हणून सर्व जण एकदम त्याच्यावर उठले. त्या सर्वांनीं मिळून त्याला खूप चोपून काढलें आणि घरांतून घालवून दिलें.

"नीट ऐकल्याशिवाय व समजल्याशिवाय उत्तरें दिल्यानें कसें नुकसान होतें पाहिलेंत ना?" असें सांगून आजोबांनीं गोष्ट संपविली.



# नालंदा विश्वविद्यालय

भारतखंडाच्या इतिहासांत 'गुप्त' काळाला सुवर्ण युग म्हटलें आहे. ह्या काळांतच शिल्प आदि विविध कलांची उन्नति झाली. अजिंठ्याच्या लेण्यांतील कांहीं लेणीं ह्याच काळांत कोरली गेलीं. ह्याच राजांच्या पदरीं कालिदास, दंडी वगैरे सारखे श्रेष्ठ कवि होते. ह्या राजांनीं विद्वानांच्याकडून ग्रंथ व काव्यें लिहून घेतलीं.

इ. स. ४१६ मध्यें विक्रमादित्याचा मुलगा पहिला कुमार गुप्त राजा झाला. त्यानेंच नालंदा जवळ एका विश्वविद्यालयाची स्थापना केली. येथें बौद्ध ग्रंथांच्या बरोबर वैदिक ग्रंथांचेंहि पठन पाठन चालत असे.

हें विद्यालय सातशें वर्षेपर्यंत उत्तम चाललें. त्यांत फक्त आपल्या देशांतीलच नव्हे, तर दक्षिण भारतांतील चीन वगैरे देशांतून सुद्धां लोक येत असत. अशाच प्रवाशांपैकीं हुएन संगनें येथें राहून अध्ययन केलें व ह्या विश्वविद्यालयासंबंधीं महत्वपूर्ण गोष्टीहि लिहून ठेविल्या.

ह्या विश्वविद्यालयाचे अवशेष पाटण्यापासून पूर्वेकडे अवघे ६० मैल दूर आहेत.



प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळें :

## उज्जयिनी - वेधशाळा

श्री. प्रभाकर नारायण आठल्ये, उज्जयिनी.

ज्योतिष शास्त्राच्या प्रगतीसंबंधीं उज्जयनीची कीर्ति फार पुरातन काळापासून आहे. येथील ज्योतिर्लिंगाचें नांव श्रीमहाकालेश्वर असें आहे. यावरून असें दिसतें कीं महाकालेश्वराची स्थापना होण्याच्या पूर्वीपासून उज्जयनीची कालज्ञाना संबंधीं प्रसिद्धी झाली होती. येथील रेषा मुख्य मानण्याचा उल्लेख शका पूर्वी ३०० ते ४०० चे सुमारास रचलेल्या आर्यसूर्यसिद्धांत ग्रंथांत आला आहे. निदान त्या कालापासून तरी उज्जयिनीला हिंदुस्थानची ग्रीनवुइच असल्याबद्दलचा मान लोक देत आले आहेत. मात्र त्याकाळीं येथें कोणत्या प्रकारची वेधशाळा होती व तेथें कोणत्या रीतीनें वेध घेत असत, याबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं. हल्लींची वेधशाळा जयपूरचा राजा जयसिंह यानें ई. स. १७३० चे सुमारास बांधिली व तिच्यांत ७-८ वर्षे वेध घेऊन ज्योतिषाच्या कांहीं मानांत सुधारणा केली. परंतु त्याच्या मरणानंतर ही वेधशाळा भग्नावस्थेंत राहिली. पुढें ई. स १९०५ सालीं मुंबई येथें अखिल भारतीय ज्योतिष्यांची सभा झाली. त्या सभेंत ज्योतिषशास्त्राच्या उन्नति करितां वेधशाळेची अवश्य स्थापना झाली पाहिजे असा ठराव केला. त्या ठरावाला मूर्तस्वरूप देण्याकरितां उज्जयिनी येथील पंडिताश्रम सभेनें खटपट करून ग्वाल्हेर दरबारची सहानुभूति मिळविली. तिचा परिणाम असा झाला कीं, कै. माधवराव महाराज शिंदे यांनीं खर्चाची स्वीकृती देऊन जयपूरचे ज्योतिषी गोकुळचंद भावन यांच्या देखरेखीखालीं या वेधशाळेचा ई. स. १९२३ मध्यें जीर्णोद्धार केला. पुढें ई. स. १९२५ मध्यें पुणें येथें जी पंचांग शोधन सभा झाली, तिनें ठराव केला कीं या वेधशाळेंत वेध घेण्याचें काम जारी करण्याबद्दल ग्वाल्हेरच्या महाराज साहेबास विनंति करावी. ती विनंति सरकारांनीं मान्य केली. या वेधशाळेंत एकंदर यंत्रें चार आहेत. तीं चुना, विटा, माती व दगड यांनीं बांधलेली आहेत. साधारण व्यावहारिक ज्योतिषशास्त्र शिकण्यास तीं पुरेशीं आहेत.

## फोटो जोडनांवें चढाओढ

फेब्रुवारी १९६१ :: बक्षिस १० रुपये





**कृपा करून जोडनांवें पोस्ट-कार्डावरच पाठवावीत.**

वरील फोटोंची ओळख करून देणारी जोडनांवें दोन ते चार शब्दांत किंवा त्याहून मोठी पण परस्परांशीं थोडेंफार साम्य दर्शविणारी असावीत आणि तीं जोडनांवें पोस्ट-कार्डावर स्वतःचें नांव व संपूर्ण पत्त्यासह ७ डिसेंबर १९६० पूर्वी खालील पत्त्यावर पाठवावीत. पोस्ट-कार्डाखेरीज आलेलीं जोडनांवें स्वीकारण्यांत येणार नाहींत.

**चांदोबा फोटो जोडनांवें चढाओढ,**
**चंदामामा प्रकाशन, मद्रास-२६.**

### डिसेंबर महिन्याचा निकाल

या महिन्यासाठीं खालील जोडनांवें सर्वोत्तम ठरलीं आहेत. या महिन्याचा अंक प्रसिद्ध होतांच बक्षिस १० रुपये मनिऑर्डरनें प्रेषकाचें नांवीं रवाना करण्यांत येईल.

पहिला फोटो : **मेघ वाजवी गगनि नगारा !**

दुसरा फोटो : **पृथ्वी वर नाचवी मयूरा !!**

प्रेषक : **श्री. धों. आ. काळुंखे,**
गोलटगांव

